## अर्पणपत्रिका—

कर्तव्यनिष्ठा व न्यायप्रियता यांमुळें पारतंत्र्याच्या काळांतील सरकारी नोकरींतहि सरकार व समाजमान्यता पावलेले, ईश्वरावरील अनन्य विश्वास हें ज्यांच्या जीवननौकेचें एकमेव सुकाणु होतें, ज्यांच्या पराकाष्ठेच्या विद्याभिरुचीनें व्यसनाची मर्यादा गाठली होती अशा माझ्या परमपूज्य कै. ती. ना. दा. वाटेगांवकर यांच्या स्मृतीस त्यांचीच ही कृति अंशात्मक प्रकाशित स्वरूपांत अत्यंत श्रद्धायुक्त अंतःकरणानें व नम्रभावानें समर्पण करीत आहे.

# मनोरमा व शब्दरत्न

यांचे

# मराठी भाषांतर

## अनुक्रमणिका



ब्रम्हार्पणच मानावे लागले प्रस्तुत समग्र ग्रन्थाचा आकार सुमारे तीन हजार पृष्ठापर्यंत होणे संभवते हा समग्र ग्रन्थ स्वत च्या खर्चाने प्रकाशित करणे माझ्या आटोक्यातले नाही

अशा परिस्थितीत सांस्कृतिक संजीवनाच्या प्रवृत्तीच्या दृष्टीने केवळ अनमोल असा हा ग्रन्थ प्रकाशित करण्याचे जे व्यवहार्य पर्याय संभवतात त्याचे विवरण, प्रकाशनाच्या योजनाची रूपरेषा, जनतेकडून माझ्या अपेक्षा इत्यादीची कल्पना एक स्वतंत्र पत्रक काढून दिली आहे त्यापैकी एखादी योजना कार्यान्वित होऊन समग्र ग्रन्थ प्रकाशित होण्याचा योग ईश्वरकृपेने यावयाचा असेल तेव्हा येईल पण पितृऋणातून, अल्पांशाने का होईना उतराई होण्याच्या नम्र भावनेने व संस्कृतप्रेमी अभ्यासकांना या अलभ्य ग्रन्थाचा अल्पसा आस्वाद उपलब्ध करून द्यावा म्हणून तीर्थरूपाच्या प्रथम श्राद्धदिनी (ता १०–३–५१ ला) मी सदर भाषान्तरित ग्रन्थाचे पहिले सज्ञाप्रकरण वडिलांनी स्वत लिहिलेल्या प्रस्तावनेसह प्रसिद्ध करीत आहे शेष ग्रन्थ प्रसिद्ध होणे ईश्वरकृपेवर अवलंबून आहे त्या कृपेच्या आविष्काराची उत्कंठेने प्रतीक्षा करण्याव्यतिरिक्त आज मला दुसरे काही करता येणे शक्य नाही

या पुस्तकाच्या प्रकाशनाच्या कामी संस्कृताची प्रुफें तपासण्यात प्रो एस् पी चतुर्वेदी यांनी मला जी आपुलकीने मदत केली त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे कमर्शिअल प्रेसने छपाईच्या कामी केलेल्या मदतीबद्दल मी व्यवस्थापकांचा फार आभारी आहे तसेच माझ्या काही मित्रानी निवळ स्नेहाखातर मला जी अमूल्य व निरपेक्ष मदत केली तिच्याबद्दल त्यांचा नामनिर्देश करून मी आपल्या कृतज्ञतेचे स्वारस्य घालवू इच्छित नाही मित्रांचे सहाय्य नसते तर माझ्यासारख्या पामराला इतकेहि मजल गाठता आली नसती

अशेष शब्दब्रम्हाची अनन्यभावे उपासना करण्याच्या वृद्धीनेच माझ्या वडिलांनी ही वाङमयसेवा केली व त्यांच्याच प्रेरणेने हा प्रकाशनाचा योग आला तेव्हा तो त्यांच्याच चरणी रुजू होवो

धंतोली, नागपूर
२२–२–१९५१

स. ना वाडेगावकर

॥ श्रीगुरु शरणम् ॥

रा रा रावबहादुर ना दा वाडेगावकर यानी प्रौढ मनोरमा व शब्दरत्न या ग्रन्थाचे जें स्त्रीप्रत्ययान्त विवरण केले आहे त्याचा बराचसा भाग मी वाचला या ग्रन्थात प्रथम प्रत्येक पक्तीचा अक्षरार्थ देऊन पुढें कसान त्या पक्तीचे विस्तृत व मार्मिक विवरण केले आहे व आवश्यक ठिकाणी पूर्ण प्रक्रिया दिली आहे त्यामुळें ग्रन्थाचा बोध होण्यास साधारण बुद्धीच्या विद्यार्थ्याला देखील माझ्या मतें काही अडचण येऊ नये या ग्रन्थात ठिकठिकाणी भाष्य, प्रदीप, उद्योत, काशिका, पदमञ्जरी इत्यादि ग्रन्थातून समर्पक उतारे दिले असल्यामुळें हा ग्रन्थ आदर्शभूत झाला आहे व युनिव्हर्सिटीसारख्या सस्थानी हा माननीय ग्रन्थ सग्रही ठेवण्यास अत्यत लायक आहे विद्यार्थिवर्गाच्या हिताकरिता हा ग्रन्थ जितक्या लवकर छापला जाईल तितकें बरें व या ग्रन्थाचे हिन्दीत भाषान्तर करून तें छापल्यास यू पी , पजाब, बगाल, वगैरे प्रातातील विद्यार्थ्यांना फार फायदा होईल मी हा ग्रन्थ वाचून फार प्रसन्न झालो आहे व एवढे कठिण व्याकरणशास्त्राचे ग्रन्थ महाराष्ट्र भाषेत उतरविणे दुष्कर असून देखील रा ब. वाडेगावकर यानी हें जें काम सरळ व सुन्दर भाषा लिहून प्रशसनीय रीतिने केले आहे त्याबद्दल मी त्याचे मनःपूर्वक अभिनन्दन करितो

| बनारस , | गोपाल शास्त्री नेने |
|---|---|
| ता ६-१२-४४ | व्याकरणाध्यापक, ग स कॉलेज, बनारस |

॥ श्रीगुरु शरणम् ॥

संस्कृत भाषेतील शास्त्रीय ग्रन्थाचे मराठी भाषेत यथार्थ भाषान्तर करणे हे कार्य सगळ्यानाच उत्तम रीतिने साधते असे नाही प आचार्य भक्त विष्णुशास्त्री बापट, दीक्षित भाऊशास्त्री लेले, म म प वासुदेव शास्त्री अभ्यंकर प्रभृति दिवंगत व विद्यमान प घुण्डिराज शास्त्री ऊर्फ बापू दीक्षित बापट पाचगावकर प्रभृति ग्रन्थकारानी केलेली भाषातरें वजाकरिता बहुतेक भावार्थानुवादात्मकच भाषान्तरें आहेत म्हणावयास हरकत नाही भाषातरित ग्रन्थात सुद्धा वेदातादि शास्त्रीय ग्रन्थाची भाषातरें लोकात प्रचलित असलेल्या दृष्टातादिकानी सुरुचिरतरी करिता येतात परतु सर्वथा नीरस व क्लिष्ट अशा व्याकरण शास्त्रातील विशिष्ट टीकाग्रन्थाचे भाषातर सुव्यवस्थित व यथार्थ रीतिने करणे हे कार्य अति अवघड व फारच कष्टसाध्य असे आहे म्हणूनच जेथें वेदान्त, धर्मशास्त्र वगैरे शास्त्रातील दहा दहा ग्रन्थाची भाषान्तरे झालेली मिळतात, तेथें व्याकरणशास्त्रातील दोन तीनच ग्रन्थाची भाषातरें झाली आहेत याचे कारण उघडच आहे प्रस्तुत ग्रन्थकारानी काही वर्षांपूर्वी श्री नागोजीभट्ट काळे यानी केलेल्या परिभाषेन्दुशेखर नावाच्या ग्रन्थाचे मराठीत सुन्दर भाषातर केलेले प्रसिद्ध आहेच आता प्रकृत ग्रन्थकारानी शब्दरत्न मनोरमेचे अव्ययान्त भागाचे मराठीत भाषातर केले आहे ते मी बरेच स्थळी आपातत व एकाध प्रकरण अक्षरश सपूर्ण वाचून पाहिले आहे त्यामुळें मला निश्चयाने असें सागता येते की सदरहू भाषातर प्राचीन परपरेला व मुळातील गभीर अर्थाला कोठेंहि न सोडता उत्तम रीतिने केलेले आहे व्याकरणासारख्या नीरस, क्लिष्ट शास्त्रातील अति कठिण टीकाग्रन्थाचे उत्कृष्ट भाषातर करिता येते याकरिता हा ग्रन्थ सर्वदा उत्कृष्ट उदाहरण म्हणून दाखविता येण्या-

सारखा आहे अस्तु ज्याना व्याकरणशास्त्राचे अध्ययन करण्याची आवड आहे परतु गुरुकडे जाऊन अध्ययन करिता येणे शक्य नाही, तसेच गुरुजवळ अध्ययन करूनही ग्रन्थ स्पष्ट होण्याकरितां पुन चिंतनाची आवश्यकता आहे अशा उभयविध जिज्ञासूना या ग्रन्थानें फार उपयोग होणार आहे

७५ चे आनगाहेर वय, इन्द्रियें एका वाळी आपली असूनही आपली नाहीत अशी मात्र पटवीत आहेत या कालातील सांसारिक मुख, अशा परिस्थितीत १५–१५ तास दिवसा तमेच रात्रीहि व्याकरण शास्त्रासारख्या नीरस क्लिष्ट विषयात एकाग्रचित्ताने विचार करीत समाधि स्थितीत असलेल्या श्रीमान् पडित बाबासाहेब वाडेगावकरानः पाहिले म्हणजे प्राचीन विद्वानाची वर्णने प्रत्यक्ष डोळ्यासमोर उभी राहतात असो हा ग्रन्थ लवकरच प्रसिद्ध होण्याचा योग यावा व मराठी भाषेत एका उत्कृष्ट भाषांतराची भर पडावी अशी सदिच्छा प्रकट करितो

पौप वद्य २०७६ बुधवार
ता ६–१२–४४ काशी

प. अनन्त शास्त्री फडके
व्याकरणाचार्य, मीमांसातीर्थ
प्रा ग म वों काशी

---

॥ श्री विश्वनाथो विजयते तमाम् ॥

रा ब श्री ना दा वाडेगावकर यानी 'प्रौढ–मनोरमा आणि शब्दरत्न' ह्या व्याकरण शास्त्रावरील जटिल दोन ग्रन्थाचे जे महाराष्ट्र भाषत विस्तृत विवरण केले आहे त्याचा काही भाग मी वाचला. हा ग्रन्थ सर्वांगसुन्दर जाहला आहे जसा एखादा वैयाकरणमूर्द्धन्य *आपल्या प्रियतम विद्यार्थ्यास प्रत्येक पक्तीचे विशद विवरण* करुन ग्रन्थाचे गूढ ग्रन्थिरहस्य एकान्तात सागतो तसे हे 'भाषान्तर' वाचकास चटकन ग्रन्थ प्रमेय सागते यात प्रत्येक पक्तीचा अक्षरार्थ प्रथम देऊन नतर कसात त्याचे विस्तृत विवरण केले आहे व जेथें प्रक्रिया देणे आवश्यक आहे तेथें सूत्रें देऊन सविस्तर प्रक्रिया दिली आहे आणि ठिकठिकाणी भाष्य काशिका प्रदीप, उद्योत, शब्देन्दुशेखर, पदमजरी इत्यादि ग्रन्थातील समर्पक उतारे दिले आहेत, त्यायोगें ग्रन्थ समजण्यात अडचण जात नाही माझी पूर्ण खात्री आहे की ज्याने कौमुदीचे अध्ययन केले आहे त्याला शिक्षकाच्या सहाय्याशिवाय हा ग्रन्थ वाचल्याने मनोरमा व शब्दरत्न यातील पक्ति उत्तम रीतिने समजू शकते असा सर्वोत्कृष्ट ग्रन्थ लिहिल्यावद्दल मी रावबहादुर याचे सप्रेम हार्दिक अभिनन्दन करितो महाराष्ट्र प्रान्तात व्याकरणशास्त्राचा प्रचार विरल आहे उत्तर (हिन्दुस्थानात) भारतात व्याकरणशास्त्राचा विशेष प्रचार असल्यामुळें या ग्रथाचे हिन्दीत भाषान्तर होणे आवश्यक आहे तसे भाषान्तर केल्यास व्याकरणशास्त्राध्ययन करणाऱ्या छात्रवर्गावर फार उपकार होतील

बनारस<br>कार्तिक कृ १३ सोमवार<br>ता १३–११–४४

सदाशिव शास्त्री मुसलगांवकर<br>माजी प्रिन्सिपल, सस्कृत कॉलेज, ग्वाल्हेर

---

॥ श्री ॥

श्री रा व ना. दा वाडेगावकर यानी प्रौढ मनोरमा व शब्द-रत्न या गहन ग्रन्थाचे महाराष्ट्र भाषेत जें स्त्रीप्रत्ययान्त विवरण केले आहे त्याची तीन प्रकरणें मी वाचली या विवरणात प्रत्येक पक्तीचा प्रथम अक्षरार्थ देऊन पुढें क्रमात विस्तृत विवेचन केले आहे व अवश्य ठिकाणी सूत्रें व सूत्राङ्क देऊन पूर्ण प्रक्रिया दिली आहे, आणि तसेच भाष्य, प्रदीप, उद्योत, शब्देन्दुशेखर, काशिका, पदमञ्जरी इत्यादि ग्रंथातून आवश्यक स्थली समर्पक उतारे दिले असून त्याचा भावार्थही दिला आहे त्यामूळें प्रत्येक पक्तीचा उत्तम रीतीनें अर्थबोध होतो हा ग्रंथ सरल व सुंदर भाषेत लिहिला असल्यामुळें सामान्य बुद्धीच्या विद्यार्थ्याला देखील ग्रंथबोध होण्यात काही अडचण येऊ नये शब्दरत्नाची भाषा फार अवघड आहे व त्या ग्रंथाचा गूढार्थ मराठी भाषेत पूर्णपणें उतरविणें हे दुष्कर असून देखील या विवरणात त उत्तम रीतीने केल साराश हे विवरण अत्यन्त सुंदर, बोधप्रद व आदर्शभूत झाले आहे व या उतारवयात शरीर रोगग्रस्त झाले असून देखील वाडेगावकर साहेबानी जो एवढा प्रचण्ड व सुंदर ग्रन्थ निर्माण केला आहे त्याबद्दल त्याच जितक कौतुक व अभिनंदन केले तितके कमीच आहे

ता ६-१२-४४

दिवाकर शास्त्री जोशी
व्याकरणाचार्य
व्याकरण शास्त्राध्यापक गवर्नमेण्ट संस्कृत कॉलेज व स्या. जैन विद्यालय बनारस

# प्रस्तावना



शुद्ध कसे बोलावे, शुद्ध कसे लिहावे, हें शुद्ध का व हें अशुद्ध का, हे व्याकरण शिकल्यानें समजते असे जें दादोबाच्या लघुव्याकरणात म्हटले आहे तेच व्याकरणाध्ययनाचे मुख्य प्रयोजन आहे पस्पशान्हिकात संस्कृत व्याकरणाचें अध्ययन करण्याचीं जीं भाष्यकारानी अनेक प्रयोजने सागितली आहेत त्यापैकी 'दुष्टाञ्शब्दान्मा प्रयुक्ष्महीत्यध्येयं व्याकरणम्' म्हणजे चूक शब्दाचा आपणाकडून प्रयोग होऊ नये (व चार लोकात आपली त्यामुळें फजीति होऊ नये) याकरिता व्याकरणाचें अध्ययन करणें आवश्यक आहे, हें एक प्रयोजन सागितले आहे व्याकरणशास्त्राचें अध्ययन न करिता शुद्ध व सुदर संस्कृत बोलणारे कित्येक शास्त्री आपणास आढळतात हें खरे पण व्याकरण शिकलेल्या पुरुषाचा आपल्या भाषणाच्या शुद्धतेसबधानें स्वत चे ठिकाणी जो आत्मविश्वास असतो तसा त्याचे ठिकाणीं व्याकरणशास्त्राच्या अध्ययनाच्या अभावामुळें राहू शकत नाही व तुमचा अमुक प्रयोग अशुद्ध आहे असे त्याना कोणी छेडल्यास, आपल्या प्रयोगाच्या शुद्धाशुद्धतेचा निर्णय करण्याकरिता त्याना वैयाकरणाचीच मदत घेतली पाहिजे 'वेदान्नो वैदिका शब्दा सिद्धा लोकाच्च लौकिका । अनर्थक व्याकरणमिति । तेभ्य एव विप्रतिपन्नबुद्धिभ्योऽध्येतृभ्य आचार्य इद शास्त्रमन्वाचष्टे,' म्हणजे वेद शिकल्याने आम्हाला वैदिक शब्दाचे ज्ञान झाल आहे व आमच्या लौकिक व्यवहारामुळें लौकिक शब्दाचेंहि आम्हाला ज्ञान झाले आहे व म्हणून व्याकरण शिकण्याची आम्हास काही गरज नाही अशा विपरीत तऱ्हेनें विचार करणाऱ्या व भलत्याच दिशेनें वाहवलेल्या पुरुषाकरिता आचार्य

पाणिनीनें व्याकरणशास्त्र रचलें आहे, असें जें पतञ्जलिप्रभृति भाष्यकारांनी म्हटलें आहे तें अशाच पुरुषांना उद्देशून वर सांगितलेल्या कारणामुळें म्हटलें आहे सारांश कोणत्याहि भाषेवर प्रभुत्व संपादन करण्याकरितां जसें त्या भाषेंतील आदर्शभूत ग्रन्थांचें काळजीपूर्वक परिशीलन करणें इष्ट व आवश्यक आहे त्याचप्रमाणें त्या भाषेंतील आदर्शभूत व्याकरणग्रन्थांचे देखील अध्ययन करणें आवश्यक आहे म्हणूनच मुलांकडून इंग्रजी लिहितांना व बोलतांना चूक होऊं नये व त्यांना शुद्ध इंग्रजी बोलतां व लिहितां यावें याकरितां इंग्रजी शाळांतून पहिल्यापासून इंग्रजी व्याकरण शिकविलें जातें इंग्रजी भाषेंत नामाहून विभक्तिप्रत्यय होत नाहींत व नामाचें रूपान्तर होत नाहीं जे कांहीं थोडे प्रत्यय त्या भाषेंत होतात ते बोटांवर मोजण्याइतके आहेत त्या भाषेंत समास होत नाहींत व भिन्न शब्दांचा सन्धि होत नाहीं. परंतु संस्कृत भाषेची स्थिति याहून अगदीं भिन्न आहे या भाषेंत शब्दांशब्दांचे सन्धि व समास होतात. नामाहून विभक्तिप्रत्यय होतात व ते प्रत्यय होतांना नामाचें मूळ स्वरूप पालटून जातें एवढेंच नव्हे तर अदन्त, इगन्त, सन्ध्यक्षरान्त, व हलन्त नामाहून आणि तसेंच स्त्रीलिङ्ग व नपुंसकलिङ्ग नामाहून प्रत्यय करितांना प्रत्ययांच्या स्वरूपांत देखील वेळोवेळीं फरक पडत जातो तसेंच नामाहून अनेक प्रकारचे तद्धित प्रत्यय होतात व ते प्रत्यय होतांना देखील नामाच्या मूळ स्वरूपांत अनेक वेळीं गुण, वृद्धि इत्यादि कार्यें होऊन फरक होतो ही गोष्ट नामाची झाली धातूंचें रूप तयार करितांना तो कोण या प्रकारचा धातु आहे हें माहित असणें आवश्यक आहे धातु परस्मैपदी असल्यास त्याहून एक प्रकारचे प्रत्यय होत असून तो आत्मनेपदी असल्यास भिन्न प्रकारचे प्रत्यय होतात आणि तो उभयपदी असल्यास दोन्ही प्रकारचे प्रत्यय होऊन पाक्षिक रूपें सिद्ध होतात. तसेंच कांहीं धातु सेट्क, कांहीं अनिट्क व कांहीं वेट्क आहेत. यापैकीं सेट्क धातूंना विशिष्ट लकारांत विशिष्ट प्रकारचे प्रत्यय करतेवेळीं त्या प्रत्ययांना इडागम होत असतो म्हणून धातूहून प्रत्यय

करतेवेळी वरील सहा प्रकारच्या धातूंपैकी तो कोणत्या दोन प्रकारचा धातु आहे याचे ज्ञान असणे आवश्यक आहे तसेच सर्व धातूना प्रत्यय होण्यापूर्वी एकाच प्रकारचे विकरण लागत नसून, भिन्न भिन्न धातूना भिन्न भिन्न प्रकारची विकरणे लागतात व त्यामुळेंच धातूचे दहा गण पाडले आहेत म्हणून कोणत्याहि धातूहून प्रत्यय करण्यापूर्वी तो धातु कोणत्या गणाचा आहे व त्याला कोणते विकरण लावले पाहिजे याचे ज्ञान असणे जरूर आहे त्याचप्रमाणे सस्कृत भार्षेत दहा लकार–काळ–मानले आहेत व प्रत्येक लकाराची रूपें सिद्ध करिताना अनेक स्थली प्रत्ययाच्या मूळ स्वरूपात फरक होतो, तसेच प्रत्येक धातूची णिजन्ताची -प्रयोजकाची,–सन्नन्ताची, यङन्ताची व यङ्लुकाची रूपें होतात या शिवाय धातूहून कृत् प्रत्यय होतात व नामाहून विशिष्ट प्रत्यय केल्याने नामधातु तयार होतात ही जी सर्व प्रकारची रूपें वैदिक कालातच अत्यत प्रगल्भ दशेला पोहोचलेल्या सस्कृत भार्षेत आढळतात ती कशी सिद्ध झाली आहेत व इतर शब्दाची तशा प्रकारची रूपें कशी होतात या व इतर सर्व विषयाचे यथार्थ ज्ञान होण्याकरिता व सस्कृत भाषेवर प्रभुत्व सपादन करण्याकरिता त्या भाषेच्या व्याकरणाचे ज्ञान असणे आवश्यक आहे व ते ज्ञान सपादन करण्याकरिता वैदिक भार्षेतील व लौकिक भार्षेतील सर्व रूपें लक्षात घेऊन पाणिनीने जें सकलरूपव्यापि व सर्वाङ्गपरिपूर्ण अष्टाध्यायीरूप अद्वितीय व्याकरणशास्त्र निर्माण केले आहे त्याचे काळजीपूर्वक अध्ययन करणे आवश्यक आहे

पाणिनीच्या पूर्वी अनेक व्याकरणाचार्य होऊन गेले त्यापैकी आपिशलि, काश्यप, गालव, चाक्रवर्मण, भारद्वाज, शाकटायन, शाकल्य, सेनक व स्फोटायन या दहा पूर्वाचार्यांचा नामनिर्देश अष्टाध्यायीत केला आहे ' इद्रश्चन्द्र काशकृत्स्नापिशली शाकटायन । पाणिन्यमरजैनेन्द्रा जयन्त्यष्टादिशाब्दिका ' या मुग्धबोधात दिलेल्या कारिकेवरून हे दिसून येते की, इन्द्र, चन्द्र व काशकृत्स्न हे व्याकर-

णाचार्य देखील पाणिनीच्या पूर्वी झाले होते व पहिल्या दोन आचार्यांचा जरी पाणिनीनें अष्टाध्यायीत साक्षात् नामनिर्देश केला नाही तरी, 'प्राचाम्' व 'उदीचाम्' या शब्दानी त्याने त्याचा अनुक्रमें निर्देश केला आहे इंद्र हा हिन्दुस्थानच्या पूर्व भागात कोठें तरी राहत असून पाणिनीय काळी त्याचा संप्रदाय त्या भागात चालू होता व चन्द्र हा हिन्दुस्थानच्या उत्तर भागात राहत असून त्याचा संप्रदाय त्या भागात पाणिनीय काळी चालू होता असे दिसून येते आणि म्हणून पाणिनीने त्या दोघाना अनुक्रमें 'प्राचाम्, उदीचाम्' असे अन्वर्थक रीतीने संबोधिले आहे बोपदेवाच्या कारिकेत निर्दिष्ट असलेला चन्द्र हा पाणिनीच्या अनेक शतकानंतर, म्हणजे ख्रिस्तोत्तर सुमारे पाचव्या शतकात झालेला बौद्ध वैयाकरण चन्द्रगोमिन् नसून पाणिनीच्या पूर्वी झालेला उत्तरदेशस्थ प्रसिद्ध व्याकरणाचार्य होय त्याचप्रमाणे वरील कारिकेत ज्या शाकटायनाचा निर्देश केला आहे तो 'नामच धातुजमाह निरुक्ते, व्याकरणे शकटस्य च तोकम्' या भाष्यात दिलेल्या कारिकेत निर्दिष्ट असलेला पूर्वाचार्य असून, ख्रिस्तोत्तर पाचव्या शतकाच्या उत्तरार्धात झालेला जैन वैयाकरण शाकटायन नव्हे - पाणिनीने जरी काशकृत्स्नाचा अष्टाध्यायीत नामनिर्देश केला नाही तरी भाष्यात त्या पूर्वाचार्याचा कित्येक ठिकाणी नामनिर्देश केलेला आढळतो

पाणिनीनें जी अनुपम व सर्वव्यापि सूत्ररचना केली आहे तीवरून हें दिसून येते की, त्याच्या डोळ्यासमोर सर्व वैदिक व लौकिक प्रयोग खेळत होते व त्या सकललक्ष्यैकचक्षुष्क अद्वितीय आचार्याचे भाषाज्ञान अगाध असले पाहिजे त्यानें सूत्ररचना करतेवेळी वैदिक अनुक्रमणींचा व पूर्वाचार्यांच्या सूत्रग्रंथाचा कितपत उपयोग केला हे सांगणे अशक्य आहे, कारण पूर्वाचार्यांचे सूत्रग्रंथ अनेक कालापासून उपलब्ध नाहीत. मात्र हें खरें की, त्यानें सूत्ररचना करतेवेळी चतुर्दश माहेश्वर सूत्राचा प्रत्याहार सिद्ध करण्याकरिता उपयोग

केला आहे. ही चवदा सूत्रें महेश्वर नामक कोणी तरी पूर्वाचार्यानें प्रत्याहाराची सिद्धि करण्याकरितां रचली असली पाहिजेत व पाणिनीय काली ती सूत्रें प्रसिद्ध असली पाहिजेत आणि त्या सूत्रांचा आधार घेऊन पाणिनीनें आपल्या सूत्रांत ठिकठिकाणीं प्रत्याहारांचा निर्देश केला आहे. आख्यायिका अशी आहे की, पाणिनीनें उग्र तपश्चर्या करून ही चवदा सूत्रें महादेवापासून प्राप्त करून घेतलीं. परंतु प्रसिद्ध पुरुषाच्या नावामागें त्याच्या मरणानंतर ज्या अनेक आख्यायिका जोडल्या जातात त्यापैकीच ही एक आख्यायिका आहे. सारांश पाणिनीची कृति सर्वोत्तम व सर्वमान्य ठरल्यामुळें व वार्तिककारानी त्या कृतीला प्राधान्य देऊन अनेक सूत्रावर वार्तिकें रचली असल्यामुळें भाष्यकारानी अष्टाध्यायीवर महाभाष्य लिहून व अनेक वार्तिकांचे खण्डन करून पाणिनीय सूत्रांचे समर्थन केलें असल्यामुळें अष्टाध्यायीला जें लोकोत्तर महत्त्व व वैशिष्ट्य प्राप्त झालें त्याचा परिणाम हाच झाला असला पाहिजे की, इतर आचार्यांच्या व्याकरणसूत्रांचें जें पठनपाठन पूर्वी चालू होतें तें हळूहळू बंद पडून अष्टाध्यायीचेंच पठनपाठन सर्वत्र सुरु झालें, व त्यामुळें पूर्वाचार्यांचे सूत्रग्रंथ कालगतीनें नष्ट होऊन त्या आचार्यांचें नामच अवशिष्ट राहिलें.

पाणिनीच्या जीवनचरित्राबद्दल दुर्दैवानें काहीच माहिती उपलब्ध नाही. त्याच्या नावावरून व तसेंच दीक्षितानी कौमुदींत (पहा सू. १२७४–७५) जी 'पाणिनि' शब्दाची व्युत्पत्ति दिली आहे तीवरून असें दिसून येतें की, तो पणीऋषींच्या कुलांत जन्मला होता व 'सर्वे सर्वपदादेशा दाक्षीपुत्रस्य पाणिनेः' या भाष्यवचनावरून हें ज्ञापित होतें की, त्याच्या आईचें नाव दाक्षी होतें. दक्षकुलांत उत्पन्न झालेली ती कोणी तरी प्रसिद्ध विदुषी बाई असली पाहिजे. [illegible] शिशुवयांतच पुढें व्याडीचा जन्म झाला. हा पाणिनीच्या मामाचा पुत्र होता असें विन्टरनिट्झ म्हणतात. वार्तिकांत याचा नामनिर्देश आढळतो व लक्षश्लोकात्मक प्रसिद्ध संग्रहनामक ग्रन्थाचा

कर्ता हा होय. संग्रहाची स्तुति करिताना भाष्यकारांनीं 'शोभना खलु दाक्षायणस्य संग्रहस्य कृतिः' असें म्हटलें आहे व भाष्यकारांनी भाष्य लिहिताना त्या संग्रहग्रन्थाचा बराच उपयोग केला असावा असे दिसून येते. पाणिनीला 'शालातुरीय' असें म्हटले असल्यामुळें त्यावरून असें दिसून येते की, वायव्य सरहद्द प्रान्तातील शालातुर या ठिकाणचा पाणिनी रहिवासी होता. हें गाव अटक शहराजवळ असून ते आता उजाड झाले आहे. परंतु पाणिनीय कालीं ते प्रसिद्ध शहर होतें व हुएनत्संग या चिनी प्रवाशाच्या वर्णनावरून असे दिसून येतें की, ख्रिस्तोत्तर सातव्या शतकात देखील तें शहर भरभराट-स्थितीत होतें. पाणिनीचा गुरु कोण होता हें कळण्यास काहीं साधन नाहीं; परंतु आख्यायिका अशी आहे की, प्रसिद्ध आचार्य वर्ष त्याचा गुरु होता. पाणिनीच्या मृत्यूसंबंधानें पञ्चतन्त्रात 'सिंहो व्याकरणस्य कर्तुरहरत् प्राणान् मुनेः पाणिनेः' असा श्लोक आढळतो. यावरून असें दिसून येतें की, पाणिनी कोठें तरी परगावीं जंगल-मार्गानें जात असता तो सिंहाकडून मारला गेला. ही जी वर त्रोटक माहिती दिली आहे त्याशिवाय पाणिनीसंबंधीं इतर कोणतीहि माहिती उपलब्ध नाही.

पाणिनी कोणत्या कालीं झाला याबद्दल विद्वान् लोकांत बराच मतभेद आहे. प्रो. मॅक्समुल्लरचें असें म्हणणें आहे कीं, 'इन्द्रवरुणभव' सू. ५०५ या सूत्रात 'यवन' असा निर्देश असल्यामुळें व हिंदुस्थानचा यवनाशी जो व्यवहार सुरू झाला तो ख्रिस्तपूर्व ३२७ मध्यें हिंदु-स्थानावर अलेक्सान्डर बादशहानें स्वारी केल्यानंतर सुरू झाला असल्यामुळें, अलेक्झान्डरच्या स्वारीनंतर अष्टाध्यायी रचली गेली असली पाहिजे. म्हणून प्रो. मॅक्समुल्लरच्या मतें ख्रिस्तपूर्व चवथ्या शतकाच्या उत्तरार्धांत पाणिनी झाला असला पाहिजे. या उलट सत्यव्रत सामश्रमींचें असें म्हणणें आहे कीं, पाणिनी ख्रिस्तपूर्व चोविसाव्या शतकात झाला. डॉ. बेलवलकर व म. म. हरप्रसाद

शास्त्री या दोघानींहि वरील दोन्ही मताचे खण्डन केले आहे व ते म्हणतात की प्रो गोल्डस्टकरनें आपल्या ग्रंथात म्हटल्याप्रमाणे पाणिनी ख्रिस्तपूर्व सातव्या किंवा आठव्या शतकात झाला असला पाहिजे.

पाणिनीनंतर जे अनेक वार्तिककार झाले त्यात कात्यायन हा प्रमुख होता हरप्रसाद शास्त्रींचे असे म्हणणे आहे की, अलाहबादच्या पश्चिमेस सुमारे तीस मैलाचे अन्तरावर यमुनेच्या काठी मध्या जें कोसमनामक गांव आहे व ज्याला पूर्वी कौशाबी म्हणत असत त्या ठिकाणचा राहणारा कात्यायन होय पण पस्पशाह्निकात 'यथा लौकिकवैदिकेषु' या वार्तिकाचे व्याख्यान करिताना भाष्यकारानी 'प्रियतद्धिता दाक्षिणात्या' असे म्हटले असल्यामुळें, त्यावरून हें सूचित होते की, त्याच्या मते कात्यायन दाक्षिणात्य होता. तो ऐन्द्रसांप्रदायाचा अनुयायी असल्यामुळें त्याने कित्येक पाणिनीय सूत्रावर खडनपर वार्तिके केली आहेत व त्या वार्तिकात त्याने पाणिनीचे दोष दाखविले आहेत तो ख्रिस्तपूर्व चवथ्या किंवा पाचव्या शतकात झाला असावा त्याच्यानतर अनेक वार्तिककार झाले. त्यापैकी कित्येकानी कात्यायनाच्या काही वार्तिकाचें खडन करून पाणिनीचेच म्हणणे बरोबर आहे असे म्हटले आहे ही दोन्ही प्रकारची खडनपर व मडनपर वार्तिके भाष्यात दिली आहेत ही दोन्ही प्रकारची वार्तिकें एकाच वार्तिककारानें केली हें म्हणणे सयुक्तिक दिसत नाही व पूर्व वार्तिककारानें खडनपर वार्तिकें करून उत्तर वार्तिककाराने मडनपर वार्तिके केली आहेत हेंच म्हणणे सयुक्तिक दिसते भाष्यात सौनाग, भारद्वाजीय, कुणि इत्यादि वार्तिककाराची सांप्रदायिक नावे दिली आहेत

महाभाष्यकार पतञ्जलि हा ख्रिस्तपूर्व द्वितीय शतकात झाला. तो गोनर्द देशात म्हणजे उज्जयनी व विदिशा-भिलसा-या दोन शहराच्या मध्यें असलेल्या गोनर्दनामक शहरात राहणारा असल्यामुळें

त्याला गोनर्दीय असे म्हणत असत त्याच्या आईचे नाव गोणिका होते भाष्यात कित्येक ठिकाणी माहिष्मती, उज्जयिनी, पाटलिपुत्र व इतर नगराचा निर्देश केला आहे जेव्हा पुष्यमित्राने आपल्या पाटली-पुत्रनामक राजधानीत अश्वमेध केला तेव्हा याजकवर्गापैकी पतञ्जलि हा एक होता हे 'इह पुष्यमित्र याजयाम' या भाष्यवचनावरून दिसून येते. पतञ्जलि जीवत असतानाच मिनेन्डरने साकेत व मध्यमिका या शहरावर हल्ला करून त्याना वेढा दिला व पुष्यमित्राने त्यावेळी ग्रीक लोकाशीं युद्ध करून त्याचा पराभव केला. पुष्यमित्र हा ख्रिस्तपूर्व द्वितीय शतकात झाला असल्यामुळे, भाष्यकार त्याच शतकात झाले हे सिद्ध होते भाष्यकाराचा पाणिनीचे ठिकाणी अत्यत आदर व पूज्यभाव होता त्यानी भाष्यात ठिकठिकाणी पाणिनीला 'भगवान्' असे सबोधिले आहे व कित्येक ठिकाणी 'प्रमाणभूत आचार्यो दर्भ-पवित्रपाणि शुचाववकाशे प्राड्मुख उपविश्य महता प्रयत्नेन सूत्राणि प्रणयति स्म तत्राशक्य वर्णेनाप्यनर्थकेन भवितु किं पुनरियता सूत्रेण' असे त्यानी भाष्यात म्हटले आहे व 'शोभना खलु पाणिने सूत्रस्य कृति' असेहि त्यानी एके ठिकाणी म्हटले आहे त्यानी भाष्य लिहिताना सङ्ग्रह ग्रन्थाचा बराच उपयोग केला असावा असे दिसून येत व भर्तृहरीच्या वाक्यपदीय ग्रन्थात महाभाष्याला 'सङ्ग्रह प्रतिकञ्चुक' असे म्हटले आहे भाष्यकारानी अत्यत सुन्दर व सरळ भाषेत महाभाष्य लिहिले आहे पण ते समजण्यास अनेक ठिकाणी फार कठिण असल्यामुळे त्यावर कैयटाने प्रदीपनामक विस्तृत टीका ख्रिस्तोत्तर सुमारे अकराव्या शतकात लिहिली व पुढे नागोजी भट्टानी प्रदीपावर उद्योतनामक टीका अठराव्या शतकात लिहिली या दोन टीकांच्या सहाय्यानेच भाष्य नीट समजू शकते.

भाष्यकारानी महाभाष्यात पाणिनीय सूत्राचा अर्थ दिला नाही त्या सूत्राचा अर्थ स्पष्ट आहे असे गृहीत धरून भाष्यकारानी अमुक सूत्रात अमुक शब्द आवश्यक आहे काय व सूत्र असणे आवश्यक आहे

काय आणि तसेंच त्या सूत्रावर रचलेलें वार्तिक असणें आवश्यक आहे काय इत्यादि विषयाची विस्तृत चर्चा केली आहे. पण भाष्य वाचल्यानें सूत्रार्थबोध होत नाहीं भाष्यकाराच्या वेळीं जरी पाणिनीय सूत्राचा सर्वांना स्पष्टपणें अर्थ कदाचित् अवगत होत असेल तरी कालान्तरानें त्या सूत्राचा अर्थ कळणें अत्यन्त कठिण झालें व भाष्यांतील ही उणीव भरून काढण्याच्या हेतूनेंच काश्मीरदेशीय जयादित्य व वामन या बौद्ध पण्डितांनीं पाणिनीय सूत्रावर काशिका नामक वृत्ति लिहिली कित्येक असें म्हणतात कीं, जयादित्य हा काश्मीरचा राजा जयापीड असून वामन हा त्याचा प्रधान होता व जयापीड इ स ६६० मध्यें वारला असें इट्सिङ्गचें म्हणणें आहे यावरून हें स्पष्ट होतें कीं ख्रिस्तोत्तर सातव्या शतकांत काशिका लिहिली गेली पहिल्या पाच अध्यायावरील वृत्ति जयादित्यानें लिहिली असून त्याच्या मरणानंतर बाकीच्या तीन अध्यायावर वामनानें वृत्ति लिहिली अशी आख्यायिका सर्वत्र प्रसिद्ध आहे व दीक्षितांनीं देखील मनोरमेंत जयादित्य व वामन या दोहोंमध्यें असणारा मतभेद स्पष्ट केला आहे ही वृत्ति फारच सरळ व सोपी भाषेंत लिहिली असून प्रत्येक सूत्रांत पूर्व सूत्रांतून कोणती पदें अनुवृत्त होतात हें सांगितलं आहे व नंतर सूत्रार्थ देऊन अनेक समर्पक उदाहरणें व प्रत्युदाहरणें दिलीं आहेत व अशा रीतीनें सूत्रार्थ स्पष्ट केला आहे या वृत्तींत प्रथम सूत्राचा अर्थ दिला असून कोणतेंहि सूत्र वगळलें नाहीं या वृत्तीचाच बहुतेक आधार घेऊन रामचन्द्राचार्यांनीं प्रक्रियाकौमुदी व भट्टोजी दीक्षितांनीं सिद्धान्तकौमुदी लिहिली आहे व दोघांनींहि बहुधा काशिकेंतील उदाहरणें दिलीं आहेत कौमुदीग्रन्थ तयार होण्यापूर्वीं पाणिनीय सूत्राचा अर्थ कळण्याकरितां विद्यार्थी काशिकावृत्तीचेंच अध्ययन करीत असत काशिकेपूर्वीं किंवा सुमार त्यावेळीं भर्तृहरीनें वाक्यपदीय नामक ग्रन्थ महाभाष्याच्या आधारें लिहिला होता. परंतु तो ग्रन्थ देखील चर्चात्मक असून त्यांत पाणिनीय

सूत्राचा अर्थ दिला नसल्यामुळें, विद्यार्थिवर्गाच्या उपयोगाकरिता वामन व जयादित्य यानी काशिकावृत्ति लिहिली

काशिकेवर दोन उत्कृष्ट टीका उपलब्ध आहेत पहिल्या टीकेचे नाव काशिकाविवरणपञ्जिका किंवा काशिकान्यास असे असून त्या टीकेचा कर्ता श्रीबोधिसत्त्वदेशीयाचार्य जिनेन्द्रबुद्धि होय हा बौद्ध पंडित ख्रिस्तोत्तर आठव्या शतकात झाला असून त्या शतकाच्या पूर्वार्धात त्यानें ही टीका लिहिली हरदत्तानें लिहिलेली पदमञ्जरी ही दुसरी टीका होय हरदत्त आन्ध्रदेशीय ब्राम्हण असून त्याच्या पित्याचे नाव पद्मकुमार व गुरूचे नाव अपराजित होतें त्यानें आपल्या ग्रन्थात कित्येक ठिकाणीं कैयटाचा दाखला दिला असल्यामुळें तो कैयटानंतर झाला हें स्पष्ट होते प्रदीपकार काश्मीरदेशस्थ कैयट हा जो मम्मटाचा बन्धु व शिष्य होता तो ख्रिस्तोत्तर अकराव्या शतकात झाला असल्यामुळें, त्या शतकाच्या अखेरीस किंवा बाराव्या शतकाच्या प्रारंभी हरदत्त झाला असावा

पण काशिकाग्रन्थ व त्यावर दोन वरील विस्तृत व विद्वत्ताप्रचुर टीका निर्माण झाल्याने पाणिनीय सूत्राचा अर्थ पूर्णपणे कळण्याचे उत्कृष्ट साधन जरी उपलब्ध झाले व त्यामुळें सूत्रार्थ कळण्याची अडचण दूर झाली तरी, पाणिनीय शास्त्राचा अभ्यास करणाऱ्या साधारण बुद्धीच्या विद्यार्थिवर्गाला त्या काळात आणी एक दुसरी अडचण पदोपदीं भासत होती ती काही हे ग्रन्थ निर्माण झाल्यानें दूर झाली नाही सन्धिकार्य करतेवेळीं व प्रत्येक प्रकारच्या अजन्त व हलन्त प्रातिपदिकाची व तसेच धातूंची अनेक प्रकाराची रूपें सिद्ध करतेवेळीं ज्या अनेक पाणिनीय सूत्राची गरज पडते ती सर्व सूत्रें क्रमवार व प्रकरणवार पठित नसल्यामुळें, तशी रूपें सिद्ध करितांना विद्यार्थ्यांना बराच श्रम पडत असे व ही त्याची अडचण वरील ग्रन्थ निर्माण झाल्यावर देखील नाहीशी झाली नाहीं पाणिनीनें अष्टाध्यायी तयार करतेवेळी 'अल्पाक्षरमसंदिग्ध सारवद्विश्वतोमुखम ।

अस्तोभमनवद्यच सूत्र सूत्रविदो विदु ' ही सूत्राची व्याख्या व तसेच 'अर्धमात्रालाघवेन पुत्रोत्सव मन्यन्ते वैयाकरणा ' हा प्रसिद्ध न्याय लक्षात धरून सूत्ररचना केली पाणिनीय कालात जरी लिपी व लेखनकला होती तरी लेखनसामग्री फारच अपुरी असल्यामुळें व त्या कालात जें पठन पाठन होत असे ते पोथीच्या सहायाने होत नसून गुरूने मुखाने सूत्रोच्चारण करून सूत्रार्थ शिष्याला नीट रीतीने समजवून देणे व शिष्याने ते सूत्र पाठ करणे अशा रीतीने होत असल्यामुळें, पाणिनीला जेवढ्या थोड्या अक्षराची सूत्रें तयार करणे *शक्य असेल तशी सूत्रें करावी लागली व तशी अल्पाक्षरसूत्रें तयार* करण्याकरिता त्याला ठिकठिकाणी लघु सज्ञा कराव्या लागल्या व गणपाठ आणि धातुपाठ तयार करावा लागला आणि अनुवृत्तीची मदत घ्यावी लागली व कित्येक ठिकाणी सक्षिप्त लुप्तविभक्तिक व आर्ष प्रयोग देखील करावे लागले तसेच ' विप्रतिषेधे पर कार्यम् ' सू १७५ व 'पूर्वत्रासिद्धम्' सू १२ अशी त्याने सूत्रें पठिन केली असल्यामुळें, त्या दोन सिद्धान्ताना धरून त्याला सूत्रपाठक्रम ठरवावा लागला त्याचप्रमाणे अनेक सूत्रात एखादें पद किंवा पदसमुदाय उच्चारण्याची गरज न पडावी याकरिता त्याने काही अधिकारसूत्रें पठित केली व ज्या अधिकारात जेवढी सूत्रें अन्तर्भूत होन असतील तेवढी सर्व सूत्रें त्या अधिकारात पठित केली उदाहरणार्थ 'आ कडारादेका सज्ञा' सू २३२ व 'असिद्धवदत्राभात्' सू २१८३ ही दोन अधिकार सूत्रें आपण घेऊ प्रथम अधिकारसूत्राखाली पाणिनीला अशा सर्व सज्ञा पठित कराव्या लागल्या की ज्यापैकी उत्तरसज्ञा पूर्वसज्ञेचा बाध करिते द्वितीय अधिकार सूत्राखाली त्याला अशी सर्व सूत्रें पठित करावी लागली की, जेथें समाननिमित्तक उत्तरकार्य करतेवेळी पूर्वकार्य असिद्ध ठरते, म्हणजे ते पूर्वकार्य झालेच नाही असे मानून उत्तरकार्य करता येते या सर्व कारणामुळें पाणिनीला सूत्रपाठ विशिष्ट क्रमानें करावा लागला पाणिनीय सूत्रपाठक्रम अशा रीतीनें जरी सर्व तऱ्हेनें योग्य ठरतो तरी, एखाद्या रूपाची

सिद्धि करण्याकरिता ज्या अनेक सूत्राची प्रवृत्ति करावी लागते ती सर्व सूत्रें अष्टाध्यायीत एके ठिकाणी क्रमवार पठित नसून भिन्न भिन्न स्थली पठित असल्यामुळें, रूपाची सिद्धि करतेवेळी विद्यार्थिवर्गाला फार अडचण भासत असे. ही अडचण दूर करण्याकरिता कौमुदीग्रन्थ निर्माण झाले इ स. अकराव्या शतकात विमलसरस्वतीने रूपमाला नामक ग्रन्थ तयार केला व सिंहलद्वीपस्थ धर्मकीर्तीनें रूपावतारनामक ग्रन्थ लिहिला पण हे दोन्ही ग्रन्थ फारच त्रोटक असल्यामुळें रामचन्द्राचार्यांनी प्रक्रियाकौमुदी नामक ग्रन्थ तयार केला व त्या ग्रन्थात इष्ट रूपाची सिद्धि करतेवेळी ज्या अनेक सूत्राची प्रवृत्ति करावी लागते ती सर्व सूत्रें एके ठिकाणी क्रमवार पठित केली व पाणिनीय सूत्राची प्रकरणवार विभागणी केली त्या ग्रन्थाच्या सहायाने इष्ट रूपाची सिद्धि करण्यात विद्यार्थिवर्गाची अडचण दूर झाली व त्या ग्रन्थाचा आधार घेऊनच व सूत्रक्रमात काही ठिकाणी फेरबदल करून दीक्षितानी अष्टाध्यायीतील कोणतेंहि सूत्र न वगळता सिद्धान्तकौमुदी तयार केली साराश कौमुदीरूपाने अष्टाध्यायी तयार करण्याचे श्रेय प्राधान्येंकरून रामचन्द्राचार्यांनाच आहे हे म्हणण्यात काही अतिशयोक्ति होत नाही

रामचन्द्राचार्य हा कृष्णाचार्यांचा पुत्र होता याचे उपनाव शेष असून गोत्र कौण्डिन्य होते व हा ऋग्वेदी ब्राम्हण असून व आध्र देशातील श्रेष्ठ कुलात याचा जन्म झाला असून हा वैष्णवसाम्प्रदायी तैलंग ब्राम्हण होता याने प्रक्रियाकौमुदीच्या प्रारभी व अखेरीस विठ्ठलास प्रणाम केला आहे व याच्या पौत्राने देखील प्रसादटीकेच्या आरभी पढरपूरच्या विठ्ठलाची स्तुति करून विठ्ठलाला 'विशिष्टेष्टदेवता' असे आपल्या टीकेंत म्हटले आहे यावरून हे स्पष्ट होतें की, पढरपूरचा विठ्ठल या कुलाचे उपास्य दैवत होते रामचन्द्र जरी आध्रदेशीय होता तरी तो कोणत्या गावी राहत होता हे कळत नाही, याचा पिता सकलशास्त्रप्रवीण असून याने आपला पिता व पित्याचा

वन्धु गोपालाचार्य याच्या जवळ सकलशास्त्राध्ययन केले होते याने प्रक्रियाकौमुदी, कालनिर्णयदीपिका व वैष्णवसिद्धान्तदीपिका हे तीन ग्रन्थ लिहिले याचा पुत्र नृसिंह असून प्रसादकर्ता विठ्ठल हा नृसिंहाचा पुत्र होता रामचन्द्राच्या कालासबधाने विद्वान लोकात वराच मतभेद दिसतो डॉ भाण्डारकर म्हणतात की, तो इ. स १४५० मध्ये झाला रा. ब के पी त्रिवेदी याचे म्हणणे आहे की, तो इ स चौदाव्या शतकात झाला परतु म म हरप्रसाद शास्त्री म्हणतात की, तो इ स तेराव्या शतकात झाला आणि कोलब्रुक साहेबाचे म्हणणे दखील असेच दिसत इ स १८३७ मध्ये लिहिलेली प्रक्रिया-कौमुदीची प्रत डेक्कन कॉलेजच्या लायब्ररीत उपलब्ध असून त्याहि पूर्वी इ स १४२० मध्ये लिहिलेली प्रत बनारस येथील गव्हरमेंट सस्कृत कॉलेजच्या पुस्तकसङ्ग्रहालयात उपलब्ध आहे म्हणून रामचन्द्राचार्य इ स १४५० मध्ये झाला हे डॉ भाण्डारकराचे म्हणणे बरोबर मानता येत नाही मल्लिनाथ इ स चौदाव्या शतकात झाला असून त्याच्या पूर्वी हेमाद्रि झाला व हेमाद्रीने आपल्या रघुवशाच्या टीकेंत– पहा सर्ग १५ श्लोक ६९–प्रसादटीकेचा उल्लेख केला आहे त्यावरून हे स्पष्ट होते की, रामचन्द्राचार्य तेराव्या शतकाच्या प्रारभी झाला असून त्या शतकाच्या उत्तरार्धात त्याचा पौत्र प्रसादकार विठ्ठल झाला असावा

डॉ ऑफ्रेक्टच्या म्हणण्याप्रमाणे प्रक्रियाकौमुदीवर सहा टीका लिहिल्या गेल्या त्यापैकी विठ्ठलाची प्रसादटीका ही एक असून दुसरी टीका भट्टोजी दीक्षिताचे गुरु पाराशरगोत्रीय श्रीकृष्ण शेष यानी लिहिली आहे व तिचे नाव प्रक्रियाप्रकाश आहे शेषकृष्णाच्या वडिलाचे नाव नृसिंहाचार्य होते व शेष घराण्याचा वशवृक्ष पुढे दिल्याप्रमाणे आहे––

नृसिंहाचार्य

श्रीकृष्ण (भट्टोजी दीक्षिताचे गुरु व प्रकाशकर्ते)    चिन्तामणि

वीरेश्वर (पं. जगन्नाथरायाचे गुरु)    नारायण

पुरुषोत्तम    चक्रपाणि

नृसिंहाचार्याला विजयानगरच्या राजसभेने भट्टभट्टारक ही पदवी दिली होती हे शेषकृष्णानी केलेल्या मुरारिविजय नाटकावरून दिसून येते. या घराण्याचे वास्तव्य गोदावरीच्या प्रान्तात असून या घराण्याचा मूळ पुरुष विश्वरूप होता हें वरील नाटकातील पुढें दिलेल्या उताऱ्या वरून स्पष्ट होतें–'अस्ति किल दाक्षिणात्यस्य गोदारोधोवास्तव्यस्य श्रीमद्विश्वरूपवंशावनमुक्तामणेरधि विद्यानगरसभं विद्वद्वृन्दवितीर्णभट्ट-भट्टारकापरनाम्नो भट्टनृसिंहस्यात्मज कृष्णभट्टो नाम महाविद्वत्कवि ।' रा. ब. वासुदेव अनंत बाबडेंकर याचें असें म्हणणे आहे की, ज्याने याज्ञवल्क्यस्मृतीवर विस्तृत टीका लिहिली व तिचा उल्लेख विज्ञानेश्वराने मिताक्षरेत केला आहे तो हा बहुधा विश्वरूप असावा. शेषकृष्णाचा बन्धु चिन्तामणि याने रसमञ्जरीवर जी परिमल नावाची टीका लिहिली आहे तीत त्याने अखेरीस 'श्रीनृसिंहचरणो-पासिना ब्रह्मपुरनिवासिना श्रीशेषचिन्तामणिना निर्मितो रसमञ्जरी-परिमल समाप्त.' असे म्हटलें असल्यामुळें त्यावरून हें स्पष्ट होतें की, या शेषघराण्याचें राहण्याचें मूळ ठिकाण ब्रह्मपूर असून या कुलाचे श्रीनृसिंह हें उपास्य दैवत होतें. ब्रह्मपूर हे गाव

राजमहेन्द्रीपासून सुमारें ४० मैलावर असून तेथें चारशें किंवा पांचशें आंध्रब्राम्हणांची घरें आहेत व त्या गांवांत नृसिंहाचें देवालय असून नृसिंहाची मूर्ति पुरुषभर उंच आहे व दरवर्षी तेथें नृसिंहाची यात्रा भरत असून मोठ्या थाटानें रथोत्सव होत असतो शेषकृष्णांनीं आपल्या पित्याजवळ सर्व शास्त्राचा अभ्यास करून इ स पधराव्या शतकाच्या पूर्वार्धांत ते काशीस राहण्यास गेले व तेथेंच स्थायिक झाले आणि हे प्रखर विद्वान पण्डित असल्यामुळें यांची लौकरच सर्वत्र प्रसिद्धि झाली पण्डितप्रकाण्ड द्राविड अप्पय्या दीक्षिताचे व तसेंच नारायणभट्टाचे चिरंजीव व भट्टोजी दीक्षिताचे उत्तरगुरु शंकरभट्ट हे दोघेहि याच समकालीन होते अकबर बादशहाचा प्रधान *तोडरमल याचा जो पुत्र गिरिधारी होता त्याचा श्रीकृष्णशेषांना* आश्रय मिळाल्यामुळें त्याचा दिल्लीदरबारच्या पण्डितसभेंत प्रवेश झाला व जहांगीरचे काळीं त्याच मधून मधून दिल्लीस राहणें सुरू झालें त्यांनीं गिरिधारिप्रभृति बड्या सरदारासमोर स्वतः रचलेल्या कंसवध नाटकाचा प्रयोग करून दाखविल्यामुळें त्यांचा सर्वत्र गौरव झाला अलाहाबादजवळ असलेल्या पत्रपुञ्जसंस्थानच्या विरबलनामक राजानें त्याचा पुत्र जो कल्याण त्याला व्याकरणशास्त्रांत प्रवीण करावे असा शेषकृष्णांना विनंति केल्यावर शेषकृष्णांनीं प्रक्रिया-कौमुदीवर प्रकाशटीका लिहिली व बहुधा ही टीकाच त्यांची सर्वत्र प्रसिद्धि होण्यास व त्याचा दिल्लीदरबारच्या पण्डितसभेंत प्रवेश होण्यास कारण झाली असली पाहिजे राजा विरबल इ स १५८६ मध्यें वारला त्यावरून हरप्रसादशास्त्री म्हणतात—' Vira-Vala died in 1586 A D The request for writing Prakriya-Prakash must have been made when Kalyan was very young. So I put it down in the sixties of the century Bhattoji must have read with SeshKrishna when the Prakriya Prakash was in the making. Perhaps he and Kalyan read together ' पण हें त्याचें

म्हणणे बरोबर मानल्यास भट्टोजी दीक्षिताचा जन्मकाल इ स. १५५० च्या सुमारे वीस वर्षे पूर्वीचा मानावा लागेल, कारण १५५०–१५६० च्या दरम्यान प्रकाशटीका लिहिली जात असताना जर श्रीकृष्णशेषानी त्याना ती पढविली तर त्यावेळी भट्टोजी दीक्षिताचे वय सुमारे २५ तरी असले पाहिजे, म्हणजे त्याचा जन्म सुमारे इ स. १५३० मध्ये झाला असावा असे मानणे भाग आहे पण इ. स १६२६ चे सुमारास त्याचा जो जगन्नाथ पण्डिताशी कडाक्याचा वादविवाद झाला त्याच्यानतर लौकरच सुमारे इ स. १६३० मध्ये त्याच्या सुमारे ७५ व्या वर्षी त्याचा अन्त झाला असल्यामुळे, त्याचा जन्म सुमारे इ स १५५५ मध्ये झाला असला पाहिजे म्हणून श्रीकृष्णशेषाच्या प्रसिद्धीला व त्याचा दिल्लीदरबारच्या पण्डितसभेत प्रवेश होण्याला प्रामुख्याने कारणीभूत झालेली प्रकाशटीका जरी इ. स १५६० च्या सुमाराम लिहिली गेली असली तरी, शेषकृष्णानी भट्टोजी दीक्षिताना ती टीका इ स १५८० चे सुमारास पढविली असली पाहिजे हेच मानणे योग्य दिसते कसवध व प्रक्रियाप्रकाश या दोन ग्रथाखेरीज श्रीकृष्णशेषानी पारिजातहरण-चम्पू, उषापरिणय, मुरारिविजय, सत्यभामापरिणय, सत्यभामा-विलास व क्रियागोपनकाव्य हे ग्रथ लिहिले आहेत

भट्टोजी दीक्षित तैलग ब्राम्हण होते. ते ऋग्वेदी होते किंवा कृष्णयजुर्वेदी हें निश्चयपूर्वक सागणे कठिण आहे त्यानी तैत्तिरीय सध्याभाष्य लिहिले असल्यामुळे ते कृष्णयजुर्वेदी असले पाहिजेत असे कित्येकाचे म्हणणे आहे इतराचे असे म्हणणे आहे की, त्यानी कौमुदीत व मनोरमेत ऋग्वेदाचीच उदाहरणे विशेषेकरून दिली असून आपल्या सिद्धान्ताच्या समर्थनार्थ त्यानी ऋग्वेदीय शौनक प्रतिशाख्याचा आधार दिला असल्यामुळे ते ऋग्वेदी ब्राम्हण असले पाहिजेत व एक गृहस्थ असेहि म्हणतात की, भट्टोजीनी जसे तैत्तिरीय सन्ध्याभाष्य लिहिले आहे तसेच ऋग्वेदी सन्ध्याभाष्य व ऋग्वेदभाष्यसार

देखील लिहिले आहे. म्हणून दीक्षित कृष्णयजुर्वेदीच होते हें निश्चयाने मानता येत नाही. पण ते ऋग्वेदी असोत किंवा कृष्णयजुर्वेदी असोत ते तैलंग ब्राम्हण होते हे मात्र खास आहे; कारण त्यांच्या शिष्यपरंपरेत हेच सांगण्यात येते की, ते तैलंग ब्राम्हण होते. म. म. भटजीशास्त्री घाटे व प्रसिद्ध सदाशिवशास्त्री घुले यांचे पौत्र म. म. भाऊशास्त्री घुले हे म्हणत असत की भट्टोजी तैलंग ब्राम्हण होते आणि शिष्यपरंपरेत प्रसिद्ध असलेली अशा प्रकारची पुरातन वार्ता विश्वासार्ह आहे. कित्येक म्हणतात की, भट्टोजी महाराष्ट्र ब्राम्हण होते पण तसे म्हणण्याचे कारण एवढेंच दिसते की, भट्टोजी दीक्षित बरेच दिवस काशीत राहून महाराष्ट्र ब्राम्हणांशी समरस झाले असल्यामुळे व महाराष्ट्र ब्राम्हणांशीच त्यांच्या वंशजांचा विवाहसंबंध घडून आला असल्यामुळे त्यांना महाराष्ट्र ब्राम्हण म्हणतात कित्येकांनी असे विधान केले आहे की, भट्टोजी दीक्षित शेणवी होते पण हें म्हणणे निःसंशय चूक आहे भट्टोजींच्या काळात शेणवी ब्राम्हण मानले जात नसत त्यापुढें अनेक वर्षांनंतर शिवाजीचे काळी गागाभट्ट इत्यादि पंडित लोकांनी राजसभेत असा निर्णय दिला की, शेणवी जरी पूर्वी ब्राम्हण होते तरी अभक्ष्यभक्षणाचे सेवन केल्याने ते भ्रष्ट झाले असल्यामुळें त्यांनी प्रायश्चित्त घेऊन अध्ययन दान व यजन हीं तीन कर्मे करावीं व अध्यापन, प्रतिग्रह व याजन हीं कर्में करू नयेत अजून देखील धर्मनिष्ठ ब्राम्हण त्यांच्याशी रोटीबेटी व्यवहार करीत नाहीत म्हणून जर भट्टोजी दीक्षित शेणवी असते तर शेषकृष्णासारख्या वसंत वैष्णवाने व अप्पय्याने त्याचे त्या काळात गुरुत्व पत्करलें नसतें व वरदराज, नीलकण्ठ शुक्ल इत्यादिकांनी त्याचे शिष्यत्व पत्करलें नसतें आणि तसेच नागोजी भट्टांनी हरि दीक्षिताजवळ शास्त्राध्ययन केलें नसतें दुसरें असें की, जर भट्टोजी शेणवी असते तर जगन्नाथपंडिताने त्यांना जी शिव्यांची लाखोली वाहिली आहे तींत तो त्यांच्या जातीचा निर्देश केल्याशिवाय कधीहि राहिला

नसतां विशेषेकरून जेव्हां भट्टोजी दीक्षितांनी जगन्नाथपंडितास म्लेच्छ म्हटलें तेव्हां जगन्नाथानें तत्रत्य शैल्क्ष्या शहरात त्याचा ज्ञाति-निर्देश करून त्यांना शिवी दिली असतो म्हणून भट्टोजी दीक्षित शेणवी ब्राम्हण होते हें म्हणणें निराधार व चूक ठरते यापेक्षा अधिक चमत्कारिक व हास्यास्पद विधान प ज्वालाप्रसाद मिश्र, मुरादाबाद, यांनी केलें आहे त्यांनी सिद्धान्तकौमुदीचें हिंदीत भाषा-न्तर केलें असून त्याच्या आरंभी जी प्रस्तावना लिहिली आहे तीत ते असें म्हणतात की, भट्टोजी दीक्षित कान्यकुब्ज ब्राम्हण असून कनौजच्या राजाचे इ स बाराव्या शतकात सभापंडित होते त्यांनी दीक्षितांना चार शतकें मागें ओढलें असून कान्यकुब्ज ब्राम्हणात ढकललें आहे या विधानाचें मण्डन करण्याच्या भरीस पडणें हें त्याला व्यर्थ महत्त्व देणें होय म्हणून ' स्वमपव्याख्यैव परास्तिया ' या न्यायानुसरें त्याच्या मतांचा निर्देश करणें हेंच त्याचें समर्थक खण्डन होय

प्राचीन संस्कृत ग्रन्थकार आपल्या ग्रन्थात स्वत विषयी काहीच माहिती नमूद करून ठेवीत नसल्यामुळें त्यांच्या कालाचा निर्णय करणें किंवा त्यांचें चरित्र लिहिणें फारच कठीण जातें ज्या वर्षी त्यांनी आपला ग्रन्थ तयार केला तें वर्ष जर त्यांनी आपल्या ग्रन्थात लिहिलें असतें तर त्यांच्या कालाचा निर्णय सहज करता येऊं शकला असता परन्तु दुर्दैवानें त्या काळात तशी प्रथाच नव्हती म्हणून भट्टोजी दीक्षित कोणत्या वर्षी जन्मले व कोणत्या वर्षी वारले हें निश्चयपूर्वक सांगता येऊं शकत नाहीं तथापि त्यांच्या कालाचा सामान्यत निर्णय करण्याचा मी येथें प्रयत्न करीत आहे पण त्यांच्या कालाचा निर्णय करण्याकरिता त्यांचे गुरु अप्पय्या दीक्षित यांच्या कालाचा निर्णय प्रथम करणें आवश्यक आहे भट्टोजी दीक्षितांनी शेषकृष्णाजवळ महाभाष्यान्त संपूर्ण व्याकरणशास्त्र शिकून व नंतर प्रसिद्ध नारायण-भट्टाचे चिरंजीव शंकरभट्ट याचेजवळ वेदान्तशास्त्राचें व मीमांसाशास्त्राचें

साधारण अध्ययन करून पुढें सिद्धान्तकौमुदी लिहिली त्याकाळी अप्पैया दीक्षित हे महाविद्वान् व सर्वशास्त्रपारङ्गत पण्डित गणले जात होते व त्यानी वेदान्तावर व मीमांसेवर अनेक विद्वत्ताप्रचुर ग्रन्थ लिहिले असल्यामुळें आणि ते मीमांसकमूर्धन्य मानले जात असल्यामुळें त्यांची उत्तर हिन्दुस्थानात सर्वत्र कीर्ति पसरली होती व काशीत देखील त्याच्या ग्रन्थांची सर्वत्र प्रशंसा होत होती म्हणून भट्टोजी दीक्षितानी आपल्या सिद्धान्तकौमुदीची एक प्रत त्याच्याकडे मुद्दाम पाठविली व त्याच्याकडून भट्टोजी दीक्षिताचा ग्रन्थ फारच उत्तम रीतीनें लिहिला गेला आहे असा प्रशंसापर संदेश देखील भट्टोजीना आला होता अशी किंवदन्ती प्रचलित आहे म्हणून त्याच्याजवळ वेदान्त व मीमांसा या दोन गहन शास्त्राचे अध्ययन करावें अशी भट्टोजीना इच्छा झाली व त्यावेळी त्याचे कनिष्ट बन्धु रङ्गोजी देखील द्राविड-प्रान्तात राहत असल्यामुळें, त्यानी सेतुबन्धरामेश्वरच्या यात्रेला जाण्याचा व अप्पैयाचे दर्शन घेण्याचा निश्चय केला आणि त्याप्रमाणें ते रामेश्वरास जावयास निघाले वाटेंत चिदंबरम् हें पवित्रक्षेत्र पडत असल्यामुळें व त्यावेळी तेथें अप्पैया दीक्षित राहत असल्यामुळें त्यानी तेथें मुक्काम केला व ते अप्पैयाच्या दर्शनास गेले आख्यायिका अशी आहे की, त्यावेळी कर्मधर्मसयोगाने अप्पैया दीक्षित आपल्या विद्यार्थ्यांना भट्टोजीची सिद्धान्तकौमुदी पढवीत होते भट्टोजीनी स्वत-बद्दल काही माहिति न देता ते तेथें पाठ ऐकत बसले कौमुदीचा पाठ झाल्यावर अप्पैयानी आपल्या विद्यार्थ्यांना असे सांगितलें की, जरी भट्टोजीनी अशी विधानें केली आहेत तरी ती भाष्यविरुद्ध दिसतात व त्याना भाष्य वाचून दाखविलें त्यावर दीक्षितानी आपल्या मताचे समर्थन करण्याकरिता असे म्हटलें की, भाष्याचा आशय अप्पैयानी सांगितल्याप्रमाणे नसून कौमुदीत जे सिद्धान्त सांगितले आहेत त्याच्या-सारखा वास्तविक भाष्याचा आशय आहे. दोन तीन दिवस असेच झाले. अप्पैया दीक्षितानी कौमुदीत दिलेल्या सिद्धान्ताविरुद्ध भाष्याचा

अर्थ सांगावा व भट्टोजींनी भाष्याचा आशय वेगळा आहे असे सांगून कौमुदीतील सिद्धान्ताचे उत्तम रीतीने समर्थन करावे हे पाहून अप्पैया दीक्षित आश्चर्यचकित झाले व त्याना असे वाटले की, हा महाविद्वान् पण्डित बहुधा भट्टोजी दीक्षितच असावा. म्हणून त्यानी तुम्ही भट्टोजी दीक्षित आहात काय असा भट्टोजींना स्पष्टच प्रश्न केला मी तोच आहे हे भट्टोजींना कबूल करावे लागले व त्यानी अप्पैयास विनयपूर्वक नमस्कार करून आपण कोणत्या हेतूने येथें आलो आहो हे अप्पैयाला कळविले हे ऐकून अप्पैयाला फारच आनंद झाला (पहा सुब्रमण्य शास्त्रिकृत श्रीमदप्पैयदीक्षितेन्द्रविजय पान १७–१८) एवढा महाविद्वान् पुरुष प्रसिद्ध काशी विद्यापीठ सोडून व एवढया लांबचा प्रवास करून मजकडे शिक्षणार्थ आला आहे हे त्यानी ऐकल्यावर त्यानी भट्टोजीला प्रेमालिङगन दिले व तेव्हापासून जें त्याच्यात प्रेम जडले ते अखेरपर्यंत कायम राहिले नतर भट्टोजी रामेश्वरच्या यात्रेकरिता रवाना झाले व यात्रा करून परत आल्यावर ते अप्पैया जवळ सुमारे तीन वर्षे राहिले तेवढया अवधीत त्या कुशाग्रबुद्धि भट्टोजीला त्यानी शाकरभाष्यापासून परिमलापर्यंत सर्व वेदान्तग्रन्थ व तसेच मीमांसाग्रन्थहि शिकविले हे शिक्षण पूर्ण झाल्यावर ते भट्टोजीला केलदीचा राजा व्यकटपति याजकडे भेटीस घेऊन गेले व्यकटपति हा स्वत विद्वान् व अप्पैयादीक्षितासारखा मोठा अद्वैतमताचा पुरस्कर्ता होता अप्पैयानी भट्टोजीची प्रशसा करून त्याची ओळख करून दिल्यावर व्यकटपति फार प्रसन्न झाला त्यावेळी रङगोजी दीक्षित देखील व्यकटपतीच्या आश्रयास येऊन राहिले होते काही दिवस तेथें मुक्काम केल्यावर व्यकटपतीने भट्टोजींना विनंति केली की, त्यानी अद्वैतसिद्धान्तावर एक उत्तम ग्रन्थ लिहावा व राजाच्या आज्ञेनुसार भट्टोजींनी तत्वकौस्तुभनामक ग्रन्थ लिहिला त्या ग्रन्थात त्यानी 'केल्दीव्यकटेन्द्रस्य निर्देशाद्विदुषा मुदी ध्वान्तोच्छित्तौ पटुतरस्तन्यते तत्वकौस्तुभ ॥' असे स्पष्ट म्हटले आहे या नतर व्यकटपतीने

त्याचा गौरव करून त्यांची रवानगी केली पुढे भट्टोजी काही दिवस अप्पैयाजवळ राहून त्याच्या निर्देशानुसार त्यांनी मीमांसेवर एक उत्तम ग्रन्थ लिहिला हे सर्व काम आटोपल्यावर भट्टोजी अप्पैया दीक्षितासह काशीस परत जावयास निघाले अप्पैया दीक्षित सुमारे तीन वर्ष काशीत राहून नंतर आपल्या गावी परत आले व तेथे लौकरच सुमारे दोन तीन वर्षांनी त्याचे देहावसान झाले

अप्पैया दीक्षिताच्या कालासंबंधी देखील मतभेद दिसून येतो. शिवानन्दयोगीन्द्राने अप्पैयाची नष्टजातक पत्रिका देऊन असे म्हटले आहे की, अप्पैयाचा जन्म १८ सप्टेंबर १५५३ मध्ये झाला व ते १६२६ साली वारले अप्पैयाचा वंशज देखील असे म्हणतो की, १५५४–१६२६ हा अप्पैयाचा काल होय पण मद्रास ओरिअँटल जर्नल १९२८ व १९२९ यात महालिङ्गशास्त्री, मद्रास, यांनी दोन विद्वत्ताप्रचुर लेख अप्पैयाबद्दल लिहिले आहेत व त्यात त्यांनी असे सिद्ध करून दाखविले आहे की, अप्पैया दीक्षित इ स १५२० साली जन्मले व १५९३ साली त्याचा मृत्यु झाला या सिद्धान्ताच्या समर्थनार्थ त्यांनी जी अनेक प्रमाणे दिली आहेत त्यापैकी एक हे आहे की पाण्ड्यवंशातील राजा चंद्रशेखर राज्य करीत असता त्याने *त्यावेळी तरुणावस्थेत असलेल्या अप्पैयाची कीर्ति ऐकली व आपल्या* दरबारातील पण्डितांना अप्पैयाबरोबर वादविवाद करावा असे आव्हान केले तेव्हा त्या दरबारातील रत्नखेतनामक पण्डित अप्पैयाशी वादविवाद करण्यास तयार झाला त्यावर चंद्रशेखराने अप्पैयास पाचारण केले व अप्पैया तेथे आल्यावर त्याचा रत्नखेताशी वादविवाद झाला शेवटी रत्नखेत पराभूत झाला व त्याने अविवाहित अप्पैयाला आपली कन्या माणिक्याम्बा मोठ्या प्रेमाने अर्पण केली हे जे पाणिग्रहण घडवून आणले त्याला राजा चंद्रशेखर मुख्यत्वेकरून कारण झाला. राजा चंद्रशेखर १५४२ साली वारला यावरून हे सिद्ध होते की अप्पैया दीक्षित त्यावेळी २०–२२ वर्षांचा असावा हे

जें प्रमाण महालिङ्गशास्त्रीनें दिलें आहे तें ऐतिहासिक दृष्ट्या खरें असल्यास, अप्पैयाचा जन्म १५५३ किंवा १५५४ साली झाला हें जें इतरांनी विधान केलें आहे तें चूक ठरतें दोन्ही पक्षांना हें मान्य आहे की, अप्पैया दीक्षित ७३ वर्षांचे असताना वारले म्हणून जर अप्पैयाचा जन्म १५२० साली झाला हे खरें मानलें तर १५९३ साली त्यांचे देहावसान झालें हें आपोआपच सिद्ध होतें महालिङ्ग-शास्त्रींनी जीं अनेक कारणें दिलीं आहेत त्यावरून मला अल्प मतीनें असें वाटतें की, त्यांचें विधान वगैरे बरोबर आहे व ह्यो वे रामस्वामी शास्त्री एम्. ए. यांनी इंग्रजी भाषेत जें जगन्नाथ पण्डिताचें चरित्र लिहिलें आहे त्यांत देखील त्यांनी असेंच मत पान २१ मध्यें प्रदर्शित केलें आहे अशा रीतीनें अप्पैया दीक्षिताचा काल १५२०-१५९३ मानल्यास, भट्टोजींचा १५७५-१६३० हा जो काल सध्या मानला जातो तो त्याच्या जन्मकालासम्बन्धानें कांहीं वर्षें मागें ढकलणें आवश्यक आहे, कारण महाभाष्यान्त व्याकरणशास्त्राचें व प्रक्रिया-कौमुदी, प्रसाद, प्रकाश, कारिका, न्यास, पदमञ्जरी इत्यादि व्याकरणशास्त्रावरील अनेक ग्रन्थांचें श्रीकृष्णशेषाजवळ सपूर्ण अध्ययन करून व पुढें शंकरभट्टाजवळ वेदान्तशास्त्र व मीमांसाशास्त्र शिकून आणि नंतर सिद्धान्तकौमुदी लिहून भट्टोजी दीक्षित जेव्हां रामेश्वरचे यात्रेस गेले तेव्हां त्याचें वय निदान ३० तरी असलें पाहिजे म्हणून त्याच्या यात्रेचा काल सुमारे १५८६ ठरतो व तें अप्पैयाजवळ सुमारे तीन वर्षें राहून व दोन ग्रन्थ लिहून अप्पैयाबरोबर काशीस १५८९ सालचे सुमारास परत आले असावेत व काशीत अप्पैया दीक्षित सुमारे दोन वर्षें राहून नंतर आपल्या गावीं परत गेले व तेथें त्यांचें १५९३ साली देहावसान झालें सारांश अप्पैया दीक्षिताचा काल १५२०-१५९३ मानल्यास भट्टोजींचा काल १५५५-१६३० मानणें योग्य ठरतें

दुसरें असें की, भट्टोजी दीक्षित व त्यांचे धाकटे बंधु रङ्गोजी

दीक्षित हे दोघेहि नृसिंहाश्रमाचे शिष्य होते नृसिंहाश्रमस्वामी पुरुषोत्तमपुरास राहत असताना त्यांनी सवत् १६०४=इ स १५४७ मध्यें तत्वविवेकदीपन नामक वेदान्तावर ग्रन्थ लिहिला होता हें त्या ग्रन्थातील पुढील श्लोकावरून स्पष्ट होते –'अब्दे वेदवियद्रसेन्दुगणिते पौषासिते श्रीदिने । रक्षोनामनि पुरुषोत्तमपुरे ग्रन्थ मृदाऽचीकरत् ॥' भट्टोजी दीक्षितानी त्या ग्रन्थावर तत्वविवेकदीपनव्याख्यानामक टीका लिहिली रङगोजी भट्टानी देखील जो अद्वैतचिन्तामणिनामक ग्रन्थ लिहिला त्या ग्रन्थात त्यानी मधून मधून नृसिंहाश्रमाच्या ग्रन्थातील उतारे देऊन तदुक्त श्रीनृसिंहाश्रम गुरुचरणैं ' असे म्हटले आहे एका लेखावरून असे दिसून येते की, अप्पैया दीक्षित देखील नृसिंहाश्रमाना गुरुतुल्य मानीत असत व त्यांच्या आज्ञेवरूनच त्यानी कल्पतरुवर परिमलनामक प्रसिद्ध टीका लिहिली (पहा रा ब वावडेकरकृत भट्टोजिदीक्षित ज्ञातिविवेक पा ३०६ टीप १) हे जर खर असेल तर अप्पैया दीक्षितापेक्षा नृसिंहाश्रम वयाने मोठे असले पाहिजेत व पूर्वी सांगितल्याप्रमाणे अप्पैया दीक्षिताचा जन्म इ स १५२० मध्यें झाला असल्यामुळें नृसिंहाश्रमाचा जन्म निदान इ स १५१० मध्यें झाला असावा हे मानणे वावगें होणार नाही डॉ दासगुप्ताचे तर असे म्हणणे आहे की (पहा–History of Indian Philosophy Vol. II P 216) नृसिंहाश्रम इ स १५०० साली झाले भट्टोजी व त्याचे धाकटे बधु हे दोघेहि नृसिंहाश्रमाचे शिष्य असल्यामुळें, भट्टोजीचा जन्म इ स १५७० मध्यें किंवा त्याहिनतर काही कालाने झाला हे जें कित्येकाचे म्हणण आहे ते बरोबर मानता येत नाही व त्याचा जन्म इ स १५५५ चे सुमारास झाला व त्यानी सुमारें २५ वर्षाचे असताना नृसिंहाश्रमास गुरु केले हेच मानणे सयुक्तिक ठरते. अप्पैया दीक्षिताचा मृत्यु इ स १५९३ साली झाला असल्यामुळें जे कोणी म्हणतात की, जेव्हा इ स १६२६ चे सुमारास भट्टोजी दीक्षित व जगन्नाथ पण्डित या दोघामध्यें जो कानीत

कडावयाचा वादविवाद झाला त्यावेळीं अप्पय्या दीक्षित हजर होते व त्यांनीं वादांत भट्टोजी दीक्षितातर्फे भाग घेतला तें म्हणणें चूक ठरतें हें अगदीं उघड आहे

भट्टोजी दीक्षिताचा वंशवृक्ष खालीं दिल्याप्रमाणें आहे—




भट्टोजीचे पूर्वज विजागापट्टम् येथें राहत होते पुढें विजयानगर येथें कृष्णदेवराय राज्य करीत असतांना जेव्हां अनेक विद्वान् तैलंग ब्राम्हण राजाश्रय मिळण्याच्या हेतूनें त्या राज्यांत गेले तेव्हां भट्टोजीचे पूर्वज देखील तिकडे गेले व चिक्कियपट्टूर येथें स्थायिक झाले हा गांव कर्नाटक प्रान्तांत असल्यामुळें भट्टोजी तैलंग ब्राम्हण असून देखील कर्नाटक होते असें कित्येक म्हणतात भट्टोजीचा जन्म बहुधा त्याच गांवीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें इ स १५५५ च्या सुमारास झाला असावा त्याचे वडील महाविद्वान् पण्डित होते व भट्टोजींनीं त्यांना विद्वन्मुकुटमाणिक्य असें म्हटलें आहे 'भट्टोजी पौगण्डावस्थेत असतानाच लक्ष्मीधरपण्डिताचा अन्त झाला पुढें भट्टोजी उत्तर हिंदुस्थानांत प्रथम जयपुरास गेले व लवकरच जयपूर सोडून काशीस शेषकृष्णपण्डिताकडे व्याकरणशास्त्राच्या अध्ययनासाठीं येऊन राहिले भट्टोजी हे जात्याच लोकोत्तर बुद्धिमान् असल्यामुळें त्यांनीं थोड्याच अवधींत व्याकरणशास्त्रांत प्राविण्य संपादन केलें पुढें लवकरच ते विवाहबद्ध झाले ते अग्निहोत्र घेऊन,

सोमयाग करून दीक्षित झाले (पहा रा व वाबर्डेकर याचा भट्टोजी दीक्षित ज्ञातिविवेक पान ३५० ) भानुजीनी अमरकोशावरील वाक्य-सुधाटीकेच्या प्रारंभी 'वलवोवल्लभं नत्वा गुरु भट्टोजिदीक्षितम्' असे म्हटले असल्यामुळे त्यावरून हे स्पष्ट होते की, भट्टोजीच्या पत्नीचे नाव वलवी होते त्यानीं सपूर्ण व्याकरणशास्त्राचे महाभाष्यान्त अध्ययन श्रीकृष्णशेषाजवळ केले हे पूर्वी सांगितलेच आहे महाभाष्याचे बाळजीपूर्वक स्वतत्र अध्ययन केल्यावर त्याना असे दिसून आले की, काशिकेत, पदमञ्जरीत, प्रक्रियाकौमुदीत व त्यावरील प्रसाद व प्रकाश टीकेत कित्येक ठिकाणी केलेली विधाने व व्याख्यानें भाष्यविरुद्ध आहेत म्हणून त्यानी स्वतत्र प्रमाणभूत सिद्धान्तकौमुदी लिहिली या ग्रन्थात महाभाष्यावरून निष्पन्न होणारे सिद्धान्त सांगितले असल्यामुळे, भट्टोजींनी या ग्रन्थाला सिद्धान्तकौमुदी हे अन्वर्थक नाव दिले प्रक्रियाकौमुदी तयार झाल्यावर काशिका ग्रन्थ व त्यावरील न्यास व पदमञ्जरी यांचे पठन पाठन कमी होऊन भट्टोजीचे काळी प्रक्रियाकौमुदी व त्या ग्रन्थावरील प्रसाद व प्रकाश या टीकाचे पठन पाठन सुरू होते या ग्रन्थात केलेली कित्येक चूक विधाने दुरुस्त करण्याच्या हेतूनें व व्याकरणशास्त्र पढणाऱ्या विद्यार्थ्यांना भाष्यावरून निष्पन्न होणाऱ्या तात्त्विक सिद्धान्तांचा बोध व्हावा या सदिच्छेनें भट्टोजींनी सिद्धान्तकौमुदी निर्माण केली व त्यांचा ग्रन्थ इतका उत्कृष्ट वठला की, त्यावेळी प्रचलित असलेल्या पूर्व ग्रन्थांचे पठन पाठन हळूहळू बद पडून या सर्वमान्य सिद्धान्तकौमुदीचे पठन पाठन सर्वत्र सुरू झाले 'कौमुदी यदि कण्ठस्था वृथा भाष्यपरिश्रम' असो या ग्रन्थाची स्तुति सर्व निःपक्षपाती विद्वज्जनांनी केली आहे सिद्धान्तकौमुदीत केलेले व्याख्यान व तींत सांगितलेले सिद्धान्त बरोबर आहेत व त्याविरुद्ध पूर्व वैयाकरणांनी केलेले व्याख्यान व दिलेले सिद्धान्त चूक आहेत हें सिद्ध करण्याच्या हेतूनेंच भट्टोजींनीं प्रौढमनोरमानामक टीका स्वरचित सिद्धान्त-

कौमुदीवर लिहिलो श्रीकृष्णशेपाच्या मरणानंतर व शब्दकौस्तुभ लिहिल्यानंतर त्यानी हा ग्रंथ लिहिला व हा ग्रन्थ लिहितेवेळी त्याना स्वतःच्या गुरुनें केलेली व त्या काळी प्रमाणभूत मानली जाणारी अनेक विधानें खोडून काढण्याचे कटु कर्तव्य करावे लागले. पण Duty is duty असो म्हण आहे व सत्यान्वेषण करणाऱ्या पुरुषाना अशी कटु कर्तव्यें करण्याचा कित्येकदा प्रसग येतो आणि तशा वेळी दीक्षितानी वचरणें हे कर्तव्यपराङ्मुखतेचे द्योतक झाले असते. साक्षात् बापानें किंवा गुरुनें चुकीचे सिद्धान्त मांगितले असल्यास ते सिद्धान्त समर्थन करण्याचा प्रयत्न करणे व त्याची चूक उघडकीस न आणता ते चूक सिद्धान्त जसेचे तसेच प्रचलित ठेवणें हे अन्धतेचे लक्षण आहे. 'दोपा वाच्या गुरोरपि' हे वचन सर्वत्र प्रसिद्ध आहेच भट्टोजीनी केवळ आपल्या गुरुच्या मतानें खण्डन केले नसून काशिका, न्यास, पदमञ्जरी, माधवीय धातुवृत्ति, प्रक्रियाकौमुदी, प्रसादटीका इत्यादि अनेक व्याकरणग्रन्थात जी भाष्यविरुद्ध भ्रामक विधानें केली आहेत त्या सर्वांचे त्यानी खण्डन केले आहे तसे करिताना त्यानी कैयटास देखील वगळले नाही व भागवतावरील प्रसिद्ध व पूज्य टीकाकार श्रीधरस्वामी याची देखील एके ठिकाणी व्याकरणासबधानें केलेली चूक दाखविली आहे हेतु हाच की, विद्यार्थ्यांना सात्विक सिद्धान्ताचा बोध व्हावा शब्दरत्नकार व नागोजी भट्ट यानी कित्येक ठिकाणी भट्टोजीच्या मताचे खण्डन करून विरुद्ध मताचे प्रतिपादन केले आहे. तेवढ्यावरून ते जसे अनुक्रमें पितामहद्रोही व दीक्षितद्रोही ठरत नाहीत त्याचप्रमाणे भट्टोजी देखील गुरुद्रोही ठरत नाहीत व जगन्नाथपण्डितानी मता-पाच्या भरात त्याना गुरुद्रोही असे जे म्हटले आहे ते व्यर्थ व अयोग्य आहे भट्टोजीनी इतर ग्रन्थकाराच्या मताचे खण्डन करिताना त्याच्या नावाचा किंवा ग्रथाचा निर्देश केला आहे, पण आपल्या गुरुच्या मताचे खण्डन करिताना 'आत्मनाम गुरोर्नाम नामातिकृपणस्य च।

श्रेयस्कामो न गृण्हीयाज्ज्येष्ठापत्यकलत्रयो ' हे स्मृतिवचन लक्षात धरून त्याच्या नावाचा किंवा ग्रन्थाचा निर्देश न करिता 'यत्त्वाहु, यदाहु ' असा आदरार्थक बहुवचनाचा प्रयोग करून त्याचे ठिकाणी स्वतःचा आदर व्यक्त केला आहे आणि मनोरमेच्या प्रारंभी 'स्मार स्मार गुरोर्गिर ' असा त्याच्या सवधाने कृतज्ञतावोधक निर्देश केला आहे

प्रौढमनोरमा ही सिद्धान्तकौमुदीवर लिहिलेली टीका होय *सिद्धान्तकौमुदीत जरी सर्व सूत्राचे व्याख्यान केले आहे* तरी काही स्थली सूत्रनिर्दिष्ट सर्व विधींची उदाहरणे व प्रत्युदाहरणे न देता प्रसङ्गोपात्त विधीचेच उदाहरण दिले आहे उदाहरणार्थ 'न पदान्त' सू ५१ या सूत्रावरील कौमुदीत त्या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या सर्व विधीची उदाहरणे न देता केवळ द्विर्वचनविधीचे उदाहरण दिले आहे त्यामुळे त्या सूत्राचे खरे मर्म त्या सूत्रावरील कौमुदी वाचताना विद्यार्थ्यांच्या ध्यानात येत नाही ही एक सिद्धान्तकौमुदीत उणीव राहिली आहे काशिकेत जशी सूत्रोपात्त सर्व विधीची उदाहरणे दिली आहेत त्याचप्रमाणे भट्टोजी दीक्षितानी वास्तविक करावयास पाहिजे होते. परतु त्यानी तसे न करिता प्रक्रियाकौमुदीचा कित्ता गिरविला आहे ही उणीव भरून काढण्याकरिता व स्वमताचे समर्थन व त्याविरुद्ध असलेल्या परमताचे खण्डन करण्याकरिता त्याना प्रौढमनोरमा लिहावी लागली व या ग्रन्थाचे काळजीपूर्वक अध्ययन केल्यानेच सिद्धान्तकौमुदीचे खरे रहस्य कळू शकते भट्टोजीनी सिद्धान्तकौमुदी व प्रौढमनोरमा खेरीज करून इतर बत्तीस ग्रन्थ लिहिले आहेत व त्यापैकी शब्दकौस्तुभ हा एक प्रसिद्ध ग्रन्थ आहे

अष्टाध्यायीला धरून कौमुदी ग्रन्थ निर्माण करण्याचे सर्व श्रेय रामचन्द्राचार्यांना आहे हे पूर्वी सांगितलेच आहे रामचन्द्राचार्यांनी कित्येक सूत्राचे, त्याचा अर्थ स्पष्ट आहे असे मानून व्याख्यान केले नाही भट्टोजीनी सिद्धान्तकौमुदीत एकहि सूत्र गाळले नाही प्रक्रिया-

कौमुदीच्या उत्तरार्धात रामचन्द्राचार्यांनी भ्वादिगणातील ठळक ठळक धातु निवडून त्याना लागू पडणारी सूत्रें दिली आहेत व परस्मैपदाचे व आत्मनेपदाचे धातु वेगवेगळ्या प्रकरणात दिले आहेत. भट्टोजींनी तसें न करिता धातुपाठक्रमानुसार सर्व धातु सिद्धान्तकौमुदीत पठित करून योग्य ठिकाणी आवश्यक सूत्रें दिली आहेत व ठिकठिकाणी प्रक्रियाकौमुदीत दिलेल्या सूत्रपाठक्रमात इष्ट व आवश्यक फरक केला आहे त्याचा सूत्रपाठक्रम अधिक योग्य व सरस आहे यात काही संशय नाही व प्रक्रियाकौमुदीतील चूक विधानाचे जागी भाष्यमतानुसार भट्टोजींनी योग्य विधान केले आहे व आपली कामगिरी उत्कृष्ट रीतीनें बजाविली आहे. तरी पण भट्टोजींनी सिद्धान्तकौमुदी लिहिताना आपल्या डोळ्यासमोर प्रक्रियाकौमुदी ठेऊन ठिकठिकाणी प्रक्रियाकौमुदीत जसें व्याख्यान केले आहे व जी उदाहरणें दिली आहेत तसेंच व्याख्यान व तींच उदाहरणें त्यानीं ठिकठिकाणीं सिद्धान्तकौमुदीत दिली आहेत आणि म्हणूनच सिद्धान्तकौमुदी ही उत्कृष्ट रीतीनें काळजीपूर्वक सुधारलेली प्रक्रियाकौमुदीची आवृत्ति आहे असें पूर्वी म्हटले आहे

वर जो भट्टोजी दीक्षिताचा वंशवृक्ष दिला आहे त्यावरून हे स्पष्ट होतें कीं, रङ्गोजी हे भट्टोजींचे धाकटे बन्धु होते. ते भट्टोजीना अत्यन्त पूज्य मानीत असत हें त्यानीं केलेल्या अद्वैतचिन्तामणि ग्रन्थाच्या शेवटी 'भट्टोजीभट्टसञ्ज्ञं गुरुं नौमि निरन्तरम्' असें जें म्हटले आहे त्यावरून स्पष्ट होते रेणिगुन्टा स्टेशनापासून सुमारें १५ मैलावर तैलंग देशात असणाऱ्या कालहस्ति शहरात जें कालहस्तीशाचे देवालय आहे त्या देवतेचे ते उपासक होते व त्यानीं शिवोल्लास हा ग्रन्थ रचून कालहस्तीशाची स्तुति केली आहे ते व्यङ्कटपतीच्या दरबारात राजपण्डित होते हे पूर्वी सांगितलेच आहे ते देखील अप्पैया दीक्षितासारखें व आपल्या वडील बन्धूसारखे अद्वैतमताचे कट्टे पुरस्कर्ते होते व त्यानीं एका माध्व यतीला वादात

जिंकून राजदरबारातून पालखीचा मान मिळविला होता त्यांनी वरील दोन ग्रन्थांखेरीज अद्वैतशास्त्रसारोद्धार व पदार्थदीपिका हे दोन ग्रन्थ लिहिले आहेत त्यांचा पुत्र कोण्डभट्ट हा देखील महाविद्वान् वैयाकरण होता व त्याने *वैयाकरणभूषण, सिद्धान्तदीपिका,* स्फोटवाद इत्यादि सात ग्रन्थ लिहिले आहेत

भट्टोजींचा वडील पुत्र वीरेश्वर हा तारुण्यावस्थेंतच वारला त्याचा हरि दीक्षित हा पुत्र होय हरि दीक्षित हा रामाश्रमाचा शिष्य होता व रामाश्रम भट्टोजींचा शिष्य होता हरि दीक्षितानें सात ग्रन्थ लिहिले आहेत व हा प्रसिद्ध पण्डित नागोजी भट्टाचा गुरू होता, व नागोजी भट्टानीं त्याच्याजवळ व्याकरणशास्त्राचे अध्ययन केले होते भट्टोजींचा द्वितीय पुत्र भानुजी यानें अमरकोशावर व्याख्यासुधा-नामक सुन्दर टीका लिहिली आहे व या टीकेंत त्यानें अमरकोशांतील सर्व शब्दांची व्याकरणशास्त्रानुसार प्रक्रिया दिली असल्यामुळें ही टीका उच्च दर्जाची मानली गेली आहे भानुजीने ही टीका महीधर देशाचा राजा वघेलवंशोत्पन्न कीर्तिसिंह याच्या आज्ञेनुसार लिहिली होती हे त्या टीकेवरून स्पष्ट होते

प्रौढमनोरमेवर ज्या कित्येक टीका लिहिल्या गेल्या आहेत त्यापैकी शब्दरत्न ही सर्वोत्कृष्ट टीका मानली गेली असून तिचा कर्ता भट्टोजींचा पौत्र व रामाश्रमाचा शिष्य हरि दीक्षित होय हे त्या टीकेतील पुढील श्लोकावरून स्पष्ट होतें—'गूढोक्तिग्रथिता पितामहकृता विद्वत्प्रमोदप्रदा। भक्त्याधीत्य मनोरमा निरुपमाद्रामाश्रमाख्य द्गुरो। तत्वज्ञानवशात्परेण कलितान्दोषान्समुन्मूलयन्। व्याचष्टे हरिरेष ता फणिमतान्यालोच्य वैरेश्वरि॥' पण या टीकेचा कर्ता वास्तविक नागोजीभट्ट असून त्याने ही टीका कृतज्ञताबुद्धिपूर्वक आपल्या गुरूच्या नावाने लिहिली आहे असा सर्वत्र प्रवाद आहे व तो यथार्थ आहे असे अनेक विद्वानांचे म्हणणे आहे नागोजीभट्ट शृङ्गवेरपूरच्या रामराजाचे आश्रित होते आणि जरी आपला आश्रयदाता

रामराजा याच्या नावाने त्यानी अध्यात्मरामायणावर टीका लिहिली आहे त्याचप्रमाणे आपल्या गुरूच्या नावाने प्रौढमनोरमेवर शब्दरत्न ही टीका लिहून आपला आश्रयदाता व विद्यादाता या दोघाच्याहि ऋणातून ते मुक्त झाले आहेत उद्योत, परिभाषेन्दुशेखर व शब्देन्दुशेखर हे ग्रंथ लिहिल्यावर नागोजीभट्टानी शब्दरत्न टीका लिहिली. या टीकेत ठिकठिकाणी वरील तीन नागोजीभट्टकृत ग्रन्थातील अनेक पक्ति आढळतात. हरिदीक्षितानी आपल्या शिष्याने केलेल्या ग्रन्थातील पक्तीची शब्दरत्नात नागोजीचा नामनिर्देश न करिता नक्कल केली आहे हे म्हणणे त्याच्या कीर्तीला कलक लावण्यासारखें होय ते देखील विद्वान् पण्डित असल्यामुळें ते आपल्या शब्दात त्या त्या विषयाचे स्वतत्र रीतीने विवरण सहज करू शकले असते व त्याना आपल्या शिष्याच्या ग्रन्थातील पक्तीची ठिकठिकाणी नकल करण्याची काहीच गरज नव्हती नागोजीभट्टानी शब्दरत्नातून उद्योतात, परिभाषेन्दुशेखरात व शब्देन्दुशेखरात उतारे घेतले आहेत हेहि म्हणणे बरोबर दिसत नाही, कारण वरील तीन ग्रन्थात नागोजीभट्ट त्या त्या विषयाचे स्वतःच्या भाषेत स्वतत्र रीतीने विवरण करण्यास पूर्णपणे समर्थ होते व त्याना देखील गुरूचे नाव न घेता शब्दरत्नातील पक्तीची नक्कल करण्याची काही गरज नव्हती. 'जर नागोजीभट्ट शब्दरत्नाचे निर्माते नसते व हरिदीक्षितकृत तो ग्रंथ असता तर वरील तीन ग्रन्थात शब्दरत्नातील ज्या अनेक पक्ति आढळतात त्या लिहितेवेळी त्यानी 'तदुक्त गुरुचरणै शब्दरत्ने' असे अवश्य म्हटले असते व गुरुग्रन्थातील पक्ति त्यानी स्वनिर्मित आहेत अशा रीतीने आपल्या ग्रन्थात उद्धृत केल्या नसत्या वरील चारहि ग्रन्थाची भाषा अगदी सारखी आहे ती फार क्लिष्ट, समासप्रचुर व न्यायघटित असून त्या भाषेवरून हे स्पष्ट होते की, वरील चारहि ग्रन्थाचा निर्माता एकच असला पाहिजे व ही वस्तुस्थिति नागोजी भट्टाचा साक्षात् शिष्य वैद्यनाथ पायगुण्डे याला पूर्णपणे अवगत असल्यामुळें त्याने

शब्दरत्नावरील आपल्या भावप्रकाश टीकेत जेथें जेथें शब्दरत्नात 'इत्यत्र विस्तर ' हे शब्द आले आहेत तेथें 'अन्यत्र' या पदाचा बहुधा उद्योत, परिभाषेंदुशेखर किंवा शब्देन्दुशेखर असा अर्थ दिला आहे व हरिदीक्षिताच्या कोणत्याहि ग्रन्थाचा त्याने निर्देश केला नाही याचे उघड कारण हेच आहे की, हरिदीक्षिताच्या ग्रन्थात तशा तऱ्हेचे *विस्तृत विवरण केले नसून नागोजी भट्टकृत ग्रन्थातच तसे विवरण* केलेले आढळते हरिदीक्षितानी आपल्या शिष्याच्या ग्रन्थाचा हवाला दिला हे म्हणणे अगदीच विसङगत व असभवनीय ठरते, कारण गुरुला जर इतर ग्रन्थाचा हवाला देणे असेल तर तो स्वग्रन्थाचा किंवा प्राचीन मान्य वैयाकरणकृत ग्रन्थाचा हवाला देईल व शिष्य-निर्मित ग्रन्थाचा हवाला कव्हाहि देणार नाही तसे करणे गुरूला केव्हाहि शोभत नाही व गुरूने तसे करणे मुळीच सभवनीय नाही हरिदीक्षितानी नागोजी भट्टाच्या ग्रन्थाचाच शब्दरत्नात हवाला दिला *आहे असे मानल्यास, नागोजी भट्टानी वरील तीन्ही ग्रन्थ लिहितेवेळी* ते हयात होते व नतर त्यानी शब्दरत्न लिहिल्यावर ते वारले असे मानावे लागेल एक तर तसे मानण्यास काहीच आधार नाही व दुसरे असे की, तसे मानल्यास, हरिदीक्षिताना लोकोत्तर आयुष्य लाभले होते अशी असभवनीय कल्पना करावी लागेल साराश सर्व तऱ्हेने विचार केल्या असता हच सिद्ध होते की नागोजी भट्टानी आपल्या गुरूचे ठिकाणी कृतज्ञता प्रदर्शित करण्याकरिता आपल्या गुरूच्या मरणानतर गुरूच्या नावाने शब्दरत्न लिहिला तसे नसते तर वरील प्रवाद केव्हाहि उत्पन्न झाला नसता असा त्या विद्वानाच्या म्हणण्याचा आशय आहे

भटोजी दीक्षितानी आपल्या गुरूच्या मरणानतर प्रौढमनोरमा लिहिली हे पूर्वी सागितलेच आहे त्यानी त्या ग्रन्थात ठिकठिकाणी आपल्या गुरूच्या मताचे खण्डन केले असल्यामुळे शेषकृष्णाच्या वशजाना व त्याच्या शिष्यपरपरतील पण्डिताना भटोजीचा फार

राग आला व त्यापैकीं काही जणानी मनोरमेवर विरुद्ध टीकाग्रन्थ लिहिण्यास सुरुवात केली बहुधा हे ग्रन्थ भट्टोजीच्या मरणानतर प्रसिद्ध झाले असावेत जर भट्टोजीच्या ह्यातीत हे ग्रन्थ निर्माण झाले असते तर भट्टोजीनी स्वत त्या सर्व विरुद्ध टीकाचे समर्पक उत्तर दिले असते परतु हे काम नागोजी भट्टानी केले असल्यामुळे त्यावरून हे दिसून येते की, बहुधा हे सर्व ग्रन्थ भट्टोजीच्या मरणानतर तयार झाले असावेत शेषकृष्णाचा पुत्र वीरेश्वर जो जगन्नाथ पण्डिताचा गुरु होता त्याचा पुत्र चक्रपाणि याने प्रथम मनोरमेचे खण्डन करणारा ग्रन्थ लिहिला व त्यालाच उद्देशून भावप्रकाशात व भैरवीत खण्डनकार असे म्हटले आहे यानतर जगन्नाथ पण्डितानी मनोरमाकुचमर्दननामक ग्रन्थ लिहिला व या ग्रन्थाच्या प्रारंभी जगन्नाथ पण्डितानी 'लक्ष्मीकान्तपदाम्भोज प्रणम्य श्रेयसा पदम्। पण्डितेन्द्रो जगन्नाथ स्मृति गर्वं गुरुद्रुहाम् ॥' असे मङ्गलाचरण पठित करून पुढे असे म्हटले आहे 'इह केचिन्निखिलविद्वन्मुकुटमणिमालालालितचरणकमलाना शेषवशावतसाना श्रीकृष्णपण्डिताना चिरायार्चितयो पादुकयोः प्रसादादासादितशब्दानुशासनास्तेषु च पारमेश्वर पद प्रयातेषु कलिकालवशवदीभवन्तस्तत्रभवद्भिरुल्लासित प्रक्रियाप्रकाशमाशयानवबोधनिबन्धनैर्दूषणै स्वय निर्मितायां मनोरमायामाकुल्यकार्षु । सा च प्रक्रियाप्रकाशकृता पौत्रैरखिलशास्त्रमहार्णवमन्थाचलायमानमानसानामस्मद्गुरुपण्डितवीरेश्वराणा तनयैर्दूषिताऽपि स्वमतिपरीक्षार्थं पुनरस्माभिर्निरीक्ष्यते।' एवढे करून देखील जगन्नाथ पण्डिताचा क्रोध नाहींसा झाला नाही त्यानी पुढे लवकरच शब्दकौस्तुभावर शब्दकौस्तुभशाणोत्तेजननामक ग्रन्थ लिहिला व त्या ग्रन्थात त्यानी 'अप्पय्यदुर्ग्रहविचेतितचेतनानामार्यद्रुहामयमहं शमयेज्ज्वलेपान्' असे म्हटले आहे भट्टोजी दीक्षितानी शेषकृष्णाच्या प्रकाशग्रन्थावर मनोरमेत विरुद्ध टीका केली याबद्दल त्याना भट्टोजीचा राग येणे साहजिक होते

परतु या क्रोधाच्या आवेशात त्यानी अप्पैया दीक्षितावर तासेरे का झाडले आहेत याचे कारण ध्यानात येत नाही अप्पैया दीक्षित त्याच्यापेक्षा वयाने बरेच जास्त असून विद्येत देखील श्रेष्ठ होते मनोरमाग्रन्थ निर्माण होण्याच्या बरेच पूर्वी ते निवर्तले होते व तो ग्रन्थ लिहिण्यास त्यानी भट्टोजीना चिथविले व उत्तेजन दिले हे म्हणणे असभवनीय ठरते हृ अगदी उघड आहे परतु भट्टोजीनी आपला स्वजातीय तैलग प्रसिद्ध विद्वान् गुरु श्रीकृष्ण शेष याला सोडून दूर प्रान्तात राहणाऱ्या विजातीय द्रविड ब्राम्हणाचे शिष्यत्व पत्करले हृ पाहून जगन्नाथ पडिताना त्याचा फार राग आला असावा व त्या रागाच्या आवेशातच त्यानी अप्पैया दीक्षिताना अयोग्य शिव्या देऊन त्याच्यावर तासेरे झाडले पुढे त्यानी अप्पैया दीक्षितकृत चित्रमीमासेचे खण्डन करतेवेळी 'द्रविडशिशु प्रलपति' इत्यादि वाईट शब्दानी त्याना सबोधिले आहे तसेच रसगङगाधरनामक ग्रन्थात देखील त्यानी बरेच ठिकाणी अप्पैयाचे मत खोडून काढण्याचा प्रयत्न केला आहे व एका ग्रन्थात 'अप्पैय्यदीक्षितदवानलदग्धशेष साहित्यमङ्कुरयते सरसैनि-बन्धै' असा अप्पैयावर तासेरा झाडून मोठ्या प्रौढीने आत्मप्रशसा केली आहे

८

चक्रपाणि व जगन्नाथपडित याच्या खेरीज इतर दोन पडितानी प्रौढमनारमेवर विरुद्ध टीका केली आहे. त्यापैकी एक श्रीकृष्ण शेषाचा धाकटा मुलगा व जगन्नाथपडिताचे गुरु वीरेश्वर याचा कनिष्ट बधु नारायण हा होय याने महाभाष्यावर सूक्ति-रत्नाकर नावाची टीका लिहिली आहे व या टीकेत त्याने दीक्षिताचे मत ठिकठिकाणी चूक ठरविण्याचा प्रयत्न केला आहे. 'रत्नाकरोक्ति खण्डयति' असे जें ठिकठिकाणी भावप्रकाशात व भैरवीत म्हटले आहे ते या नारायणालाच उद्देशून म्हटले आहे

भट्टोजीच्या प्रौढमनोरमेवर विरुद्ध टीका करणारा चवथा पडित शिवरामेन्द्रसरस्वती हा होय हा सन्यासी होता आणि म्हणूनच

भावप्रकाशकार व भैरवीकार यानी याचा दण्डी–सन्यासी–या नावाने आपल्या टीकेंत निर्देश केला आहे. भट्टोजी दीक्षितांनी जेव्हा सिद्धान्तकौमुदी लिहून प्रसिद्ध केली तेव्हाच या सन्याशाने ता ग्रन्थ वाचून पित्त खवळले व त्याने 'प्रक्रिया विक्रिया नोता श्रीमद्भट्टोजि-दीक्षितैः' असे सिद्धान्तकौमुदीसंबधाने उद्गार काढले. हा चक्रपाणीचा समकालीन होता व चक्रपाणीला याच्याबद्दल फार आदर वाटत असे व चक्रपाणीने याच्यासंबधाने 'वैयाकरणकुम्भीन्द्रकुम्भनिर्भेदभीषण । कवीन्द्रकेसरी भाति काश्यामानन्दकानने ॥' असे म्हटले आहे. हा बहुधा वीरेश्वराचा शिष्य असावा व पूर्वाश्रमात याने वीरेश्वराजवळ व्याकरणशास्त्राचे अध्ययन केले असावे व वीरेश्वराचे वडील श्रीकृष्ण शेष याची मते दीक्षितांनी प्रौढमनोरमेंत कित्येक ठिकाणी खोडून काढली असल्यामुळे याला दीक्षितांचा राग आला असावा. याने महाभाष्यावर सिद्धान्तरत्नाकरनामक टीका लिहिली आहे व त्या टीकेंत याने भट्टोजी दीक्षितांची मते ठिकठिकाणी खोडून काढण्याचा प्रयत्न केला आहे.

वरील चारहि टीकाकारांनी जे भट्टोजींच्या मताविरुद्ध प्रतिपादन केले त्याचे शब्दरत्नात व शब्देन्दुशेखरात पूर्णपणे खण्डन केले आहे. हे जें शब्दरत्नात व शब्देन्दुशेखरात विरुद्ध मताचे खण्डन करून दीक्षितांच्या मताचे समर्थन केले आहे त्याचे खण्डन करण्यास समर्थ असा कोणी विद्वान् वैयाकरण शेष घराण्यात किंवा त्या घराण्यातील शिष्यपरंपरेत निपजला नाही, व तसेच सिद्धान्तकौमुदीत जें प्रक्रियाकौमुदीविरुद्ध पाणिनीय सूत्रांचे मधून मधून दीक्षितांनी व्याख्यान केले आहे ते सदोष असून प्रक्रियाकौमुदीकारांनी जें व्याख्यान केले आहे तेच योग्य आहे असे सप्रमाण प्रतिपादन करणारा कोणीहि विद्वान् वैयाकरण नागेशानंतर निपजला नाही. त्यामुळे सिद्धान्तकौमुदी, प्रौढमनोरमा, शब्दरत्न, शब्देन्दुशेखर व परिभाषेन्दु-शेखर हेच व्याकरणशास्त्रावर प्रमाणभूत ग्रन्थ मानले जाऊन त्यांचेच

सर्वत्र पठन पाठन सुरु झाले व अजूनहि तीच स्थिति कायम आहे नागेशाच्या शिष्यपरपरेतच वैजनाथ पायगुडे इत्यादि अनेक विद्वान् वैयाकरण निपजले व त्या सर्वांनी दीक्षितसप्रदायच चालू ठेवला त्यामुळें कौमुदीकारामध्यें भट्टोजी दीक्षिताना अग्रस्थान प्राप्त झाले आणि प्रक्रियाकौमुदी, प्रसादटीका व प्रकाशटीका याचे अध्ययन नाहीसे होऊन सर्वत्र सिद्धान्तकौमुदीचेच अध्ययन प्रचलित झाले; कारण अष्टाध्यायीचे यथार्थ ज्ञान होण्याकरिता सिद्धान्तकौमुदीसारखा दुसरा कोणताहि ग्रन्थ नाही

पाणिनीनें जशी अष्टाध्यायी तयार केली त्याचप्रमाणे धातुपाठ, गणपाठ, लिङ्गानुशासन व शिक्षा हे ग्रन्थ निर्माण केले व पाणिनीय शास्त्रात जसे हे ग्रन्थ अन्तर्भूत होतात त्याचप्रमाणे पाणिनीय सूत्रावर रचलेली व भाष्यकारानी स्वीकारलेली वार्तिके आणि तसेच परिभाषा, उणादि सूत्रें व फिट्सूत्रे ही देखील अन्तर्भूत होतात अष्टाध्यायीत फारच थोड्या परिभाषा सागितल्या असून बाकीच्या सर्व परिभाषा व्याडीने आपल्या सङ्ग्रहनामक ग्रन्थात एकत्रित केल्या होत्या तो ग्रन्थ जरी भाष्यकाराच्या वेळी विद्यमान होता तरी पुढें लौकरच तो ग्रन्थ नाहीसा झाला सुदैवाने भाष्यकारानी भाष्यात सर्व महत्वाच्या परिभाषा पठित केल्या असून त्याची प्रयोजनेहि दिली आहेत या सर्व परिभाषावर सीरदेवाने इ सन तेराव्या शतकापूर्वी परिभाषावृत्तिनामक ग्रन्थ लिहिला व पुढें नागेशानी अठराव्या शतकात परिभाषेन्दुशेखरनामक उत्कृष्ट व सर्वमान्य ग्रन्थ लिहिला *हाच ग्रन्थ आजकाल परिभाषाचे यथार्थज्ञान होण्याकरिता प्रमाणभूत* ग्रन्थ मानला जातो या ग्रन्थाचे महाराष्ट्रभाषेंत विस्तृत विवरण मी केले असून ते १९३६ च्या अखेरीस छापून प्रसिद्ध केले आहे

*उणादिसूत्रें कोणी रचली हे सागता येणे कठिण आहे* कित्येकाचे असे म्हणणे आहे की, ही सूत्रें पाणिनीच्या पूर्वी झालेल्या शाकटायन मुनीने प्रणीत केली आहेत व या विधानाच्या समर्थनार्थ

ते 'नाम च धातुजमाह निरुक्ते व्याकरणे शकटस्य च तोकम्' या भाष्यवचनाचा आधार देतात इतराचें असें म्हणणें आहे की, उणादि-सूत्रांत पाणिनीय संज्ञाचाच सर्वत्र निर्देश आढळत असल्यामुळें हीं सूत्रें पाणिनीच्या पूर्वी झालेल्या शाकटायनानें रचलीं आहेत हें म्हणणें चूक ठरतें व हीं सूत्रें पाणिनीनें स्वतःच रचलीं असून त्यांत वार्तिककारानें बहुधा पुढें भर घातली आहे आणि 'उणादयो बहुलम्' हें सूत्र पाणिनीनें पठित केलें असल्यामुळें त्यानेंच उणादिसूत्रपाठ तयार केला हेंच मानणें सयुक्तिक ठरतें असें त्याचें म्हणणें आहे उणादिसूत्रें प्रथम किती होतीं व त्यांत पुढें कोणी किती सूत्रांची भर घातली हें सांगता येणें कठिण आहे एवढें मात्र निश्चित आहे की, मूळ उणादिसूत्रांत अनेक वैयाकरणांनीं पुढें वेळोवेळीं बरीच भर घातली उणादिसूत्रें प्रथम पाच पादांत पठित असून पुढें त्यांचे दहा पाद झाले दीक्षितांनीं कौमुदींत पञ्चपादींचें विवरण केलें असून प्रक्रियाकौमुदींत दशपादीचें विवरण केलें आहे उज्ज्वलदत्तानें तेराव्या शतकांत पञ्चपादीवर वृत्ति लिहिली असून पुढें माणिक्य-देवानें दशपादीवर वृत्ति लिहिली आहे दीक्षितांनीं कौमुदींत पञ्चपादीचा संग्रह केला असल्यामुळें त्यावरून हें दिसून येतें की, त्यांच्या मतें पञ्चपादी हाच मूळचा विश्वसनीय ग्रन्थ असून दशपादी हा ग्रन्थ पुढें जेव्हां इतर व्याकरणसंप्रदाय सुरू झाले तेव्हां निर्माण झालेला ग्रन्थ आहे

पाणिनीनें जी स्वरप्रक्रियेची सूत्रें अष्टाध्यायींत पठित केलीं आहेत तीं स्वरसिद्धि करतेवेळीं कांहीं ठिकाणीं अपुरीं पडत असल्या-मुळें ही उणीव भरून काढण्याच्या हेतूनें पाणिनीच्या नंतर व वार्तिक-कालापूर्वी शान्तनवाचार्यानें फिट्सूत्रें रचलीं हीं सूत्रें वार्तिककालापूर्वी रचलीं गेलीं हें म्हणण्याचें कारण हें की, वार्तिककालांत हीं सूत्रें नसतीं तर वार्तिककारानें तशा अर्थाचीं वार्तिकें अवश्य पठित केलीं असतीं फिट्सूत्रें चार पादांत पठित केलीं असून त्यांची संख्या ८७

आहे व या सर्व सूत्रावर व तसेच उणादिसूत्रावर दीक्षितानी कौमुदीच्या उत्तरार्धात वृत्ति लिहिली आहे

पाणिनीच्या धातुपाठावर अनेक विद्वान् वैयाकरणानी वृत्ति लिहिली आहे व त्यापैकी बऱ्याच ग्रन्थकर्त्यांचा नामनिर्देश मनोरमेत केला आहे, उदाहरणार्थ क्षीरस्वामी, मैत्रेयरक्षित, उज्वलदत्त, माधव, श्रीपति, पुरुषोत्तम, विश्वरूप व रत्नमति याखेरीज शब्दरत्नात मम्मनाकाराचा देखील निर्देश केला आहे क्षीरस्वामी अकराव्या शतकात झाला असून त्याने धातुवृत्तिशिवाय अमरकोशावर टीका लिहिली आहे व तसेच त्याने क्षीरतरङ्गिणी, निपाताव्ययोपसर्गवृत्ति, व निघण्टुवृत्ति हे ग्रन्थ लिहिले आहेत मैत्रेयरक्षिताने धातुवृत्ति लिहिली असून जिनेन्द्रबुद्धिकृत न्यासटीकेवर तन्त्रप्रदीप नावाची टीका लिहिली आहे या टीकेला अनुन्यास असे देखील म्हणतात या ग्रन्थकाराचा नामनिर्देश इ स ११६० च्या सुमारास झालेल्या सर्वानन्द पण्डिताने केला असल्यामुळे, हा बहुधा अकराव्या शतकात झाला असावा माधव चवदाव्या शतकात विजयानगरच्या राजाचा मन्त्री होता या अलौकिक बुद्धिमान् सर्वशास्त्रनिष्णात पण्डिताने अनेक शास्त्रावर उत्कृष्ट ग्रन्थ लिहिले असून उत्तम धातुवृत्ति देखील लिहिली आहे श्रीपति हा वङ्गदेशीय पण्डित असून याने कातन्त्रावर उत्तम परिशिष्ट लिहिले आहे व तसेच धातुवृत्ति देखील लिहिली आहे हा प्रसिद्ध कातन्त्रपरिशिष्टकार पधराव्या शतकात झाला. पुरुषोत्तम हा देखील वङ्गदेशीय बौद्ध पण्डित होता राजा लक्ष्मणसेन (११७९–१२०६) बङ्गालात राज्य करीत असता, त्याच्या आज्ञेनुसार पुरुषोत्तमाने धातुवृत्ति लिहिली विश्वरूप हा कोशकर्ता असून धातुवृत्तिकार देखील होता रत्नमति केव्हा झाला हे सागता येत नाही मम्मनाकार हा मम्मतानामक धातुवृत्तीचा कर्ता असला पाहिजे त्याचे नाव काय होते व तो केव्हा झाला हे कळत नाही

धातुपाठावर जशा अनेक वृत्ति लिहिल्या आहेत तशा गणपाठा-

वर लिहिल्या गेल्या नाहीत याचे उघड कारण हेच की, धातुपाठ जसा भाषेंत अत्यन्त महत्वाचा भाग आहे तसा गणपाठ नाही. तथापि गणपाठात ज्याना महत्व आहे, म्हणजे 'स्वरादिनिपातमव्ययम्' सू ४८७ या सूत्रान्वयें ज्याना अव्ययसंज्ञा आहे, त्यावर क्षीरस्वामीनें वृत्ति लिहिली आहे व त्यानंतर वर्धमानानें संपूर्ण गणपाठावर गणरत्न-महोदधिनामक प्रसिद्ध ग्रन्थ बाराव्या शतकाच्या पूर्वार्धात लिहिला आहे व या दोन्ही ग्रन्थाचा निर्देश मनोरमेंत केला आहे

लिङ्गानुशासन व शिक्षा हे जे दोन ग्रन्थ सध्या उपलब्ध आहेत ते पाणिनिकृत नव्हत असे किन्येक विद्वानाचे मत आहे. 'अथ शिक्षा प्रवक्ष्यामि पाणिनीयं मतं यथा' या शिक्षेंतील प्रथम श्लोकाच्या पूर्वार्धावरूनच हें दिसून येतें की, पाणिनीनंतर त्याच्या संप्रदायातील कोणीतरी विद्वान् पण्डितानें हा ग्रन्थ निर्माण केला असावा 'लिङ्गमशिष्यं लोकाश्रयत्वाल्लिङ्गस्य' असे वार्तिककार व भाष्यकार यानी म्हटलें असल्यामुळें, व्याकरणशास्त्रात लिङ्गानु-शासनाला विशेष महत्व नाही आणि म्हणून या ग्रन्थासंबधानें अधिक चर्चा करण्याची आवश्यकता नाही भट्टोजी दीक्षितानी मात्र या ग्रन्थावर देखील कौमुदीत वृत्ति लिहिली आहे व इतर काही ग्रन्थ-कारानीहि या ग्रन्थावर वेळोवेळी वृत्ति लिहिली आहे

दीक्षितानीं मनोरमेंत वर निर्दिष्ट केलेल्या ग्रन्थकाराखेरीज ज्या इतराचा निर्देश केला आहे ते व्याघ्रभूति, शौनक, शाकल्य, भागुरि, जयदेव, पञ्चकाव्याचे कर्ते, म्हणजे कालिदास, भारवि, माघ व श्रीहर्ष व तसेच भट्टि व अनुस्मृतिकार हे होत याशिवाय शब्द-रत्नात हेलाराज व व्याख्यादर्शकार याचा देखील निर्देश केला आहे व्याघ्रभूति हा पाणिनीचा शिष्य असून त्याने पाणिनीय संप्रदाय चालू राहावा या हेतूने कारिकाग्रन्थ तयार केला अशी जनश्रुति आहे शौनक व शाकल्य हे प्राचीन प्रातिशाख्यकार होत भागुरि हा क्रोष्टुक पीचा पुत्र होता याला क्रौष्टकि भागुरि असें म्हणतात व हा

यास्कापूर्वी झाला. हा प्राचीन व्याकरणाचार्य होता याने केलेला कोणताहि ग्रन्थ उपलब्ध नाही तथापि याच्या मताची प्रदर्शक 'वष्टि भागुरिरल्लोपमवाप्योरुपसर्गयो । आप चैव हलन्ताना यथा वाचा निशा दिशा ॥' ही कारिका सर्वत्र प्रसिद्ध आहे व या कारिकेचा उल्लेख मनोरमेंत केला आहे जयदेव कवि हा प्रसिद्ध गीतगोविन्द *काव्याचा कर्ता होय वङ्गालात राजा लक्ष्मणसेन राज्य करीत* असताना त्याचे जे नव मुख्य सभापण्डित होते त्या नवरत्नापैकी हा एक होता कालिदासादि पञ्चकाव्यकर्ते व भट्टिकाव्याचा कर्ता हे प्रसिद्ध कवि असून याचा, कालनिर्णय करण्याचे हे स्थल नव्हे. हे केव्हा झाले हे कोणत्याहि सस्कृत वाङमयाच्या इतिहासग्रन्था-वरून सहज कळून येईल हेलाराज याने भर्तृहरिकृत वाक्यपदीयावर टीका लिहिली आहे हेलाराज केव्हा झाला हें सागता येत नाही *आणि तसेंच अनुस्मृतिकार व व्याख्यादर्शकार हे कोण होते व केव्हा* झाले याचीहि माहिती मला उपलब्ध झाली नाही

अष्टाध्यायीत सुमारे ४००० सूत्रें पठित असून त्या सूत्रावर बरीच वार्तिके पठित आहेत ही सर्व सूत्रें व वार्तिकें पाठ करून व याचा अर्थ नीट समजून घेऊन ध्यानात ठेवणे व इष्ट रूपाची सिद्धि करते वेळी त्याचा यथार्थ उपयोग करणे याकरिता पुष्कळ परिश्रम करावे लागतात व बराच काळ व्यतीत करावा लागतो ससारात पोट भरण्याकरिता अविश्रान्त परिश्रम करणाऱ्या पुरुषाला अजस्र पाणिनीयशास्त्राचा अभ्यास करण्यास वेळ मिळणे शक्य नाही या *सर्व अडचणी ध्यानात आणून,* थोडया अवधीत कोणालाहि व्याकरण-शास्त्राचे ज्ञान सपादन करून घेता यावे व शुद्ध सस्कृत लिहिता व बोलता यावे या हेतूने कित्येक विद्वान् वैयाकरणानीं ल्हान स्वतत्र व्याकरणग्रन्थ वेळोवेळी निर्माण केले या दिशेने प्रथम प्रयत्न करणारा कातन्त्रसूत्रकार शर्ववर्मा हा होय हा ख्रिस्तोत्तर पहिल्या शतकात झाला आख्यायिका अशी आहे की, त्या शतकात दक्षिण देशात

शातवाहन घराण्यातील जो राजा राज्य करीत होता त्याने उत्तर हिन्दुस्थानातील एका विदुषी कन्येशी लग्न केले होते व या राणीला तद्देशीय भाषा अवगत नसल्यामुळें ती नेहमी राजाशी संस्कृतांत बोलत असे. राजाला फारच कमी संस्कृत येत असल्यामुळे, त्याला कित्येकदा तिचे भाषण कळत नसे व त्यामुळें त्याची फजिती होत असे. एकदा जलक्रीडेच्या प्रसङ्गी राणीनें 'मोदकं देहि राजन्' असे राजास म्हटलें असता, राजानें राणीकरिता मोदक घेऊन येण्याबद्दल नोकरास आज्ञा केली. हे ऐकून राणी हसली व माझ्या अङ्गावर पाणी शिंपडूं नका हा माझ्या म्हणण्याचा अर्थ होता असे तिने राजास सांगितले. हे ऐकून राजा फार खजील झाला व त्याच्या दरबारांत शर्ववर्मानामक जो महापण्डित होता त्याला विनंती केली कीं, ज्या योगाने मला संस्कृत भाषा चांगल्या रीतीनें थोडक्या काळांत समजता व बोलता येईल असें एक लहानसें सोपें व्याकरण आपण तयार करावें. तेव्हां त्या पण्डितानें शिवाराधना करून शंकरास प्रसन्न केलें व शंकरानें आपला पुत्र कुमार-कार्तिकेय-याला आज्ञा केली कीं, या पण्डिताचे मनोरथ पूर्ण कर. त्यावरून कुमारानें त्या पण्डिताला आपल्या मयूराकडून व्याकरणसूत्रें कळविलीं व त्या सूत्रांनाच कौमार किंवा कालापसूत्रें म्हणतात. पाणिनीची सुमारें चार हजार सूत्रें असून कातन्त्राची केवळ आठशें पंचावन सूत्रें असल्यामुळे, या शास्त्राला कातन्त्र-लहानसें तन्त्र-असें म्हणतात. पण संस्कृत भाण्डागार अत्यन्त विशाल असल्यामुळें व कातन्त्रातील थोड्या सूत्रांनी संस्कृत भाषेतील सर्व रूपांची सिद्धि होऊं शकत नसल्यामुळे, त्या व्याकरणशास्त्राला वेळोवेळी कौमार वैयाकरणांनी परिशिष्टे जोडली व या परिशिष्टांनाच कातन्त्रपरिशिष्ट म्हणतात. कातन्त्र-सूत्रावर दुर्गसिंहानें सुमारें इ. स. आठव्या शतकांत विस्तृत टीका लिहिली व त्या शास्त्राला धातुपाठ जोडून त्यावर धातुवृत्ति लिहिली व ते शास्त्र पाणिनीयशास्त्रासारखें त्यानें व इतरांनी सर्वाङ्गपूर्ण

करण्याचा प्रयत्न केला. कातन्त्रानंतर अनेक व्याकरणसंप्रदाय निघाले, उदाहरणार्थ चन्द्रगोमिन्चा चान्द्रसंप्रदाय, पूज्यपाद देवानन्दीचा जैनेन्द्रसंप्रदाय, नरेन्द्राचा सारस्वतसंप्रदाय, वोपदेवाचा मुग्धबोध-संप्रदाय, पद्मनाभभट्टाचा सौपद्मसंप्रदाय. याशिवाय शैवसंप्रदायाची व वैष्णवसंप्रदायाची देखील व्याकरणशास्त्रें निर्माण झाली. या सर्व व्याकरणसंप्रदायाचा काल व इतिहास डॉ. बेल्वलकरकृत *Systems of Sanskrit Grammar* या ग्रन्थात दिला आहे. या सर्व संप्रदायातील व्याकरणग्रन्थ संस्कृत भाषेत प्रचलित असलेल्या सर्व तन्हेच्या रूपाची सिद्धि करण्याकरिता उपयोगी पडणारे नसल्यामुळें व त्यात वैदिक प्रक्रिया व स्वरप्रक्रिया दिली नसल्यामुळें, ते काही कालपर्यंत टिकून पुढें कालगतीनें 'उत्पद्यन्ते विलीयन्ते' या न्यायानव्ये विलयास गेले व हिन्दुस्थानच्या थोडयाशा भागात जरी काही संप्रदाय अजून चालू आहेत तरी सर्वत्र पाणिनीयशास्त्राचे अध्ययन सुरू आहे. याचे कारण पूर्वी सांगितल्याप्रमाणे हेंच आहे की, पाणिनीयशास्त्र संस्कृत भाषेतील सर्वरूपांना व्यापणार व कोणत्याहि रूपाची सिद्धि करण्यास उपयोगी पडणार सर्वाङ्गपरिपूर्ण असून पूर्वाचार्यांनी व उत्तराचार्यांनी केलेले व्याकरणग्रन्थ त्याच्या कसोटीला पावत नसल्यामुळें आणि त्याच्या पुढे ते सर्व ग्रन्थ फिके पडत असल्यामुळें, ते काहीं काळ टिकाव धरून पुढे कालगतीनें नष्टप्राय व नामशेष झाले आणि सर्वांना पुरून पाणिनीयशास्त्रच अनेक शतकापासून टिकाव धरून उरले आहे आणि सर्वमान्य झाले आहे. धन्य ता पाणिनी व धन्य त्याची विशाल बुद्धि ! ज्या हिन्दुस्थानात 'न भूतो न भविष्यति' असा हा अद्वितीय पुरुष निर्माण झाला त्या हिन्दुस्थानाला त्याच्याबद्दल अत्यन्त अभिमान वाटणे साहजिक आहे. व त्या महात्म्याची जितकी स्तुति करावी तितकी थोडीच आहे. जरी अष्टाध्यायीवर अनेक वार्तिके रचली गेली तरी विद्वान् वैयाकरणांनी ठिकठिकाणी असेच म्हटले आहे की, 'सूत्रेष्वेव हि तत्सर्वं यद्वृत्तौ यच्च वार्तिके।'

जसा व्याकरणसूत्रकारात आचार्य पाणिनि श्रेष्ठ त्याचप्रमाणे कौमुदीकारात भट्टोजी दीक्षित श्रेष्ठ जशी अष्टाध्यायी निर्माण झाल्यावर पूर्वाचार्यांचे ग्रन्थ विलयास गेले त्याचप्रमाणे सिद्धान्तकौमुदी तयार झाल्यावर पूर्वकौमुदीग्रन्थाचे पठनपाठन बंद पडून ते नामशेष झाले सिद्धान्तकौमुदीच विद्यार्थ्यांना समजणे फार कठीण आहे जोपर्यंत वासुदेव दीक्षितकृत सिद्धान्तकौमुदीवरील बालमनोरमानामक टीका प्रसिद्ध झाली नव्हती तोपर्यंत गुरूच्या सहायाशिवाय सिद्धान्तकौमुदीत दिलेल्या अनेक पक्तींचा अर्थ व तसेच त्या ग्रन्थात दिलेल्या अनेक उदाहरणांची प्रक्रिया कळणे फार कठीण जात होते पण आता फार सरळ व सुन्दर भाषेत लिहिलेल्या बालमनोरमेच्या साहाय्याने गुरूच्या मदतीशिवाय कौमुदीतील पक्तींच्या अर्थाचा बोध होऊ शकतो व सर्व उदाहरणांची प्रक्रिया कळू शकते सिद्धान्तकौमुदीपेक्षा मनोरमा फार कठीण असून मनोरमेपेक्षा शब्दरत्न किती तरी पट कठीण आहे मूळ ग्रन्थाचा अर्थ विशद होऊन तो सहज रीतीने सामान्य विद्यार्थ्यांच्या ध्यानात यावा हें वास्तविक टीकेचे ध्येय असले पाहिजे व टीका मूळ ग्रन्थापेक्षा सोपी व सुबोध असली पाहिजे पण प्रकृत स्थली पाहावे तो अगदी उलट प्रकार दिसून येतो मूळ ग्रन्थाच्या मानाने टीका अधिक कठीण व दुर्बोध आहे मूळ ग्रन्थातील कठीण पक्तींचा अर्थ विशद करण्याचा व उदाहरणांची प्रक्रिया समजवून देण्याचा टीकेत मुळीच प्रयत्न केला नसून अनेक क्लिष्ट कल्पना उपस्थित करून त्यावर उत्तर दिले आहे शंका व समाधान इतक्या कठीण व त्रोटक शब्दात सांगितले आहे की, त्याचा भावार्थ ध्यानात येणे हे सामान्य विद्यार्थ्यास फारच जड जाते त्यामुळें नको ती टीका, मूळच बरें, असे वारंवार म्हणण्याची पाळी येते मनोरमेची भाषा शब्दरत्नासारखी समासप्रचुर, न्यायघटित व क्लिष्ट नाही व तत्वबोधिनीत आणि विशेषत बालमनोरमेंत मनोरमेंतील काही पक्तींचे विवरण करून पुष्कळ ठिकाणी प्रक्रिया दिली आहे त्यामुळें

मनोरमेच्या पङ्क्ति कशा तरी लावता येऊ शकतात पण त्या दोन्ही टीकेंत शब्दरत्नातील कोणत्याहि पङ्क्तीचा अर्थ विशद केला नसल्यामुळें, शब्दरत्न लावतेवेळी त्या टीका उपयोगी पडत नाहीत आणि भैरवी व भावप्रकाश या टीकांच्या सहायानें शब्दरत्न कसा तरी लावावा लागतो पण या दोन टीका बालमनोरमेसारखा प्रत्येक पङ्क्तीचा अर्थ विशद करीत नाहीत त्यामुळें शब्दरत्न लावतेवेळी कित्येक ठिकाणी फार अडचण जाते. परिष्कारप्रिय वैयाकरणानी शब्दरत्नावर मधून मधून काहीं टिप्पणी दिल्या आहेत पण त्या टिप्पणीत वीत वीत लांब समासाचा उपयोग करून न्यायघटित व क्लिष्ट भाषा वापरली असल्यामुळें सामान्य वाचकास त्या टिप्पणीपासून काहीं विशेष अर्थबोध व फायदा होत नाही बालमनोरमेच्या धर्तीवर प्रौढमनोरमा, शब्दरत्न, शब्देन्दुशेखर, परिभाषेन्दुशेखर इत्यादि व्याकरणशास्त्रावरील प्रमाणभूत ग्रन्थांचे सामान्य विद्यार्थ्यांस देखील समजू शकेल अशा सोपी व सरळ संस्कृत भाषेंत विद्वान् पण्डितानी व्याख्यान केले पाहिजे व तसें केल्यासच हे ग्रन्थ नीट ध्यानात येऊ शकतील व व्याकरणशास्त्राध्ययन करू इच्छिणाऱ्या विद्यार्थिवर्गावर त्यांचे फार उपकार होतील दुर्दैवानें तसा प्रयत्न अजून कोणी करीत नाही सध्या संस्कृत भाषेबद्दल सर्वत्र व विशेषत: महाराष्ट्रांत फारच अनास्था उत्पन्न झाली आहे त्यात व्याकरणशास्त्रासारखे कठीण विषय शिकण्याची इच्छा फारच थोड्या विद्यार्थ्यांना होते. दुसरे असें की, जरी सिद्धान्तकौमुदी पढविणारे शास्त्री अजून ठिकठिकाणी महाराष्ट्रात आहेत तरी व्याकरणशास्त्रावरील वरचे ग्रन्थ शिकविणारा पण्डित महाराष्ट्रांत फारच क्वचित् आढळतो. जरी सुदैवानें काशीत तसे थोडे पण्डित आहेत. परन्तु गरीब विद्यार्थ्यांना द्रव्याभावामुळें तेथें जाता येणें शक्य नाही महामहोपाध्याय वे० शा वासुदेवशास्त्री अभ्यंकर यानी मराठीत महाभाष्याचे सुन्दर भाषान्तर करून व ठिकठिकाणी टीका देऊन विद्यार्थिवर्गावर फार

उपकार केले आहेत इतर प्रसिद्ध प्रचलित व्याकरणग्रन्थाचे देखील तसे भाषान्तर व्हावयास पाहिजे व विद्वान् महाराष्ट्र वैयाकरणानी तसा प्रयत्न केला पाहिजे तसे केल्यासच व्याकरणशास्त्र पठित करण्याची जी प्रथा सध्या दुर्दैवाने बद पडली आहे ती पुन्हा थोडी-बहुत प्रचलित होण्याची उमेद आहे

मी कोणत्याहि वैयाकरणाजवळ जुन्या पद्धतीने व्याकरणशास्त्राचे अध्ययन कार्यबाहुल्यामुळे सरकारी नोकरीत असताना करू शकलो नाही पण सेवानिवृत्त झाल्यावर मला जी पहिल्यापासून व्याकरण शास्त्राची गोडी होती ती पुन्हा उत्पन्न झाली व माझे परममित्र प्रो गोपाळ केशव गर्दे याच्याबरोबर मी सिद्धान्तकौमुदीची काही प्रकरणे वाचली व पुढे काही वर्षांनी त्याच्या प्रेरणेने व सहायाने मी परिभाषेन्दुशेखराचे मराठीत विस्तृत विवरण करून तो ग्रन्थ १९३६ च्या अखेरीस प्रसिद्ध केला त्यानतर काही मित्राच्या प्रेरणेने मी मनोरमा व शब्दरत्न याचे भाषान्तर व विवरण करण्यास सुरुवात केली परिभाषेन्दुशेखराचे डॉ किल्हॉर्न यानी इग्रजीत भाषान्तर केले आहे पण मनोरमा व शब्दरत्न या ग्रन्थाचे भाषान्तर अजून कोणीहि केले नाही आणि म्हणून मी ते ग्रन्थ मुद्दाम हाती घेतले प्रथम माझा मनोरमेचेच विवरण करण्याचा विचार होता पण शब्दरत्न वाचल्याशिवाय मनोरमेचे खरे रहस्य कळू शकत नाही हे आढळून आल्यावर मी दोन्ही ग्रन्थाचे विवरण करण्यास प्रारभ केला हे करिताना माझे मित्र प्रो गर्दे याचे काही वेळपर्यंत मला साहाय्य झाले पण ते पुढे लवकरच आजारी पडले व अजून ते गेल्या पाच वर्षांपासून सारखे आजारीच आहेत व अध झाले आहेत मीहि सुमारे दोन वर्षांपूर्वी फार आजारी झालो व अजून माझा आजार चालूच आहे व वार्धक्यामुळे शरीर व्याधीने जर्जर झाले आहे अशा स्थितीत मी स्त्रीप्रत्ययान्त मनोरमा व शब्दरत्न या ग्रन्थाचे कसे तरी विवरण केले आहे कारक प्रकरणाचे विवरण करण्याची माझी फार

इच्छा होती पण आता शरीर अगदी दुर्बल झाले असल्यामुळे, दुर्दैवाने ती इच्छा पूर्ण करण्याचे सामर्थ्य माझ्यात राहिले नाही व त्याबद्दल मला फार दिलगिरी वाटते माझी उत्कट इच्छा ही आहे की, कोणी तरी विद्वान् महाराष्ट्र वैयाकरणाने अवशिष्ट राहिलेल्या कारकप्रकरणाचे व तसच कारकान्त शब्देन्दुशेखराचे मराठीत विस्तृत व सुबोध विवरण करावे

मनोरमा व शब्दरत्न याचे विवरण करिताना मी प्रथम प्रत्येक पङ्क्तीचा सरळ अर्थ दिला आहे व त्यानतर प्रत्येक पङ्क्तीचे कसात विस्तृत विवरण करून जेथे जेथे प्रक्रिया देणे आवश्यक आहे तेथे पूर्ण प्रक्रिया दिली आहे आणि प्रक्रिया देताना पाणिनीय सूत्रे व त्याच्या बालमनोरमेच्या प्रतीत दिलेला अनुक्रमाङ्क दिला आहे. त्यामुळे ज्याने सिद्धान्तकौमुदी वाचली आहे त्याला गुरुच्या महाया-शिवाय माझे विवरण वाचल्याने मनोरमा व शब्दरत्न पूर्णपणे कळू शकतील अशी मला पूर्ण आशा आहे माझा ग्रन्थ कितपत ठीक झाला आहे हे वैयाकरणच सागू शकतील मी यावद्बुद्धिबलोदय वरील दोन ग्रन्थाचे मराठीत विवरण करून व्याकरणशास्त्राची व मातृभाषेची यथाशक्ति थोडीशी सेवा करण्याचा प्रयत्न केला आहे व या विवरणाने जर विद्यार्थिवर्गाची अडचण दूर होईल तर माझे परिश्रम सफल झाले आहेत असे मी समजेन

हा ग्रन्थ लिहितेवेळी प्रा गोपाळ केशव गर्दे यानी मला जी अमूल्य मदत केली तिचेबद्दल मी त्याचे जितके आभार मानके तितके कमीच आहेत त्याच्यामुळेच मला व्याकरणशास्त्रावरील वरचे ग्रन्थ वाचण्याची इच्छा झाली व त्याच्या कृपाप्रसादानेच मी ती इच्छा थोडी बहुत पूर्ण करू शकलो आणि म्हणून मी त्याचा सदैव ऋणी आहे प्रस्तुत ग्रथ जरी मी कसातरी लिहून काढला तरी माझा स्वत चे ठिकाणी आत्मविश्वास नसल्यामुळे, बनारस गव्हर्मेन्ट सस्कृत कॉलेजात असलेले व्याकरणशास्त्राचे प्रधानाध्यापक सुप्रसिद्ध विद्वान्

प गोपाळशास्त्री नेने, व्याकरणाचार्य याना माझा ग्रन्थ वाचण्याची मी विनन्ति केली व माझे विनन्तीस मान देऊन त्यानी माझे ग्रन्थाचा बराच भाग वाचला व मधूनमधून उपयुक्त सूचना केल्या आणि माझा ग्रन्थ वाचून ते फार प्रसन्न झाले तसेच अनन्तशास्त्री फडके, व्याकरणाचार्य व मीमांसातीर्थ व दिवाकरशास्त्री जोशी, व्याकरणाचार्य आणि सदाशिवशास्त्री मुसळगावकर, माजी प्रिन्सिपॉल गव्हर्नमेंट संस्कृत कॉलेज, ग्वालेर, यानी कृपा करुन माझ्या ग्रन्थाची काही प्रकरणे वाचली व या सर्व विद्वान पण्डितानी माझ्या ग्रन्थाबद्दल उत्कृष्ट अभिप्राय नमूद केले आहत या सर्व सज्जनानी माझा ग्रन्थ वाचण्याची जी तसदी घेतली व जे माझे हार्दिक अभिनन्दन केले त्याबद्दल मी त्याचा फार आभारी आहे ही प्रस्तावना लिहिताना मला डॉ बेल्वल्करकृत 'Systems of Sanskrit grammar' व महामहोपाध्याय हरप्रसाद शास्त्री यानी बङ्गाल रॉयल एशिआटिक सोसायटीच्या ग्रन्थाल्यात जे हस्तलिखित ग्रन्थ आहेत त्याच्या सबधान लिहिलेली प्रस्तावना आणि रा व बावडेकरकृत भट्टोजी दीक्षित–ज्ञातिविवेक या तीन ग्रन्थाचा फार उपयोग झाला आहे व या ग्रथकाराचे मी मनपूर्वक आभार मानतो ही प्रस्तावना लिहितेवेळी माझे जामात चि रा शिवनाथपत झारखण्डी, एम् ए, एम् एस्सी यानी बरेच परिश्रम घेऊन मधून मधून पुष्कळ माहिती पुरविली मला हस्तकपामुळे लिहिता येत नसल्यामुळे या ग्रन्थलेखनाचे सर्व काम माझ्या ज्येष्ठ चिरंजिवाने केले असेरीस ज्या जगदीश्वराच्या कृपेने हे ग्रन्थलेखनाचे काम मी कसतरी पार पाडू शकलो त्याचे चरणकमली हा ग्रन्थ अत्यन्त नम्रतापूर्वक अर्पण करुन ही प्रस्तावना मी पूरी करितो

धनोली, चैत्र शु ९ शके १८६७      ना. दा. वाडेगांवकर
ता २०–४–१९४५

---

टीप–जेथे जेथे मी आपल्या विवरणात दीक्षित हा शब्द वापरला आहे त्याने भट्टोजी दीक्षिताचे ग्रहण करावे.

॥ श्रीगणेशायनम ॥

# प्रौढमनोरमा व शब्दरत्न यांचें महाराष्ट्रभाषेंत विवरण

सर्वारिष्टविनाशक गणपतिं श्रीव्यंकटेश प्रभुम् ।
देवीं माहुरवासिनीं भगवतीं पूज्य मुनीनां त्रयम् ॥
भट्टोजि हरिदीक्षित च पितरौ श्रीभट्टजोशास्त्रिणम् ।
नत्वा प्रौढमनोरमाविवरणं कुर्वे प्रसादाद्गुरोः ॥ १ ॥
हरिदीक्षितैः कृताया गूढार्थाया मनोरमाविवृतेः ।
व्याख्यान च यथामति कुर्वेऽह मातृभाषायाम् ॥ २ ॥
क्व शब्दरत्नो गम्भीरो मादृशोऽल्पमतिः क्व च ।
तथाऽपि साहसं कुर्वे क्षन्तव्यं तन्मनीषिभिः ॥ ३ ॥

## अथ संज्ञाप्रकरणम्

मनोरमा– ध्यायं ध्याय परं ब्रह्म स्मारं स्मारं गुरोर्गिरः ।
सिद्धान्तकौमुदीव्याख्या कुर्मः प्रौढमनोरमाम् ॥

परब्रह्माचे पुन्हा पुन्हा ध्यान करुन व गुरुंच्या उक्तीचे पुन्हा पुन्हा स्मरण करुन सिद्धान्तकौमुदीची प्रौढमनोरमानामक व्याख्या आम्ही करितो. (हातीं लिहिण्यास घेतलेल्या ग्रन्थाची निर्विघ्नपणें समाप्ति व्हावी व त्या ग्रन्थाचा सर्वत्र प्रसार होऊन त्याची सर्वत्र प्रसिद्धि व्हावी या हेतूने दीक्षितानी 'ग्रन्थादौ ग्रन्थमध्ये ग्रन्थान्ते च मङ्गलं कुर्यात' या शिष्टाचाराला व तसेच 'भूवादयो धातव' सू १–३–१ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी 'मङ्गलादीनि मङ्गलमध्यानि मङ्गलान्तानि हि शास्त्राणि प्रथन्ते वीरपुरुषाणि च भवन्त्यायुष्मत्पुरुषाणि चाध्येतारश्च मङ्गलयुक्ता यथा स्युः' असे जे म्हटले आहे त्याला अनुसरुन वरील मङ्गलाचरण केले आहे )

शब्दरत्न– शेषविभूषणमीडे शेषाशेषार्थलाभाय ।
दातु सकलमभीष्ट फलमीष्टे यत्कृपादृष्टि ॥१॥

ध्याय ध्यायमिति । ध्यात्वा ध्यात्वेत्यर्थ । णमुलन्तमेतत् । परम् = सर्व जगदुपादानम् । कार्यब्रह्महिरण्यगर्भव्यावृत्तये इदम् । ध्यानम् = चिन्तापरपर्याय स्मृत्यनुकूलव्यापाररूपम् । स्मरण तु तज्जन्यमिति विशेष । गुरोरित्येकवचनेन सर्वविद्यालाभ एकस्मादेव गुरोरिति सूचितम् । 'प्रौढाना मनो रमयति' इत्यर्थिका मनोरमाम् । प्रौढत्व च सकलदर्शनार्थज्ञानपूर्वकमहाभाष्यगूढार्थज्ञानवत्त्वम् ॥

ज्याचा कृपाकटाक्ष सर्व वाछित फल देण्यास समर्थ आहे व शेष ज्याचा अलकार आहे अशा शिवाची, भाष्यातील सपूर्ण अर्थाचे ज्ञान होण्याकरिता, मी स्तुति करितो मनोरमेतील 'ध्याय ध्यायम्' या पदाचा 'ध्यात्वा ध्यात्वा' असा अर्थ आहे व ह ('ध्यै' धातूचे) णमुलप्रत्ययान्त रूप आहे (त्याचप्रमाणे 'स्मार स्मारम्' हे देखील 'स्मृ' धातूचे णमुलप्रत्ययान्त रूप असून त्याचा 'स्मृत्वा स्मृत्वा' असा अर्थ आहे वरील दोन्ही स्थली 'आभीक्ष्ण्ये णमुल् च' सू ३३४३ या सूत्राने 'पौन पुन्य' या अर्थामध्ये णमुल् प्रत्यय झाला असून 'नित्यवीप्सयो' सू २१४० या सूत्राने द्विर्वचन झाले आहे) मनोरमेतील 'परम्' या पदाचा सकलविश्वाचे उपादानकारण असा अर्थ आहे व हिरण्यगर्भरूप कार्यब्रह्माची व्यावृत्ति व्हावी याकरिता ते पद घातले आहे ('अपञ्चीकृतसकलभूतसमष्टिसूक्ष्मशरीरोपहितो हिरण्यगर्भ, तदुपाधिभूततादृशशरीरस्य जन्यत्वात् हिरण्यगर्भस्य जन्यत्वव्यवहार । अतएव–हिरण्यगर्भ समवर्तताग्रे भूतस्य जात पतिरेक आसीत् । इति श्रुति सङ्गच्छते' असे भैरवीत म्हटले आहे. साराश अशा कार्यब्रह्माचे ग्रहण न होता 'नित्य विज्ञानमानन्द ब्रह्म' या शुद्ध चैतन्यस्वरूप जगदुपादानकारण परब्रह्माचे ग्रहण व्हावे याकरिता दीक्षितानी 'परम्' हे पद मङ्गलाचरणात घातले आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे) 'ध्यानम्' हा शब्द चिन्तन

या अर्थाचा वाचक असून 'चिन्तन' हा स्मृति होण्यास अनुकूल व्यापार आहे, म्हणजे चिन्तनामुळेंच स्मृति होते स्मृति चिन्तनामुळे होणारी आहे व हाच ध्यान–चिन्तन–व स्मरण या दोहांमध्यें फरक आहे ('ध्यै चिन्तायाम्' या धातूहून भावे 'ल्युट् = अन' प्रत्यय केल्याने ध्यान हा जो शब्द सिद्ध होतो त्याचा चिन्तन असा अर्थ आहे) 'गुरो' असा जो मनोरमेंत ('आदरार्थे बहुवचनम्' या वचनानुसार 'गुरूणा गिर' असा बहुवचनाचा प्रयोग न करिता) एकवचनाचा प्रयोग केला आहे तो असा हेतूने केला आहे की, एकाच गुरूजवळ सर्व शास्त्राचे अध्ययन करून विद्या अधिगत केली आहे हे सूचित व्हावे. (शेषोपनामक कृष्णाचार्य दीक्षिताचे गुरु होते ते सर्व शास्त्रात निष्णात असल्यामुळे दीक्षितांनी त्यांच्याच जवळ सर्व शास्त्रांचे अध्ययन करून त्यात प्रभुत्व संपादन केले व त्यांना कोणतेहि शास्त्र शिकण्याकरिता इतर गुरूजवळ जाण्याची गरज पडली नाही हें 'गुरो' या एकवचनाच्या प्रयोगाने बोधित होतें) 'प्रौढमनोरमाम्' या पदाचा 'प्रौढाना मनो रमयति नाम्' असा अर्थ–विग्रह– आहे सर्व दर्शनाचे ज्ञान संपादन केल्यानंतर ज्यांनी महाभाष्याचे अध्ययन करून त्याच्या गूढ अर्थांचे ज्ञान संपादित केले आहे ते प्रौढ होत ('प्रौढमनोरमा' या पदाचा 'प्रौढा चासौ मनोरमा' असा विग्रह करू नये तसा विग्रह केल्यास 'वयात आलेली कामिनी' असा त्या शब्दाचा अनिष्ट अर्थ होईल विशेषतः असे म्हणणे आहे की, प्रौढमनांसि रमयति इति प्रौढमनोरमा' असा देखील विग्रह करता येत नाही, कारण तसा विग्रह केल्यास, 'कर्मण्यण्' सू २९१३ या सूत्राने 'अण्' प्रत्यय होऊन 'टिड्ढाणञ्,' सू ४७० या सूत्राने 'ङीप्' प्रत्ययाची प्राप्ति होईल व 'प्रौढमनोरमा' असे इष्ट रूप सिद्ध होऊ शकणार नाही. म्हणून 'नन्दिग्रहिपचादिभ्य' सू २८९६ या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'पचादि' आकृतिगणात शिवा 'कर्मकर्ते मूल-विभुजादिभ्य उपसंख्यानम्'–सू २९१९ वरील वार्तिकाच्या वार्तिकात

निर्दिष्ट असलेल्या 'मूलविभुजादि' आकृतिगणात 'रम्' धातु अन्तर्भूत आहे असे मानून त्या 'रम्' धातूहून 'अच्' किंवा 'क' प्रत्यय करून व नतर 'अजाद्यतष्टाप्' सू ४५४ या सूत्राने 'टाप्' प्रत्यय करून 'रमयतीति रमा' असे रूप सिद्ध केल्यावर 'प्रौढमनसा रमा प्रौढमनोरमा' असा विग्रह करणे उचित आहे पण 'नन्दिग्रहिपचादिभ्यः' या सूत्राने होणारा 'अच्' प्रत्यय व तसेच 'मूलविभुजादिभ्यः' या वार्तिकाने होणारा 'क' प्रत्यय हे दोन्ही 'कर्मण्यण्' या सूत्राने होणाऱ्या 'अण्' प्रत्ययाचे बाधक असल्यामुळे, पचादिगणात किंवा मूलविभुजादिगणात अन्तर्भूत मानलेल्या 'रम्' धातूहून, कर्मार्थक उपपद असता देखील, 'अण्' प्रत्यय न होता 'अच्' किंवा 'क' *प्रत्ययच होऊ शकतो व त्यामुळे 'ङीप्' प्रत्ययाची प्राप्ति होत नाही,* व 'प्रौढमनांसि रमयतीति प्रौढमनोरमा' असा विग्रह करण्यात काणताहि प्रत्यवाय येत नाही असे भैरवीकाराचे म्हणणे आहे व म्हणूनच तसाच', विग्रह शब्दरत्नकारानी केला आहे 'प्रौढमनोरमा' या सामासिक शब्दात 'प्रौढ' हा जो शब्द मुद्दाम घातला आहे त्याने हे सूचित होते की, दीक्षितानी केलेली सिद्धान्तकौमुदी मध्यम विद्यार्थ्याकरिता असून तीत केवळ सिद्धान्त सांगितले आहेत पण तेच बरोबर सिद्धान्त होत व इतर वैयाकरणानी त्या सिद्धान्ताविरुद्ध जें प्रतिपादन केले आहे ते चूक आहे इत्यादि विविध कठीण विषयाची त्या ग्रंथात चर्चा केली नाही ती चर्चा प्रकृत ग्रंथात केली आहे व इतर वैयाकरणानी मानलेले विरुद्ध अर्थ व सिद्धान्त खोडून काढले *आहेत त्या चर्चेचे सार मर्म व रहस्य प्रौढानाच, म्हणजे ज्यानी इतर* दर्शनाचे अध्ययन करून महाभाष्याचे काळजीपूर्वक अध्ययन केले आहे अशा विद्वानानाच, कळू शकते व तशा विद्वानाच्याच मनाला आनंद देणारी व रमविणारी ही टीका असल्यामुळे तिला दीक्षितानीं 'प्रौढमनोरमा' असे जें नाव दिले आहे तें अन्वर्थक ठरते हे उघड आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे )

मनोरमा– "हयवरट्" । हकारोपदेशः, अट्अशहल्इण्ग्रहणेषु हकारग्रहणार्थः । 'अर्हेण' "अट्व्यवायेऽपि" इति णत्वम् । 'देवा हसन्ति' "भोभगो" इति रोर्यत्वम् । 'देवो हसति' "हशि च" इत्युत्वम् । 'लिलिहिढ्वे' 'लिलिहिध्वे' "विभाषेटः" इति वा ढः ॥

'हयवरट्' या शिवसूत्रात जें हकाराचे उच्चारण केले आहे ते अशाकरिता की, 'अट्, अश्, हल्' व 'इण्' या प्रत्याहारानी हकाराचे ग्रहण व्हावे ('हयवरट्' व 'हल्' या दोन्ही शिवसूत्रात हकाराचे उच्चारण केले आहे. 'हल्' या अन्तिम शिवसूत्रात हकाराचे उच्चारण केले असून पुन्हा 'हयवरट्' या शिवसूत्रात हकाराचे उच्चारण का केले आहे याचे प्रयोजन दीक्षितानी या पंक्तीत सांगितले आहे. अट्प्रत्याहाराने हकाराचे ग्रहण होणे म्हणूनच) 'अर्हेण' या उदाहरणात 'अट्कुप्वाङ्नुम्व्यवायेऽपि' सू १९७ या सूत्राने णत्व झाले आहे ('अर्हेण' या उदाहरणात रकार व नकार या दोहोमध्ये हकार व एकार याचे व्यवधान आहे. एकार हा अट् आहे जर 'हयवरट्' या शिवसूत्रात हकाराचे उच्चारण केले नसते तर अट्प्रत्याहाराने हकाराचे ग्रहण झाले नसते व त्यामुळे 'अर्हेण' या स्थली णत्व न होता 'अर्हेन' असे अनिष्ट रूप होण्याची आपत्ति आली असती. ती आपत्ति टळावी व तसेच 'अट्कुप्वाङ्नुम्-ह्व्यवायेऽपि' असे वेगळें हकारग्रहण करून तसे सूत्र पठित करण्याची गरज न पडावी याकरिता प्रकृत शिवसूत्रात हकाराचे ग्रहण केले आहे) 'देवा हसन्ति' या उदाहरणात 'भोभगोअघो' सू १६७ या सूत्राने 'रु' चे जागी यकारादेश झाला आहे ('देव अस् हसन्ति' या स्थली 'प्रथमयो पूर्वसवर्ण सू १६४ या सूत्रान पूर्वसवर्णदीर्घ होऊन व 'ससजुषो रु' सू १६२ या सूत्राने पदान्ती असलेल्या सकाराचे रुत्व होऊन 'देवा रु हसन्ति' अशी स्थिति झाली असता, अश्प्रत्याहाराने हकाराचे ग्रहण होत असल्यामुळेच व तो हकार 'रु' पुढें आला असल्यामुळें, 'भोभगो' या सूत्राने 'रु' चे जागी यकार

होऊन देवाय् हसन्ति' अशी स्थिति होते व 'हलि सर्वेषाम्' सू १७१ या सूत्राने यकाराचा लोप होऊन 'देवा हसन्ति' असा इष्ट प्रयोग सिद्ध होतो. जर प्रकृत शिवसूत्रात हकाराचे ग्रहण केले नसते तर अश्प्रत्याहारान हकाराचे ग्रहण झाले नसते व वरील इष्ट प्रयोग सिद्ध होऊ शकला नसता ) 'देवो हसति' या उदाहरणात 'हशि च' सू १६६ या सूत्राने उत्व झाले आहे ('देव सु हसति' या स्थली 'ससजुषो रुः' सू १६२ या सूत्राने पदान्ती असलेल्या सकाराचे रुत्व होऊन 'देव र् हसति' अशी स्थिति झाली असता, हश्प्रत्याहाराने हकाराचे ग्रहण होत असल्यामुळेच, 'हशि च' या सूत्राने 'रु' चे जागी उकार होऊन 'देव उ हसति' अशी स्थिति होते व नंतर 'आद्‌गुणः' सू ६९ या सूत्राने 'देव' यातील अन्त्य अकार व त्यापुढील उ या दोहोंचे जागी 'ओ' असा गुणरूप एकादेश होऊन 'देवो हसति' हा इष्ट प्रयोग सिद्ध होतो जर प्रकृत शिवसूत्रात हकाराचे उच्चारण केले नसते तर हश्प्रत्याहार साधताच येऊ शकला नसता व 'हशि च' या सूत्राऐवजी यशि च असे सूत्र करावे लागले असते व यश्प्रत्याहारात हकाराचे ग्रहण होऊ शकले नसते व वरील इष्ट प्रयोग सिद्ध होऊ शकला नसता तो प्रयोग सिद्ध होण्याकरिता यशि च या सूत्रात हकाराचे वेगळे ग्रहण करणे भाग पडले असते हे सर्व टळावे व हश् प्रत्याहार साधता यावा आणि त्या हश्प्रत्याहारात हकाराचे ग्रहण व्हावे याकरिता प्रकृत शिवसूत्रात हकाराचे उच्चारण केले आहे असा दीक्षितांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे ) 'लिलिहिढ्व, लिलिहिध्वे' या स्थली 'विभाषेटः' सू २३२५ या सूत्राने विकल्पेकरून ढकार होतो (इण्प्रत्याहारान्तर्गत वर्णापुढे इट् असून त्या इटपुढे लिट् किंवा लुङ् लकाराचा 'ध्वम्' प्रत्यय आल्यास, त्या प्रत्ययातील धकाराचा, 'विभाषेटः' या सूत्राने, विकल्पेकरून ढकार होणे सांगितले आहे लिडादेश लिट् 'लिट् च' सू २१७२ या सूत्रान्वये आर्धधातुकसंज्ञक प्रत्यय असल्यामुळे, लिट्चे जागी

होणाऱ्या वगादि प्रत्ययाना 'आर्धधातुकस्येड् वलादेः' सू. २१८४ या सूत्राने इडागम होतो जरी 'लिट्' धातु अनिट् आहे तरी, त्यापुढे लिडादेश वलादि आर्धधातुक प्रत्यय आल्याम, तशा प्रत्ययाला वादि-नियमान्वयें इडागम होतोच, आणि जरी 'सिपतमुजि' सू. २१५४ या सूत्रात 'ध्वम्' प्रत्यय निर्दिष्ट आहे तरी त्या प्रत्ययातील 'अम्' या 'टि' चे जागी 'टित आत्मनेपदानां टेरे' सू. २२३३ या सूत्राने 'ए' होऊन त्याचे 'ध्वे' असे रूपान्तर होते तरी, 'ध्वे' हा 'ध्वम्'च आहे असे स्थानिवद्भावाने मानता येते व त्या 'ध्वे' ला लिड्‌व्यवहाराव इडागम होतो व त्यामुळें 'लिलिट्+इट्+ध्वे' अशी स्थिति होते जर 'हयवरट्' या शिवसूत्रात हकारग्रहण केले नसते तर माहेश्वर सूत्रातील पर णकारान साधणाऱ्या इणप्रत्याहाराने हकाराचे ग्रहण झाले नसते व 'विभाषेटः' या सूत्राची वरील उदाहरणात प्रवृत्ति करता आली नसती व 'ध्वे' यातील धकाराचे वैकल्पिक ढत्व करता आले नसत पण त्या शिवसूत्रात हकारग्रहण केले असल्यामुळें, हकार हा इणप्रत्याहारान्तर्गत वर्ण ठरता व वरील उदाहरणात तसा हकारस्य इणपुढें इट् आला असून त्या इट्‌पुढें 'ध्वन्=ध्वे' हा प्रत्यय आला असल्यामुळें, 'विभाषेटः' या सूत्राने त्या प्रत्ययातील धकाराच वैकल्पिक ढत्व होऊन 'लिलिहिढ्वे' असे पाणिनि इष्ट रूप सिद्ध होते. साराश 'अट्, अम्, हन्, इण्' या चार प्रत्याहारानी हकाराचे ग्रहण व्हावे याकरिता 'हयवरट्' या सूत्रात हकारग्रहण केले आहे. तसे ग्रहण केले नसते तर, जेथें जेथें पाणिनीय सूत्रात 'अट् अम् इण्' प्रत्याहाराचे ग्रहण केले आहे तेथें तेथें इष्टरूपसिद्धि होण्याकरिता त्या प्रत्याहाराबरोबर हकाराचे ग्रहण करावे लागले असत, आणि तसेच जेथें जेथें पाणिनीय सूत्रात हश्‌प्रत्याहाराचे ग्रहण केले आहे तेथें तेथें यम्‌प्रत्याहाराचे ग्रहण करून त्याबरोबर हकाराचे ग्रहण करावे लागले असते हा सर्व त्रास टाळण्याकरिता प्रकृत शिवसूत्रात हकारग्रहण केले आहे 'हयवरट्' या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात—'सर्वे

वर्णा मङ्क्षुपदिष्टा। अथ हकारो द्विरुपदिश्यते पूर्वश्चैव परश्च। यदि पुन पूर्व एवोपदिश्येत पर एव वा। कश्चात्र विशेष।' व त्या हकाराच्या पूर्वोपदेशाचे प्रयोजन सांगताना भाष्यकार 'हकारस्य परोपदेशेऽड्ग्रहणेषु हग्रहणम्' व 'उत्त्वे च' ही दोन वार्तिके पठित करतात प्रथम वार्तिकाचा अर्थ असा आहे की, हकार एकदा शेवटीच, म्हणजे 'हल्' या अन्तिम शिवसूत्रातच, उच्चारल्यास, ज्या ठिकाणी 'अट्' हा शब्द उच्चारून अट्वर्णांना किंवा तन्निमित्तक कार्य होणे सांगितले आहे त्या सूत्रात त्या प्रत्याहाराबरोबरीज हकाराचा उच्चार करावा लागेल द्वितीय वार्तिकाचा अर्थ हा आहे की, उकारादेश सांगणाऱ्या-'हशि च' इत्यादि-सूत्रात हकार उच्चारावा लागेल, आणि नतर हकाराच्या परोपदेशाचे प्रयोजन सागून अखेरीस भाष्यकार म्हणतात-'तस्मात्पूर्वश्चैवोपदेष्टव्य परश्च। यदि च किंचिदन्यत्राप्युपदेशे प्रयोजनमस्ति तत्राप्युपदेश कर्तव्य।' या भाष्याचा आशय हा आहे की, वर्णांचे ज्ञान व्हावे याकरिता अक्षरसमाम्नाय उच्चारला नसून प्रयोजनाकरिता, म्हणजे प्रत्याहार साधण्याकरिता, उच्चारला आहे म्हणून एखादा वर्ण एकदा उच्चारल्याने जर सर्व इष्ट प्रयोजनाची सिद्धि होत नसेल तर तो वर्ण दोनदा किंवा गरज असल्यास अधिक वेळा उच्चारणे आवश्यक आहे, व अशा रीतीने भाष्यकार अक्षरसमाम्नायातील हकाराच्या द्विरुच्चारणाचे समर्थन करितात )

शब्दरत्न-इणग्रहणेष्विति। नन्विद न्यूनम्, अम्ग्रहणेऽपि ग्रहणात्। फल तु 'मद्दुपुमन्‌ह्' इत्यादौ "पुम खय्यम्" इति रुत्वम्। 'गर्धितय्यमाह' इत्यादिवत् अपदान्तत्वात्ककारादेर्न जश्त्वमिति, चेत्, न, "मुद्गतियो." इत्यादाविकाराद्युच्चारणेन शास्त्राबोधिताजव्यवहितहल्समुदायस्यासाधुत्वबोधनात्। अत एव "उत्त्वरवात्तः" इति सूत्रे भाष्यम्-"न पुनरन्तरेणाच व्यञ्जनस्योच्चारणमपि भवति" इति। स्कोरित्यादिस्तु सौत्र. प्रयोग। अत एवाटि

**हकारप्रयोजनकथनावसरे भाष्ये "शश्छोऽटि" इत्युपन्यस्य तदुदाहरणं नोपन्यस्तम्। हकारपरशकारासम्भवेन शश्छोटीति प्रसङ्गोच्चारितमिति च कैयटेन व्याख्यातम्। 'अमि' हकारप्रयोजनम् 'इति' च भाष्ये नोक्तमिति दिक् ॥**

विस्तैकाचे असे म्हणणे आहे की, 'हकारोपदेश अट्‌अम्‌हूण्‌-इण्ग्रहणेषु हकारग्रहणार्थं' असे जें मनोरमेंत म्हटले आहे ते अपुरे आहे, कारण हकाराचे (वरील चार प्रत्याहारासेरीज) 'अम्' प्रत्याहारात देखील ग्रहण व्हावे हे 'हयवरट्' या शिवसूत्रातील हकारग्रहणाचे एक अधिक प्रयोजन मानता येत, व 'अम्' प्रत्याहाराने हकाराचे ग्रहण केल्याने, 'बहुपुम् क् ह्' इत्यादि स्थली 'पुमः खय्यम्परे' सू १३९ या सूत्राने 'बहुपुम्' यातील मकाराचे रुत्व होणे हे फल आहे, आणि 'गवित्ययमाह' इत्यादि प्रयोगात 'गो' हे अनुकरण जसे पद मानता येत नाही तसेच 'क्' व 'ह्' या अनुकरणाना पदसंज्ञा मानता येत नाही व अशा रीतीने 'क्' व 'ह्' हे पदाच्या अन्ती आहेत असे मानता येत नसल्यामुळें, त्याचे ('झलां जशोऽन्ते' सू ८४ व 'हो ढः' सू ३२४ या सूत्रांनी होणारे अनुक्रमें) जश्त्व व ढत्व होत नाहीं ('बहवः पुमांसः यस्मिन् तत्' या बहुव्रीहिसमासात 'पुमांसः' हा बहुवचनान्त शब्द असल्यामुळें व 'उरःप्रभृतिभ्यः कप्' सू ८८९ या नित्य कप्विधायक सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'उरः' प्रभृतिगणात 'पुमान्' असा एकवचनान्त शब्द पठित असल्यामुळें, या स्थली नित्य 'कप्' प्रत्यय न होता 'शेषाद्विभाषा' सू ८९१ या सूत्रानें विकल्पेंकरून 'कप्' प्रत्यय पावला आहे तो समासान्त 'कप्' प्रत्यय प्रकृत स्थली न केल्यास, 'बहुपुम्स्' असे जें सामासिक रूप होतें त्याहून प्रथमेच्या एकवचनाचा 'सु' प्रत्यय केला असता, 'हल्ङ्याब्भ्यो' सू २५२ या सूत्रानें त्या 'सु' प्रत्ययाचा लोप होतो व 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू २६२ या सूत्रात 'बहुपुम्स्' याला पदसंज्ञा होते व त्यामुळें त्या पदातील संयोगान्त सकाराचा 'संयोगान्तस्य लोपः' सू

५४ या सूत्राने लोप होऊन 'बहुपुम्' असे प्रथमेच्या एकवचनाचे रूप होते या पदापुढें ककार व हकार यांचे अनुकरण 'क्, ह्' हे वर्ण आले असल्यामुळें व ककार हा 'खय्' असून त्या खयुपुढें हकार हा 'अम्' आला असल्यामुळें, 'पुम्' यातील मकाराचे जागी 'रु' होतो हे, अम्प्रत्याहारात हकाराचे ग्रहण केल्याचे, फल आहे येथें अशी प्रतिशंका करण्यात येते की, अनुकरण व अनुकार्य याच्या विषयात भेदानुकरणपक्ष मानला असता, अनुकरण ककार व हकार हे अर्थवान् ठरतात व त्यामुळें 'अर्थवदधातुरप्रत्ययः' सू १७८ या सूत्राने त्याना प्रातिपदिकसंज्ञा होते व 'ङ्याप्प्रातिपदिकात्' सू १८२ या अधिकारसूत्रान्वयें त्याहून सुबुत्पत्ति होऊन व 'हल्ङ्याब्भ्य.' सू २५२ या सूत्राने 'सु' प्रत्ययाचा लोप होऊन 'क्,ह्' या दोहोनाहि प्रत्ययलक्षणाने पदसंज्ञा होते आणि त्यामुळें 'झलां जशोऽन्ते' सू ८४ या सूत्राने ककाराचा गकार व 'हो ढ' सू ३२४ या सूत्रानें हकाराचा ढकार होणे प्राप्त होते आणि तसे केल्यास 'पुम्' यातील मकारापुढें 'खय्' नसणारा गकार येत असून त्या गकारापुढें 'अम्' नसणारा ढकार येत असल्यामुळे, अम्प्रत्याहाराने हकार ग्रहण होण्याचे फल आहे हे सिद्ध करण्याकरिता वर दिलेले 'बहुपुम् ग् ढ्' हे योग्य उदाहरण मानताच येत नाही या प्रतिशंकेवर शंकाकार असे उत्तर देतो की, अभेदानुकरणपक्ष मानला असता, 'गवित्ययमाह' या प्रयोगात 'गो' हे अनुकरण अर्थवान् ठरत नसल्यामुळें जशी त्याला 'अर्थवदधातु' या सूत्रानें होणारी प्रातिपदिकसंज्ञा होत नाही व त्यामुळें त्याहून सुबुत्पत्ति होत नसल्याकारणानें त्याला पदसंज्ञा होत नाही आणि त्यामुळें 'अवङ् स्फोटायनस्य' सू ८८ या सूत्राने 'गो' यातील ओकाराचे जागी विकल्पेंकरून अवङ् आदेश न होता 'एचोऽयवायावः' सू ६१ या सूत्राने जसा केवळ अवादेश होतो व त्या आदेशातील वकार, म्हणजे 'गव्' यातील वकार, पदान्ती आहे असे ठरत नसल्याकारणानें 'लोपः शाकल्यस्य' सू ६७ या सूत्राने त्या

वकाराचा लोप होत नाही. त्याचप्रमाणे अभेदानुकरणपक्षात प्रकृत स्थलीं अनुकरण ककार व हकार हे अर्थवान् ठरत नसल्यामुळें, त्यांना प्रातिपदिकसंज्ञा होत नाहीं व त्यामुळें त्याहून सुबुत्पत्ति होऊं शकत नसल्यामुळें, 'सुप्तिङन्तं पदम्' सू. ७९ या सूत्राने होणारी पदसंज्ञा त्यांना होऊंच शकत नाही व त्यामुळें त्यांचे अनुक्रमें जश्त्व व हत्व होऊं शकत नाहीं. म्हणून अम्प्रत्याहारांत हकारग्रहण करण्याचें 'बहुपुम् क् ह्' या उदाहरणामध्यें मकाराचं रत्व होणें हें फल आहे असें जें वर म्हटलें आहे तें निर्दोष ठरतें असा शंकाकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. येथें हे सांगणे आवश्यक आहे की, शंकाकाराने जी शंका केली आहे ती अभेदानुकरणपक्ष मानून केली आहे व त्या शंकेवर जी प्रतिशंका केली आहे ती भेदानुकरणपक्ष मानून केली आहे. हे दोन्ही पक्ष व्याकरणशास्त्रात मानले आहेत व या दोन पक्षांत फरक हा आहे की, अभेदानुकरणपक्षांत अनुकार्य अर्थवान् ठरत असून अनुकरण अर्थरहित मानलें जातें आणि म्हणून अर्थवत्त्वाच्या अभावामुळें त्या अनुकरणाला प्रातिपदिकसंज्ञा होत नाही व त्यामुळें त्याहून सुबुत्पत्ति होऊं शकत नसल्याकारणानें त्याला पदसंज्ञा होऊं शकत नाहीं. पण भेदानुकरणपक्षांत अनुकरण व अनुकार्य हे दोन्ही सारखेच अर्थवान् मानले जात असल्यामुळें, अनुकरणास देखील 'अर्थवदधातु' या सूत्राने होणारी प्रातिपदिकसंज्ञा होते व त्यामुळें त्याहून सुबुत्पत्ति होऊन त्याला पदसंज्ञा होते. म्हणूनच शंकाकाराने अभेदानुकरणपक्ष मानून शंका केली आहे व त्याच्या शंकेवर प्रतिशंका करितांना प्रतिशंकाकाराने भेदानुकरणपक्ष मानून त्याच्या शंकेचें खण्डन केलें आहे. आता शंकाकाराने अभेदानुकरणपक्षाचा आश्रय घेऊन वर केलेल्या शंकेचें निरसन करण्याकरितां शब्दकौस्तुभकार असें म्हणतात की,) ही शंका बरोबर नाहीं, कारण 'मुद् सियो' सू. ७७१० इत्यादि सूत्रांत ('स्यो' असें उच्चारण न करितां) नकाराला हकार जोडून जें उच्चारण केलें आहे त्यावरून हें सिद्ध होतें की, जसें पाणिनीयसूत्रा-

हें स्पष्ट होते की, अजव्यवहित हल्समुदायाचा प्रयोग भार्षेत करता येऊ शकत नाहीं व त्यामुळें 'बहुधुम् कृ' हा काल्पनिक प्रयोग अशास्त्र-शास्त्रविरुद्ध-ठरतो आणि ज्या प्रयोगाचे भार्षेत अभिधान नाहीं अशा प्रयोगाच्या विषयांत पाणिनीय शास्त्राची प्रवृत्ति करता येत नाहीं. या अर्थाचे 'यथालक्षणमप्रयुक्ते' हे वचन भाष्यकारांनी भाष्यात ठिकठिकाणी पठित केले असल्यामुळें, तसा काल्पनिक व भार्षेत न आढळणाऱ्या आणि अशास्त्र ठरणाऱ्या प्रयोगाचे ठिकाणी वरील भाष्य-वचनाच्या 'पुमः खय्यम्परे' या पाणिनीय सूत्राची प्रवृत्ति करता येऊ शकत नाही ) 'स्नौ. मर्योगाद्यो ' सू. ३८० (किंवा 'लोपो व्योर्वलि' सू. ८७३) इत्यादि सूत्रांत 'स्नौ' (किंवा 'व्यो') असा जो (अजव्यवहित व्यञ्जनाचा) प्रयोग केला आहे तो सौत्र प्रयोग आहे. (आणि 'छन्दोवत्सूत्राणि भवन्ति' असे भाष्यवचन असल्यामुळें ज्या-प्रमाणे वेदांतील कोणताहि प्रयोग अशुद्ध मानतां येत नाहीं त्याचप्रमाणें 'स्नौ, व्यो' इत्यादि सौत्र प्रयोग अशुद्ध मानतां येत नाहींत पण तशा सौत्र प्रयोगाच्या आधारावर भार्षेत अजव्यवहित हल् समुदायाचा प्रयोग करता येऊ शकत नाही व तसा प्रयोग अशास्त्र ठरतो ) म्हणूनच 'अट्' प्रत्याहाराने हकाराचे ग्रहण व्हावें याचे प्रयोजन सांगतेवेळीं भाष्यकारांनी जरी 'शश्छोऽटि' सू. १२० या सूत्राचा उपन्यास केला आहे तरी त्या सूत्राचे कोणतेहि उदाहरण दिले नाहीं आणि त्या भाष्यावरील प्रदीपात कैयटाने असें व्याख्यान केलें आहे की, शकारापुढें हकार येणे असम्भवनीय असल्यामुळे भाष्यकारांनी 'शश्छोऽटि' या सूत्राचा केवळ प्रसङ्गोपात्त उपन्यास केला आहे. म्हणजे जरी भाष्यकारांनी प्रसङ्गाने अनुसन्धान त्या सूत्राचा उल्लेख केला आहे तरी शकारापुढें भार्षेत हकार येणें असम्भवनीय असल्यामुळेंच तसा प्रकारचे कोणतेंहि उदाहरण दिलें नाहीं (या कैयटवृत्तीवरून देखील हें स्पष्ट होतें की, ज्याच्या मध्यें अचाचें व्यवधान नाहीं अशा अनेक व्यञ्जनाचा भार्षेत प्रयोग करता येत नाहीं व तसा प्रयोग

न्वयें अनेक व्यञ्जने एकापुढें एक असे एकत्र येऊ शकतात ती स्थले खेरीज करून इतर स्थली अनेक व्यञ्जनाचा एकापुढें एक अशा तऱ्हेचा स्वरव्यवधानरहित प्रयोग भाषेत साधु मानला जात नाही (साराश 'इको यणचि' सू ४७ इत्यादि सधिसूत्रान्वये जेथें अचाचे मध्यें व्यवधान नसून अनेक व्यञ्जने एकत्र येतात तशा ठिकाणी स्वरव्यवधानरहित अनेक व्यञ्जनाचा समुदायरूप प्रयोग पाणिनीय शास्त्राच्या आधारे होत असल्यामुळें तसा प्रयोग साधु मानला येतो परतु 'बहुपुम् क् ह्' या उदाहरणात मकार ककार व हकार या तीन व्यञ्जनाचा एकापुढें एक असा प्रयोग कोणत्याहि पाणिनीय सूत्रावयें झाला नसून केवळ काल्पनिक प्रयोग असल्यामुळें, तसा प्रयोग साधु मानता येत नाही व तशा असाधु प्रयोगाचे ठिकाणी व्याकरणशास्त्र प्रवृत्त होत नाही म्हणून अम्प्रत्याहाराने हकाराचे ग्रहण केले असता वरील ज्या उदाहरणात रुत्व होणे हे फल शकाकार देतो ते उदाहरण काल्पनिक व असाधु असल्यामुळें, शकाकाराने केलेली शका व्यर्थ ठरते असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा भावार्थ आहे ) म्हणूनच, म्हणजे पाणिनीय शास्त्रान्वयें सिद्ध न होणारा एकापुढें एक असा हल्समुदाय भाषत कोठेंहि आढळत नसल्यामुळें व तशा समुदायाचा प्रयोग व्याकरण रीत्या असाधु मानला जात असल्यामुळेंच, 'उच्चैरुदात्त' सू १–२–२९ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी 'न पुनरन्तरेणाच व्यञ्जनस्योच्चारणमपि भवति,' म्हणजे स्वराच्या सहायाशिवाय व्यञ्जनाचा उच्चार देखील होऊ शकत नाही, असें म्हटले आहे (मग जर स्वराच्या सहायाशिवाय एक देखील व्यञ्जन उच्चारता येत नाही तर ज्याच्या मध्यें अचाचे व्यवधान नाही अशी अनेक व्यञ्जने कशी उच्चारता येऊ शकणार ? या भाष्यावरून व तसेच वर मागिलल्याप्रमाणे 'सुट् तिथो , झषस्तथो ' सू २२८• इत्यादि पाणिनीय सूत्रात 'न्थो असा निर्देश न करिता मध्यें इकार व अकार जोडून 'तिथो तयो ' इत्यादि जे निर्देश केले आहेत त्यावरून

हें स्पष्ट होते की, अजव्यवहित हल्समुदायाचा प्रयोग भाषेंत करता येऊ शकत नाही व त्यामुळें 'अहुपुम क् ड्' हा काल्पनिक प्रयोग असाधु-शास्त्रविरुद्ध-ठरतो आणि ज्या प्रयोगाचें भाषेंत अभिधान नाही अशा प्रयोगाच्या विषयात पाणिनीय शास्त्राची प्रवृत्ति करता येत नाही या अर्थाचे 'यथालक्षणमप्रयुक्ते' हें वचन भाष्यकारांनी भाष्यात ठिकठिकाणी पठित केले असल्यामुळें, तसा काल्पनिक व भाषेंत न आढळणाऱ्या आणि असाधु ठरणाऱ्या प्रयोगाचे ठिकाणी वरील भाष्य-वचनान्वयें 'पुम खय्यम्परे' या पाणिनीय सूत्राची प्रवृत्ति करता येऊ शकत नाही ) 'स्को मयोगाद्यो' सू ३८० (किंवा 'लोपो व्योर्वलि' सू ८७३) इत्यादि सूत्रात 'स्को' (किंवा 'व्यो') असा जो (अजव्यवहित व्यञ्जनाचा) प्रयोग केला आहे तो सौत्र प्रयोग आहे. (आणि 'छन्दोवत्सूत्राणि भवन्ति' असे भाष्यवचन असल्यामुळें ज्या-प्रमाणें वेदांतील कोणताहि प्रयोग अशुद्ध मानता येत नाही त्याचप्रमाणें 'स्को, व्यो' इत्यादि सौत्र प्रयोग अशुद्ध मानता येत नाहीत पण तशा सौत्र प्रयोगाच्या आधारावर भाषेंत अजव्यवहित हल् समुदायाचा प्रयोग करता येऊ शकत नाही व तसा प्रयोग असाधुच ठरतो ) म्हणूनच 'अट्' प्रत्याहाराने हकाराचे ग्रहण व्हावे याचे प्रयोजन सांगतेवेळी भाष्यकारांनी जरी 'शश्छोटि' सू १२० या सूत्राचा उपन्यास केला आहे तरी त्या सूत्राचे कोणतेहि उदाहरण दिले नाही आणि त्या भाष्यावरील प्रदीपात कैयटानें असें व्याख्यान केले आहे की, शकारापुढें हकार येणे असंभवनीय असल्यामुळें भाष्यकारांनी 'शश्छोटि' या सूत्राचा केवळ प्रसङ्गोपात्त उपन्यास केला आहे, म्हणजे जरी भाष्यकारांनी प्रसङ्गाला अनुसरून त्या सूत्राचा उल्लेख केला आहे तरी शकारापुढें भाषेंत हकार येणे असंभवनीय असल्यामुळेंच तसा प्रकारचे कोणतेहि उदाहरण दिले नाही (या कैयटवृत्तीवरून देखील हें स्पष्ट होते की, ज्याच्या मध्यें अचाचें व्यवधान नाही अशा अनेक व्यञ्जनांचा भाषेंत प्रयोग करता येत नाही व तसा प्रयोग

व्याकरणशास्त्ररीत्या अशुद्ध ठरतो म्हणून 'वहूपुम् क् ह्' हें जें शंका-कारानें उदाहरण दिलें आहे ते अशुद्ध ठरत असल्यामुळें, त्याचे ठिकाणी वर सांगितल्याप्रमाणे 'पुम स्यम्परे' या पाणिनीय सूत्राची प्रवृत्ति करता येत नाही ) 'हयवरट्' या शिवसूत्रातील हकाराचें ग्रहण 'अम' प्रत्याहाराने देखील हकाराचे ग्रहण व्हावे याकरिता केले आहे असे भाष्यात कोठेंहि म्हटले नाही (म्हणून दीक्षितांनी मनोरमेंत ज्या चार प्रत्याहाराचा निर्देश केला आहे तेवढयाच प्रत्याहारानी हकारग्रहण व्हावें याकरिताच 'हयवरट' या शिवसूत्रात हकाराचे ग्रहण केले आहे हेच मानणे योग्य आहे व 'अम्' प्रत्याहाराने देखील हकाराचे ग्रहण व्हावें याकरिता त्या शिवसूत्रात हकारग्रहण केले आहे हे मानणे बरोबर नाही )

**मनोरमा– "हल्" (मा. सू. १४)'। इद सूत्र वल्रल्झल्शल्षु हकारग्रहणार्थम्। 'रुदिहि' 'स्वपिहि' "रुदादिभ्य सार्वधातुके" इति वलादिलक्षण इट्। 'स्निहित्वा' 'स्नेहित्वा' "रलो व्युपधाद्" इति वा कित्वम्। 'अदाग्धाम्' "झलो झलि" इति सकारलोपः। 'अलिक्षत्' "शल इगुपधात्" इति क्स ॥**

('हयवरट्' या शिवसूत्रात हकाराचे ग्रहण केले असल्यामुळें, ज्यात पुन्हा हकाराचे ग्रहण केले आहे व लकार इत् आहे असे 'हल्' हे अंतिम शिवसूत्र असण्याची गरज काय अशी कोणी शंका केल्यास, त्या शंकेचे निवारण करण्याकरिता व हकाराचा जसा पूर्वोपदेश करणे जरूर होते तसाच त्याचा परोपदेश करणे देखील जरूर असल्यामुळे, 'हल्' हें शिवसूत्र करणे आवश्यक होते हे सिद्ध करण्याकरिता, दीक्षित हो पंक्ति लिहितात ) 'वल्, रल्, झल्, शल्' या प्रत्याहारात हकाराचे ग्रहण व्हावें म्हणून, 'हल्' हे अन्तिम शिवसूत्र पठित केलें आहे. (जर हे शिवसूत्र पठित केले नसते तर, वर निर्दिष्ट केलेल्या चार प्रत्याहारात हकाराचे ग्रहण झाले नसते) 'रुदिहि, स्वपिहि' या उदाहरणात 'रुदादिभ्य सार्वधातुके' सू २४७४ या सूत्राने

(व गादि मार्वधातुक प्रत्यय 'रुद्, स्वप्, श्वस्, अन्, जक्ष्' या धातुपुढें आला असता, त्याला) वलादित्यामुळें होणारा इडागम होतो (सेहर्यपिच्च सू २२०१ या सूत्रानें 'पि' या सार्वधातुक प्रत्ययाचे जागी लोट् लकारात 'हि' असा अपित् आदेश होतो व तो स्थानिवद्भावानें सार्वधातुक प्रत्यय ठरतो '' हि'' हा प्रत्यय हकारानें सुरु होणारा आहे जर 'हृल्' हें शिवसूत्र नसतें तर, 'वल्' प्रत्याहार साधताच आला नसता व 'वर्' असा प्रत्याहार होऊन त्या प्रत्याहाराचे जर सूत्रात ग्रहण केलें असतें तर, नशा प्रत्याहारानें हकाराचे ग्रहण झालें नसतें, व 'हि' या प्रत्ययाला इडागम झाला नसता आणि 'रुदिहि, स्वपिहि' अशी इष्टरूपें सिद्ध होऊ शकली नसती ती सिद्ध व्हावी म्हणून, 'हृल्' हें अन्तिम शिवसूत्र आवश्यक आहे व अशा रीतीनें तें सूत्र चरितार्थ ठरतें ) 'स्निग्ध्वा, स्नेहित्वा या स्थलीं, 'रलो व्युपधात् सू २६१७ या सूत्रावयें इडागमसहित 'क्त्वा' प्रत्यय विकल्पेंकरून 'कित्' होतो ('स्निह्+क्त्वा' या स्थलीं, 'स्निह्' धातु व्यजनानें सुरु होणारा असून व त्याच्या उपधेंत इकार असून अन्तीं हकार आहे रल्प्रत्याहारानें हकाराचे ग्रहण, 'हृल्' हें शिवसूत्र असलें तरच, होऊ शकतें तें सूत्र नसतें तर, 'रल्' प्रत्याहार साधताच आला नसता 'रर्' प्रत्याहार साधता आला असता व त्या 'रर्' प्रत्याहारानें हकाराचें ग्रहण होऊ शकलें नसते व त्यामुळें 'न क्त्वा सेट्' सू ३३२२ या सूत्रान्वयें अकित् असणारा 'सेट् क्त्वा' प्रत्यय विकल्पेंकरून कित् झाला नसता व 'स्निहित्वा' असे इष्ट पाक्षिक रूप होऊ शकलें नसतें पण 'हृल्' हें शिवसूत्र असल्यामुळें, रल्प्रत्याहारानें हकाराचे ग्रहण होतें व स्निह् धातूपुढील 'सेट् त्वा' प्रत्यय जेव्हा विकल्पेंकरून कित् होतो तेव्हा, 'क्ङिति च' सू २२१७ या सूत्रान्वयें उपधेंतील इकारास गुण होत नाहीं व 'स्निहित्वा' असे पाक्षिक इष्ट रूप सिद्ध होतें ) 'अदाग्धाम्' या उदाहरणात 'झलो झलि' सू २२८१ या सूत्रान्वयें सकाराचा लोप होतो

('अ + दह् + सिच् + ताम्' या स्थली, 'वदव्रजहलन्तस्याच' सू २२६७ या सूत्राने 'दह्' यातील अकाराची वृद्धि होऊन 'अ + दाह् + स् + ताम्' अशी स्थिति झाली असता, झल्प्रत्याहाराने हकाराचे ग्रहण होत असल्यामुळेच व त्या झल् हकारापुढें 'सिच्' प्रत्यय असून त्या सिचापुढे झलादि 'ताम्' प्रत्यय आला असल्यामुळें, सिचाचा-म्हणजे सकाराचा-लोप होतो जर 'हल्' हे शिवसूत्र नसते तर, 'झल' प्रत्याहार साधताच आला नसता 'झर' प्रत्याहार साधता आला असता व त्या झर्प्रत्याहाराने हकाराचे ग्रहण होऊ शकले नसते व सिचाचा लोप झाला नसता आणि 'अदाग्धाम्' असे इष्टरूप सिद्ध होऊ शकले नसते सिचाचा लोप होऊन 'अदाह् + ताम्' अशी स्थिति झाल्यावर, 'दादेर्धातोर्घ' सू ३२५ या सूत्राने 'दह्' धातूतील हकाराचा घकार होऊन व 'झषस्तथोर्धे' सू २२८० या सूत्राने 'ताम्' प्रत्ययातील तकाराचा धकार होऊन व 'झला जश् झशि' सू ५२ या सूत्राने घकाराचा गकार होऊन 'अदाग्धाम्' असे रूप सिद्ध होते ) 'अलिक्षत्' या उदाहरणात 'शल इगुपधादनिट क्स' सू २३३६ या सूत्राने ('च्लि' चे जागी) 'क्स' असा आदेश होता (या आदेशातील ककार 'लशक्वतद्धिते' सू १९५ या सूत्रान्वय 'इत' आहे व हा आदेश 'कित्' असल्यामुळें व 'क्ङिति च' सू २२१७ हे निषेधक सूत्र असल्यामुळ 'लिह्' यातील उपधेचा 'पुगन्तलघूपधस्य च' सू २१८९ या सूत्राने होणारा गुण होत नाही 'अ + लिह् + स + त्' या स्थली 'लिह्' हा धातु शल्प्रत्याहारान्तर्गत हवर्णान्त आहे जर 'हल्' हे शिवसूत्र नसते तर 'शल्' प्रत्याहार साधताच आला नसता 'शर्' प्रत्याहार साधता आला असता व त्या 'शर' प्रत्याहाराने हकाराचे ग्रहण झाले नसते, आणि इगुपध हकारान्त 'लिह्' धातूपुढील 'च्लि' चे जागी 'क्स' हा आदेश होऊ शकला नसता पण ते शिवसूत्र असल्यामुळे, 'शल्' प्रत्याहार सिद्ध होतो व त्या प्रत्याहाराने हकाराचे ग्रहण होऊन 'लिह्' पुढील

'चिउ' चे जागी 'वस = स' असा आदेश होतो व 'हो ढ' सू २२४ या सूत्राने 'लिट्' धातूतील हकाराचा ढकार होऊन व 'षढो कः सि' सू २९५ या सूत्राने त्या ढकाराचा ककार होऊन आणि 'आदेश-प्रत्यययो' सू २१२ या सूत्राने 'स' प्रत्ययातील सकाराचा षकार होऊन 'अलिक्षत्' असे इष्ट रूप सिद्ध होते सारांश 'हल्' हे अन्तिम शिवसूत्र नसते तर 'वल्, रल्, झल्, शल्' हे प्रत्याहार साधता आले नसते व त्यामुळें त्या चार प्रत्याहाराऐवजी 'वर्, रर्, झर्, शर्' असे प्रत्याहार करावे लागले असते हे वर सांगितलेच आहे आणि त्या प्रत्याहाराचे ज्या ज्या पाणिनीय सूत्रात ग्रहण केले असते तेथें तेथें हकारास विवा हकारनिमित्तक कार्य होण्याकरिता, त्या प्रत्याहाराबरोबरीज हकाराचे देखील ग्रहण करावे लागले असते हा सर्व त्रास टाळण्याकरिता व लघु सूत्रे होण्याकरिता 'हल्' हें प्रकृत शिवसूत्र केले आहे, व अशा रीतीनें ते सूत्र आवश्यक ठरते असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे 'हयवरट्' या शिवसूत्रा-वरील भाष्यात देखील 'पूर्वोपदेशे किल्वकर्मेड्विधयो झल्ग्रहणानि च' हे वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचे व्याख्यान करिताना भाष्य-काराने वरप्रमाणेच म्हटले आहे व त्याचाच अनुवाद मनोरमेंत केला आहे)

शब्दरत्न– इदं सूत्रमिति। वलादिप्रत्याहारास्तु रेफेणैव सन्तु। हरन्त्यमित्यत्र अन्योन्याश्रयपरिहारस्तु 'रन्त्य हर्' इति न्यासेनावृत्या, हर्प्रत्याहारबोधकसूत्रसमुदायान्त्यमित्यर्थेन वा सुकर इति भावः। ग्रहणार्थमिति। शषसहरित्येव तु नोक्तम्, तर्हि हकारग्रहणापत्तौ हरिर्हरतीत्यादौ विसर्गापत्तेः।

('हल्' या अन्तिम शिवसूत्रासंबंधाने अशी शंका करण्यात येते की, 'हयवरट्' या शिवसूत्रात हकाराचा पूर्वीच उपदेश केला असल्यामुळें, 'हल्' हे शिवसूत्र गाळून टाकावे व 'शषसर्' पर्यंत तेराच शिवसूत्रें पठित करावी, कारण ते सूत्र नसले तरी, सर्व

स्वर व्यञ्जनाचा बाकीच्या तेरा सूत्रानी उपदेश होतोच ते सूत्र गाळल्यास, चतुर्दशसूत्रीतील अन्त्य लकार नाहीसा होईल हे खरे पण तो इत्संज्ञक वर्ण आहे व तो वर्ण असण्याची जी प्रयोजने आहेत, म्हणजे 'हलन्त्यम्' या सूत्राची उपपत्ति लावणे. व वलादि ल्न्त प्रत्याहार साधणे, ती सर्व प्रयोजने, तो वर्ण नसला तरी, इतर रीतीने सिद्ध होऊ शकतात तो वर्ण नाहीसा केल्याने जरी लान्त प्रत्याहार साधता येणार नाहीत तरी त्याच्या ऐवजी रान्त प्रत्याहार साधावे व 'हलन्त्यम्' या पाणिनीय सूत्राऐवजी 'हरन्त्यम्' असे सूत्र पठित करावे *तसे केले म्हणजे, अन्त्य लकार असण्याची जी प्रयोजने आहेत* ती अशा रीतीने सहज सिद्ध होऊ शकतात म्हणून शकाकार म्हणतो की, 'वल्, रल्, झल्, शल्' इत्यादि लान्त प्रत्याहाराऐवजी 'शषसर्' या शिवसूत्रातील अन्त्य) रेफानेच 'वर्' इत्यादि रान्त प्रत्याहार साधावे, (व 'हलन्त्यम्' या सूत्राऐवजी) 'हरन्त्यम्' असे जें सूत्र पठित करावे लागेल त्यात जो अन्योन्याश्रयरूप दोष येण्याचा *संभव आहे तो दोष टाळण्याकरिता,* एकतर 'हरन्त्यम्' असे सूत्र पठित न करिता त्याऐवजी 'रन्त्यहर्' असे सूत्र पठित करावे, किंवा (अन्योन्याश्रयरूप दोषाचे निवारण करण्याकरिता जसे दीक्षितानी 'हलन्त्यम्' हे सूत्र दोनदा उच्चारून त्या सूत्राचे दोन भिन्न अर्थ केले आहेत त्याचप्रमाणे) 'हरन्त्यम्' हे सूत्र दोनदा उच्चारावे, व ते सूत्र दोनदा उच्चारल्यास, हर् प्रत्याहाराचा बोध करून देणारा जो शिवसूत्रसमुदाय, म्हणजे ज्याच्या योगाने हर्‌प्रत्याहार साधता येतो असा 'हयवरट्' या सूत्रापासून 'शषसर्' या सूत्रापर्यंत जो सूत्रसमुदाय, त्यातील अन्त्य हर्–व्यञ्जन–इत् होते असा सूत्रार्थ होईल (व अशा रीतीने वर सांगितलेल्या दोन उपायांपैकी कोणत्याहि उपायाचे अवलंबन केले तरी अन्योन्याश्रयरूप दोष सहज टाळता येतो) असा शकाकाराच्या म्हणण्याचा भावार्थ आहे ('रन्त्य हर्' असा 'हलन्त्यम्' या सूत्राऐवजी सूत्रपाठ केल्यास,

त्यात 'उपदेशेऽजनुनासिक इत्' या पूर्व सूत्रातून 'इत्' या पदाची अनुवृत्ति होऊन 'रन्त्य हर् इत्' असे सूत्र होईल व त्या सूत्रातील 'र्' व 'हर्' या दोहोंच्या मध्यें पठित असलेल्या 'अन्त्यम्' या पदाचा देहलीदीपन्यायानें 'र्' व 'हर्' या दोहोंशी अन्वय केल्यास, 'अन्त्यम् र् इत्' व 'अन्त्यम् हर् इत्' असे वाक्यद्वयात्मक सूत्र होईल व शिवसूत्रातील अन्त्य रकार, म्हणजे 'हल्' हे अन्तिम सूत्र गाळले असता 'शषसर्' हें जें अन्तिम शिवसूत्र होते त्यातील अन्त्य रकार, इत्संज्ञक होतो असा प्रथम वाक्याचा अर्थ होईल अशा रीतीने शिवसूत्रातील त्या अन्त्य रकाराची इत्संज्ञा सिद्ध झाल्यावर 'आदिरन्त्येन सहेता' या सूत्राच्या सहायानें 'हर' प्रत्याहार सिद्ध होऊन व त्या 'हर्' प्रत्याहारात व्यञ्जनेंच निर्दिष्ट असल्यामुळें 'हर्' याचा व्यञ्जन असा अर्थ होऊन त्या योगाने द्वितीय वाक्याचा उपदेशातील अन्त्य हर्, म्हणजे व्यञ्जन, इत्संज्ञक होत असा अर्थ होईल दोन्ही वाक्याचा वरप्रमाणें अर्थ केल्यानें अन्योन्याश्रयरूप दोष मुळींच येत नाही पण 'रन्त्य हर्' असा न्यासभेद करून व रकार अधिक जोडून सूत्र पठित करण्यात गौरव आहे असें वाटल्यास, तस सूत्र पठित न करिता 'हरन्त्यम्' असेच 'हलन्त्यम्' या सूत्रासारखेंच सूत्र पठित करावे व अन्योन्याश्रयरूप दोष टाळण्याकरिता त सूत्र दोनदा उच्चारून प्रथम उच्चारलेल्या त्या सूत्राचा असा अर्थ करावा की, 'हर्' प्रत्याहाराचा बोधक जो 'हयवरट्' या शिवसूत्रापासून 'शषसर्' या अन्तिम शिवसूत्रापर्यंतचा शिवसूत्रसमुदाय आहे, म्हणजे ज्या शिवसूत्रसमुदायानें 'हर्' प्रत्याहार सिद्ध होतो, त्या समुदायाचा अन्त्य रकार इत्संज्ञक होतो असा अर्थ करतेवेळी 'हरन्त्यम्' या सूत्रातील 'हर्' या शब्दाचा हर्प्रत्याहारबोधक शिवसूत्रसमुदाय असा लक्षणेने अर्थ करावा व 'हरन्त्यम्' या सामासिक पदाचा 'हर अन्त्यम्' असा षष्ठीतत्पुरुषसमास मानून विग्रह करावा असा लक्षणेने अर्थ करण्याचें कारण हे की, 'हल्' हें स्वतंत्र अन्तिम

शिवसूत्र असताना जसा 'हलन्त्यम्' या सूत्राचा 'हलि=हल् इति शिवसूत्रे, अन्त्य इत्' असा विग्रह करून लकाराची इत्संज्ञा सिद्ध करता येऊ शकत होती तसा, 'हर्' असे स्वतंत्र अन्तिम शिवसूत्र नसल्यामुळें, 'हरन्त्यम्' या सूत्राचा 'हरि अन्त्यम्' असा विग्रह करता येऊ शक्त नाही म्हणून प्रथम उच्चारलेल्या 'हरन्त्यम्' या सूत्रातील 'हर्' या पदाचा वर सांगितल्याप्रमाणे लक्षणेनें अर्थ करणे आवश्यक आहे व तसा अर्थ करून शिवसूत्रातील अन्त्य रकाराची इत्संज्ञा सिद्ध झाल्यावर 'आदिरन्त्येन सहेता' या सूत्राच्या सहायाने 'हर्' प्रत्याहार सिद्ध होतो आणि तसा प्रत्याहार सिद्ध झाल्यावर दुसऱ्याने उच्चारलेल्या 'हरन्त्यम' या सूत्राचा 'उपदेशे अन्त्य हर् =व्यञ्जनम् इत्स्यात्' असा अर्थ सिद्ध होतो अशा रीतीने 'हरन्त्यम्' हे सूत्र दोनदा उच्चारून वर सांगितल्याप्रमाणे अर्थ केल्याने अन्योन्याश्रयरूप दोष येत नाही असा शंकाकाराच्या म्हणण्याचा तात्पर्यार्थ आहे पण त्याच्या म्हणण्याप्रमाणे 'हल्' हे संपूर्ण अन्तिम शिवसूत्र गाळल्यास, लकाराबरोबर हकार देखील नाहीसा होणार व त्या सूत्राची जी प्रयोजनें आहेत, म्हणजे 'वल्, रल्, झल्, शल्' हे प्रत्याहार सिद्ध करणे व त्या प्रत्याहारात हकार अन्तर्भूत असणे ही जी प्रयोजने आहेत, ती कशी सिद्ध होऊ शकणार ? तो म्हणतो की, त्या लान्त प्रत्याहाराऐवजी 'वर्, रर्, झर्, शर्' असे रेफान्त प्रत्याहार साधावे पण तसे प्रत्याहार साधल्यास, त्या प्रत्याहारानी हकाराच ग्रहण होऊ शकणार नाही व त्यामुळे मनोरमेंत दिलेली 'र्लिढि' इत्यादि उदाहरणे सिद्ध न होण्याची आपत्ति येईल हे पूर्वी सांगितलेच आहे ती आपत्ति टाळण्याकरिता शिवसूत्रात हकाराचे दुसऱ्यान शेवटी ग्रहण करणे आवश्यक आहे व 'वल्, रल्, झल्, शल्' हे प्रत्याहार सिद्ध होण्याकरिता अखेरीस उच्चारलेल्या त्या हकाराबरोबर लकारानुबन्ध देखील उच्चारणे आवश्यक आहे, आणि अशा रीतीने 'हल्' हे संपूर्ण अन्तिम शिवसूत्र आवश्यक असून ते सूत्र

किंवा त्यातील एकहि वर्ण गाळता येऊ शकत नाही हे सिद्ध करण्याकरिता, शंकाकाराची 'वलादि प्रत्याहाराश्च रेफेणैव सन्तु ‥ ‥ सुकर इति भाव ' ही शब्दरत्नात मांगितलेली शंका मनात घेऊनच त्या शंकेच्या उत्तरादाखल दीक्षितांनी 'हल् इद सूत्र वलरलझलशल्पु हकार ग्रहणार्थम्' ही पंक्ति मनोरमेंत लिहिली आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे यावर शंकाकार पुन्हा अशी शंका करतो की, शिवसूत्रात हकाराचे दुसऱ्याने शेवटी केलेले ग्रहण आवश्यक असल्यामुळें, हकार कायम ठेवून त्या पुढील लकारानुबन्ध गाळावा व 'शषसहर्' असे तेरावे शिवसूत्र करावे व तसे सूत्र केल्याने 'वर्, रर्, झर्, शर्' या रेफान्त प्रत्याहारांनी हकाराचे ग्रहण करता येते व मनोरमेंत दिलेली इष्ट रूपें सिद्ध होऊ शकतात आणि 'हल्' असे वेगळें अन्तिम शिवसूत्र असण्याची गरज राहत नाही या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'शषसर्, हल्' या दोन शिवसूत्राऐवजी) 'शषसहर्' असे एक शिवसूत्र पठित केले नाही, कारण (वरील दोन शिवसूत्रे मिळून तसे एकच शिवसूत्र पठित केले असते तर) 'खर्' प्रत्याहाराने हकाराचे ग्रहण होण्याची आपत्ति आली असती आणि 'हरिर्हरति' इत्यादि उदाहरणात ('खरवसानयोर्विसर्जनीय ' सू ७६ या सूत्राने) रेफाचा विसर्ग होण्याची आपत्ति आली असती. ('हरि+सु+हरति = हरिर्+हरति' या स्थली, हकार 'खर्' मानल्यास, वाक्यसंस्कार-पक्षात देखील, रेफाचा विसर्ग होऊन 'हरिः हरति' असाच प्रयोग झाला असता तो टाळण्याकरिता 'शषसर्' व 'हल्' अशी दोन शिवसूत्रें पठित केली आहेत असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे 'प्रैष्यन्नुवोर्हविषो देवता सम्प्रदाने' सू ६२१ या पाणिनीय सूत्रात रेफापुढें हकार आला असून देखील त्या रेफाचा पाणिनीने विसर्ग केला नसल्यामुळें, त्या ज्ञापकाच्या आधारे असे म्हणता येते की, रेफापुढें हकार आल्यास, त्या रेफाचा विसर्ग होत नाही व

त्यामुळें शब्दरत्नात दाखविलेली आपत्ति टाळता येते असे कोणी म्हटल्यास, त्याला उत्तर हे आहे की, 'खर्' प्रत्याहाराने हकाराचे ग्रहण केल्यास, शब्दरत्नात दिलेली आपत्ति वरील ज्ञापकाच्या आधारे जरी टाळता आली तरी, 'शर' प्रत्याहाराने हकाराचे ग्रहण होईल व 'सुगण् हसति, प्रत्यङ् हसति' इत्यादि उदाहरणात णकारापुढें व ङकारापुढें 'हसति' यातील हकार आला असल्यामुळें, तो हकार 'शर्' मानल्यास, 'ङणो कुक्टुक्शरि' सू १३० या सूत्राने णकाराला टुक् आगम व ङकाराला कुक् आगम होण्याची आपत्ति येईल. यावर असे म्हणता येते की, 'एङह्रस्वात्सम्बुद्धे' सू १९३ या पाणिनीय सूत्रात ङकारापुढे हकार आला असून देखील ङकाराला कुगागम केला नसल्यामुळे त्यावरून हे ज्ञापित होते की, ङकारापुढें हकार आल्यास ङकाराला कुगागम होत नाही पण हे जरी बरोबर मानले तरी 'सुगण् हसति' या उदाहरणात णकाराला टुगागम होण्याची जी आपत्ति येते ती कशी टाळता येऊ शकणार ? सारांश हकार हा 'खर्' किंवा 'शर्' मानल्यास ज्या अनेक आपत्ति येऊ पाहतात त्यांचें निवारण करण्याकरिता पाणिनीय सूत्रातील ज्ञापके धुंडाळणे यात गौरव असून, 'हल्' हे अन्तिम शिवसूत्र मानणे यातच लाघव आहे व ते सूत्र मानल्यास ज्ञापके धुंडत बसण्याची मुळीच गरज पडत नाही दुसरे असे की, 'प्रमाणभूत आचार्यो दर्भपवित्रपाणि शुचाववकाशे प्राङ्मुख उपविश्य महता यत्नेन सूत्रं प्रणयति स्म, तत्राशक्यं वर्णेनाप्यनर्थकेन भवितुं किं पुनरियता सूत्रेण' असे जे *'वृद्धिरादैच्' सू १-१-१ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी* म्हटले आहे ते जसे पाणिनीय सूत्राना लागू पडते तसेच पाणिनीने स्वीकारलेल्या शिवसूत्राना देखील सारखेंच लागू पडतें म्हणून चतुर्दश शिवसूत्रांपैकी कोणतेहि सूत्र किंवा त्यातील कोणतेहि अक्षर न गाळता, ती सूत्रें जशी पठित आहेत तशी ती मानणे योग्य आहे व तसे मानल्याने ज्ञापके शोधण्याची गरज न पडता सर्व इष्ट रूपाची सिद्धि करता येते )

मनोरमा– "हलन्त्यम्" सूत्रेऽन्त्यमिति । 'हलि अन्त्यम्' इति विग्रहे 'सप्तमी' इति योगविभागात् "सुप्सुपा" इति वा समास इति भाव । यद्वा षष्ठीतत्पुरुषोऽयम् ॥

'हलन्त्यम्' सू १ या सूत्राचे कौमुदीत 'हलिति सूत्रे अन्त्यमित्स्यात्' असे जें व्याख्यान केले आहे ते त्या सूत्राचा 'हलि अन्त्यम्' असा विग्रह करून केले आहे व या स्थली ('सप्तमी शौण्डै' सू ७१७ या सूत्राचा योगविभाग करून) 'सप्तमी' असे जे योगविभागाने पृथक् सूत्र होते त्या सूत्राने सप्तमीतत्पुरुषसमास झाला आहे असे समजावे अथवा या स्थली 'सुप्सुपा' या सूत्राने, म्हणजे 'सह सुपा' सू ६४९ या सूत्राचा योगविभाग करून व 'सुपा' असे पृथक् सूत्र मानून त्या सूत्रात 'सुबामन्त्रिते' या पूर्व सूत्रातून 'सुप्' या पदाची अनुवृत्ति केल्याने 'सुप् सुपा = सुबन्त सुबन्तेन सह समस्यते' असे जें सूत्र होते त्या सूत्राने, सप्तमीतत्पुरुषसमास झाला आहे असे समजावे किंवा 'हलन्त्यम' या सूत्राचा ('हल अन्त्यम्' असा) षष्ठीतत्पुरुषसमास मानून विग्रह करावा (मनोरमतील वरील पक्तीचे व्याख्यान शब्दरत्नात करण्यात येईल)

शब्दरत्न– सप्तमीति अधिकरणकारकस्य कर्त्राद्यन्वयद्वारा क्रियान्वयादस्ति सामर्थ्यमिति भावः । अस्य योगविभागस्य भाष्येऽदर्शनादाह–सुप्सुपेतीति । अनेनापि साधनस्याप्रतिकगतिकत्वादाह–यद्वेति । हलः=हलितिसूत्रस्यान्त्यमिति विग्रह इति भावः । "षष्ठीस्थाने" इत्यस्य च "ऊदुपधाया गोहः" इत्यादाविव, 'गुणानाञ्च परार्थत्वात्' इति न्यायेन वाऽप्रवृत्तिरिति बोध्यम् ।

'सप्तमी इति योगविभागात्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, अधिकरणकारकाचा कर्ता इत्यादिकांच्या द्वारा क्रियेशी अन्वय होत असल्यामुळे अधिकरणसप्तमीत समस्यमान होण्याचे सामर्थ्य आहे (जर अधिकरणसप्तमीत समस्यमान होण्याचे

सामर्थ्य नसते तर, 'समर्थ पदविधि ' सू ६४७ असे सूत्र असल्यामुळें, 'सप्तमी' या योगविभागाने पृथक् केलेल्या सूत्राने प्रकृत स्थली सप्तमीतत्पुरुपसमास होऊ शकला नसता परतु 'सप्तमी शौण्डै, या सूत्राचा जसा दीक्षितानी योगविभाग केला आहे) तसा योगविभाग भाष्यात केला नसल्यामुळें, 'सुप्सुपा' या सूत्राच्या आधारे सप्तमी-तत्पुरुपसमास करावा असे दीक्षितानी पुढे मनोरमेत म्हटले आहे. (*साराश 'सप्तमी शौण्डै ' या सूत्राचा 'सप्तमी' असा योगविभाग* भाष्यकारानी केला नसल्यामुळे तसा योगविभाग आपणास करता यऊ शक्त नाही असे कोणी म्हटल्यास, दीक्षित असे सुचवितात की, तसा योगविभाग जर अप्रमाण ठरतो तर तो न करिता 'सुप्सुपा' या सामान्य सूत्राने प्रकृत स्थली सप्तमीतत्पुरुपसमास झाला आहे असे मानावे ) पण 'सुप्सुपा हे समासविधायक सामान्य सूत्र जेथें गत्यन्तर नाही तेथेंच प्रवृत्त करता येऊ शकते असे कोणी म्हटल्यास, दीक्षित असे म्हणतात की, प्रकृतस्थली पष्ठीतत्पुरुपसमास मानावा (साराश 'सुप्सुपा हे सामान्य सूत्र जेथें कोणत्याहि पाणिनीय सूत्राने इष्ट समास करता येऊ शक्त नाही तेथेंच आनिकगतिन्यायाने प्रवृत्त करता येऊ शकते परतु प्रकृत स्थली 'पष्ठी' सू ७०२ या सूत्रान्वयें पष्ठीतत्पुरुपसमास करता येऊ शक्त असल्यामुळ 'सुप्सुपा' या सूत्रान्वयें येथें सप्तमीतत्पुरुपसमास करणे अयोग्य आहे असे कोणी म्हटल्यास, दीक्षित पुढें असे म्हणतात की, 'पष्ठी' या सूत्राने येथें पष्ठीतत्पुरुपसमास करावा तसा समास केल्याने) 'हल् =हलिति सूत्रस्यान्त्यमित्त' असा विग्रह केला पाहिजे असा दीक्षिताच्या म्हण-ण्याचा भावार्थ आहे 'ऊदुपधाया गोह ' सू ७३६४ इत्यादि सूत्राचे ठिकाणी ज्यी 'पष्ठी स्थानेयोगा' सू ३८ ही परिभाषा प्रवृत्त होत *नाही त्याचप्रमाणे 'हल अन्त्यम' या ठिकाणी* देखील ती परिभाषा प्रवृत्त होऊ शक्त नाही अथवा 'गुणानाञ्च परार्थत्वात् ' असा न्याय असल्यामुळें त्या परिभाषेची प्रकृत स्थली-'हल अन्त्यम्' या स्थली-

प्रवृत्ति होऊ शकत नाहीं हे जाणावें ('अनिर्धारितसम्बन्धविशेषा षष्ठीस्थानेयोगा बोध्या' असा 'षष्ठीस्थानेयोगा' या परिभाषेचा अर्थ असल्यामुळें, जेथें अवयवावयविभाव, स्वस्वामिभाव, इत्यादि प्रकारचा संबंध संभवत नाहीं तशाच ठिकाणीं ती परिभाषा प्रवृत्त होते. पण 'हल अन्त्यम्' किंवा 'उदुपधाया गोह.' या दोन्ही स्थली जरी 'हल' व 'गोह' या षष्ठी आहेत तरी त्या दोन्ही स्थलीं 'अन्त्यम्' व 'उपधाया' ही अवयववाचक पदें असल्यामुळें त्या दोन्ही षष्ठी अवयवावयविभावसंबंधबोधक षष्ठी ठरतात आणि अशा रीतीनें त्या दोन्ही षष्ठीचा अवयवावयविभावरूप अर्थ निश्चित होत असल्यामुळें, ज्या ठिकाणीं कोणत्याहि इतर प्रकारचा संबंध संभवत नाहीं अशाच ठिकाणीं प्रवृत्त होणारी 'षष्ठी स्थानेयोगा' ही परिभाषा वरील दोन्ही स्थली प्रवृत्त होऊ शकत नाहीं 'षष्ठी स्थानेयोगा' सू १–१–४९ या सूत्रावरील भाष्यांत देखील भाष्यकारांनी 'अवयवषष्ठ्यादीनां चाप्राप्तिर्योगस्यासन्दिग्धत्वात्' हें वार्तिक पठित करून या वार्तिकाचें व्याख्यान करितांना 'अवयवषष्ठ्यादीनाञ्च नियमस्याप्राप्तिः । किं कारणम् ? । योगस्यासन्दिग्धत्वात् । सन्देहे नियमो, न चावयवषष्ठ्यादिषु सन्देहः ।' असें म्हटलें आहे आणि त्या भाष्यांत भाष्यकार पुढें असेंहि म्हणतात कीं, 'अथवा स्थानेऽयोगा स्थानेयोगा । किमिदमयोगेति ? । अन्यस्त्रयोगादयोगा ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे कीं, ज्या षष्ठीचे अवयव इत्यादि संबंध आहेत तशा षष्ठीच्या ठिकाणीं 'षष्ठी स्थानेयोगा' ही परिभाषा प्रवृत्त होत नाहीं व त्याचें कारण हें कीं, अशा संबंधाच्या विषयांत संदेह उत्पन्नच होत नाहीं जेथें संदेह उत्पन्न होतो तशाच ठिकाणीं नियम केला जातो आणि जेथें अवयववाचक शब्द उच्चारला आहे तशा ठिकाणीं अवयवीचा आक्षेप होत असल्यामुळें आणि अशा रीतीनें अवयवावयविसंबंध स्पष्टपणें–निश्चतपणें–ज्ञात होत असल्यामुळें, अशा स्थलीं 'षष्ठी स्थानेयोगा' ही परिभाषा लागूच पडत नाहीं. अथवा त्या सूत्रांतील 'स्थानेयोगा'

या पदाचा 'स्थाने अयोगा' असा पदच्छेद करावा, म्हणजे 'स्थानेयोगा' हे एक पद न मानता 'स्थाने' व 'अयोगा' ही दोन भिन्न पदे मानावी व 'अयोगा' या पदाचा अव्यक्तयोगा, म्हणजे ज्या षष्ठीचा संबंध अमुक प्रकारचा असा स्पष्ट झालेला नसेल तशा षष्ठीचाच स्थानाशी संबंध जोडावा. या वरील भाष्यावरून हे स्पष्ट होते की, 'हल् अन्त्यम्' इत्यादि स्थली जेथें 'अन्त्यम्' हा अवयववाचक शब्द उच्चारला असल्यामुळें 'हल्' ही अवयवषष्ठी आहे हे निश्चनपणे बोधित होते तशा ठिकाणी 'षष्ठी स्थानेयोगा' ही परिभाषा मुळीच लागू पडत नाही. दुसरे असे की, 'गुणाना च परार्थत्वादसम्बन्ध समत्वात्स्यात्' असा न्याय आहे व अशाच तऱ्हेचा न्याय 'न हि भिक्षुको भिक्षुकान्तर याचितुमर्हति सत्यन्यस्मिन्नभिक्षुके' या भिन्न शब्दात भाष्यात पठित आहे. या मीमांसेतील वरील जैमिनीय न्यायाचा भावार्थ हा आहे की, गुण किंवा विशेषणे ही अप्रधान असल्यामुळ व नी प्रधान किंवा विशेष्य याचा अर्थ स्पष्ट करून देणारे असल्यामुळें आणि अशा रीतीनें ती प्रधानाच्या किंवा विशेष्याच्या उपयोगी पडणारी असल्यामुळे समान दर्जाची ठरणाऱ्या त्या गुणाचा किंवा विशेषणाचा परस्पराशी अन्वय न होता, ती सर्व अप्रधान विशेषणे प्रधानाशी किंवा विशेष्याशीच अन्वित होतात. शब्दरत्नकारानी हा जो न्याय प्रकृत स्थली प्रवृत्त केला आहे त्याचे कारण हे की, 'हलन्त्यम्' हे *इत्संज्ञेचे विधान करणारे संज्ञासूत्र असून* 'षष्ठीस्थानेयोगा' ही परिभाषा आहे आणि संज्ञासूत्रे व परिभाषा ही *स्वतःच्या उपयोगाकरिता नसून कार्यविधायक सूत्राचा अर्थ निश्चित* करण्याच्या उपयोगी पडणारी साधने असल्यामुळें व अशा रीतीने कार्यविधायक सूत्रें प्रधान असून परिभाषा व संज्ञासूत्रे ही दोन्ही अप्रधान–परार्थ–असल्यामुळें, 'हलन्त्यम्' या संज्ञासूत्राचे ठिकाणी 'षष्ठी स्थानेयोगा' ही परिभाषा उपस्थित होऊ शकत नाही व त्यामुळ देखील 'हल् अन्त्यम्' या विग्रहातील 'हल्' ही 'हल् स्थाने'

या अर्थाची बोधक स्थानषष्ठी मानता यऊ शकत नाही असा शब्द-रत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे मीमांसेतील वरील न्यायाचे विवरण करिताना मञ्जेत 'अय च न्यायो लोकसिद्ध । यथा कस्यचिद्राज्ञो द्वौ भृत्यौ नापितो दीपदर्शकश्च राज्ञ एव क्षुरसंस्कार दीपदर्शन वा कुरुत, न तु परस्परस्य तत्तत्कार्यमिति । एवमेव प्रकृतेऽपि विध्यर्थत्वात्संज्ञा-शास्त्रस्य परिभाषाशास्त्रस्य च तयोस्तदुपकारकत्वमेव भवितुमर्हति, न तु संज्ञाशास्त्रस्य परिभाषोपकारकत्वम्, परिभाषाशास्त्रस्य च संज्ञाशास्त्रो-पकारकत्वमिति । असं म्हटले आहे )

मनोरमा– स्यादेतत् हलित्येकदेशस्यैव तन्त्रावृत्त्येकशेषान्यतममस्तु। 'हस्य ल्' इति च व्याख्यास्यते । सामीप्य षष्ठ्यर्थं । यद्वा मास्तु तन्त्रादि । अस्तु समाहारद्वन्द्वो हल्चल् चेति । लकारस्य संयोगान्तलोप ॥

(दीक्षितानी अन्योन्याश्रयरूप दोष टाळण्याकरिता 'हलन्त्यम्' हे सूत्र दोनदा उच्चारून व प्रथम उच्चारलेले त सूत्र एक पद मानून आणि त्या पदाचा 'हलि अन्त्यम्' किंवा 'हल् अन्त्यम्' असा विग्रह करून 'हल् इति शिवसूत्रस्य अन्त्यलकार इत्' असा त्या प्रथम उच्चारलेल्या सूत्राचा अर्थ केला आहे, आणि अशा रीतीने अन्त्य लकाराची इत्संज्ञा सिद्ध करून 'आदिरन्त्येन सहेता' या सूत्राच्या सहायाने हल् प्रत्याहार साधला आहे व दुसऱ्याने उच्चारलेले 'हलन्त्यम्' हे सूत्र द्विपद मानून त्याचा 'उपदेशे अन्त्य हल् इत्स्यात् = उपदेशविषयीभूता य शब्द तस्य अन्त्य व्यञ्जन इत्स्यात्' असा अर्थ केला आहे पण इतर वैयाकरणानी ते सूत्र दोनदा न उच्चारता एकदाच उच्चारून अन्योन्याश्रयरूप दोषाचे भिन्न रीतीने निवारण केले आहे उदाहरणार्थ प्रक्रियाकौमुदीकारानी ते सूत्र एकदाच उच्चारून त्याचा 'उपदेशे अन्त्य हल् इत्स्यात्' एवढाच अर्थ केला आहे यावर टीका करिताना प्रसादकार म्हणतात–'ननु लकार-स्येत्संज्ञाया सत्याम् आदिरन्त्येन सहेता इति प्रत्याहारग्रहण स्यात् ।

सति च तस्मिन् हलन्त्यमितीत्संज्ञा । तदितरेतराश्रयत्वं स्यात् । इतरेतराश्रयाणिच कार्याणि न प्रकल्पन्त इति चेदुच्यते । हलिति द्वितीयमत्र हल्ग्रहणं तन्त्रेणोपात्तं द्रष्टव्यम् ।...तत्रैकेन हल्ग्रहणेन हस्य समीपे यो ल् तस्येत्संज्ञा पश्चाद् द्वितीयेन प्रत्याहारग्रहणेनेत्संज्ञेति नेतरेतराश्रयदोष ।' माराश त्यानी 'हलन्त्यम्' या सूत्रातील 'हल्' हा शब्द द्व्यर्थी मानून त्याचा 'हस्य समीपवर्ती यो ल्' असा एक अर्थ केला आहे, व अशा रीतीने शिवसूत्रातील अन्त्य लकाराची इत्संज्ञा साधून व 'आदिरन्त्येन सहेता' या सूत्राच्या सहायाने हल् प्रत्याहार साधून व 'हल्' या पदाचा 'व्यञ्जन' असा दुसरा अर्थ करून 'उपदेशे अन्त्यं हल्-व्यञ्जनम्-इत् स्यात्' असा अखेरीस प्रकृत सूत्राचा अर्थ सिद्ध केला आहे, आणि अशा रीतीने अन्योन्याश्रयरूप दोष टाळला आहे माधवाने देखील आपल्या धातुवृत्तीत 'भू सत्तायाम्' या धातूचे विवरण करिताना असेच म्हटले आहे व यावेरीज त्याने असेहि म्हटले आहे की, 'हल्' या पदाचा 'हल् च ल् च हल्ल्' असा समाहारद्वन्द्व करावा व त्या पदातील अन्त्य लकाराचा 'संयोगान्तस्य लोप' सू ५४ या सूत्राने लोप झाला आहे असे समजावे 'हलन्त्यम्' १–३–३ या सूत्रावरील भाष्यात 'सिद्धं तु लकारनिर्देशात्' असे जें वार्तिक पठित केले आहे त्याचे व्याख्यान करिताना कैयटाने देखील 'पूर्वं लकारस्येत्संज्ञा विधेया, तेन हलिति प्रत्याहार उपपद्यते, तत्र हल् च ल चेति समाहारद्वन्द्वं कृत्वा संयोगान्तस्य लोप इति लकारो लुप्यते' असे म्हटले आहे अन्योन्याश्रयरूप दोषाचा परिहार करण्याकरिता 'हलन्त्यम्' हे सूत्र एकदाच उच्चारून त्यातील 'हल्' या पदाचा वर सांगितलेल्या तऱ्हेने अर्थ करणे हें मत दीक्षितास मान्य नसल्यामुळें, ते प्रथम त्या मताचा उपन्यास करितात ) 'हलन्त्यम्' या सूत्रातील 'हल्' एवढ्याच भागाचे ठिकाणी तन्त्र किंवा आवृत्ति किंवा एकशेष या तीनपैकी कोणते तरी एक मानावे असे म्हणता येऊ शकते (कारण सपूर्ण सूत्राची आवृत्ति करण्यात गौरव असून, वर

मागितल्याप्रमाणे त्यातील 'हल्' या एकदेशाची आवृत्ति करण्यात लाघव आहे व तसे केल्याने देखील इष्ट अर्थ सिद्ध होतो व अन्यो-न्याश्रयरूप दोषाचे निवारण होतें ) 'हृस्य ल्' अशा रीतीने व्याख्यान करावे व 'हृस्य' या षष्ठीचा 'सामीप्य' असा अर्थ समजावा, (कारण 'षष्ठी स्थानेयोगा' १-१-४९ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी 'एकशत षष्ठ्यर्था', म्हणजे षष्ठीचे अनेक अर्थ आहेत, असे म्हटले असल्यामुळें, प्रकृत स्थली 'हृस्य' या षष्ठीचा सामीप्यरूप अर्थ मानण्यात काही दोष येत नाही ) अथवा (तन्त्रादिकाचा उपयोग न करिता) 'हल् च ल् च' असा समाहारद्वन्द्व करावा व अन्त्य लकाराचा 'संयोगान्तस्य लोप' सू ५४ या सूत्राने लोप झाला आहे असे मानावे ('एकस्य शब्दस्यानेकार्थपरत्वेनभव्यवहार' अशी भैरवीकारानी 'तन्त्र' शब्दाची व्याख्या दिली असून, 'अक्षान् पश्य' हे तन्त्राचे उदाहरण दिले आहे या उदाहरणातील 'अक्ष' हा शब्द द्यूत खेळण्याचे फासे, गाडीचे चाक, माळेचे मणी, इन्द्रिय इत्यादि अनेक अर्थांचा वाचक आहे सारांश जेथें अनेकार्थवाचक शब्दाचा वाक्यात प्रयोग करून वक्ता त्या वाक्याने श्रोत्याला अनेक अर्थांचा बोध व्हावा असे इच्छितो तेथें तशा प्रयोगास 'तन्त्र' असे म्हणतात जेथें दोन समान स्वरूप किंवा भिन्न स्वरूप शब्दाची वृत्ति केली असता, 'सरूपाणामेकशेष' सू १८८ या सूत्रान्वयें किंवा एकशेषप्रकरणात पठित असलेल्या सूत्रान्वये त्यापैकी एक शिल्लक राहतो त्याला 'एकशेष' म्हणतात उदाहरणार्थ परशुराम व दाशरथिराम या दोन भिन्न अर्थांच्या वाचक पण समानरूप 'राम' या शब्दाची वृत्ति केली असता, त्या दोन 'राम' शब्दांपैकी एक 'राम' शब्द शिल्लक राहून 'रामौ पश्य' असा एकशेषाने प्रयोग केला जातो तसेच 'माता च पिता च पितरौ, भ्राता च स्वसा च भ्रातरौ, पुत्रश्च दुहिता च पुत्रौ' इत्यादि भिन्नस्वरूप शब्दांची एकशेषाची उदाहरणे होत आपणास प्रकृत स्थली जेथें दोन भिन्नार्थक पण समानरूप शब्दांची

वृत्ति केली असता, त्यांपैकी एक शिल्लक राहतो तसा एकशेषाशी कर्तव्य आहे एखादा शब्द किंवा शब्दसमुदाय एकवेळ उच्चारून पुन्हा तो दुसऱ्याने उच्चारणे याला 'आवृत्ति' म्हणतात 'चार्थे द्वन्द्व.' सू ९०१ या सूत्रान्वये होणारा समास द्वन्द्वसमास होय वर मागितलेल्या तन्त्र, आवृत्ति, एकशेष व द्वन्द्व या चार साधनाचा *'हलन्त्यम्' या सूत्रातील 'हल्' या एकदेशाचे ठिकाणी आता आपण* उपयोग करू

'हलन्त्यम्' या सूत्रातील 'हल्' या एकदेशाचे ठिकाणी तन्त्र मानल्यास, म्हणजे 'हल्' हा शब्द दोन अर्थांचा वाचक मानल्यास, *त्याचा 'हस्य समीपवर्ती लकार' असा एक अर्थ व 'व्यञ्जन' असा* दुसरा अर्थ होतो त्या शब्दाचे असे दोन अर्थ मानल्याने, 'अन्तिम शिवसूत्रे हस्य समीपवर्ती लकार इत्संज्ञक स्यात, उपदेशे अन्त्य व्यञ्जन इत्संज्ञक स्यात्' असा 'हलन्त्यम्' या सूत्राचा दोन प्रकारचा इष्ट अर्थ होऊ शकतो तसेच, 'हल्' या पदाचे दोनदा उच्चारण केल्यास व प्रथम उच्चारलेल्या त्या पदाचा वर मागितलेला प्रथम अर्थ केल्यास व दुसऱ्याने उच्चारलेल्या त्या पदाचा वर सांगितलेला द्वितीय अर्थ केल्यास, प्रकृतसूत्राचा वर सांगितल्याप्रमाणे दोन प्रकारचा इष्ट अर्थ निष्पन्न होतो त्याचप्रमाणे, 'हल् च हल च हल्' असा एकशेष केल्यास, व प्रथम 'हल' शब्दाचा वर मागितलेला प्रथम अर्थ व द्वितीय 'हल्' शब्दाचा वर सांगितलेला द्वितीय अर्थ केल्यास, इष्ट सूत्रार्थ निष्पन्न होतो तसेच 'हल् च ल् च' *असा समाहारद्वन्द्व केल्यास* व 'हल्' या पदाचा 'व्यञ्जन' व 'ल्' याचा शिवसूत्रातील अन्त्य लकार असा अर्थ केल्यास, तोच सूत्रार्थ निष्पन्न होतो साराश 'हलन्त्यम्' या संपूर्ण सूत्राची द्विरावृत्ति न करिता, त्या सूत्रातील 'हल्' या एकदेशाचे ठिकाणी वर मागितलेल्या चार साधनापैकी कोणतेहि एक साधन उपयोगात आणल्याने इष्ट सूत्रार्थ निष्पन्न होऊ शकतो. म्हणून संपूर्ण सूत्राची द्विरावृत्ति करण्यात गौरव असून

'हल्' या एकदेशाचे ठिकाणी वरील चार साधनापैकी कोणत्याहि एक साधनाचा उपयोग करण्यात लाघव असल्यामुळें, तसें करणें इष्ट आहे असें माधवादिकांचें म्हणणें आहे ह्या मताचें खण्डन पुढें दीक्षित करणार आहेत.)

शब्दरत्न– तन्त्रावृत्त्येकशेषान्यतममस्त्विति। यद्यपीदृशे विषये उच्चारयितुस्तन्त्रैकशेषान्यतरेणोच्चारणम् वोद्धुस्त्वावृत्त्या बोध इत्येवानुभवसिद्धम्, तथापि व्यवस्थितवान्यतमसत्ताऽनेन बोध्यत इति न दोषः। एकशेषश्च प्रत्याख्यातोऽसहविवक्षायामपि शास्त्रमात्रप्रक्रियोपयोगीत्याशयेन पृथगुक्तः। सामीप्य षष्ठ्यर्थ इति। "षष्ठी स्थाने" इत्यस्य 'गुणानां च परार्थत्वात्' इति न्यायेनाप्रवृत्तिः। न च 'इको गुणवृद्धी" इति सूत्रे तच्छेषशब्देन परिभाषयोरपि गुणगुणिभाव उक्त इति वाच्यम्, 'सार्वधातुकार्धधातुकयोः' 'अलोन्त्यस्य' 'इको गुणवृद्धी' इति सूत्रत्रयस्य लक्ष्यसंस्कारकमहावाक्ये विशेष्यविशेषणभावमादायैव तच्छेषव्यवहारो, न तु गुणगुणिभावेन परस्परापेक्षत्वेन चेति कैयटेन स्पष्टमुक्ते, एतन्मूलकतयैव तत्पक्षासम्भवस्य तेनोक्तेश्चेति भावः॥

जरी अशा ठिकाणी वक्त्यानें तन्त्राचा किंवा एकशेषाचा उपयोग केला असला तरी, श्रोत्याला आवृत्ति करूनच बोध होतो हें अनुभवसिद्ध आहे. म्हणून वक्ता जरी अनेकार्थांचें बोधन करण्याकरिता तन्त्र किंवा एकशेष याचें अवलंबन करतो तरी, श्रोत्याला आवृत्ति केल्याशिवाय बोध होत नसल्यामुळें व अशा रीतीनें तन्त्र व एकशेष या दोन साधनाचा वक्त्यास, व आवृत्ति या तृतीय साधनाचा श्रोत्यास, असा व्यवस्थित उपयोग करावा लागत असल्यामुळें, दीक्षितांनीं मनोरमेंत ('अन्यतरदस्तु' म्हणजे 'तन्त्रावृत्ती एकशेषावृत्ती वा स्ताम्' असें न म्हणता) 'अन्यतममस्तु' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्यात कांहीं दोष येत नाहीं, म्हणजे तें म्हणणें योग्य ठरतें

(जरी 'सकृदुच्चरित शब्द सकृदेवार्थं गमयति,' म्हणजे एकदा उच्चारलेल्या शब्दाने एकच अर्थाचा बोध होऊ शकतो, असा सामान्य न्याय आहे तरी 'गङगाया मीनघोषौ स्त' इत्यादि प्रयोगावरून हे सिद्ध होते की, तो न्याय सार्वत्रिक नसून भाषेतील कित्येक प्रयोगात तो व्यभिचरित झालेला आढळतो, म्हणजे कित्येक प्रयोगाना तो न्याय लागू पडत नाही, कारण वर दिलेल्या उदाहरणात 'गङगायाम्' हा शब्द जरी एकदाच उच्चारला आहे तरी त्या शब्दाचे 'गङगाप्रवाहे' व 'गङगातीरे' असे दोन भिन्न अर्थ होतात, व 'गङगाप्रवाहे मीनोऽस्ति' व 'गङगातीरे घोषोऽस्ति' असा वाक्यार्थबोध होतो जेथें तन्त्राचा उपयोग करून वक्ता दोन भिन्न अर्थाचे बोधक वाक्य उच्चारतो तेथे श्रोत्याला कशी आवृत्ति करावी लागते याचे 'सुखिने दु खिते चेतसि दवदहनदीधितिराशिस्तुहिनदीधिति' हे एक काव्यप्रकाशात दिलेले उदाहरण आहे हे वाक्य वक्त्याने उच्चारले असता, श्रोत्याला त्या वाक्यातील दोन भिन्न अर्थाचा बोध होण्याकरिता एकदा जें उद्देश्य मानले आहे ते पुन्हा विधेय मानून व जें विधेय मानले आहे त पुन्हा उद्देश्य मानून दोन भिन्न वाक्यें कल्पावी लागतात व अशा रीतीने त्याला 'दवदहनदीधितिराशि' व 'तुहिनदीधिति' या दोन शब्दांची आवृत्ति करून 'सुखिते चेतसि दवदहनदीधितिराशि = वनाग्निसमूह, तुहिनदीधिति = चन्द्र' आणि 'दु खिते चेतसि तुहिनदीधितिर्दवदहनदीधितिराशि' अशी दोन भिन्न वाक्ये कल्पिल्याने त्या श्रोत्याला वक्त्याने उच्चारलेल्या वरील वाक्यातील दोन भिन्न अर्थांचा बोध होऊ शकतो याचप्रमाणे 'हलन्त्यम्' या सूत्रातील 'हल्' या पदाने 'हस्य समीपवर्ती लकार,' म्हणजे 'हल्' या शिवसूत्रातील हकारापुढील लकार, व 'हल्रूपमन्त्यम्', म्हणजे उपदेशातील अन्त्य व्यञ्जन, अशा दोन भिन्न अर्थांचा बोध होण्याकरिता 'हल्' या पदाची आवृत्ति करून 'हसमीपवर्तिलकार इत्' व 'हल्रूपमन्त्य च इत्' अशी दोन भिन्न वाक्यें कल्पिणे जरूर आहे.

आता मनोरमेतील शंकापर ग्रन्थात 'हलित्येकदेशस्यैव तन्त्रावृत्त्येक-शेषान्यतमस्तु' असे जें म्हटले आहे त्यावर शंकाकार अशी शंका करतो की, या पक्तीत एकशेषाचे ग्रहण करावयास नको होते, कारण 'सरूपाणामेकशेष' १–२–६४ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी 'अशिष्य एकशेष एकेनोक्तत्वात्', म्हणजे 'सरूपाणामेकशेष.' हें एकशेषाचे सूत्र असण्याची काहीच गरज नाही, कारण एकाच शब्दाने अनेक अर्थांचा बोध अभिधाशक्तीने होत असल्यामुळें एकशेष मानण्याची काही आवश्यकता नाही, असे वार्तिक पठित करून एकशेषाचे प्रत्याख्यान केले आहे शंकाकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, अनेकार्थवाचक एखादा शब्द वक्त्याने तन्त्राचा आश्रय करून वाक्यात उच्चारला असता, त्या शब्दाच्या अनेक अर्थांचा श्रोत्याला आवृत्ति केल्यानें बोध होऊ शक्त असल्यामुळें आणि याच कारणाकरिता भाष्यकारानी एकशेषाचे प्रत्याख्यान केले असल्यामुळें, दीक्षितानी 'तन्त्रावृत्त्येकशेषान्यतमस्तु' असे न म्हणता, 'तन्त्रावृत्ती स्ताम्' एवढेंच मनोरमेतील शंकाग्रन्थात म्हणावयास हवे होते या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, जरी भाष्यकारानीं एकशेषाचे प्रत्याख्यान केले आहे तरी (त्यानीं स्वत च 'एकशेषनिर्देशात्' असे वचन पठित करून पाणिनीय सूत्राच्या अर्थाचे स्पष्टीकरण करण्याकरिता जेथें महविवक्षा नाही, म्हणजे ज्या दोन समानस्वरूप शब्दाचा त्यानी एकशेष मानला आहे त्याचा वाक्यातील इतर पदाशी सारख्याच रीतीने अन्वय होत नाही, अशा स्थानी देखील, एकशेषाचा उपयोग केला असल्यामुळें व अशा रीतीने ते प्रत्याख्यान असहविवक्षेच्या विषयात लागू पडणारे नसून लौकिक प्रयोगात केवळ सहविवक्षेच्या विषयात लागू पडणारे असल्यामुळें) असहविवक्षेच्या विषयात केवळ शास्त्रीय प्रयोग साधण्याच्या उपयोगी पडणाऱ्या एकशेषाचा दीक्षितानी मनोरमेच्या वरील पक्तीत पृथक् निर्देश केला आहे (उदाहरणार्थ 'सर्वादीनि सर्वनामानि' १–१–२७ या सूत्रावरील

भाष्यात भाष्यकार म्हणतात-'एवं तर्ह्युभयमनेन क्रियते पाठश्चैव विशेष्यते संज्ञा च । कथं पुनरेकेन यत्नेनोभयं लभ्यम् । लभ्यमित्याह । कथम् ? । एकशेषनिर्देशात् । एकशेषनिर्देशोऽयम् । सर्वादीनि च सर्वादीनि च सर्वादीनि । सर्वनामानि च सर्वनामानि च सर्वनामानि । सर्वादीनि सर्वनामसंज्ञानि भवन्ति सर्वेषां यानि च नामानि तानि सर्वादीनि संज्ञोपसर्जने च विशेषेऽवतिष्ठेते ।' या भाष्याचा थोडक्यात तात्पर्यार्थ हा आहे की, 'सर्वादीनि सर्वनामानि' या सूत्राचा एकशेष करून उल्लेख केला आहे, म्हणजे मूळची दोन सूत्रे असून एक सूत्र उच्चारले आहे, असे मानले म्हणजे, सर्वादिगणात पठित असलेले शब्द सर्व अर्थाचे दर्शक असतानाच सर्वनामसंज्ञक होतात व संज्ञावाचक किंवा उपसर्जनीभूत ते शब्द सर्वनामसंज्ञक होत नाहीत असा दोन्ही प्रकारचा अर्थ त्या सूत्रातूनच निघतो आणि त्यामुळे 'संज्ञोपसर्जनप्रतिषेध' हे वार्तिक पठित करण्याची काही गरज राहत नाही त्याचप्रमाणे 'द्विर्वचनेऽचि' १-१-५९ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात-'एवं तर्ह्युभयमनेन क्रियते प्रत्ययश्च विशेष्यते द्विर्वचनं च । कथं पुनरेकेन यत्नेनोभयं लभ्यम् । लभ्यमित्याह । कथम्? । एकशेषनिर्देशात् । एकशेषनिर्देशोऽयम् । द्विर्वचनं च द्विर्वचनं च द्विर्वचनम् । द्विर्वचने च कर्तव्ये द्विर्वचनेऽचि प्रत्यये इति द्विर्वचननिमित्तेऽचि स्थानिवद्भवति ।' या दोन्ही भाष्यात भाष्यकारानी 'सर्वादीनि, सर्वनामानि, द्विर्वचने' या पदाचा एकशेष मानला आहे, व ही तीन्ही पदें अशी आहेत की, त्याचे द्विरुच्चारण केले असता, ती वाक्यांतील एकाच पदाशी अन्वित न होतां, भिन्न भिन्न पदांशी अन्वित होतात हे देखील त्या दोन भाष्यावरूनच स्पष्ट होते सारांश जरी भाष्यकारानी एकशेषाचे प्रत्याख्यान केले आहे तरी पाणिनीय सूत्राचा अर्थ विशद करण्याकरिता त्यानी कित्येक ठिकाणी जेथे सहविवक्षा नाही अशा स्थली एकशेष केला असल्यामुळे हे ध्वनित होते की, '*असहविवक्षाया गौणमात्रप्रयोगार्थमेकशेषस्यावश्यकत्वम्*'

आणि म्हणून प्रकृत स्थली 'हलन्त्यम्' या पाणिनीय सूत्राचा अर्थ विशद करणे असल्यामुळे, दीक्षितांनी मनोरमेतील वाक्यग्रन्थात एकशेषाचा पृथक् निर्देश केला आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. त्या सूत्रातील 'हल्' या पदाचा 'हल् च हल् च' असा एकशेष केल्याने 'हल्' हे एक पद 'हम्य समीपवर्ती लकार' या अर्थाचा बोध करून देते व दुसरे ते पद 'व्यञ्जन' या अर्थाचा बोध करून देते आणि अशा रीतीने एकाच सूत्राने त्या दोहोंचीहि इत्संज्ञा सिद्ध करता येते.) 'सामीप्य षष्ठ्यर्थ' असे जें मनोरमेत म्हटले आहे (व 'हम्य ल्' या स्थली दीक्षितांनी 'षष्ठी स्थानेयोगा' ही परिभाषा प्रवृत्त केली नाही) याचे कारण हे की, 'गुणाना च परार्थत्वात्' असा न्याय असल्यामुळे, 'हलन्त्यम्' या संज्ञासूत्राचा अर्थ करतेवेळी 'षष्ठी स्थानेयोगा' ही परिभाषा उपस्थित होऊ शकत नाही, (कारण संज्ञासूत्रें व परिभाषा ही विधायक सूत्रांचा अर्थ लावण्याकरिताच पठित केली असल्यामुळे व अशा रीतीने ती परार्थ असल्यामुळे, त्यांच्यात अङ्गाङ्गिभाव किंवा परस्परोपकारित्व राहू शकत नाही वरील न्यायाचे विस्तृत विवरण मागील शब्दरत्नांत केलेच आहे) यावर कोणी असे म्हणेल की, 'इको गुणवृद्धी' १-१-३ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारांनी 'तच्छेष' या शब्दाने दोन परिभाषामध्यें देखील परस्परात अङ्गाङ्गिभाव असतो असे सांगितले आहे, पण हे म्हणणे बरोबर नाही, कारण इष्ट रूपाची सिद्धि करण्याकरिता 'सार्वधातुकार्धधातुकयोः', 'अलोऽन्त्यस्य', व 'इको गुणवृद्धी' या तीन सूत्रांचे मिळून जें एक महावाक्य तयार केले जाते त्यात 'अलोऽन्त्यस्य' व 'इको गुणवृद्धी' या दोन परिभाषांपैकी कोणती परिभाषा विशेष्य व कोणती विशेषण आहे अशा प्रकारच्या विशेषणविशेष्यभावाला धरूनच भाष्यकारांनी 'तच्छेष' शब्दाचा उपयोग केला आहे, व दोन परिभाषामध्यें परस्परात अङ्गाङ्गिभाव अथवा निमित्तनिमित्तिभाव असतो किंवा त्यांना परस्परांची आकांक्षा

असते असे भाष्यकारानी मानले नाही व तसं मानून 'तच्छेप' शब्दाचा उपयोग केला नाही असे त्या सूत्रावरील भाष्याच्या टीकेत कैयटाने स्पष्ट म्हटले आहे आणि 'गुणानां च परार्थत्वादसम्बन्ध-समत्वात्स्यात्' असा न्याय असल्यामुळें तच्छेपपक्ष, म्हणजे परिभाषा-मध्यें परस्परात अङ्गाङ्गिभाव, सभवत नाहीं असे देखील कैयटानें तयें म्हटलें आहे ('इको गुणवृद्धी' १–१–३ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात–'किं पुनरयमलोन्त्यशेष, आहोस्विदलोन्त्यापवाद ?। कथं चायं तच्छेप स्यात्, कथं वा तदपवाद ?। यद्येकं वाक्यम्, तच्चेद च, अलोऽन्त्यस्य विषयो भवन्ति, इको गुणवृद्धी अलोऽन्त्यस्येति ततोऽयं तच्छेप । अथ नाना वाक्यम्, तच्चेद च, अलोऽन्त्यस्य विषयो भवन्ति, इको गुणवृद्धी अन्त्यस्य चानन्त्यस्य च इति । ततोऽयं तदपवाद ।' या भाष्यातील 'तच्छेप' या पदाचा कैयटानें दोन तऱ्हेनें, म्हणजे 'स अलोऽन्त्यस्य इति सूत्र शेप यस्य इको गुणवृद्धी इति सूत्रस्य' असा बहुव्रीहि मानून व 'तस्य अलोऽन्त्यस्य इति सूत्रस्य शेप' असा षष्ठीतत्पुरुष मानून, विग्रह केला आहे त्यामुळें भाष्यकाराच्या म्हणण्याचा असा अर्थ होतो कीं, 'अलोऽन्त्यस्य' हें सूत्र 'इको गुणवृद्धी' या सूत्राचे विशेषण मानल्यास किंवा 'इको गुणवृद्धी' हें सूत्र 'अलोऽन्त्यस्य' या सूत्राचे विशेषण मानल्यास, तच्छेपपक्ष निष्पन्न होतो, पण 'इको गुणवृद्धी' हें सूत्र 'अलोऽन्त्यस्य' या सूत्राचे बाधक सूत्र मानल्यास, तदपवादपक्ष निष्पन्न होतो 'विशेषणविशेष्यभाव कामचार' असा न्याय असल्यामुळें, तच्छेप-पक्षात वरील दोन परिभाषासूत्रांपैकी कोणतेंहि एक सूत्र दुसऱ्याचें विशेषण, म्हणजे अर्थाचा संकोच करणार परिच्छेदक, मानतां येतें आणि म्हणूनच कैयटाने वर सांगितल्याप्रमाणे 'तच्छेप' शब्दाचा दोन तऱ्हेनें विग्रह केला आहे वरील दोन्ही सूत्रें परिभाषा असून, त्या दोन परिभाषामध्यें भाष्यकारानीं विशेषणविशेष्यभाव करता येतो असे म्हटले असल्यामुळें, नागेशार असे म्हणतो कीं, जरी

सञ्ज्ञासूत्रें व परिभाषा स्वतःकरिता नसून परार्थ आहेत तरी त्याच्यात गुणगुणिभाव होऊं शकतो आणि त्यामुळें 'हलन्त्यम्' या सञ्ज्ञासूत्रातील 'हल्' या एकदेशाचा 'हम्य ल्' असा षष्ठीतत्पुरुषसमास केला असता, 'षष्ठी स्थानेयोगा' ही परिभाषा उपस्थित होऊन 'हम्य स्थाने ल्' असाच अर्थ होऊ शकतो व 'सामीप्ये षष्ठयर्थ' असे जें मनोरमेंतील शङ्काग्रन्थात म्हटलें आहे तें बरोबर मानता येत नाहीं या शङ्केवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, दोन परिभाषामध्यें अङ्गाङ्गिभाव होऊ शकतो असा भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय नसून, त्याच्या म्हणण्याचा वास्तविक आशय हा आहे कीं, जेव्हां एखाद्या कार्यविधायक सूत्रात दोन भिन्न परिभाषांचे निमित्त विद्यमान असल्यामुळें त्या दोन्ही परिभाषा त्या सूत्राचे ठिकाणीं उपस्थित होतात तेव्हां, इष्ट प्रयोगाची सिद्धी करण्याकरिता त्या कार्यविधायक सूत्राचे त्या दोन परिभाषांसह जें एक महावाक्य तयार केलें जातें त्यात एक परिभाषा दुसऱ्या परिभाषेचे विशेषण मानता येते व असा विशेषणविशेष्यभाव तशा महावाक्यातच होऊ शकतो व, इतर स्थलीं होऊ शकत नाहीं उदाहरणार्थ 'सार्वधातुकार्धधातुकयोः' सू २१६८ हें सूत्र अङ्गाधिकारात पठित असल्यामुळें त्या सूत्रात 'अङ्गस्य' हें पद अनुवृत्त होतें आणि 'अङ्गस्य' ही स्थानषष्ठी असल्यामुळें व तीं 'अलोऽन्त्यस्य' ही परिभाषा उपस्थित होण्याचे निमित्त असल्यामुळें, त्या सूत्रात ती परिभाषा उपस्थित होते त्याचप्रमाणें त्या विधायक सूत्रात 'मिदेर्गुणः' या पूर्वसूत्रातून 'गुण' हे पद अनुवृत्त होत असल्यामुळें व ते पद 'इको गुणवृद्धी' ही परिभाषा उपस्थित होण्याचे निमित्त असल्यामुळें, ती परिभाषा देखील त्या सूत्राचे ठिकाणीं उपस्थित होते. तें विधायक सूत्र व या दोन परिभाषा या तिहींचे मिळून एक महावाक्य तयार केल्याशिवाय इष्ट रूपाची सिद्धि करण्याकरिता उपयोगी पडणारा असा त्या विधायक सूत्राचा अर्थ निष्पन्न होऊ शकत नाहीं म्हणून या तिहींचे 'सार्वधातुकार्ध-

धातुज्या प्रत्ययया. परया सतो, अङ्गस्य अन्त्यस्य इग्रूपस्य अल. गुणोभवति,' अथवा 'अन्त्याल्रूपस्य इक् गुणोभवति ' असे दोन प्रकारचे महावाक्य, त्या दान परिभाषामध्यें विशेषणविशेष्यभावाचा व्यत्यास केल्याने, म्हणजे एकदा 'अलोऽन्त्यस्य' ही परिभाषा 'इको गुणवृद्धी' या परिभाषेचे विशेष्य व दुसऱ्यान ती 'इको गुणवृद्धी' या परिभाषेचे विशेषण मानल्याने, तयार होते, व तसा सूत्रार्थ सिद्ध झाल्यावरच इष्ट रूपाची सिद्धि करता येते. साराश वरील भाष्या-वरून हे स्पष्ट होते की, दोन परिभाषामध्य परस्परात अङ्गाङ्गिभाव किंवा परस्पराकांक्षा नसते, पण जेव्हा त्या दोन्ही परिभाषा एखाद्या विधायक सूत्रात त्यांचे निमित्त विद्यमान असल्यामुळें एकत्र उपस्थित होतात तेव्हाच त्याच्यामध्यें विशेषणविशेष्यभाव होऊ शकतो, व त्या सूत्रावरील भाष्याच्या टीकेंत कैयटाने भाष्यकाराचा हाच आशय आहे असे म्हटले आहे. त्या टीकेंत कैयटाने 'परस्परानपेक्षयो स्वस्वनिमित्तप्रयुक्तसन्निधानयोर्द्वयो परिभाषयो प्रदर्शेपुस्वस्वकार्य-प्रतिपादनम् । तत्र यदि कथचिदेकविषये सन्निपातो भवति, तैतावता परस्परापेक्षा भवतीत्यर्थ ।' असे म्हटले असून, त्यावर उद्योतकारानी 'विशेषणविशेष्यभावमात्रेण शेषशेषिव्यवहारो न क्वापि दृष्टचर' असे म्हटले आहे म्हणून 'हलन्त्यम्' या सज्ञासूत्राचा अर्थ करतेवेळी जेव्हा त्या सूत्रातील 'हल्' या एकदेशाचे 'हश्च ल्' अशा रीतीने व्याख्यान केले जाते तेव्हा 'हश्' ही षष्ठी असून देखील तेथें 'षष्ठी स्थानेयोगा' ही परिभाषा उपस्थित होऊ शकत नाही, आणि त्यामुळे 'सामीप्य षष्ठ्यर्थ ' असे जे मनोरमेंतील शब्दग्रन्थात म्हटले आहे ते अयोग्य ठरत नाही असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा भावार्थ आहे मनोरमेंतील ज्या ग्रन्थाचे आतापर्यंत शब्दरत्नात विवरण केले आहे तो शकाग्रन्थ आहे हे लक्षात ठेवावे या ग्रन्थात केलेल्या शंकेचे निरसन करण्याकरिता दीक्षित मनोरमेंत पुढील पंक्ति लिहितात.

**मनोरमा– इति चेन्मैवम् आद्ये समासस्य क्लिष्टत्वात् । न हि 'ब्राह्मणकम्बल.' इत्यादौ ब्राह्मणसमीपवर्त्यन्यदीयः कम्बलः प्रतीयते ।**

न या चित्रगुशब्दाच्चित्रगवीणां सामीपवर्ती वृक्षादि प्रतीयते। अत एवानन्तरादिषु न समास, अनभिधानादिति स्पष्टमाकरे। किं बहुना 'ब्राह्मणस्य कम्बल' 'चित्रा गावोऽस्य' इति व्यस्तप्रयोगोऽपि तत्रानिष्टः।

वरील म्हणणे बरोबर नाही याचे कारण हे की, प्रथम पक्ष स्वीकारल्यास, म्हणजे 'हलन्त्यम्' या सूत्रातील 'हल्' या पदाचा 'हम्य ल्' असा विग्रह करून 'हस्य या षष्ठीचा सामीप्य असा अर्थ मानल्यास, समास विलष्ट होतो, म्हणजे त्या समासाने सामीप्यरूप अर्थाचा बोध होऊ शकत नाही व 'हकारस्य समीपवर्ती लकार' असे ज्ञान होऊ शकत नाही 'ब्राह्मणस्य कम्बल' इत्यादि स्थली ब्राम्हणाच्या समीप असलेले घोगडे असा अर्थ मुळीच ज्ञात होत नाही (उलट त्या वाक्यावरून ब्राह्मणाचे घोगडे असाच अर्थ ज्ञात होतो, म्हणजे 'ब्राह्मणस्य कम्बल' या वाक्याने सामीप्यरूप सबध बोधित होत नसून स्वस्वामिभावसबधच प्रतीत होतो) त्याचप्रमाणे 'चित्रगु' या शब्दाने ज्या वृक्षादिकाजवळ रंगी बेरंगी गायी उभ्या आहेत अशा वृक्षादिकाचा बोध होत नाही ('चित्रा गावो यस्य स चित्रगु' या अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहिसमासातील लौकिक विग्रहवाक्यात असणाऱ्या 'यस्य' या षष्ठ्यन्त पदाने 'यस्य वृक्षादे समीपवर्तिन्य चित्रा गाव' असा मुळीच बोध होत नसून, 'यस्य पुरुषस्य चित्रा गाव' असाच बोध होतो सारांश वरील दोन्ही उदाहरणात सामीप्यरूप सबधाची प्रतीति न होता स्वस्वामिभावसबधाचीच प्रतीति होते) षष्ठीचा अर्थ आनन्तर्य, सामीप्य इत्यादि नसल्यामूळेच, 'अनन्तर' इत्यादि अर्थामध्ये षष्ठीतत्पुरुष होत नाही, कारण तशा अर्थामध्ये केलेला षष्ठीतत्पुरुषसमासाचा प्रयोग भाष्यंत कोठेहि आढळत नाही असे भाष्यात स्पष्टपणे सांगितले आहे ('षष्ठी स्थानेयोगा' १–१–४९ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात–'शब्दस्यापि शब्देनानन्तरादयोऽभिसम्बन्धा। अस्तेर्भूर्भवतीति सन्देह स्थानेऽन्तरे समीप इति। सन्देहमात्रमेतद्भवति, सर्वसन्देहेषु चेदमुपतिष्ठते व्याख्यानतो

विशेषप्रतिपत्तिर्न हि सन्देहादलक्षणमिति । स्थान इति व्याख्यास्याम' । या भाष्याचा भावार्थ हा आहे कीं, एका शब्दाचा दुसऱ्या शब्दाशी स्थान्यादेशसंबंध होणेंच संभवत असें नसून, आनन्तर्य इत्यादि प्रकारचे संबंध संभवतात. उदाहरणार्थ 'अस्तेर्भूः' या स्थली 'अस्' धातूचे ठिकाणी 'भू' हा आदेश होतो किंवा तो 'अस्' धातूचे अनन्तर-संयुक्त-होतो किंवा 'अस' धातूच्या जवळ तो होतो असा संदेह उत्पन्न होतोच पण अशा प्रकारचा संशय केवळ नाममात्र-निरर्थक-आहे सर्व ठिकाणी संदेह उत्पन्न झाल्यास, 'व्याख्यानतो विशेष प्रतिपत्ति' प १ ही परिभाषा लगेच मनात येते आणि त्या संदेहाचें निराकरण करण्याकरिता आम्ही 'अस्' धातूचे जागी 'भू' हा आदेश होतो असे व्याख्यान करू सारांश या भाष्यावरून हे स्पष्ट होते की आनन्तर्य, सामीप्य इत्यादि षष्ठीचे अर्थ नव्हत व त्यामुळें तशा अर्थामध्यें षष्ठीतत्पुरुष समास होऊ शकत नाही ); एवढेंच नव्हें तर, 'ब्राह्मणस्य कम्बल' किंवा 'चित्रा गावोऽस्य' अशा असमस्त वाक्याचा देखील आनन्तर्य इत्यादि संबंध द्योतित करण्याकरिता प्रयोग करणें अयोग्य आहे (कारण आनन्तर्य, सामीप्य इत्यादि षष्ठीचे अर्थ नसल्यामुळें, तशा वाक्याचा प्रयोग केला असता आनन्तर्य सामीप्य इत्यादि संबंधाची प्रतीति होऊ शकत नाही )

शब्दरत्न- क्लिष्टत्वादिति । 'ब्राह्मणस्य कम्बल' इत्यादावसत्यपि प्रकरणादौ स्वस्वामिभावादिप्रतीतिवदनन्तरसमीपादिशब्दप्रयोगमन्तरेण सामीप्याद्यप्रतीतेः तस्य षष्ठ्यर्थत्वाभावात्, तत्प्रयोगे त्वसामर्थ्यात् षष्ठीसमासाप्राप्तिरिति मध्यमपदलोपिसमासे, सौत्रे वा तत्र समासस्य क्लिष्टत्वमिति भाव । तदेतदाह— नहीत्यादिना तत्रानिष्ट इत्यन्तेन । चित्र गवीणमिति । "कुमति च" इति णत्वम् । दन्त्यपाठस्तु लेखकप्रमादात् । एवं स्त्रीगवीणामित्येतस्यैव प्रकरणान्तस्य कैयटप्रयोगेऽपि बोध्यम् । 'अस्तेरनन्तरे समीपे वा'

इत्यादिभाष्य त्वनन्तरादिपदाध्याहारेण तन्निरूपितसबन्धार्थिका, स्थानपदाध्याहारेण तन्निरूपितसबन्धार्थिका वा षष्ठीत्यभिप्रायकम् । अत एव मनुप्सूत्रे कैयटेन 'गावोऽस्य सन्त्यनन्तरा' इत्यर्थे मतुप्प्राड्कापरभाष्यव्याख्यावसरे आनन्तर्यमस्त्यर्थवत्प्रकृत्यर्थोपाधिरित्युक्तम्, नतु तस्य षष्ठ्यर्थत्वेन प्रत्ययार्थत्वमुक्तम् । भाष्यकृता चासामर्थ्यात्तत्र वृत्त्यभाव उक्त । षष्ठ्यर्थत्वे तु प्रत्ययार्थत्वात्क्वासामर्थ्यम् ।

'समासस्य क्लिष्टत्वात्' असे जें मनोरमेंत म्हटल आहे त्याचे कारण हें की, 'ब्राह्मणस्य कम्बल' इत्यादि स्थली प्रकरणादिक काही नसून देखील तसें वाक्य उच्चारताक्षणीच जसा स्वस्वामिभावसबधाचा बोध होतो तसा 'अनन्तर, समीप' इत्यादि शब्दाचा प्रयोग केल्याशिवाय आनन्तर्य, सामीप्य इत्यादि अर्थांचा बोध होत नाही, कारण आनन्तर्य, सामीप्य इत्यादि षष्ठींचे अर्थ नव्हत, व 'ब्राह्मणस्य अनन्तर कम्बल' अशा प्रकारे विग्रहवाक्यात 'अनन्तर' इत्यादि शब्दाचा उपयोग करून 'ब्राह्मणकम्बल' असा षष्ठीतत्पुरुष समास तशा अर्थामध्यें, सामर्थ्याच्या अभावामुळें, म्हणजे तसा अर्थ द्योतित करण्याचे षष्ठीत सामर्थ्य नसल्यामुळें, होऊ शकत नाही म्हणून अशा ठिकाणीं मध्यमपदलोपीसमास करणे किंवा 'हलन्त्यम्' या सूत्रात 'हस्य समीपवर्ति ल्' असा मध्यमपदलोपीसमास करणें देखील षष्ठीसमासासारखेंच क्लिष्ट आहे आणि हे स्पष्ट करण्याकरिताच दीक्षितानी मनोरमेंत 'न हि ब्राह्मणस्य कम्बल इत्यादौ...व्यस्तप्रयोगोऽपि तत्रानिष्ट' असें म्हटलें आहे (कारण तसा मध्यमपदलोपीसमास करून देखील आनन्तर्य, सामीप्य इत्यादि सबधाचा सामासिक शब्दातून बोध होणें अशक्यप्राय आहे ) मनोरमेंत 'चित्रगवीणाम्' असा जो प्रयोग केला आहे त्यात 'कुमति च' सू १०५६ या सूत्राने णत्व झाले आहे मनोरमेच्या काही प्रतीत

'चित्रगवीनाम्' असा जो दन्त्यनकारयुक्त पाठ आढळतो तो लेखकाच्या प्रमादामुळें झाला असून अशुद्ध आहे असे समजावे त्याचप्रमाण एकशेष प्रकरणातील ('त्यदादीनि सर्वैर्नित्यम्' १–२–७२ या सूत्रावरील भाष्याच्या), कैयटवृत्तीत 'ततश्चात्र गोगद्ध स्त्रीगवीणा वाचक' असा जो पाठ आढळतो त्या पाठातील 'स्त्रीगवीणाम्' या स्थली देखील 'कुमति च' या सूत्रानें णत्व झाले आहे असे समजावे (आता शब्दाकार अशी शंका करितो की, षष्ठीचा अर्थ सामीप्य आहे हे मानण्यास 'षष्ठी स्थानेयोगा' १–१–४९ या सूत्रावरील भाष्य प्रमाण आहे आणि म्हणून 'हस्य समीपवर्ति ल्' असा 'हल्' या पदाचा षष्ठीतत्पुरुषसमास चूक ठरत नाही या शंकेवर शद्बरत्नकार असे उत्तर देतात की,) त्या भाष्यात 'अग्नेरनन्तरे समीपे वा' इत्यादि जें भाष्यकारानी म्हटले आहे तें, 'अग्नेर्भू' या सूत्रातील 'अस्ते' या षष्ठीपुढें 'समीपे, अनन्तरे' या पदाचा अध्याहार करून त्या पदानी बोधित होणाऱ्या सवर्णाचो वाचक 'अग्ने' ही षष्ठी आहे काय किंवा 'अस्ते' या षष्ठीपुढें 'स्थाने' या पदाचा अध्याहारकरून त्या पदाने बाधित होणाऱ्या स्थान्यादशसवर्णाची वाचक 'अस्ते' ही षष्ठी आहे काय, या आशयाने म्हटले आहे (त भाष्य मनोरमेंत दिलेच आहे त्या भाष्यात भाष्यकारानी जो संशय उपस्थित केला आहे तो 'अनन्तरे, समीपे, स्थाने' या पदाचा अध्याहार करूनच उपस्थित केला आहे. त्या भाष्यात त्यानी असें मुळीच म्हटले नाही की, षष्ठीचा अर्थ आनन्तर्य, सामीप्य किंवा स्थान आहे तसा षष्ठीचा अर्थ असता तर त्या शद्बाचा अध्याहार करण्याची काहीच गरज नव्हती म्हणून षष्ठीचा अर्थ सामीप्य आहे हे मानण्यास वरील भाष्य प्रमाण ठरत नाही व त्यामुळें 'हस्य ल्' याचा 'हसमीपवर्वी लकार.' असा अर्थ मुळीच करता येत नाही असा शद्बरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.) आनन्तर्य, सामीप्य

इत्यादि षष्ठीचा अर्थ नसल्यामुळेच, 'गावोऽस्य सन्ति अनन्तरा', या अर्थामध्यें 'गो' शब्दाहून मतुप् प्रत्यय का होऊ नये अशी 'तदस्यास्त्यस्मिन्निति मतुप्' ५-२-९४ या मतुप्विधायक सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी जी शंका उपस्थित केली आहे त्या शंकापर भाष्याचे विवरण करिताना कैयटानें असं म्हटले आहे की, ज्याप्रमाणे 'गाव अस्य सन्ति' या स्थली 'अस्ति' या पदाचा विद्यमानतारूप अर्थ प्रकृतीचे, म्हणजे ज्या 'गो' शब्दाहून मतुप् प्रत्यय करणे आहे त्या 'गो' प्रकृतीचे, विशेषण होतो त्याचप्रमाणे 'गाव अस्य सन्ति अनन्तरा' या स्थली देखील आनन्तर्यरूप अर्थ 'गो' या प्रकृतीचे विशेषण मानता येतो पण आनन्तर्य हा षष्ठीच्या प्रत्ययाचा अर्थ आहे व त्यामुळें आनन्तर्य या अर्थामध्यें मतुप्प्रत्यय होतो असे कैयटाने मुळीच म्हटले नाही आणि भाष्यकारानी असें म्हटले आहे की, 'गावा अस्य सन्ति अनन्तरा' या अर्थामध्यें 'गो' शब्दाहून, असामर्थ्यामुळें, तद्धित मतुप्प्रत्यय होऊ शकत नाही. जर षष्ठीचा अर्थ अनन्तर, समीप इत्यादि असता तर, मतुप् प्रत्ययाने तो अर्थ बोधित होऊ शकलाच असता, व षष्ठीचे ठिकाणी तसा अर्थ बोधित करण्याचे सामर्थ्य नाही (व त्यामुळें त्या अर्थामध्यें मतुप् प्रत्यय होऊ शकत नाही) असे कसे म्हणता आले असते? मतुब्विधायक सूत्रावरील भाष्यात ५-२-९४ भाष्यकार म्हणतात— 'अथ क्रियमाणेऽप्यस्तिग्रहणे इह कस्मान्न भवति गावोऽस्य सन्त्यनन्तरा, गावोऽस्य सन्ति समीप इति ?॥ असामर्थ्यात् । कथमसामर्थ्यम् ? । सापेक्षमसमर्थवद्भवतीति ।' या भाष्यावरील टीकेंत कैयटाने 'असामर्थ्यादिति' हे प्रतीक घेऊन असे म्हटले आहे की, 'इह तु म प्रकृत्यर्थोपाधि प्रत्ययान्तेनान्तर्भावयितु शक्यस्तदुपाधेरेव प्रत्ययेन माध्यम् । न च गोमानित्येतत् प्रकृत्यर्थ-स्यानन्तर्यं गमयितु शक्नोतीति तदभिधानाय वाक्यमेव प्रयुज्यते। स्वस्वामिभावस्तु स्वत्तयैवान्तर्भावित इति तत्प्रतीतिर्भवत्येव।'

'तदस्यास्त्यस्मिन्निति मतुप' सू १८९४ या सूत्राने अस्तिसमानाधिकरणप्रथमान्ताहून 'अस्य' किंवा 'अस्मिन्' या अर्थामध्यें मतुपप्रत्यय होणे सांगितले आहे. येथें असा प्रश्न उपस्थित होतो की, 'अस्य' ही स्वस्वामिभावसंबधबोधिकाच षष्ठी मानावी किंवा अनन्तरादिसंबधबोधिका देखील षष्ठी मानावी? कैयटाचें असे म्हणणे आहे की, 'अस्य' या षष्ठीनें जसा स्वस्वामिभावसंबध ज्ञात होतो तसा, अनन्तर, समीप इत्यादि शब्दाचा उपयोग केल्याशिवाय, त्या षष्ठीने सामीप्यादिसंबधाचा बोध होऊ शकत नाही, कारण आनन्तर्य किंवा सामीप्य हा षष्ठीचा अर्थ नव्हे म्हणून तशा अर्थामध्यें मतुपप्रत्यय होऊ शकत नाही आणि म्हणूनच त्या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारांनी असे म्हटले आहे की, 'अथाऽस्तिग्रहण किमर्थम्?। सत्तायामर्थे प्रत्ययो यथा स्यात। नैतदस्ति प्रयोजन, न सत्ता पदार्थो व्यभिचरति। .....इद तर्हि प्रयोजनमस्तियुक्ताद्यथा स्यादनन्तरादियुक्तान्मा भूदिति, गावोऽस्यानन्तरा, गावोऽस्य समीप इति'।

शब्दरत्न– तस्माद्यत्र षष्ठ्यन्तमात्रप्रयोगे आनन्तर्यादिप्रतीतिस्तत्रानन्तरादिपदाध्याहार एव बोध्य । तत्रास्तिग्रहणाभावे तस्यान्यफलकत्वे वा सूत्रानुपात्तास्त्यर्थान्तर्भावेण मत्वर्थीयवद्बहुव्रीहिवच्च तथाभूतानन्तर्याद्यर्थान्तर्भावेण 'चित्रा गावोऽस्य सन्त्यनन्तरा' इत्याद्यर्थे बहुव्रीहिमत्वर्थीयौ न भवतोऽनभिधानादिति मतुप्सूत्रे भाष्ये स्पष्टम्। अनन्तरादेरिदमर्थत्वे "तस्येदम्" इति शैषिकोऽप्यनभिधानान्नेति "तस्येदम्" इत्यत्र भाष्ये। तदुक्तम्—अनन्तरादिषु न समासोऽनभिधानादिति स्पष्टमाकर इति। तत्र समासग्रहण तद्धितवृत्तेरप्युपलक्षणम्।

म्हणून जेथें केवळ षठ्यन्तपदाचा प्रयोग केल्यानें आनन्तर्य इत्यादि अर्थांची प्रतीति होते तशा ठिकाणी देखील, अनन्तर इत्यादि पदाचा अध्याहार मानणेच योग्य आहे असे समजावे (जसें 'गुरुपुत्रो देवदत्तस्य किञ्चित्' या स्थली 'अनन्तर' हे पद वाक्यान

घातले नसून देखील जो आनन्तर्यनिरूपितसंबंधाचा, म्हणजे 'गुरुपुत्र, देवदत्तस्य किञ्चिदनन्तरः' असा, बोध होतो तो 'अनन्तर' या पदाचा अध्याहार केल्यानेच होतो ) 'तदस्यास्ति' सू ५–२–९४ या मतुप्सूत्रावरील भाष्यावरून हे स्पष्ट होतें की, जरी त्या सूत्रात 'अस्ति' या पदाचें ग्रहण नसलें किंवा तें पद इतर प्रयोजनाकरिता, म्हणजे 'अस्ति' या धनवाचकतिङन्तप्रतिरूपक अव्ययाहून मतुप् प्रत्यय घडला नसल्यामुळें त्याहून देखील मतुप् प्रत्यय व्हावा व 'अस्तिमान्' असें मतुपप्रत्ययान्त रूप व्हावें या प्रयोजनाकरिता, घातलें असलें तरी देखील, त्या 'अस्ति' शब्दाच्या अर्थाचा ('न सत्ता पदार्थो व्यभिचरति' या न्यायान्वयें) प्रकृतीच्या अर्थामध्यें अन्तर्भाव होत असल्यामुळें, त्या अर्थाला धरून जसा बहुव्रीहिसमास, म्हणजे 'चित्रा गावो यस्य स चित्रगु' असा बहुव्रीहिसमास, किंवा 'गाव सन्ति अस्य स गोमान्' असा 'गो' शब्दाहून मतुप् प्रत्यय होतो तसा त्या सूत्रात न घातलेल्या 'अनन्तर' इत्यादि शब्दाच्या अर्थाचा अन्तर्भाव करून 'चित्रा गावोऽस्य सन्त्यनन्तरा' असा आनन्तर्य इत्यादि अर्थांमध्यें बहुव्रीहिसमास किंवा मतुप प्रत्यय होऊं शकत नाहीं, कारण (तसा अर्थाचा बोध करण्याचें सामर्थ्य बहुव्रीहीत किंवा मतुप् प्रत्ययांत नाहीं व) तसा अर्थामध्यें केलेल्या बहुव्रीहीचा किंवा मतुप् प्रत्ययान्ताचा प्रयोग आपॅन कोठेंहि आढळत नाहीं (या विषयासंबंधाचें मतुप्विधायक सूत्रावरील भाष्य पूर्वी दिलेंच आहे 'अनन्तर' इत्यादि अर्थांमध्यें बहुव्रीहिसमास किंवा मतुप् प्रत्यय का होऊं शकत नाहीं याचीं दोन कारणें त्या भाष्यात भाष्यकारानी दिलीं आहेत प्रथम कारण 'असामर्थ्यात्' हें असून, द्वितीय कारण 'अनभिधानात्' हें आहे व भाष्यकारानीं प्रथम कारणाचें व्याख्यान करिताना 'सापेक्षमसमर्थवद्भवति' असं म्हटलें आहे त्याचा अर्थ हा आहे की, बहुव्रीहिसमासात किंवा मतुप् प्रत्यय करते वेळीं 'अनन्तर, समीप' इत्यादि शब्दाचा उपयोग केल्याशिवाय तसा बहुव्रीहिसमासात

किंवा मतुपप्रत्ययान्तात सामीप्य इत्यादि अर्थाचा बोध करून देण्याचे सामर्थ्य नसल्यामुळें, म्हणजे तशा अर्थाचा बोध करून देण्याकरिता त्याना 'अनन्तर, समीप' इत्यादि शब्दाची अपेक्षा असल्यामुळें, तशा अर्थामध्यें बहुव्रीहिसमास किंवा मतुप प्रत्यय होऊ शकत नाही 'अनभिधानात' या द्वितीय हेतूचा अर्थ हा आहे की, भाषेत सामीप्य इत्यादि अर्थामध्यें केलेला बहुव्रीहीचा किंवा मतुप प्रत्ययान्ताचा प्रयोग कोठेंहि आढळत नाही ) 'तस्येदम' सू ४–३–१२० या सूत्रावरील भाष्यात असे म्हटले आहे की, 'तस्येदम्' सू १५०० या सूत्रातील 'इदम्' या पदाचा 'अनन्तर,' म्हणजे 'तस्येदमनन्तरम्' इत्यादि अर्थ केल्याने तशा अर्थामध्यें, त्या सूत्रान्वयें होणारा शैषिक प्रत्यय होऊ शकत नाही, कारण (तसा अर्थ द्योतित करण्याचे सामर्थ्य त्या प्रत्ययात नाही व) तशा अर्थामध्ये केलेला प्रयोग भाषेत कोठेहि आढळत नाही (त्या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात– 'तस्येदमित्यसन्निहितेऽप्राप्ति । किं कारणम ? । इदम प्रत्यक्षवाचित्वात । इदमित्येतत्प्रत्यक्षे वर्तते । तेनेहैव स्यात्–तस्येदमिति । तस्याऽद इति, तस्य तदित्यत्र न स्यात् । सिद्ध तु यद्योगा षष्ठी तत्र । सिद्धमेतत् । कथम ? । यद्योगा षष्ठी वर्तते तत्रेति वक्तव्यम । अनन्तरादिषु च प्रतिषेध । अनन्तरादिषु च प्रतिषेधो वक्तव्य ।' पुढें भाष्यकारानी 'अनन्तरादिषु च प्रतिषेध' या वार्तिकाचे प्रत्याख्यान केले आहे, व प्रत्याख्यान करिताना असे म्हटले आहे की, 'यदप्युच्यते–अनन्तरादिषु च प्रतिषेधो वक्तव्य इति । न वक्तव्य – अनभिधानादनन्तरादिषूत्पत्तिर्न भविष्यति ।' 'इदम्' हा शब्द प्रत्यक्षाचा वाचक असल्यामुळें, 'तस्य तत्' इत्यादि अर्थामध्यें शैषिक प्रत्यय न होण्याची जी आपत्ति येत होती ती टाळण्याकरिता, 'सिद्ध तु यद्योगा षष्ठी तत्र' हे वार्तिक वार्तिककाराने पठित केले. परंतु त्या वार्तिकान्वयें, 'तस्य अनन्तर' इत्यादि अर्थामध्ये शैषिक प्रत्यय होण्याची आपत्ति येत होती ती टाळण्याकरिता, वार्तिककाराने 'अनन्तरादिषु च प्रतिषेध' हे द्वितीय वार्तिक पठित केले परंतु

माप्यकार म्हणतात की, अस द्वितीय वार्तिक पठित करण्याची काही गरज नाही, कारण 'अनन्तर' इत्यादि अर्थ द्योतित करण्यास सामर्थ्य षष्ठीत व षष्ठ्यन्तातून होणाऱ्या शैषिक तद्धित प्रत्ययात नाही, व तशा अर्थामध्ये झालेल्या शैषिक प्रत्ययाच कोणतहि उदाहरण भाषेत आढळत नाही ) या वर मागितलेल्या सर्व गोष्टी मनात धरून, 'अनन्तरादिषु न समास अनभिधानादिति स्पष्टमास्र' अस दीक्षितानी मनोरमेत म्हटले आहे या मनोरमेतील पक्तीत 'समास' असा जा शब्द वापरला आहे त्यात तद्धितवृत्तीचा देखील समावश होतो म्हणजे 'अनन्तर, समीप' इत्यादि अर्थामध्ये जसा समास होत नाही तसा तद्धितप्रत्यय देखील होत नाही

शब्दरत्न– अनन्तरादिरार्थे षष्ठीतत्पुरुषादिस्तु भवत्येव । 'ग्रामकूप' 'गङ्गातीरम्' इत्यादौ समीप एवावयवत्वारोपेण समास । स्पष्टा चेय रीति "सपर्यन्तस्य" इति सूत्रे कैयटे । किं च हृस्य लिख्यर्थे "हल विलेखने" इति धातोर्लत्वापत्ति । न च फलाभाव? 'देवदत्त हल्' इत्यादौ डित्त्वसामर्थ्यादभस्यापि टेर्लोपवल्लित्वसामर्थ्यात्प्रत्ययात्पूर्वत्वाभावेऽपि लित्स्वरस्यैव फलत्वस्य वक्तु शक्यत्वादित्यपि बोध्यम् । यद्यपि "हल्सीरात्" इति निर्देशेन तस्य नेत्वमिति कल्पयितु शक्यम् । तथापि ज्ञापकस्वीकारापेक्षया सूत्रावृत्तिरेव लघीयसीति दिक् ।

'अनन्तर' इत्यादि शब्दाशी षष्ठीतत्पुरुष इत्यादि समास होतातच (जसे 'तस्य अनन्तर तदनन्तर' इत्यादि, कारण वृत्ति न होण्याकरिता जे असामर्थ्य पाहिजे ते अशा स्थळी नसून, दोन पदात परस्परान्वित होण्याच सामर्थ्य आह) 'ग्रामकूप, गङ्गातीरम्' इत्यादि स्थळी सामीप्याच ठिकाणी अवयवत्वाचा आरोप करून (व षष्ठी समासातील षष्ठ्यन्त पद अवयवषष्ठी मानून) षष्ठीतत्पुरुषसमास होतो 'सपर्यन्तस्य' ७-२-९१ या सूत्रावरील भाष्याच्या कैयट टीकेवरून वर सागितल्याप्रमाणे अवयवत्वाचा आरोप करून वर दिलेल्या उदाहरणात समास करता येतो हे स्पष्ट होत (कैयटाने त्या

टीकेत असे म्हटले आहे की 'सर्वत्रैवाऽन्तशब्दोऽवयववाची, कस्य चिन्मुख्यमव यवत्व कस्य चित्सामीप्यादुपचरितमित्यभिप्रायेणेद भाष्यम् ।') दुसरे असे की, (आनन्तर्यं सामीप्य इत्यादि षष्ठीचा अर्थ मानला व 'हल्' याचा 'हस्य समीपवर्ती लकार इत्संज्ञक स्यात्' असा अर्थ केला तर) 'हल विलेखने' या भ्वादिगणातील धातूमध्यें 'ह' च्या समीप लकार असल्यामुळें, त्याला इत्संज्ञा (होऊन 'तस्य लोप' सू ६२ या सूत्राने त्या लकाराचा लोप) होण्याची आपत्ति येईल येथें लोपव्यतिरिक्त दुसरें काही फल नाही असे समजू नये ज्याप्रमाणे भसंज्ञक अङ्गापुढें डित् प्रत्यय आल्यास त्या अङ्गाच्या 'टि' चा लोप होतो हे सागणाऱ्या 'टे' सू ३१६ या सूत्रान्वयें, भसंज्ञक अङ्ग नसून देखील त्यापुढें डित् प्रत्यय आला असता 'डित्वसामर्थ्यादभस्यापि टेर्लोप' या वचनान्वयें तशा अङ्गाच्याहि 'टि' चा लोप डित्वसामर्थ्यामुळे होतो, म्हणजे 'भू + इ + तास + डा = भवितास् + डा' येथें डा हा डित् प्रत्यय पुढें आल्यामुळें, 'भवितास्' हें अङ्ग भसंज्ञक नसून देखील, त्याच्या 'आस' या 'टि' चा लोप होतो, त्याचप्रमाणे (लित्प्रत्यय पुढें आला असता तशा प्रत्ययाच्या *ल्गेंच पूर्वी असलेला अच् उदात्त होतो हें सागणाऱ्या 'लिति' सू* ३६७६ या सूत्रान्वयें) प्रत्ययभिन्न लित पुढें आल्यास देखील त्याच्या ल्गेंच पूर्वी असणारा अच लित्सामर्थ्यामुळें उदात्त होतो असें देखील म्हणता येण शक्य आहे व असें मानल्यास 'देवदत्त हल' म्हणजे 'हे देवदत्त हल् अस्ति' या उदाहरणातील 'हल्' या (क्विबन्त प्रथमान्त) पदातील स्वार वर सागितल्याप्रमाणे, इत् मानला असता, त्या ल्काराच्या ल्गेंच पूर्वी असणारा अकार उदात्त होईल जरी 'हल्सीरात् ठक' सू १६३३ या सूत्रामध्यें 'हल' अशा शब्दाचा निर्देश केला असल्यामुळें ह ज्ञापित होते की, 'हल' धातूतील ल्कार इत् नाही अस म्हणता येऊ शकत तरी 'हल' धातूतील ल्काराला जी इत्संज्ञा होण्याची आपत्ति येते ती आपत्ति टाळण्याकरिता,

'हल्मीरात्' या सूत्रातील शब्दाचा आधार घेऊन असा तर्क सम्भव करण्यापेक्षा, 'हल्न्यम्' या संपूर्ण सूत्राचा द्विरावृत्ति करून त्या सूत्राचा कौमुदीत जसा अर्थ केला आहे तसा करण्यातच अधिक लाघव आहे (कारण संपूर्ण 'हल्न्यम्' या सूत्राचा द्विरावृत्ति करण्यापेक्षा त्या सूत्रातील 'हल्' या एकदेशाचा द्विरावृत्ति करण्यात लाघव आहे असे मानून प्रसादकारादिकांना जो प्रकृत सूत्राचा अर्थ करण्याचा यत्न केला आहे त्यात वर भाष्यिकान्याप्रमाणे अनेक दोष उद्भवत असल्यामुळे, तसे करण्यापेक्षा संपूर्ण सूत्राचा द्विरावृत्ति करून सूत्रार्थ केल्यास कोणताहि दोष येत नसल्यामुळे, तसेच करण्यात अधिक लाघव आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे )

मनोरमा– द्वितीयेऽपि सयोगान्तलोपो दुर्लभ, यण प्रतिषेधारम्भात्, तत्प्रत्याख्यानपक्षेऽपि "झलो झलि" इत्यतो झल्ग्रहणमपकृष्य सयोगान्तस्य झलो लोपविधानाच्च । किं च पदार्थबोध विना वाक्यार्थबोधासम्भवेन हल्प्रत्याहारसिद्धे प्राक्तत्सूत्रार्थावबोध प्रसक्ते तदुद्धारार्थोऽयं यत्न । अस्यां चावस्थायां हल्शब्दार्थाप्रसिद्धौ द्वन्द्व एव दुर्लभ , सहविवक्षाया असम्भवात । तस्माद्यथोक्तमेव न्याय्यम् ॥

द्वितीय पक्ष स्वीकारल्यास दवाल्, म्हणजे 'हल् च ल च' असा समाहारद्वन्द्व करून 'हल्ल' असे जे पद होते त्यातील अन्त्य लकाराचा 'सयोगान्तस्य लोप' सू ५४ या सूत्राने जो लोप केला आहे तो पण स्वीकारल्यास देखील, सयोगान्त लकाराचा लोप होणे अशक्य आहे, कारण 'सयोगान्तस्य लोप' या सूत्रावर 'यण प्रतिषेधो वाच्य' हे वार्तिक आरंभिले असल्यामुळे, त्या वार्तिकारंभपक्षात 'हल्ल' यातील सयोगान्त लकार या यणचा लोप होऊ शकत नाही वार्तिक प्रत्याख्यानपक्षात देखील (भाष्यकारांना) 'झलो झलि' या उत्तर सूत्रातून 'सयोगान्तस्य लोप' या पूर्व सूत्रात 'झल' या पदाचे अपकर्षण करून सयोगान्त झलाचा लोप होतो असे विधान केले

असल्यामुळें व 'हल्ल्' यातील अन्त्य लकार झल् नसल्यामुळें, त्याचा लोप होऊ शकत नाही ('संयोगान्तस्य लोप' ८–२–२३ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारांनी 'संयोगान्तस्य लोपे यण प्रतिषेध' हें वार्तिक प्रथम पठित करून, पुढें त्या वार्तिकाचे प्रत्याख्यान करिताना 'न वा, झलो लोपात्।' हे द्वितीय वार्तिक पठित केले आहे व असे म्हटले आहे की, 'न वा वक्तव्यम्। किं कारणम्? । झलो लोपात्। झलो लोप संयोगान्तलोपो वक्तव्य ।' साराश वार्तिकारमपक्ष मानला तर, लकार यण् असल्यामुळें त्याचा लोप होऊ शकत नाही. वार्तिकप्रत्याख्यानपक्ष मानला तरी, लकार झल् नसल्यामुळें त्याचा लोप होऊ शकत नाही एकदरीत दोन्ही पक्षात लकाराचा लोप होणे अशक्य आहे म्हणून 'हल् च ल् च' असा समाहारद्वन्द्व करून व त्याचा 'व्यञ्जनमिन् अन्त्यलकारश्च इत्' असा अर्थ सिद्ध करण्याकरिता 'हल्ल्' असे पद सिद्ध करून त्यातील अन्त्य लकाराचा 'संयोगान्तस्य लोप' या सूत्राने लोप होऊ शकत नसल्यामुळें, 'हल्' या अन्तिम शिवसूत्रातील अन्त्य लकाराला इत्संज्ञा प्राप्त करून देण्याची जी अशा तऱ्हेची खटपट केली आहे ती, वर सांगितल्याप्रमाणे दोषयुक्त असल्यामुळें त्याज्य आहे, आणि त्यामुळें द्वितीय द्वन्द्व पक्ष देखील स्वीकारता येत नाही असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे ) दुसरे असे की, वाक्यातील प्रत्येक पदाच्या अर्थाचा बोध झाल्याशिवाय संपूर्ण वाक्याच्या अर्थाचा बोध होणे असंभवनीय असल्यामुळें, जोपर्यंत हल्प्रत्याहार सिद्ध होत नाही (व 'हल्' या पदाचा 'व्यञ्जन' असा अर्थ आहे हे ज्ञान होत नाही) तोपर्यंत 'हलन्त्यम्' या संपूर्ण सूत्राच्या अर्थाचा बोध होणे अशक्य आहे अशी जी आपत्ति येते ती टाळण्याकरिताच 'हल् च ल् च' असा समाहारद्वन्द्व करण्याचा प्रयत्न केला आहे. पण असा द्वन्द्वसमास करतेवेळी त्या समासातील 'हल्' या पदाचा अर्थ अप्रसिद्ध–अज्ञात–असल्यामुळें, अशा ठिकाणी द्वन्द्वसमास होऊच शकत नाही, कारण येथें अशा स्थितीत सहविवक्षा असणे असंभवनीय

आहे, म्हणजे जेथें द्वन्द्वसमास करतेवेळी त्या समासातील प्रत्येक पदाच्या अर्थाचा बोध झालेला नाही तशा ठिकाणी सहविवक्षा संभवतच नाही (व अशा रीतीने येथें सहविवक्षेचा अभाव असल्यामुळे द्वन्द्वसमास होऊच शकत नाही या विषयाचें विस्तृत विवरण शब्दरत्नात केलें गेलें) म्हणून ('हल्' या एकदेशाचा 'हल् च ल् च' असा द्वन्द्वसमास करण्यापेक्षा) 'हलन्त्यम्' या संपूर्ण सूत्राची द्विरावृत्ति करून जसा त्या सूत्राचा कौमुदीत अर्थ केला आहे तसाच तऱ्हेने त्या सूत्राचा अर्थ करणे न्याय्य–योग्य–आहे

शब्दरत्न– झलो लोपेति । सौत्रलोपाश्रयणे तु मूलोक्तमेव लघु । असम्भवादिति । नच "आद्यन्तौ टकितौ इत्यादौ यथासङ्ख्यमन्वयेऽपि प्रथमतः साहित्यावच्छिन्ने साहित्यावच्छिन्नान्वयमानेन सहविवक्षामाश्रित्य यथा द्वन्द्वसाधुत्वं तथेहापि प्रथमतः तत्कारे हल्पदवाच्यत्वेन्" इति सामान्यतो बोधं कल्पितमादाय द्वन्द्वसाधुत्वम्, ततो विशेषजिज्ञासायाम् "आदिरन्त्येन" इत्येकवाक्यतया विशेषतो वाक्यार्थो लक्ष्यसंस्कारकः । किं च, सहविवक्षा = सहवक्तुं वक्तुरिच्छा, सा च सूत्रप्रणयनानुपपत्त्या पाणिनेस्तत्‌ पूर्वमपि हल्पदार्थज्ञानादस्त्येव, बोद्धुबोधस्तु क्रमेणैवेति वाच्यम्, "आद्यन्तौ" इत्यादौ यथासङ्ख्यसूत्रारम्भसामर्थ्येन तथा-साधुत्वाङ्गीकारेऽप्यन्यप्रकारेण तस्य साधुत्वकल्पने मानाभावात् ।

('हल् च ल् च हल्ल्' असा द्वन्द्वसमास करून 'हल्ल्' असे जें सामासिक पद होतें त्यांतील अन्त्य लकार इत् नसल्यामुळें व 'संयोगान्तस्य झला लोप' असें भाष्यवचन असल्यामुळें त्याचा लोप न होण्याची जी आपत्ति येते ती टाळण्याकरिता त्या अन्त्य लकाराचा निपातनाने) सौत्रलोप झाला आहे असे मानण्यापेक्षा 'हलन्त्यम्' या संपूर्ण सूत्राची द्विरावृत्ति करून त्या सूत्राचा कौमुदीत जसा अर्थ केला आहे तसें करण्यानच लाघव आहे (व सौत्रलोप मानण्यात गौरवरूप दोष आहे आता मनोरमेत 'द्वन्द्व एव दुर्लभ सहविवक्षाया

असम्भवान् अस जें म्हटले आहे त्यावर शकाकार अशी शंका करतो की, 'ड सि घुट्, तस्च, सि तुट्' सू १३१–३३ इत्यादि सूत्रान्वयें लक्ष्याला टित किंवा कित् आगम करतेवेळीच) ज्याप्रमाणे 'आद्यन्तौ टकितौ' सू ३६ इत्यादि सौत्र वाक्यात यथासंख्य अन्वय केला जातो, म्हणजे 'टित आद्यवयवो भवति, कित् अन्तावयवो भवति' असा 'यथासंख्य मनुदेश समानाम्' सू १२८ या सूत्राच्या सहायाने लक्ष्याला संस्कार करतेवेळीच अनन्तरमें अन्वय केला जातो, तरी 'आद्यन्तौ टकितौ' या वाक्याचा प्रयोग करतेवेळी 'टकितौ' या समुदायाचा 'आद्यन्तौ,' या समुदायाशी अन्वय केल्यान (वक्त्याचे ठिकाणी असलेली) जी महविवक्षा ज्ञात होते तिचा आश्रय केल्याने त्या सूत्रातील दोन्ही द्वन्द्वसमास साधु ठरतात, त्याचप्रमाणे 'हल् च ल् च हल' या स्थली 'लकार इत्, हल्पदवाच्यश्च इत' असा जो प्रथम सामान्य बोध होतो त्याचा आश्रय केल्याने हा द्वन्द्वसमास देखील साधु मानता येतो त्यानतर (या द्वन्द्वसमासातील 'हल्' या पदाचा अर्थ काय आहे ही) विशेष जिज्ञासा उत्पन्न झाली असता ('अन्त्य ल् इत्' असा अर्थ केल्याने अन्तिम शिवसूत्रातील अन्त्य लकाराला इत्संज्ञा प्राप्त झाली असल्यामुळें) 'आदिरन्त्येन सहेता' या सूत्राच्या सहाय्याने (हल्प्रत्याहार सिद्ध होऊन 'हल्' या पदाचा अर्थ 'व्यञ्जन' आहे असा) विशेष बोध होतो व 'अन्त्य हल् इत्संज्ञक स्यात्' असा जो वाक्यार्थ निष्पन्न होतो तो लक्ष्याला संस्कार करण्याच्या उपयोगी पडतो, म्हणजे उपदेशविषयीभूत—ज्याचे पाणिनीय शास्त्रात आद्योच्चारण केले आहे असा—शब्दातील अन्त्य व्यञ्जन इत्संज्ञक असतें असा बोध होऊन त्या अन्त्य व्यञ्जनाचा 'तस्य लोपः' या सूत्राने लोप करण्यात वर सिद्ध झालेला वाक्यार्थ उपयोगी पडतो (शंकाकार म्हणतो की, लक्ष्याला संस्कार करतेवेळी 'आद्यन्तौ टकितौ' या सूत्रातील 'टकितौ' या संपूर्ण सामासिक पदाचा 'आद्यन्तौ' या संपूर्ण सामासिक शब्दाशी अन्वय होणे विवक्षित नाही [illegible] [illegible] अन्वय होणे विवक्षित

असते तर, त्या सूत्राचा असा विपरीत अर्थ मान्य असता की, 'टित्' व 'कित्' हे दोन्ही प्रकारचे आगम ज्यांना होतात त्याचे ते आद्यवयव व तसच अन्तावयव देखील होतात वास्तविक त्यसमस्कार —त्ययाला आगम—करतेवेळी 'टित्' चा 'आदि' या पदाशी व 'कित्' चा 'अन्त' या पदाशी अन्वय होणे विवक्षित आहे ग्रासाठ इतरेतरयोग-द्वन्द्व होण्यास जी साहित्याची अपेक्षा असते ती 'आद्यन्तौ' व 'टकितौ' या दोन्ही स्थली नसल्यामुळें, या दोन्ही ठिकाणी वास्तविक द्वन्द्वसमास न झाला पाहिजे तरी पण 'आद्यन्तौ टकितौ' या वाक्याचा प्रयोग केला असता, 'टकितौ' या पदाचा 'आद्यन्तौ' या पदाशी जो कल्पित अन्वय होतो त्या कल्पित अन्वयाचे आधारावर वक्त्याचे ठिकाणी महविवक्षा आहे असे मानल्यानें ज्याप्रमाणे हे वरील दोन्ही द्वन्द्वसमास साधु मानले जातात त्याचप्रमाणे, 'हल् च ल् च हल्' या द्वन्द्वसमासात देखील 'हल्' या संपूर्ण समुदायाचा 'इत्' या पदाशी जो कल्पित अन्वय होतो त्या कल्पित अन्वयाचे आधारावर वक्त्याचे ठिकाणी महविवक्षा आहे असे मानल्याने हा द्वन्द्वसमास देखील साधु मानता येतो ? पर की, असा द्वन्द्वसमास करतेवेळी जसा 'ल्' या पदाचा 'अन्तिम शिवसूत्रातील ल्कार' असा निश्चित अर्थ समास करणाऱ्याला ज्ञात आहे तसा त्याला 'हल्' या पदाचा निश्चित अर्थ ज्ञात नाही तरीपण त्या पदाचा काहीतरी अर्थ असलाच पाहिजे असे त्याला सामान्य ज्ञान आहेच, व 'पाठक्रमादर्थक्रमो बलीयान्' या न्यायान्वये 'ल' या पदाचा 'इत्' शी प्रथम अन्वय केल्यान ल्कार इत्संज्ञक ठरत असल्यामुळे, 'आदिरन्त्येन सहेता' या सूत्राच्या सहायाने हल्प्रत्याहार सिद्ध केला असता, 'हल्' या पदाचा 'व्यन्जन' हा अर्थ आहे हे नंतर त्या श्रोत्याला—पाणिनीय सूत्राचे अध्ययन करणाऱ्या पुरुषाला—ज्ञात होऊ शकतेच म्हणून हा द्वन्द्वसमास असाधु मानता येत नाही पण 'हल् च ल् च हल्' असा द्वन्द्वसमास करतेवेळी जर 'हल्' या पदाच्या अर्थाचे ज्ञानच नाही तर महविवक्षा कशी मानता यावी ? या याचे ठिकाणी महविवक्षा तेव्हाच मानता येते की, जेव्हा दोन किंवा अधिक पदाचा इतरेतरयोगद्वन्द्व करतेवेळी

त्या वक्याला त्या समासात अवयवीभूत असलेल्या सर्व पदाच्या अर्थाचे ज्ञान आहे अशी कोणी शंका केल्यास, त्या शंकेवर शंकाकार पुढें सांगितल्याप्रमाणे उत्तर देतो ) दुसरें असे की, सहविवक्षा या शब्दाचा 'सह वक्तु वक्तुरिच्छा'-एकत्र उच्चारण्याची वक्त्याची इच्छा-असा अर्थ आहे 'हलन्त्यम्' हे सूत्र रचणाऱ्या पाणिनीला ते सूत्र रचण्यापूर्वी जर 'हल्' या पदाच्या अर्थाचे ज्ञान नसते तर त्याला ते सूत्र रचताच आले नसते पण त्याने ते सूत्र रचले असल्यामुळें, ते सूत्र अनुपपन्न-निरर्थक-न ठरावे व त्या सूत्राची उपपत्ति लावता यावी याकरिता हे मानणें आवश्यक आहे की त्याला ते सूत्र रचण्यापूर्वी 'हल्' या पदाच्या अर्थाचे ज्ञान होते व अशा रीतीने त्याचे ठिकाणी सहविवक्षा होती हे सिद्ध होते परतु श्रोत्याला मात्र क्रमानेच बोध होतो, म्हणजे 'हलन्त्यम्' या सूत्रातील 'हल्' या पदाचा 'हल् च ल् च' असा विग्रह केल्याने 'अन्त्य हल् इत् लकारश्च इत्' असें जें वाक्य तयार होते ते ऐक्तेवेळी पाणिनीय शास्त्राचे अध्ययन करणाऱ्या पुरुषाला जरी अन्तिम शिवसूत्रातील लकार इत्संज्ञक होतो एवढेंच प्रथम ज्ञान होते व 'हल्' या पदाच्या अर्थाचे एकदम ज्ञान होत नाही तरी, लकार इत्संज्ञक होतो हे ज्ञान त्याला झाले असल्यामुळें तो 'आदिरन्त्येन सहेता,' या सूत्राच्या सहायाने जेव्हा नतर हल्प्रत्याहार सिद्ध करतो तेव्हा त्याला 'हल्' या पदाचा अर्थ व्यञ्जन आहे असें मागून ज्ञान होतेच (सारांश 'हलन्त्यम्' हे सूत्र रचणाऱ्या पाणिनीचे ठिकाणी 'अन्त्य हल् ल् च इत्' अशी वर सांगितल्याप्रमाणें सहविवक्षा होती असें मानता येत असल्यामुळें, 'हल् च ल् च हल्' हा द्वन्द्वसमास साधु मानता येण्यात कोणतीहि अडचण येत नाही असा शंकाकाराच्या म्हणण्याचा आशय आहे 'न च आद्यन्तौ टकितौ इत्यादौ...क्रमेणैवेति' हा सर्व शंकाग्रन्थ आहे हे लक्षात ठेवावें आता या ग्रन्थात शंकाकाराने जी शंका केली आहे त्या शंकेवर उत्तर देताना शब्दरत्नकार असे म्हणतात की,) ही शंका बरोबर नाही, कारण 'आद्यन्तौ टकितौ' इत्यादि स्थलीं सहविवक्षा

नमून देखील 'आद्यन्तौ,टकितौ' इत्यादि द्वन्द्वसमास, 'यथासंख्यमनुदेशः समानाम्' सू १९८ हे सूत्र आरंभिले असल्यामुळें त्या सूत्राच्या आरंभसामर्थ्याने जरी साधु मानले जातात तरी, ज्या स्थली यथासंख्य सूत्र लागू पडत नाही तशा ठिकाणी सहविवक्षा नसून देखील केलेला द्वन्द्वसमास इतर रीतीनें, म्हणजे शब्दाकाराने जी तऱ्हा सांगितली आहे त्या तऱ्हेने, साधु ठरतो असे मानण्यास कोणतेंहि प्रमाण नाही ('शत्रु मित्र विपत्ति च जय रञ्जय भञ्जय' इत्यादि लौकिक प्रयोगात जेथें द्वन्द्वसमास न करिता असमस्त पदें उच्चारली आहेत तशा स्थली स्थानरूप लौकिक प्रमाणान्वयें 'शत्रु जय, मित्र रञ्जय, विपत्ति भञ्जय' असा यथासंख्य अन्वय ज्याप्रमाणे होतो त्याचप्रमाणे व्याकरणशास्त्रात देखील द्वन्द्वसमास न करिता असमस्त उद्देश्यरूप व विधेयरूप पदें उच्चारली असली तर त्या स्थानरूप लौकिक प्रमाणान्वयें यथासंख्य अन्वय होऊ शकतो पण लौकिक प्रयोगात जर द्वन्द्वसमास करून एखादे वाक्य उच्चारलें असेल तर तशा स्थली स्थानरूप प्रमाण लागू केल्याने यथासंख्य अन्वय प्रतीत होऊ शकत नाही उदाहरणार्थ 'अजाविधनौ देवदत्तयज्ञदत्तौ' अशा द्वन्द्वसमासघटित वाक्याचा प्रयोग केला असता, 'देवदत्तयज्ञदत्तौ' या सामासिक पदाचा 'अजाविधनौ' या सामासिक पदाशी अन्वय होत असून क्रमान्वय होत नसल्यामुळें, अजा देवदत्ताचे धन आहे व अवि यज्ञदत्ताचे धन आहे असा क्रमिक बोध होत नसून, देवदत्त व यज्ञदत्त या दोघाचेंहि अजा व अवि हे धन आहे असाच समुदायरूप बोध होतो पाणिनीय व्याकरणशास्त्रात असे द्वन्द्वसमासघटित सूत्र उच्चारले असता,समुदायाचा समुदायाशी अन्वय न होता क्रमिक अन्वय व्हावा एवढ्याकरिताच 'यथासंख्यमनुदेशः' हे सूत्र आरंभिले आहे, व त्या सूत्राच्या आरंभसामर्थ्यानेच 'आद्यन्तौ टकितौ' सू ३६, 'तस्थस्थमिपां तांतंतामः' सू २१९९ इत्यादि सूत्रात निर्दिष्ट असलेले द्वन्द्वसमास सहविवक्षा नसून देखील साधु मानले जातात व तशा ठिकाणी समुदायाचा समुदायाशी अन्वय न होता क्रमान्वय

होतो 'आद्यन्तौ' टकितौ १ १ ४६ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात–'समासनिर्देशोऽयं तत्र न ज्ञायते क आदि कोऽन्त इति। तद्यथा। अजाविधनौ देवदत्तयज्ञदत्ताविति्युक्ते तत्र न ज्ञायते कस्याजा धन कस्यावय इति। यद्यपि तावल्लोक एष दृष्टान्तो, दृष्टान्तस्यापि पुरुषारम्भो निवर्तको भवति। अस्ति चेह कश्चित्पुरुषारम्भ ? अस्तीत्याह। क ? । सख्यातानुदेशो नाम।' या भाष्यावरून हे स्पष्ट होते की, जेथें पाणिनीय सूत्रात उद्देश्याचा व विधेयाचा सहविवक्षा नसून देखील द्वन्द्वसमासरूपान प्रयोग केला आहे तशा ठिकाणी यथासख्यसूत्राच्या आरभसामर्थ्यानेच क्रमिक अन्वय होतो व सहविवक्षा नसून देखील केलेले तसे द्वन्द्वसमास साधु मानले जातात पण 'हल् च ल च हल्, इत्' या स्थली यथासख्यसूत्र लागू पडत नाही, कारण येथें 'हल' व 'ल्' ही' दोन उद्देश्यें असून 'इत्' हे एकच विधेय आहे म्हणून या वरील उदाहरणात उद्देश्य व विधेय याची सख्या सारखी नसल्यामुळें, 'हलन्त्यम्' हे सूत्र यथासख्य सूत्राचा विषय होऊ शकत नाही व त्यामुळें या स्थली सहविवक्षा नसून देखील जो प्रसादकारादिकानी द्वन्द्वसमास करण्याचा प्रयत्न केला आहे तो प्रयत्न निष्फल असून त्यानी केलेला द्वन्द्वसमास साधु मानता येत नाही असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे)

शब्दरत्न– किं च, 'श्रोतृणा सहबोधो भवतु' इतीच्छया सह वक्तुमिच्छायां एव सहविवक्षात्वेन श्रोतृणामपि सहबोध एवोचित। तादृशेच्छया तेषा तादृशबोधाजनकशब्दप्रयोगे तु पाणिनेर्भ्रान्तत्वापत्ति। 'मूलनयन पश्य' इत्यादौ तु न दोष, उभयज्ञत्वेन ज्ञात प्रत्येव तादृशशब्दप्रयोगात्। तेन रूपेण ज्ञान भ्रम, प्रमा वेत्यन्यदेतत्।

दुसरे असे की, सहविवक्षा या शब्दाचा (जसा प्रकाशकाराने वर सांगितल्याप्रमाणे अर्थ केला आहे तो अर्थ बरोबर नसून)'श्रोतृणा सहबोधो भवतु इतीच्छया सहवक्तु वक्तुमिच्छा' असा वास्तविक अर्थ आहे, म्हणजे वक्त्यान एखादें वाक्य उच्चारले असता जसा ते वाक्य

उच्चारतेवेळी त्याला त्या वाक्याचा अर्थ अवगत असतो त्याचप्रमाणें श्रोत्याला देखील तें वाक्य ऐकल्याबरोबर त्या वाक्याच्या अर्थाचा बोध व्हावा अशी जी वक्त्याची इच्छा ती सद्विवक्षा होय, व त्या शब्दाचा असा अर्थ असल्यामुळें, श्रोत्याला देखील (वक्त्यानें वाक्य उच्चारलें असता जसा त्याला त्या वाक्याचा अर्थ अवगत असतो तसा) बोध होणेंच उचित आहे. सारांश 'श्रोतृसमवेत सद्ज्ञान मदिष्टसाधनम्' अशा प्रकारची वक्त्याचे ठिकाणीं असणारी जी इच्छा तिलाच सद्विवक्षा म्हणतात म्हणून वक्त्यानें एखादें वाक्य उच्चारलें असता तें वाक्य ऐकल्यावर जर श्रोत्याला त्या वाक्याच्या अर्थाचा बोध होऊ शकत नाहीं तर तशा स्थली वक्त्याचे ठिकाणी सद्विवक्षा होती असें मानता येत नाहीं) पाणिनीला सद्विवक्षा असून देखील, म्हणजे त्यानें उच्चारलेल्या सूत्राच्या अर्थाचा श्रोत्याला तें सूत्र ऐकल्याबरोबर बोध व्हावा अशी त्याची इच्छा असून देखील, जर त्यानें अशा द्वन्द्वसमासघटित वाक्याचा प्रयोग केला असेल की, तें वाक्य ऐकल्यावर श्रोत्याला त्या वाक्याच्या अर्थाचा बोध होऊ शकत नाहीं तर पाणिनीनें भ्रमानें—चुकीनें—तसा वाक्याचा प्रयोग केला असें मानण्याची आपत्ति येते ('हलन्त्यम्' या सूत्रांतील 'हल्' हे पद 'हल् च ल् च' या द्वन्द्वसमासाचें घटक पद आहे असें मानल्यास, तें सूत्र उच्चारतेवेळी जरी पाणिनीला 'हल्' चा 'व्यञ्जन' हा अर्थ आहे हें ज्ञान होतें तरी तें सूत्र उच्चारलें असता, श्रोत्याला 'हल्' या पदाचा अर्थ ज्ञात होत नसल्यामुळें, 'श्रोतृणा सद्बोधो भवतु' अशी पाणिनीची इच्छा असून देखील त्यानें भ्रान्तीनें 'हलन्त्यम्' हें सूत्र उच्चारलें आहे असें मानण्याचा अनिष्ट प्रसंग येतो पण तशा सर्वज्ञ आचार्याला भ्रान्ति होणें असंभव आहे म्हणून हेंच मानलें पाहिजे कीं, पाणिनीनें 'हलन्त्यम्' या सूत्रांतील 'हल्' हें पद 'हल् च ल् च' अशा द्वन्द्वसमासाचें घटक पद आहे व त्याचा व्यञ्जन असा अर्थ आहे या अभिप्रायानें मुळींच उच्चारलें नाहीं पुन्हा

शकाकार अशी शंका करतो की, द्वन्द्वसमासघटक दोन पदांपैकी श्रोत्याला जर्थे एकाच पदाच्या अर्थाचे ज्ञान असून दुसऱ्या पदाच्या अर्थाचे ज्ञान नाही तशा ठिकाणी देखील 'मुखनयन पश्य' इत्यादि द्वन्द्वसमासघटित वाक्याचा प्रयोग केलेला भाषेत आढळतो, म्हणजे 'मुखनयनम्' या सामासिक पदात मुख व नयन हे जे दोन शब्द आहेत त्यापैकी श्रोत्याला जरी एकाच शब्दाच्या अर्थाचे ज्ञान असले व दुसऱ्या शब्दाच्या अर्थाचे मुळीच ज्ञान नसले तरी वक्ता तसा प्रयोग भाषत करीत असतो म्हणून 'हल् च ल च हल्' अशा अभिप्रायाने 'हल्' हे पद उच्चारले असता जरी श्रोत्याला 'हल्' या द्वन्द्वसमासघटक प्रथम पदाच्या अर्थाचे ज्ञान नसून केवळ 'ल्' या द्वितीय पदाच्या अर्थाचे ज्ञान आहे तरी अशा ठिकाणी वक्त्याने–पाणिनीने–केलेला द्वन्द्वसमासाचा प्रयोग साधु ठरतो या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'मुख च नयन च तथा समाहार मुखनयनम्' असा 'द्वन्द्वश्च प्राणितूर्यसेनाङ्गानाम' सू ९०६ या सूत्रान्वयें समाहारद्वन्द्व करून) 'मुखनयन पश्य' इत्यादि प्रयोग करण्यात काही दोष येत नाही, कारण तशा वाक्याचा प्रयोग अशाच श्रोत्याला उद्देशून केला जातो की, ज्याला मुख व नयन या द्वन्द्वसमासघटक दोन्ही पदाच्या अर्थाचे ज्ञान आहे असे वक्ता समजतो हे शक्य आहे की श्रोत्याला तशा द्वन्द्वसमासातील दोन्ही पदाच्या अर्थाचे ज्ञान आहे असा वक्त्याचे ठिकाणी झालेला ग्रह कदाचित् खरा असल किंवा चुकीचा अथवा आरोपित असल, पण ही गोष्ट वेगळी (तशा चुकीच्या किंवा आरोपित ग्रहाने वक्त्यान केलेला द्वन्द्वसमासाचा प्रयोग साधु मानण्यात काही दोष येत नाही)

शब्दरत्न– किं च पाणिने पूर्वं हल्पदार्थज्ञानेऽपि तदभिप्रायेण न प्रयोग । अन्यथा व्याख्यातृपरम्परावगतवक्तृतात्पर्यानुपपत्त्या "लट् स्मे" इति सूत्रस्थकैयटोक्तरीत्या लक्षणया, तन्त्रान्तरीयप्रथमादिव्यवहारेण प्रथमादिपदानामिव शक्त्यनुमानाद्वा तत श्रोतॄणां

बोधसम्भवेनेतरेतराश्रयस्यैवाभावेन तदाशङ्का "लश्चेतिवक्तव्यम्" इत्यादिसमाधानपरभाष्यासङ्गत्यापत्तेः । न चैवमजादिव्यवहारस्यापि लक्षणादिनैवोपपत्तावादिरन्त्येनेति सूत्रवैयर्थ्यम्, क्वचिल्लक्षणादिना बोध इति सर्वत्र लक्षणाद्याश्रयणमेवेति नियमाभावात् । "नानुपा कर्त्तव्या यत्रानुगमः क्रियते" इति "षड्विंशति" इति सूत्रे भाष्योक्तेः ।

दुसरे असे की, 'हलन्त्यम्' हे सूत्र रचण्यापूर्वी पाणिनीला जरी 'हल्' या पदाचा अर्थ 'व्यञ्जन' आहे असे ज्ञान होते तरी, त्याने त्या सूत्रात 'हल्' या पदाचा प्रयोग 'व्यञ्जन' या अर्थामध्ये केला नाही 'व्यञ्जन' या अर्थामध्ये त्याने त्या सूत्रात 'हल्' या पदाचा प्रयोग केला असे मानल्यास, वक्त्याला–पाणिनीला–अभिप्रेत असलेल्या व गुरुशिष्यपरंपरेने–पाणिनी, त्याचे शिष्य, त्या शिष्याचे शिष्य इत्यादि परपरेने–ज्ञान होणाऱ्या 'व्यञ्जन' या अर्थामध्ये 'हल्' या पदाचा पाणिनीने जो उपयोग केला आहे त्या अर्थाची इतर रीतीने उपपत्ति लागू शकत नसल्यामुळें, (१) 'लट् स्मे' या सूत्रावरील भाष्याच्या टीकेत जशी कैयटाने लक्षणा मानली आहे तशी लक्षणा मानल्याने, किंवा (२) इतर वैयाकरणाच्या व्याकरणग्रन्थात 'सु औ जस्' म्हणजे प्रथमा, 'अम् औट् शस' म्हणजे द्वितीया इत्यादि केलेल्या व्यवहाराला धरूनच पाणिनीने त्याच अर्थामध्ये प्रथमा, द्वितीया इत्यादि शब्दाचा प्रयोग केला आहे असे ज्याप्रमाणे शक्त्यनुमानाने ठरविले जाते, म्हणजे 'सु औ जस्, अम् औट् शस' इत्यादि त्रिकाचे ठिकाणी अनुक्रमे प्रथमा, द्वितीया इत्यादि अर्थाचा बोध करण्याची अभिधाशक्ति आहे असे अनुमानाने ठरविता येते, त्याच-प्रमाणे 'हल्' या शब्दाचा प्रयोग 'हलन्त्यम्' या सूत्रात पाणिनीने, तो शब्द अभिधाशक्तीने 'व्यञ्जन' या अर्थाचा वाचक आहे असे जाणून, त्या अर्थामध्ये उपयोग केला आहे असे शक्त्यनुमान केल्याने, म्हणजे 'हल्पद हकारादिषु शक्तम् = हकारादिलान्तसमुदायघटकबोध-जनकम्, हकारादिबोधतात्पर्येण पाणिन्युच्चरितत्वात्' असा तऱ्हेचे

शक्यनुमान केल्याने, श्रोत्याला उपदेशविषयीभूत शब्दातील अन्त्य व्यञ्जन इत्सञ्ज्ञक होते असा 'हलन्त्यम्' या सूत्राच्या अर्थाचा बोध होणे संभवते पण तसे मानले तर अन्योन्याश्रयरूप दोष मुळीच येत नाही व त्यामुळें 'हलन्त्यम्' १-३-३ या सूत्रावरील ज्या भाष्यात भाष्यकारानी अन्योन्याश्रयदोषरूप शंका उपस्थित केली आहे व त्या शंकेच्या परिहारार्थ 'लश्चेति वक्तव्यम्' ('एकशेष-निर्देशाद्वा सिद्धम्') इत्यादि वचने पठित केली आहेत ते समाधानपर भाष्य असंगत ठरण्याची आपत्ति येते ('लट् स्मे' ३-२-११८ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी 'स्मपुरा भूतमात्रे' व 'न स्मपुराऽद्यतने' अशी दोन वार्तिके पठित केली आहेत पहिल्या वार्तिकाचा 'स्म' किंवा 'पुरा' याचा वाक्यात उपयोग केला असल्यास, सामान्य भूतकालवाचक अर्थामध्यें लट् लकाराचा प्रयोग करावा असा अर्थ केला, व द्वितीय वार्तिकाचा 'स्म' किंवा 'पुरा' याचा वाक्यात उपयोग केला असल्यास, सामान्य अद्यतनभूत या अर्थामध्ये लट् लकाराचा प्रयोग होऊ शकत नाही, म्हणजे अनद्यतन-भूत या विशेष प्रकारच्या भूतकालवाचक अर्थामध्येंच लट्लकाराचा प्रयोग होतो, असा अर्थ केला तर, वरील दोन वार्तिके परस्परविरुद्ध अर्थाचे प्रतिपादन करणारी वार्तिके आहेत असे मानण्याची आपत्ति येते. ही आपत्ति टाळण्याकरिता कैयटाने प्रथम वार्तिकातील 'स्मपुरा' या पदाचा, ज्या सूत्रात 'स्म' हा शब्द आहे त्या सूत्रापासून ज्या सूत्रात 'पुरा' हा शब्द आहे त्या सूत्रापर्यंतची पाच सूत्रें, म्हणजे 'लट् स्मे' अपरोक्षे च, ननौ पृष्टप्रतिवचने, नन्वोर्विभाषा, पुरि लुङ् चास्मे' सू २७७८-२७८२, असा लक्षणेने अर्थ केला आहे व असा लक्षणेनें 'स्मपुरा' याचा अर्थ करून वरील दोन वार्तिकाचा असा अर्थ केला आहे की, वर सांगितलेल्या पाच सूत्रापैकी दोन सूत्रानी—म्हणजे सूत्र २७८०-८१ या सूत्रानी—सामान्य भूतकालवाचक अर्थामध्यें लट् लकाराचा प्रयोग होतो, पण बाकीच्या ज्या तीन सूत्रात 'स्म' व

'पुरा' हे शब्द आहेत असा 'लट् स्मे, अपरोक्षे च, पुरि लुङ् चास्मे' या तीन सूत्रांनी होणारा लट् लकाराचा प्रयोग सामान्य भूतकालवाचक अर्थामध्यें करता येत नसून अनद्यतनभूतकालवाचक विशेष अर्थामध्येंच करता येतो. त्या भाष्यावरील टीकेत कैयटानें असें म्हटलें आहे 'इत आरभ्य पञ्चसूत्र्या कालविभागप्रतिपादनाय वार्तिकद्वयम्, स्मपुराभूतमात्रे, न स्म पुराद्यतन इति। तस्यायमर्थ–प्रथमे वार्तिके स्मपुराशब्दाभ्यामाद्यन्ताभ्यां पञ्चसूत्री लक्ष्यते। तत्र भूतमात्रे प्रत्ययो भवति। स्मपुरालक्षणस्तु प्रत्ययोऽद्यतने न भवति। एतदुक्तं भवति–लट् स्मे, अपरोक्षे च, पुरि लुङ् चास्मे इति सूत्रत्रयेणानद्यतने भूतविशेषे प्रत्ययो भवति। ननौ पृष्टप्रतिवचने, नन्वोर्विभाषेत्येताभ्यां तु भूतमात्रे प्रत्ययः।' सारांश 'स्मपुरा' या शब्दाचा 'स्म' पासून 'पुरा' पर्यंत असा ज्याप्रमाणें कैयटानें लक्षणेनें अर्थ केला आहे त्याचप्रमाणें 'हलन्त्यम्' या सूत्रातील 'हल्' या शब्दाचा 'ह' पासून 'ल्' पर्यंत शिवसूत्रांतील वर्णसमुदाय असा लक्षणेनें अर्थ करता येतो, व त्या सूत्रांत 'अन्त्यम्' हें अवयववाचक पद घातलें असल्यामुळें, उपदेशविषयीभूत शब्दांत–आद्योच्चारणांत–असणारा शिवसूत्रस्थहकारादिलकारान्तसमुदायान्तर्गत अन्त्य वर्ण–व्यञ्जन–इत्संज्ञक होतो असा त्या सूत्राचा अर्थ फलित होतो. पण तसा अर्थ 'हल्' शब्दाचे ठिकाणीं अभिधाशक्ति मानल्यानें बोधित होऊं शकत असल्यास, लक्षणावृत्तीचा आश्रय करणें अनुचित आहे हा आशय मनांत धरून शङ्काकार असें सुचवितो की, 'हल्' हें पद अभिधावृत्तीनें 'व्यञ्जन' या अर्थाचें वाचक आहे असें मानता येतें; कारण पाणिनीनें अष्टाध्यायींत 'प्रातिपदिकार्थलिङ्गपरिमाणवचनमात्रे प्रथमा, कर्मणि द्वितीया, कर्तृकरणयोस्तृतीया' इत्यादि सूत्रांत प्रथमा, द्वितीया, तृतीया इत्यादि विभक्तींचा निर्देश केला असून ज्याअर्थी प्रथमा, द्वितीया, तृतीया इत्यादि कशास म्हणावें याबद्दल कोठेंहि विधान केलें नाहीं त्याअर्थी इतर व्याकरणग्रन्थांत 'सु औ जस इति

प्रथमा, अम् औट् शस् इति द्वितीया' इत्यादि प्रथमा द्वितीया वगैरे विभक्तींची व्याख्या सांगितली असल्यामुळे 'स्वौजस' सू. १८३ या सूत्रात जी सात त्रिकें निर्दिष्ट आहेत त्यांचे ठिकाणी अनुक्रमें प्रथमा, द्वितीया, तृतीया इत्यादि सात विभक्तींचा अभिधाशक्तीने बोध करण्याचें सामर्थ्य आहे व त्यामुळेच पाणिनीने प्रथमा, द्वितीया इत्यादि शब्दांची वेगळी व्याख्या न देतां इतर व्याकरणग्रन्थांत त्या शब्दांचा ज्या अर्थामध्ये उपयोग केला आहे त्या अर्थाला धरूनच पाणिनीने देखील त्या शब्दाचा उपयोग अष्टाध्यायींत केला आहे असे ज्याप्रमाणे शक्यनुमान म्हणजे 'स्वौजस' इत्यादि सात त्रिकें प्रथमा इत्यादि सात विभक्तींचे अभिधाशक्तीने अनुक्रमें बोधक आहेत असे अनुमान, करता येतें त्याचप्रमाणे इतर प्राचीन व्याकरणग्रन्थांत जेथें जेथें व्यञ्जन शब्दाचा प्रयोग आढळतो तेथें तेथें पाणिनीने 'हल्' शब्दाचा प्रयोग केला असल्यामुळे, 'हल्' हा शब्द अभिधा-शक्तीने 'व्यञ्जन' या अर्थाचा वाचक आहे व त्या अर्थामध्येच पाणिनीने 'हलन्त्यम्' या सूत्रांत 'हल्' या शब्दाचा उपयोग केला आहे असे शक्यनुमान करता येते. सारांश वर सांगितल्याप्रमाणे लक्षणेने किंवा शक्यनुमानाने 'हल्' या शब्दाचा व्यञ्जन असा अर्थ केल्याने, 'हल् च ल् च हल्' असा द्वन्द्वसमास करतेवेळी त्या समासाचे घटक—अवयव—जे 'हल्' व 'ल्' हे आहेत त्यांपैकी 'हल्' चा अर्थ व्यञ्जन असून 'ल्' याचा शिवसूत्रांतील अन्त्य लकार हा अर्थ आहे अशा प्रकारचें दोन्ही पदांच्या अर्थाचें ज्ञान आहे असे सिद्ध होत असल्यामुळे, येथें सहविवक्षा आहे असे मानता येते व त्यामुळे या स्थली द्वन्द्वसमास होण्यांत कांहीं प्रत्यवाय येत नाही आणि तसा द्वन्द्वसमास केला असता, शिवसूत्रांतील अन्त्य लकार इत्संज्ञक समजावा व उपदेशांतील अन्त्य व्यञ्जन इत्संज्ञक समजावें असा 'हलन्त्यम्' या सूत्राचा अर्थ निष्पन्न होतो असे शंकाकाराच्या म्हणण्याचें तात्पर्य आहे. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात की,

शकाकाराच्या म्हणण्याप्रमाणे 'हलन्त्यम्' या प्रकृत सूत्रातील 'हल्' हे पद लक्षणेने किंवा अभिधाशक्तीने व्यञ्जन या अर्थाचे वाचक आहे असे मानून शंकाकाराने वर सांगितल्याप्रमाणे प्रकृत सूत्राचा अर्थ केल्यास अन्योन्याश्रयरूप दोष मुळीच उद्भवत नाही. मग त्या सूत्रावरील ज्या भाष्यात अन्योन्याश्रयरूप दोष दाखविला आहे व त्या दोषाचे निवारण करण्याकरिता अनेक उपाय सुचविले आहेत त्या भाष्याची सुसङ्गतता कशी लावता येणे शक्य आहे? त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात– 'लकारस्यानुबन्धत्वेनाऽज्ञापितत्वाद्हल्ग्रहणस्याऽप्रसिद्धि । हलन्त्य-मित्यत्र भवतीत्युच्यते, लकारस्यैव तावदित्सञ्ज्ञा न प्राप्नोति ।' या भाष्याचा भावार्थ हा आहे की, 'हल्' या अन्तिम माहेश्वरसूत्रातील लकाराला दुसऱ्या कोणत्याहि सूत्राने इत्सञ्ज्ञा होणे सांगितले नसल्यामुळे 'हलन्त्यम' या प्रकृत सूत्रातील 'हल्' या पदाचा अर्थच कळू शकत नाही, कारण त्या लकाराला इत्सञ्ज्ञा झाल्याशिवाय हल् या पदाचा अर्थ बोधित करून देणारे 'आदिरन्त्येन सहेता' हे सूत्र प्रवृत्त होऊच शकत नाही आणि 'हलन्त्यम्' या सूत्रात तर हल् इत्सञ्ज्ञक होणे सांगितले आहे पण हल् या शब्दाने कोणते वर्ण घ्यावे हे समजू शकत नसल्यामुळे त्या सूत्राचा अर्थच होऊ शकत नाही. या वरील भाष्यातील 'लकारस्येति' हे प्रतीक घेऊन कैयटाने असे म्हटले आहे की, 'इतरे-तराश्रय मन्यते । शषसर् हलित्यत्र लकारस्य सत्यामित्सञ्ज्ञायां हलिति प्रत्याहार, सति च प्रत्याहारे लणित्यत्र लकारस्य हलत्वात्तस्यैव शषसर् हलित्यनान्ते निर्दिष्टत्वादित्सञ्ज्ञेति प्रत्याहाराश्रयेत्सञ्ज्ञा, तदाश्रयश्च प्रत्याहार ।' कैयटाच्या म्हणण्याचा थोडक्यात आशय हा आहे की, 'हलन्त्यम्' या सूत्राच्या विषयात भाष्यकार अन्योन्याश्रयरूप दोष मानतात व त्याचे कारण हे की, 'हल्' या अन्तिम शिवसूत्रातील लकाराला इत्सञ्ज्ञा झाल्याशिवाय 'हल्' प्रत्याहार सिद्ध होऊ शकत नाही व तो प्रत्याहार 'आदिरन्त्येन सहेता' या सूत्राच्या सहायाने सिद्ध केल्याशिवाय शिवसूत्रातील अन्त्य लकाराला–व्यञ्जनाला–इत्सञ्ज्ञा

होऊ शकत नाही अशा रीतीने हल्प्रत्याहारसापेक्ष लकाराची इत्संज्ञा ठरत असून इत्संज्ञासापेक्ष हल्प्रत्याहाराची सिद्धि ठरत असल्यामुळें, येथें अन्योन्याश्रयरूप दोष येतो व 'इतरेतराश्रयाणि कार्याणि न प्रकल्पन्ते' असा सिद्धान्त असल्यामुळे लकाराची इत्संज्ञाहि सिद्ध होत नाही व तसेच हल्संज्ञाहि सिद्ध होत नाही, म्हणजे हल् या पदाचा व्यञ्जन असा अर्थ आहे हे देखील सिद्ध होऊ शकत नाही सारांश 'आदिरन्त्येन सहेता' हे इत्संज्ञासापेक्ष सूत्र असल्यामुळे जोपर्यंत अन्तिम शिवसूत्रातील लकाराची इत्संज्ञा सिद्ध होत नाही तोपर्यंत त्या सूत्राची प्रवृत्ति होऊ शकत नाही व जोपर्यंत त्या सूत्राच्या सहायाने हल्प्रत्याहार सिद्ध होत नाही तोपर्यंत हल्संज्ञासापेक्ष 'हलन्त्यम्' हे सूत्र प्रवृत्त होऊं शकत नाही व त्यामुळें लकाराला इत्संज्ञा होऊ शकत नाही अशा रीतीने 'आदिरन्त्येन सहेता' व 'हलन्त्यम्' ही दोन सूत्रे परस्परसापेक्ष असल्यामुळें, वर सांगितल्याप्रमाणे इत्संज्ञा व तशीच हल्संज्ञा या दोन्हींहि संज्ञा सिद्ध होत नाहीत आणि त्यामुळें 'हलन्त्यम्' या सूत्राच्या अर्थाचा बोध होऊ शकत नाही वर दिलेल्या भाष्यावरून व कैयटवृत्तीवरून हे स्पष्ट होते की, भाष्यकारानी प्रकृत सूत्राच्या विषयात अन्योन्याश्रयरूप दोष मानला आहे व तो दोष टाळण्याकरिताच त्यानी 'लकारनिर्देश कर्तव्य । हलन्त्यमित्संज्ञ भवति लकारश्चेति वक्तव्यम्' असे प्रकृत सूत्रावरील भाष्यात म्हटले आहे व 'एकशेषनिर्देशात्सिद्धम्' असा दुसरा उपाय देखील सुचविला आहे पण शंकाकाराच्या म्हणण्याप्रमाणे 'हलन्त्यम्' या प्रकृत सूत्रात 'हल' या पदाचा पाणिनीने 'हकारादिलकारान्तवर्णसमुदाय,' म्हणजे 'व्यञ्जनम्' या अर्थामध्ये उपयोग केला आहे असे मानल्यास, समाहारद्वन्द्वपक्षात लकाराची इत्संज्ञा सिद्ध होते व हल् या पदाचा व्यञ्जन असा अर्थ देखील बोधित होतो आणि त्यामुळें प्रकृत सूत्राच्या विषयात अन्योन्याश्रयरूप दोष मुळीच येत नाही मग भाष्यकारानी एवढी उठाठेव करून अन्योन्याश्रयरूप दोष निवारण करण्याचा व्यर्थच

प्रयत्न केला आहे असे मानले पाहिजे सारांश शकाकाराचे म्हणणे बरोबर मानल्यास, वरील भाष्य असङ्गत ठरण्याची आपत्ति येते हे उघड आहे. पण सर्वज्ञ भाष्यकारांनी केलेले प्रमाणभूत भाष्य तर केव्हाहि असङ्गत किंवा चूक मानता येत नाही. म्हणून ते भाष्य सुसङ्गत ठरण्याकरिता हे मानणे आवश्यक आहे की, पाणिनीने 'हलन्त्यम्' या सूत्रात 'हल्' या पदाचा 'व्यन्जन' या अर्थामध्ये मुळीच उपयोग केला नाही सारांश 'हल् च ल् च' असा द्वन्द्वसमास करतेवेळी त्या द्वन्द्वसमासातील 'हल्' या पूर्वपदाच्या अर्थाचे ज्ञान नसल्यामुळे, येथे सहविवक्षा मानता येत नाही व त्यामुळे तसा द्वन्द्वसमास होऊ शक्त नाही असे शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचे तात्पर्य आहे आता 'स्मपुरा भूतमात्रे' या वार्तिकातील 'स्मपुरा' या शब्दाचा, ज्या सूत्रात 'स्म' हा शब्द आहे त्या सूत्रापासून ज्या सूत्रात 'पुरा' हा शब्द आहे असा पन्चसूत्रसमुदाय, असा तऱ्हेने ज्याप्रमाणे कैयटाने लक्षणेने अर्थ केला आह त्याचप्रमाणे) 'अच्, हल' इत्यादि शब्दाचा देखील 'अ' पासून 'च्' पर्यंत वर्णसमुदाय, 'ह्' पासून 'ल्' पर्यंत वर्णसमुदाय असा लक्षणेनेच किंवा वर सांगितल्याप्रमाणे शक्यनुमानानेच अर्थ केल्याने सर्व उपपत्ति लागू शक्त असल्यामुळे, 'आदिरन्त्येन सहेता' हे सूत्र असण्याची काहीच गरज नाही अस कोणी म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर नाही एखाद्या सूत्रातील (किंवा वार्तिकातील) पदाचा अर्थ करण्याकरिता लक्षणा किंवा शक्यनुमान याचा जरी उपयोग केला असला तरी, सर्वत्र त्याचा उपयोग करुन सूत्रार्थ करावा असा कोठेहि नियम नाही, आणि 'पङ्क्तिविंशति' सू ५-१-५९ या सूत्रावरील भाष्यात 'नासूया कर्तव्या यत्नानुगम क्रियते' असे भाष्यकारांनी म्हटले आहे (त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात— 'इमे विंशत्यादय सप्रकृतिका सप्रत्ययकाश्च निपात्यन्ते, तत्र न ज्ञायते का प्रकृति, क प्रत्यय, क प्रत्ययार्थ इति । तत्र वक्तव्यमिय प्रकृतिरय प्रत्ययोऽय प्रत्ययार्थ इति । इमे ब्रूमो, द्विरन्तादय दशदर्था-

भिधायिन स्वार्थे शतिच्प्रत्ययो निपात्यते विन्भावश्च । द्वौ दशती विंशति ।' अशा रीतीने त्या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या शब्दाचा प्रकृतिप्रत्ययरूप विभाग करून दाखविल्यावर, ते सूत्र आरंभिण्याची वाहीच गरज नव्हती या अर्थाचे 'अनारम्भो वा प्रातिपदिकविज्ञानाद्यथा सहस्रादिपु' हें वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचें व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात –'अनारम्भो वा पुनर्विंशत्यादीना न्याय्य । कथ सिद्धयति ? । प्रातिपदिकविज्ञानात । कथ प्रातिपदिकविज्ञानम ? । विंशत्यादयोऽव्युत्पन्नानि प्रातिपदिकानि । यथा सहस्रादिपु । तद्यथा–सहस्रमयुतमर्बुदमिति, नचानुगम क्रियते, भवनि चाभिधानम् ।' पुढें पाणिनीनें ते सूत्र आरंभिणेच योग्य होते याचे समर्थन करितांना भाष्यकार म्हणतात –'यथा सहस्रादिष्वित्युच्यते, –अथ सहस्रादिष्वपि कथ भवितव्यम्,–सहस्र गवा, सहस्र गाव, सहस्रगव, गोसहस्रमिति ? । यावताऽत्रापि सन्देहो, नासूया कर्तव्या यत्रानुगम क्रियते ।' या भाष्यातील 'नासूया कर्त्तव्या यत्रानुगम क्रियते' या पक्तीचा कैयटानें 'अननुगमो हि दोषाय । अशक्यो वानन्त्यान् सर्वशब्दानुगम । नत्वनुगम एव स्वप्रज्ञापराधादशक्यार्थविशेपनिश्चयत्वाद्दोपत्वेनोद्भावनीय इत्यर्थ ' असा अर्थ केला आहे व याच अर्थाचे भैरवीकारानी 'प्रकृतिप्रत्ययोरानन्त्येन शब्दाना साधुत्वज्ञान न सम्भवति, तत्र केपाञ्चिच्छब्दाना साधुत्वमाचार्येण प्रतिपादितम, पङ्क्तिविंशति इत्यादिना, शब्दानामानन्त्यात्सर्वेषा तन्न सम्भवतीति तथा न कृतम् नह्येतावताऽऽचार्यस्य दोप इति' अशा रीतीने स्पष्टीकरण केले आहे साराश त्या पक्तीचा तात्पर्यार्थ असा आहे की, भाषेत रूढ असलेल्या शब्दाच्या अर्थाचे यथार्थ ज्ञान होण्याकरिता व ते शब्द साधु आहेत असा निश्चित बोध होण्याकरिता प्रत्येक शब्दाची प्रकृति कोणती, त्या प्रकृतीहून कोणता प्रत्यय झाला आहे, व तो कोणत्या अर्थामध्ये झाला आहे हे ज्ञान असणे जरी इष्ट आहे तरी, भाषेत अनन्त शब्द असल्यामुळें आचार्य पाणिनीने त्या

सर्व शब्दांचे असे व्याख्यान न करिता काही शब्दांचेच असे व्याख्यान जरी केले आहे तरी ज्या शब्दांचे पाणिनीने प्रकृतिप्रत्ययविभागरूपाने व्याख्यान केले नाही, म्हणजेच अनुगम केला नाही, व ते शब्द निपातनरूपाने सूत्रात पठित केले आहेत त्याबद्दल आचार्य पाणिनीला दोष देता येत नाही हा न्याय प्रकृत स्थली लावल्यास, असा अर्थ निष्पन्न होतो की, 'स्मपुरा' या स्थली 'आदिरन्त्येन सहेता' हे सूत्र लागू पडत नसल्यामुळे व अशा अडचणीच्या स्थली लागू पडणारे पाणिनीने कोणतेहि सूत्र केले नसल्यामुळे, जरी कैयटाने 'स्मपुरा' या शब्दाचा पूर्वी सांगितल्याप्रमाणे लक्षणेने अर्थ केला आहे तरी, ज्या ठिकाणी ते सूत्र लागू पडते तशा ठिकाणी लक्षणेचा किंवा शब्दानुमानाचा उपयोग करणे अयोग्य आहे अशा ठिकाणी देखील लक्षणेचा किंवा शब्दानुमानाचा उपयोग केल्यास, 'आदिरन्त्येन सहेता' हे सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते सारांश पाणिनीने 'आदिरन्त्येन सहेता' हे सूत्र केले असल्यामुळे, जरी ते सूत्र जेथे लागू पडत नाही तेथे लक्षणादिकांनी अर्थ करून काम भागवावे लागते तरी, जेथे ते सूत्र लागू पडते तेथे त्या सूत्रान्वयेच अर्थ करणे योग्य आहे, कारण शब्दांच्या अभिधाशक्तीने त्याच्या अर्थाचा बोध व्हावा याकरिता व्याकरणशास्त्र निर्माण केले असल्यामुळे, सर्वत्र लक्षणादिकांचा उपयोग करणे योग्य नाही )

शब्दरत्न– तस्मात्करिष्यमाणशक्तिग्रहोपायकपदस्य तदभिप्रायेणाचार्यस्य पूर्वमप्रयोग इत्येव कल्पना ज्यायसी, ध्वनितश्चायमर्थो "नाज्झलौ" इति सूत्रेऽष्टादशानां ग्रहणाभावाय "वर्णानामुपदेशस्तावत्, उपदेशोत्तरकालेत्संज्ञा, इत्संज्ञोत्तरकालः प्रत्याहारः, प्रत्याहारोत्तरकाला सवर्णसंज्ञा, तदुत्तरमणुदिदिति सवर्णग्राहकमित्येतेन समुदितेनान्यत्र सवर्णानां ग्रहणं भवति न स्वस्मिन्नपि स्वाङ्गे" इत्येव वाक्यापरिसमाप्तिप्रतिपादकभाष्येणापि । अन्यथा तत्तच्छास्त्रप्रणयनानुपपत्त्या पाणिनेस्तत्याज्ञानस्य पूर्वमपि सत्त्वेनाचार्येण तत्प्रयोगे, बोधद-

**णामपि क्रमेण तथाबोधे उपपन्ने किं तेन कृत स्यात्, कथ वा नाज्झलावित्यत्राष्टादशादीना ग्रहणवारण भाष्योक्त सङ्गत स्यादिति विभाव्यता तदाह–तस्मादिति ।**

म्हणून ज्या पदाच्या अर्थाचा अभिधाशक्तीने बोध होण्याकरिता आचार्य पाणिनीने पुढें शक्तिग्राहक उपाय सागितला आहे त्या पदाचा त्याने पूर्वी ज्ञात असलेल्या अर्थामध्यें स्वरचित सूत्रात उपयोग केला नाही, हेच मानणे अधिक उचित ठरते (साराश अन्तिम शिवसूत्रातील लकाराची इत्सज्ञा साधल्यावर व नतर 'आदिरन्त्येन सहेता' या सूत्राच्या सहायाने हल् प्रत्याहार साधल्यावरच, 'हल्' या पदाचा अर्थ *'व्यञ्जन' आहे असे ज्ञात होत असल्यामुळें, ते शक्तिग्राहक–अर्थबोध* करून देणारे–सूत्र प्रवृत्त करण्यापूर्वीच, 'हल्' या पदाचा 'व्यञ्जन' असा अर्थ करणे अयोग्य आहे आता, इत्सज्ञा सिद्ध झाल्यानतरच प्रत्याहार साधता येतात व प्रत्याहार साधल्यानतरच त्या प्रत्याहाराच्या अर्थाचा बोध होऊ शकतो हे सिद्ध करण्याकरिता, शब्दरत्नकार पुढील पक्तीत 'नाज्झलौ' १ १-१० या सूत्रावरील भाष्याचे प्रमाण देतात ) हाच अर्थ 'नाज्झलौ' या सूत्रावरील वाक्यापरिसमाप्तिन्याय-प्रतिपादक भाष्यात देखील ध्वनित केला आहे 'नाज्झलौ' या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'अच्' या प्रत्याहाराने त्या प्रत्याहारात अन्तर्भूत असलेल्या अ,इ,उ,ऋ या वर्णाच्या अठराहि प्रकारच्या सवर्णाचे ग्रहण होऊ नये याकरिता, भाष्यकारानी त्या भाष्यात असे म्हटले आहे की, प्रथम वर्णाचा उपदेश केला आहे उपदेशोत्तरकाली इत्सज्ञा सिद्ध झाल्यावर 'आदिरन्त्येन सहेता' या सूत्रान्वयें प्रत्याहार सिद्ध होतात प्रत्याहार सिद्ध झाल्यानतर सवर्णसज्ञा होते आणि सवर्णसज्ञा सिद्ध झाल्यानतर 'अणुदित्सवर्णस्य' या सूत्राने सवर्णाचे ग्रहण होते या सर्व पोटवाक्यानी युक्त अशा महावाक्याने एतद्व्यतिरिक्त स्थली सवर्णाचे ग्रहण होते (पण अशा क्रमाने बोधित झालेला 'अण्' जरी इतर सूत्रात सवर्णाचा ग्राहक होतो तरी) 'अणुदित्' या सूत्रातील 'अण्

व तसेच तदङ्गभूत 'नाज्झलौ' या सूत्रातील अणुप्रत्याहारात अन्तर्भूत असलेल्या अच् सवर्णांना ग्राहक होत नाहीं (अनेक पोटवाक्यांनीं बनलेल्या मोठ्या वाक्याला महावाक्य असें म्हणतात. अशा महावाक्यात एक पोटवाक्य प्रधान असून इतर पोटवाक्यें त्याचीं अङ्गभूत असतात. अङ्गभूत पोटवाक्याचा अर्थ निश्चित झाल्याशिवाय मुख्य पोटवाक्याच्या अर्थाची परिसमाप्ति किंवा पूर्णता होत नाही, म्हणजे त्या मुख्य पोटवाक्याच्या अर्थाचा निश्चित बोध होऊ शकत नाही, आणि म्हणूनच याला वाक्यापरिसमाप्तिन्याय असे नाव दिलें आहे व या न्यायाचें म्हणणं असें आहे की, महावाक्याचा अर्थ पूर्णपणें निश्चित होईपर्यंत त्या महावाक्यात सांगितलेल्या विधानाचा उपयोग करता येत नाही आता 'हलन्त्यम्' या सूत्राची प्रवृत्ति करण्याकरिता त्या सूत्राला ज्यात वर्णांचा निर्देश केला आहे त्या माहेश्वरसूत्राची गरज आहे आणि अशा रीतीनें माहेश्वरसूत्रें 'हलन्त्यम्' या सूत्राचें अङ्ग ठरतात 'आदिरन्त्येन सहेता' या सूत्रातील 'अन्त्येन इता' या पदाचा अर्थ बोधित करणारें 'हलन्त्यम्' हें सूत्र असल्यामुळें, 'हलन्त्यम्' हें वाक्य 'आदिरन्त्येन सहेता' याचें अङ्गभूत ठरतें त्याचप्रमाणें, 'अणुदित्सवर्णस्य' या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'अण्' या पदाचा आणि तसेच 'नाज्झलौ' या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'अच्' व 'हल्' या पदाचा अर्थ बोधित करणारें 'आदिरन्त्येन सहेता' हें सूत्र असल्यामुळें, तें सूत्र त्या दोन्ही सूत्रांचें अङ्गभूत ठरतें तसेच 'अणुदित्सवर्णस्य' या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'सवर्ण' या पदाचा अर्थ बोधित करणारी 'तुल्यास्य प्रयत्नं सवर्णम्' व 'नाज्झलौ' हीं सूत्रें असल्यामुळें, ती दोन्ही सूत्रें 'अणुदित्सवर्णस्य' या सूत्राची अङ्गभूत ठरतात वर निर्दिष्ट केलेल्या सर्व सूत्रांचें जें एक महावाक्य तयार होतें त्यात 'अणुदित्सवर्णस्य' हें पोटवाक्य मुख्य आहे व बाकीच्या पोटवाक्यात परस्परामध्यें अङ्गाङ्गिभावसंबंध असून तीं सर्व पोटवाक्यें 'अणुदित्सवर्णस्य' या सूत्राचीं अङ्गभूत ठरतात.

जोंपर्यंत या अङ्गभूत सूत्राचा अर्थ निश्चित होत नाही तोपर्यंत 'अणुदित्सवर्णस्य' या मुख्य पोटवाक्याचा—सूत्राचा—अर्थ निश्चित होऊ शकत नाही तो अर्थ निश्चित होण्याकरिता, प्रथम वर्णोपदेश, नतर इत्सज्ञा, नतर प्रत्याहारसिद्धि, नतर सवर्णसज्ञा, आणि अखेरीस सवर्णांचे ग्रहण असा भाष्यकारानी क्रम आखून दिला आहे या क्रमावरून हे स्पष्ट होते की, प्रथम इत्सज्ञा झाल्यानतरच प्रत्याहार सिद्ध होऊ शकतात व त्या प्रत्याहाराच्या अर्थाचा बोध होऊ शकतो असा भाष्यकारानी क्रम मागितला असल्यामुळे, पाणिनीने 'हलन्त्यम्' या सूत्रात 'हल्' या पदाचा पूर्वी ज्ञात असलेल्या 'व्यञ्जन' या अर्थामध्यें उपयोग केला आहे हे मानणे अयोग्य ठरते पहिल्याने शिवसूत्रातील अन्त्य लकाराची इत्सज्ञा सिद्ध केल्यावर आणि नतर 'आदिरन्त्येन सहेता' या सूत्राच्या सहायाने 'हल्' प्रत्याहार साधल्यावरच, हल्' या पदाच्या अर्थाचा निश्चित बोध होऊ शकतो म्हणून द्वन्द्वसमास करतेवेळी 'हल् च ल् च' या द्वन्द्वसमासातील 'हल्' या प्रथम पदाच्या अर्थाचे निश्चित ज्ञान नसल्यामुळें आणि अशा रीतीने येथें सहविवक्षा नसल्यामुळे, तसा द्वन्द्वसमास करणे व तसे करून 'हलन्त्यम्' या सूत्राचा अर्थ करणे योग्य नाही आणि त्या सूत्राची द्विरावृत्ति करून जसा त्या सूत्राचा कौमुदीत अर्थ केला आहे तसाच अर्थ करणे इष्ट आहे हे शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचे तात्पर्य आहे वर सांगितलेला अर्थ दृढ करण्याच्या हेतूने शब्दरत्नकार पुढील पक्ति लिहितात ) पाणिनीने पदार्थबोध होण्याकरिता जी शक्तिग्रहोपायक सूत्र रचली आहेत ती सूत्रे त्याला त्या त्या पदाच्या अर्थाचे ज्ञान पूर्वी असल्याशिवाय रचणे असभवनीय असल्यामुळें, त्याला त्या पदाच्या अर्थाचे ज्ञान तशी सूत्रें रचण्यापूर्वी असलेच पाहिजे व त्याने त्याला पूर्वी ज्ञात असलेल्या अर्थामध्यें त्या पदाचा अष्टाध्यायीत उपयोग केला आहे असे मानल्यास, ज्या अर्थामध्यें त्या पदाचा पाणिनीने उपयोग केला आहे तो अर्थ बोधपाला—पाणिनीय सूत्राध्ययन

करणाऱ्याला–देखील उपदेशादिक्रमानें ज्ञान होऊं शकत असल्यामुळे, त्या पदाचा, म्हणजे 'हल्' इत्यादि पदाचा, अभिधाशक्तीने अर्थबोध होण्याकरिता पाणिनीनें जी ('आदिरन्त्येन सहेता' इत्यादि) शक्तिग्रहोपायक–अर्थबोध करून देणारी–सूत्रें रचण्याची खटपट केली आहे ती खटपट करून त्यानें अधिक काय मिळविलें, किंवा 'नाज्झलौ' या सूत्रात अठराहि प्रकारच्या अणाचे ग्रहण न व्हावे याकरिता भाष्यकारानी जे व्याख्यान केले आहे तें सुसंगत कसें ठरूं शकणार, या भयानें ('हल् च ल् च' असा द्वन्द्वसमास करून त्यायोगानें 'हलन्त्यम्' या सूत्राचा अर्थ करणाऱ्या द्वन्द्ववादी व्याख्यात्यानी) विचार करावा (साराश पाणिनीनें त्याच्या पूर्वी होऊन गेलेल्या प्राचीन वैयाकरणानी ज्या अर्थामध्यें 'हल्' इत्यादि पदाचा उपयोग केला आहे त्याच, त्याला पूर्वी ज्ञात असलेल्या, अर्थामध्यें अष्टाध्यायींत त्यानें उपयोग केला आहे असे मानल्यास, त्यानें जी शक्तिग्रहोपायक सूत्रें मुद्दाम रचली आहेत ती सर्व सूत्रे व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते व भाष्यकारांनी इतका सिद्ध ज्ञाल्यावरच प्रत्याहारसिद्धि करावी इत्यादि जा श्रम मागितला आहे तो श्रम निष्प्रयोजनक ठरण्याची आपत्ति येते ती आपत्ति टळण्याकरिता हे मानणे आवश्यक आहे की पाणिनीनें 'हल्' इत्यादि पदाचा पूर्वी ज्ञात असलेल्या अर्थामध्य उपयोग केला नसून, त्यानें जी शक्तिग्रहोपायक सूत्रें रचली आहेत ती सूत्रे प्रवृत्त केल्यानें पुढे निष्पन्न होणाऱ्या अर्थामध्येंच त्याचा उपयोग केला आहे असे मानलें म्हणजे, 'हल् च ल् च' असा द्वन्द्वसमास करतेवेळी त्या द्वन्द्वसमासानील प्रथम 'हल्' या पदाच्या अर्थाचे ज्ञान नसल्यामुळें व अशा रीतीनें सहविवक्षा नसल्यामुळे, तसा द्वन्द्वसमास करणें व त्यायोगानें 'हलन्त्यम्' या सूत्राचा अर्थ करणें साधु ठरत नाही हे उघड आहे ) वर सांगितलेल्या सर्व गोष्टी मनात धरूनच, दीक्षितानीं 'तस्माद्यथोक्तमेव न्याय्यम्' म्हणजे 'हलन्त्यम्' या सूत्राचा द्वन्द्ववादीनें जशा रीतीनें अर्थ केला आहे तशा रीतीनें

त्या सूत्राचा अर्थ न करिता त्या सूत्राची द्विरावृत्ति करून कौमुदीत जशा रीतीने त्या सूत्राचा अर्थ केला आहे तशाच रीतीने अर्थ करणे न्याय्य आहे असे मनोरमेंत म्हटले आहे

**मनोरमा– मध्यगानामिति। आद्यन्ताभ्यामवयवाभ्यामवयवी समुदाय आक्षिप्यते, तस्य च युगपल्लक्ष्ये प्रयोगाभावात्तदवयवेष्ववतरन्ती सञ्ज्ञा मध्यगेषु विश्राम्यति, न त्वाद्यन्तयोः, संज्ञास्वरूपान्तर्भाविण तयो पारार्थ्यनिर्णयादिति भावः। स्वस्य चेति। "स्वं रूपम्" इत्यनुवृत्तेः। स्व रूप चादेरेव गृह्यते नान्त्यस्य, अन्त्येनेत्यप्रधानतृतीयानिर्देशात्, सर्वनाम्नामुत्सर्गतः प्रधानपरामर्शित्वात्।**

('आदिरन्त्येन सहेता' सू २ या सूत्रात 'आदि' व 'अन्त्य' या दोन अवयववाचक शब्दाचा उपयोग केला असल्यामुळें व अवयव अवयवीशिवाय राहणे असभवनीय असल्यामुळें, 'येन विना यदनुपपन्न तत्तेनाक्षिप्यते' या न्यायान्वयें) आद्यन्त अवयवानी अवयवी जो समुदाय त्याचा आक्षेप होतो, म्हणजे त्याचे ग्रहण होते तशा सपूर्ण समुदायाचा कोणत्याहि उदाहरणात एकेचवेळी प्रयोग आढळणे अशक्य असल्यामुळें ('प्रत्येक वाक्यपरिसमाप्ति'– परि ११६ या न्यायान्वयें) अवयवाना लागू पडणारी ती सज्ञा समुदायातील मध्य वर्णानाच लागू पडते, म्हणजे आद्यन्त वर्णांना ती सज्ञा न होता त्या दोन वर्णांच्या मध्यें जे वर्ण असतात त्यानाच ती सज्ञा लागू पडते, कारण त्या आद्यन्त वर्णांचा सज्ञेचे रूप साधण्यामध्यें उपयोग करण्याकरिताच उच्चार केला असल्यामुळें व अशा रीतीने ते परार्थ ठरत असल्यामुळें, म्हणजे दुसऱ्याचा बोध करून देण्यातच उपयोगी पडत असल्यामुळें, ते सज्ञी होऊ शकत नाहीत (व सज्ञा सिद्ध करून देण्याचे आपले काम त्यानी करून दिल्यावर ते आद्यन्त वर्ण निवृत्त होतात व त्यामुळें मध्यवर्णच सज्ञी होतात 'इको यणचि' या सूत्रात 'इक्, यण्, अच्' या तीन प्रत्याहाराचा निर्देश केला आहे. जर त्या तीन

प्रत्याहारानी संपूर्ण इक्समुदाय, यण्समुदाय व अच्समुदाय याचे ग्रहण केले तर, कोणत्याहि उदाहरणात सर्व इकापुढे सर्व अच् येणे असंभवनीय असल्यामुळे, ते सूत्र कोठेहि उपयोगात आणता येणार नाही व व्यर्थ ठरण्याची आपत्ति येईल आणि म्हणूनच दीक्षितानी म्हटले आहे की, समुदायास संज्ञा न होता त्या समुदायाचे घटक जे वर्ण आहेत त्यापैकी आद्यन्त दोन वर्ण सोडून बाकीच्या प्रत्येक वर्णास ती संज्ञा होते पण अशा रीतीने समुदायातील आद्य अवयव जर वगळला तर, 'इक्' यातील इकारास इक् संज्ञा व 'अच्' यातील अकारास अच्संज्ञा होणार नाही व त्यामुळे इकारापुढे अकार आल्यास, इकाराचे जागी यकारादेश होणार नाही ही आपत्ति टळावी म्हणून दीक्षित म्हणतात की, 'आदिरन्त्येन सहेता' या सूत्रात) 'स्वं रूपं शब्दस्य' या पूर्व सूत्रातून 'स्वम्' हें पद अनुवृत्त होत असल्यामुळे, (त्या पदाचा 'स्वस्य' असा षष्ठीविभक्तीत विपरिणाम केल्याने) 'मध्यगाना स्वस्य च संज्ञा स्यात्' असे प्रकृत सूत्रावरील कौमुदीत म्हटले आहे (व तसा अनुवृत्तीमुळे वर दाखविलेली आपत्ति टळते. परंतु अशा रीतीने अनुवृत्ति केल्यास, जे दोन आद्यन्त वर्ण मिळून प्रत्याहार सिद्ध होतो, म्हणजे अच्, इक् इत्यादि संज्ञा सिद्ध होतात, त्या दोन्ही वर्णाचे 'स्वस्य' या शब्दाने ग्रहण होईल व त्यामुळे 'अच्' ही संज्ञा जशी आद्य अकारास होते तशी ती अन्त्य चकारास देखील होईल व चकार देखील अच् ठरण्याची आपत्ति येईल त्या आपत्तीचे निवारण करण्याकरिता दीक्षित म्हणतात की) 'स्वस्य' या अनुवृत्त पदाने सर्वेनीच आद्य वर्णाचेच ग्रहण होते, अन्त्य वर्णाचे ग्रहण होऊ शकत नाही, कारण 'आदिरन्त्येन सहेता' या प्रकृत सूत्रात 'अन्त्येन' असा अप्रधान तृतीयाविभक्तीचा निर्देश केला आहे व सर्वनामाने वाक्यातील प्रधान शब्दाचाच परामर्श होत असतो, म्हणजे ग्रहण करता येते, असा सामान्य नियम आहे (त्यामुळे 'स्वम्=स्वस्य' या सर्वनामाने 'आदिरन्त्येन सहेता' या सूत्रातील अप्रधानतृतीया-

विभक्तिनिर्दिष्ट अन्त्य वर्णाचे ग्रहण न होता, 'आदि' या प्रधान प्रथमाविभक्तिनिर्दिष्ट आद्य वर्णाचेच ग्रहण होते आणि म्हणून अच् इत्यादि प्रत्याहारानी 'च्' इत्यादि अन्त्य वर्णाचे ग्रहण होत नाही, व अशा रीतीने वर दाखविलेली आपत्ति टळते )

शब्दरत्न– आद्यन्ताभ्यामिति। अवयवत्वेन बोधकाद्यन्तशब्दाभ्यामित्यर्थ। तस्येति। समुदायस्य। तयो पारार्थ्येति। सञ्ज्ञास्वरूपबोधकतया शक्तिग्रहकाले एव तयो पारार्थ्यनिर्णयादित्यर्थ। परामर्शित्वादिति। वस्तुतो ज्ञापकादिनाऽस्यापि न सञ्ज्ञाकार्यम्, आद्यन्तशब्दाभ्यामाद्यन्तघटितसमुदायस्याक्षेपेणान्येषामिव तयो प्राप्ताया सञ्ज्ञाया प्रकारान्तरेणाशक्यवारणत्वात्। स्वशब्दानुवृत्तेश्च न फलम्। भाष्येऽपि एतत्फलितार्थकथनमेव स्वस्य च रूपस्येति। सञ्ज्ञा स्वरूपत्व विशिष्टस्यास्तु, प्रत्येक स्वबोध्यत्व चास्तु को विरोध। यथा "अचच घे" इत्यादौ गुणदर्शनेन घिशब्दस्यापि घिसञ्ज्ञाबोध्यत्व तद्वदेवाजादिसञ्ज्ञा स्वसञ्ज्ञिघटकेकारादिविवाकारचकारयोरपि प्राप्नोत्येव। किं च स्वशब्देन केवलान्त्यपरामर्शसम्भवेऽपि विशिष्टपरामर्शो न बाधकम्, तत्र समुदाये फलाभावादवयवयोर्विश्रान्ति प्राप्स्यति। तस्माज् ज्ञापकादिनैवान्त्यस्य तत्कार्यं वारणीयमित्यलम्।

मनोरमेतील 'आद्यन्ताभ्याम्' या शब्दातील 'आदि' व 'अन्त्य' या शब्दानी अवयववाचक आदि व अन्त्य वर्ण याचे ग्रहण होतें 'तस्य च युगपल्लक्ष्ये प्रयोगाभावात्' या मनोरमेच्या पक्तीतील 'तस्य' या पदाचा 'समुदायस्य' असा अर्थ आहे मनोरमेत 'तयो पारार्थ्यनिर्णयात्' असे जें म्हटल आहे त्याच कारण हें की, आद्यन्त वर्ण सज्ञेच्या स्वरूपाचे बोधक असल्यामुळें, म्हणज केवळ सज्ञा तयार करून दण्याच्या कामी त वण उपयोगी पडत असल्यामुळें, सज्ञेचा अर्थ करतेवळीच ते आद्यन्त वर्ण परार्थ आहेत असा निश्चित बोध होतो, (कारण 'सज्ञा सज्ञिन बोधयति न तु सज्ञाम्स्वरूपमपि' असा न्याय असल्यामुळें, अच् इक् इत्यादि शब्दानी सज्ञा तयार करून देणाऱ्या आद्यन्त वर्णाचे ग्रहण न होता केवळ मध्यग वर्णांचेच ग्रहण

होतें आद्य वर्णाचें जें ग्रहण होतें तें प्रकृत सूत्रांत 'स्वस्य' या पदाची अनुवृत्ति केल्यानेंच होतें. पण दीक्षितांनीं प्राचीन वैयाकरणांच्या मताला अनुसरून जें वर सांगितल्याप्रमाणें प्रकृत सूत्राचें व्याख्यान केलें आहे तें व्याख्यान शब्दरत्नकारास मान्य नसल्यामुळें, शब्दरत्नकार असें म्हणतात कीं, 'आदिरन्त्येन सहेता' या सूत्रांतील 'आदि' व 'अन्त्य' या अवयववाचक शब्दांनीं आद्यन्तवर्णघटित समुदायांतील प्रत्येक वर्णास संज्ञा प्राप्त होते व त्यामुळें ती जशी मध्यग वर्णांना होते तशीच आद्यन्त वर्णांना देखील होते ती संज्ञा आदि वर्णास होणें इष्ट असून, अन्त्य वर्णाला होणें इष्ट नाहीं म्हणून) वास्तविक ज्ञापकादिकांच्या आधारेंच आद्यन्तवर्णघटित समुदायांतील अन्त्य वर्णाला प्राप्त होणाऱ्या संज्ञेचें देखील निवारण केलें पाहिजे, कारण प्रकृत सूत्रांतील 'आदि' व 'अन्त्य' या शब्दांनीं तसा आद्यन्तवर्णघटित समुदायाचा आक्षेप होत असल्यामुळें, जशी ती संज्ञा मध्यग वर्णांना प्राप्त होते तशीच ती आद्यन्त वर्णांना देखील प्राप्त होते, आणि ज्याप्रमाणें इतर मध्यग वर्णांना, म्हणजे णकार, ककार इत्यादि इत्संज्ञक मध्यग वर्णांना, प्राप्त होणाऱ्या संज्ञेचें ज्ञापकाच्या आधारें निवारण केलें जातें त्याचप्रमाणें त्या दोन आद्यन्त वर्णांपैकीं अन्त्य वर्णाला प्राप्त होणाऱ्या संज्ञेचें निवारण ज्ञापकाखेरीज इतर कोणत्याहि उपायानें करणें शक्य नाहीं (अच् प्रत्याहारांत इत्संज्ञक मध्यग वर्ण जो ककार आहे त्याचें देखील प्रकृत सूत्रान्वयें ग्रहण होऊं पाहतें पण 'उपदेशेऽजनुनासिक इत्' या सूत्रांत 'अनुनासिक' या शब्दाचा निर्देश केला असल्यामुळें त्या निर्देशानें हें ज्ञापित होतें कीं, अच् प्रत्याहारानें इत्संज्ञक मध्यग वर्ण जो ककार आहे त्याचें ग्रहण होत नाहीं. तसें ग्रहण झालें असतें तर, ककारासहित अच् संज्ञा होऊन 'इको यणचि' सू ४७ या सूत्रान्वयें 'अनुनासिक' या स्थलीं 'सि' यांतील इकारापुढें ककार आला असल्यामुळें त्या इकाराचे जागीं यकारादेश झाला असता, व

'लोपो व्योर्वलि' सू ८७३ या सूत्रानें त्या यकाराचा लोप होऊन 'अनुनास्क' असे रूप झाले असते व पाणिनीने तशा रूपाचा त्या सूत्रात निर्देश केला असता परतु तशा रूपाचा निर्देश न करिता 'अनुनासिक' अशा रूपाचा पाणिनीनें निर्देश केला असल्यामुळें, त्या ज्ञापकाच्या आधारे 'प्रत्याहारेषु इता न ग्रहणम्' हे सिद्ध होते शब्दरत्नकार म्हणतात की, हें जसे ज्ञापकाच्या आधारे सिद्ध केले जाते त्याचप्रमाणे प्रत्याहारातील अन्त्य वर्णाला सज्ञा होत नाही हे देखील ज्ञापकाच्या आधारेच सिद्ध केले पाहिजे, कारण ज्ञापकाच्या आधाराशिवाय अन्त्य वर्णास प्राप्त होणाऱ्या सज्ञेचे इतर कोणत्याहि रीतीने निवारण करणे शक्य नाही व ते ज्ञापक 'एचोऽयवायाव' सू ६१ हे सूत्र मानता येते 'एच्' ही सज्ञा वास्तविक 'ए, ओ, ऐ, औ' या वर्णांना होते तो सज्ञा व तसेच 'अच' ही सज्ञा जर अन्त्य चकारास देखील होते असे मानले तर, त्या सूत्रातील 'एच' या पदात 'ए' च्या पुढें चकार आला असल्यामुळें त्या 'ए' च्या जागी त्या सूत्रान्वयें अयादेश झाला पाहिजे पण तसा अयादेश न करिता पाणिनीनें 'एच' असा निर्देश केला असल्यामुळें, त्या ज्ञापकाच्या आधारें हें ज्ञापित होते की, प्रत्याहारातील अन्त्य वर्णास त्या प्रत्याहाराने प्राप्त होणारी सज्ञा होत नाही सारांश प्रत्याहारातील अन्त्य वर्णाला प्राप्त होणाऱ्या सज्ञेचे निवारण करण्याकरिता 'तयोः पारार्थ्यनिर्णयात्' व 'सर्वतान्त उत्सर्गत प्रधानपरार्मित्वात्' असे जे दीक्षितानी मनोरमेत हेतु दिले आहेत ते बरोबर नसून, वर सांगितल्याप्रमाणे अन्त्य वर्णाला प्राप्त होणाऱ्या सज्ञेचे निवारण ज्ञापकाच्याच आधारे केले पाहिजे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे) प्रकृत सूत्रात दीक्षितानी 'स्व रूप शब्दस्य' या पूर्व सूत्रातून जी 'स्वम्' या शब्दाची अनुवृत्ति केली आहे तशी अनुवृत्ति करून कोणतेंहि अधिक फळ निष्पन्न होत नाही. (कारण समुदायघटक आद्यन्तवर्णांनीं जसे मध्यग वर्णांचे ग्रहण होते तसेच आद्यन्त वर्णांचे

देखील ते समुदायाचे अवयव असल्यामुळें ग्रहण होतेच. म्हणून आद्य वर्णांचे ग्रहण होण्याकरिता 'स्वं रूप शब्दस्य' या पूर्व सूत्रातून 'स्वम्' या शब्दाची अनुवृत्ति करण्याची काहीच गरज नाही असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. येथें अशी शंका करण्यात येते की, 'स्वस्य च रूपस्य' असें प्रकृत सूत्रावरील भाष्यात म्हटले असल्यामुळें त्यावरून हें स्पष्ट होते की, भाष्यकारानी प्रकृत सूत्रात पूर्व सूत्रातून 'स्वमस्वस्य' या पदाची अनुवृत्ति केली आहे. म्हणून तशी अनुवृत्ति न करिता शब्दरत्नात जसें व्याख्यान केलें आहे तसें व्याख्यान करणे भाष्य विरुद्ध ठरते या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, प्रकृत सूत्रावरील) भाष्यात देखील 'स्वस्य च रूपस्य' असे जें म्हटले आहे ते केवळ वर सांगितल्याप्रमाणें निष्पन्न होणाऱ्या अर्थाचेच प्रतिपादन करणारे वचन आहे (त्या भाष्यात १-१-७१ भाष्यकार म्हणतात – 'आदिरन्त्य इति सम्बन्धिशब्दावेतौ । तत्र सम्बन्धादेतद्‌गन्तव्य य प्रत्यादिरन्त्य इति च भवति तस्य ग्रहण भवति स्वस्य च रूपस्येति ।' या भाष्यावरून हें स्पष्ट होते की, भाष्यकारानी प्रकृत सूत्रात 'स्व रूप शब्दस्य' या सूत्रातून 'स्वम' या शब्दाची अनुवृत्ति केलो नाही व 'स्वस्य च रूपस्य' असे जे म्हटले आहे त्याचे कारण हेच की, समुदायातील आद्यन्त वर्णांनी जसे मध्यग वर्णांचे ग्रहण होते तसेंच आद्यन्त वर्णांचे देखील ग्रहण होते.) आद्यन्तवर्णयुक्त शब्द, म्हणजे अच्, इक् इत्यादि प्रत्याहार, सञ्ज्ञेचे स्वरूप आहे, म्हणजे सञ्ज्ञा आहे, व त्या सञ्ज्ञेने तशा आद्यन्त घटितवर्णसमुदायातील प्रत्येक वर्ण बोध्य आहे, म्हणजे त्या सञ्ज्ञेचा सञ्ज्ञी आहे, असे मानले तर कोणता विरोध येतो ? (अच्-प्रत्याहारान्तर्गत प्रत्येक वर्ण उद्देश्य ठरून 'अच्' ही वर्णानुपूर्वी विधेय ठरत असल्यामूळें आणि अशा रीतीनें उद्देश्य व विधेय भिन्न असल्यामुळे, प्रकृत स्थली अच् हेच उद्देश्य व अच् हेच विधेय आहे असे मुळीच म्हणता येत नाही व अशा प्रकारचा दोष येथें देता येत

नाही असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे ) ज्याप्रमाणे 'अच्च घे' सू २४७ इत्यादि स्थली 'घि' हा संज्ञावाचक शब्द असून त्याला गुण केला असल्यामुळे, 'घि' हा शब्द देखील 'घि' या संज्ञेने बोध्य होतो, म्हणजे त्या संज्ञेचा संज्ञी होतो त्याचप्रमाणे अच् इत्यादि संज्ञा जशी त्या संज्ञेने बोधित होणाऱ्या अच्प्रत्याहारान्तर्गत-वर्णसमुदायरूप संज्ञीचे इकारापासून औकारापर्यंत जे अवयवरूप *मध्यग वर्ण आहेत त्याना लागू पडते तशीच ती अकार व चकार या आद्यन्त वर्णांना* देखील लागू पडतेच (*सारांश अच्प्रत्याहाराचे* इकारापासून औकारापर्यंत जे मध्यग वर्ण आहेत तेवढेच वर्ण अच्संज्ञेचे संज्ञी ठरत नसून आद्यन्त अकार व चकार हे संज्ञा साधून देणारे वर्ण देखील त्या संज्ञेचे संज्ञी ठरतात ) दुसरे असे की, जरी 'स्व' या सर्वनामशब्दाने केवळ अन्त्य वर्णाचे ग्रहण होणे असंभवनीय आहे तरी त्या सर्वनामाने अच या आद्यन्तवर्णविशिष्ट समुदायाचे ग्रहण होण्यास कोणताहि प्रत्यवाय येत नाही समुदायाला तशी संज्ञा केल्याने कोणतेहि फल निष्पन्न होत नसल्यामुळे, त्या समुदायाच्या अवयवाना, म्हणजे आद्यन्त व मध्यग वर्णांना, ती संज्ञा होते म्हणून त्या समुदायातील अन्त्य वर्णाला प्राप्त होणाऱ्या त्या संज्ञेचे निवारण शास्त्रकारांच्या आधारेच केले पाहिजे या विषयासंबंधाने एवढे पुरे ('अवयवेष्ववतरन्ती संज्ञा मध्यगेषु विश्राम्यति...उत्सर्गेण प्रधान-परामर्शित्वात' असे जे मनोरमेत दीक्षितानी म्हटले आहे त्याचे खण्डन करण्याकरिता 'वस्तुतो ज्ञापकादिनाऽप्याप्ति न संज्ञार्थम्... वारणीयमित्यलम्' या पंक्ति शब्दरत्नकारानी लिहिल्या आहेत व शब्देन्दुशेखरात नागेशभट्टानी प्रकृत सूत्रावरील टीकेत याच मताचा अनुवाद केला आहे त्या ग्रन्थात नागेशभट्ट म्हणतात-'अनाद्यन्ता-भ्यामसत्यन्तेन बोधकाभ्या स्वघटित समुदाय आक्षिप्त संज्ञी, तस्य चैकस्य स्वस्य प्रयोगाभावात्प्रत्येक संज्ञित्वम्। अन्त्यस्य तु न तत्कार्यम्, तस्येतसंज्ञालोपाभ्यामपहारात्। एतदर्थमितरयत्नमेव भाष्ये, मूले च-

स्वस्य च रूपस्येति । स्वमित्यनुवृत्तिपरत्वेन व्याख्यानन्तु हेयमेव, अनुवृत्तौ फलाभावात् ।' दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, ज्याला संज्ञा केली जाते तें उद्देश्य असून व संज्ञा हे विधेय असून, वाक्यात उद्देश्य व विधेय एकच नसावीत व भिन्न असली पाहिजेत असा नियम असल्यामुळें, ज्याप्रमाणे 'घटो घट, दण्डवान् दण्डवान्' इत्यादि प्रयोग साधु ठरत नाहीत त्याचप्रमाणे 'अच् अच् स्यात्' हा प्रयोग देखील साधु ठरत नाही, कारण या वाक्यात 'अच्' हे उद्देश्य असून 'अच्' हेच विधेय आहे व उद्देश्य आणि विधेय एकच असणे हे शास्त्रनियमाविरुद्ध आहे सारांश दीक्षितांच्या मताप्रमाणे संज्ञा ही कधीहि संज्ञी होऊ शकत नाही उदाहरणार्थ 'तरप्तमपौ घ' सू २००३, 'दाधा घ्वदाप्' सू २३७३ इत्यादि सूत्रांनी होणाऱ्या 'घ, घु' या संज्ञांचे 'घ, घु' हे केव्हाहि संज्ञी होऊ शकत नाहीत आणि त्याचप्रमाणे 'अच्' या संज्ञेचा देखील 'अच्' हाच संज्ञी होऊ शकत नाही 'अच्' ही संज्ञा प्रकृत सूत्रान्वयें अकार व चकार या दोन आद्यन्त वर्णांनी बनली आहे व या संज्ञेचा जरी अच् प्रत्याहारान्तर्गत अकारापासून चकारापर्यंत वर्णसमुदायातील प्रत्येक वर्ण, 'प्रत्येकं वाक्यपरिसमाप्ति' या न्यायान्वयें संज्ञी ठरू शकतो तरी, अकार व चकार हे आद्यन्त वर्ण संज्ञा तयार करून देण्यात खर्ची पडल्यामुळें, ते दोन वर्ण माठरपरिवेषणन्यायान्वयें 'अच्' या संज्ञेचे संज्ञी होऊ शकत नाहीत व त्या प्रत्याहारातील अवशिष्ट मध्यग वर्णच त्या संज्ञेचे संज्ञी होऊ शकतात. 'सर्वे ब्राह्मणा भोज्यन्तां, माठरकौण्डिन्यौ परिवेविषाताम्' हा माठरपरिवेषणन्याय होय 'सर्व ब्राम्हणांना जेवू घालावे' या वाक्यात माठर व कौण्डिन्य हे ब्राम्हण असल्यामुळें जरी त्यांचा समावेश होतो तरी, त्यांच्याकडे वाढण्याचें काम सोपविलें असल्यामुळें जसे ते ब्राम्हणांच्या पंक्तीत भोजनास बसू शकत नाहीत त्याचप्रमाणे संज्ञा तयार करून देण्यास गुंतलेले व खर्ची पडलेले आद्यन्त अकार व चकार हे वर्ण 'अच्' या संज्ञेचे संज्ञी होऊ

शकत नाहीत व मध्यग वर्णांनाच ती सज्ञा होते. 'वृद्धिरादैच्' १-१-१ या सूत्रावरील भाष्यात देखील भाष्यकारानी असे म्हटले आहे की, 'न च सज्ञाया निवृत्तिरुच्यते। स्वभावत सज्ञा सज्ञिन प्रत्याय्य निवर्तन्ते। तेनानुबन्धानामपि निवृत्तिर्भविष्यति' या भाष्याचा अर्थ असा आहे की, सज्ञेची निवृत्ति कोठेहि सागितली जात नाही सज्ञा ही स्वभावत च सज्ञीचे ज्ञान करून दिल्यावर नाहीशी होते. या नियमानुसार अनुबन्ध देखील सज्ञीचे ज्ञान झाल्यावर आपोआपच नाहीसे होतील या भाष्यानुसार 'अच्' ही सज्ञा सज्ञीचा बोध करून दिल्यावर नाहीशी झाली असता, ज्या आद्यन्त वर्णांनी ती सज्ञा तयार झाली आहे ते नाहीसे होणार आणि मग त्या दोन आद्यन्त वर्णांना ती सज्ञा कशी होणार व त्या सज्ञेचे ते कसे सज्ञी ठरू शकणार? परतु प्रत्याहारातील आद्य वर्णाला तर सज्ञा होणे इष्ट आहे, व त्याला ती सज्ञा होण्याकरिता 'स्व रूप शब्दस्य' या पूर्व सूत्रातून 'स्वम्= स्वस्य' या पदाची अनुवृत्ति करणे आवश्यक आहे त्या अनुवृत्त केलेल्या 'स्वस्य' या सर्वनामसज्ञक पदाने प्रकृत सूत्रातील प्रथमा-विभक्तिनिर्दिष्ट 'आदि' या पदाचेच ग्रहण होते व अप्रधान तृतीयाविभक्तिनिर्दिष्ट 'अन्त्येन' या पदाचे ग्रहण होऊ शकत नाही व त्यामुळे प्रत्याहारातील आद्य वर्णाला सज्ञा होते व अन्त्य वर्णाला ती सज्ञा होत नाही असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे हे पूर्वी सागितलेच आहे हे दीक्षिताचे मत शब्दरत्नकारास मान्य नाही. व शब्दरत्नकार असे म्हणतात की, सज्ञा केव्हाहि सज्ञी होऊ शकत नाही असे जे दीक्षिताचे म्हणणे आहे ते बरोबर नाही, कारण 'शेषो घ्यसखि' सू २४३ या सूत्राने ह्रस्व इकारान्त व उकारान्त शब्दाना जशी घिसज्ञा होते तशीच ती 'घि' या सज्ञाबोधक ह्रस्व इकारान्त शब्दाला देखील होते त्या शब्दाला ती सज्ञा झाली नसती तर, 'अच्च घे' सू २४३ या सूत्रात 'घेर्ङिति' सू २४५ या सूत्राने होणारा गुण पाणिनीने 'घि' यातील अन्त्य इकाराम केला नसता.

सारांश 'अच्च घे' या सूत्रात 'घे' असा निर्देश असल्यामुळें, संज्ञाबोधक शब्द केव्हांहि संज्ञी होऊं शकत नाहीं हे दीक्षितांचे म्हणणे बरोबर मानता येत नाहीं आणि त्याप्रमाणे अच् संज्ञा तयार करून देणारे अकार व चकार हे आद्यन्त वर्ण 'अच्' या संज्ञेचे संज्ञी ठरू शकत नाहींत हे म्हणणें देखील स्वीकारतां येत नाहीं प्रकृत स्थळीं अच् ही वर्णानुपूर्वी संज्ञा–विधेय–असून अच्प्रत्याहारान्तर्गत प्रत्येक वर्ण संज्ञी–उद्देश्य–आहे आणि अशा रीतीनें संज्ञा व संज्ञी–विधेय व उद्देश्य–येथें भिन्न आहेत हे पूर्वी सिद्ध केलेंच आहे म्हणून प्रत्याहारातील आद्य वर्णास अशा रीतीने संज्ञा होत असल्यामुळें, त्याला ती संज्ञा प्राप्त करून देण्याकरितां प्रकृत सूत्रात 'स्वम् स्वस्य' या पदाची अनुवृत्ति करण्याची काहींच गरज नाहीं दुसरें असें कीं, प्रकृत सूत्रात 'स्वम् स्वस्य' या पदाची अनुवृत्ति केली तरी, जरी 'स्वस्य' या सर्वनामसंज्ञक शब्दाने प्रत्याहारातील केवळ अन्त्य वर्णाचे ग्रहण होऊं शकत नाहीं तरी त्या शब्दाने प्रत्याहार बोधक वर्णसमुदायाचे ग्रहण होण्यास कोणताहि बाध येत नाहीं, म्हणजे 'अच्' या संज्ञेतील, 'स्वस्य' या पदानें, जरी केवळ अन्त्य चकाराचा परामर्श होऊं शकत नाहीं तरी त्या सर्वनामसंज्ञक शब्दानें 'अच्' या समुदायाचे ग्रहण होण्यास कोणताहि प्रत्यवाय येत नाहीं आणि 'अच्' या संज्ञेनें अकारापासून चकारापर्यंत असलेला वर्णसमुदाय बोधित होत असल्यामुळें व पूर्वी सांगितल्याप्रमाणे समुदायाला संज्ञा करून कोणतेंहि फल निष्पन्न होत नसल्यामुळें, ती संज्ञा त्या समुदायातील प्रत्येक वर्णाला 'प्रत्येकं वाक्यपरिसमाप्ति' या न्यायान्वयें होते आता हें खरें कीं, 'अच्' ही संज्ञा जशी आद्य वर्णाला व मध्यग वर्णांना होते तशी ती अन्त्य वर्णाला देखील होऊं शकते कारण तो वर्ण देखील आद्य व मध्यग वर्णांसारखा समुदायाचा अवयव आहेच परंतु प्रत्याहारातील अन्त्य वर्ण 'हलन्त्यम्' या सूत्रान्वयें इत्संज्ञक असल्यामुळें व 'तस्य लोप' या सूत्रानें त्याचा

अवश्य लोप होणार असल्यामुळें त्या अन्त्य वर्णाला पूर्वी सांगितलेल्या ज्ञापकान्वयें ती संज्ञा होत नाही म्हणून दीक्षिताचें म्हणणें स्वीकारार्ह नाही असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे )

मनोरमा– आद्योच्चारणमिति । यद्यपि 'उपदिश्यतेऽनेन' इति करणव्युत्पत्त्या शास्त्रमुपदेश इति भाष्यवृत्त्यादिषु व्याख्यातम्, तथापि तत्प्रौढिवादमात्रम्, करणे घञो दुर्लभत्वात्, ल्युटा बाधात् । न च घ , असंज्ञात्वात । 'प्रायेण संज्ञायाम्' इति व्याख्यानस्य विलिष्टत्वात्, न ह्युपाधेरुपाधिर्भवतीत्यादिना भाष्यकृताऽवहेलनाच्च । अत एव घापवाद "हलश्च" इति घञपीह न । बाहुलक स्वगतिकगति । अत एव 'प्रक्रियन्ते शब्दा याभि ' इति करणव्युत्पत्तिरपि परास्ता । तथा च वार्तिकम् "अजब्भ्या स्त्रीखलना स्त्रिया खलनौ विप्रतिषेधेन" इति । अनो भावे एव प्रत्ययो न्याय्य इति भाव ।

('आदिरन्त्येन सहेता' सू २ या सूत्रावरील कौमुदीत 'उपदेश आद्योच्चारणम्' असं जें म्हटले आहे त्यातील 'उपदेश' या स्थली 'आद्य' या अर्थाच्या वाचक 'उप' या उपसर्गपूर्वक उच्चारण-क्रियार्थक 'दिश्' धातूहून 'भावे' सू ३१८४ या सूत्राने 'सिद्धावस्था-पन्नक्रिया'–पूर्ण झालेली क्रिया–या अर्थामध्यें घञ् प्रत्यय झाला असल्यामुळें) 'उपदेश' या शब्दाचा 'आद्योच्चारण'–उपदेशन–असा अर्थ होतो जरी भाष्य, काशिकावृत्ति इत्यादि ग्रन्थात 'उपदिश्यते अनेन' अशा रीतीने 'करणे घञ्' प्रत्यय करून 'उपदेश' या शब्दाचा 'शास्त्र', म्हणजे सूत्रपाठ धातुपाठ वगैरे, असा अर्थ केला आहे तरी ती केवळ प्रौढोक्ति होय, म्हणजे ती सिद्धान्तोक्ति समजू नये, कारण 'उपदेश' या स्थली 'करणे' या अर्थामध्यें घञ् प्रत्यय होणें दुर्लभ–अशक्य–आहे ('भावे' या सूत्राने 'सिद्धावस्थापन्न क्रिया' या अर्थामध्येंच घञ् प्रत्यय होऊ शकतो इतर अर्थामध्यें घञ् प्रत्यय होण्याकरिता 'अकर्तरि च कारके संज्ञायाम्' सू ३१८६ व 'हलश्च' सू ३३०० ही दोन सूत्रें आहेत या दोन्ही

सूत्रानी संज्ञेच्या विषयात, म्हणजे जेथें घञ्प्रत्ययान्त शब्द संज्ञावाचक होत असेल तशाच ठिकाणी, घञ् प्रत्यय होऊ शकतो 'उपदेश' हा शब्द संज्ञावाचक नसल्यामुळें, या स्थली त्या वरील दोन सूत्रांनी घञ् प्रत्यय होऊ शकत नाही 'अकर्तरि च कारके संज्ञायाम्' सू ३-३-१९ या सूत्रावरील भाष्यात 'संज्ञाग्रहणानर्थक्यं च, सर्वत्र घञो दर्शनात्' हे वार्तिक पठित करून भाष्यकारानी असे म्हटल आहे की, त्या सूत्रात 'संज्ञायाम्' हे पद असण्याची काही आवश्यकता नाही हा पक्ष मानल्यास, 'अकर्तरि च कारके' या सूत्राने, संज्ञा वाच्य नसून देखील, कर्तृभिन्न कोणत्याहि कारकाच्या अर्थामध्यें घञ् प्रत्यय होऊ शकतो हे खरे परंतु पुढें 'करणाधिकरणयोश्च' सू ३२९३ हे ल्युट्प्रत्ययविधायक सूत्र असल्यामुळें, अकर्तरि च कारके' या सूत्रान 'करण' व 'अधिकरण' या कारकाच्या अर्थामध्यें होणान्या घञ् प्रत्ययाचा त्या) ल्युट्न बाध होतो ('पुंसि संज्ञायां घ प्रायेण' सू ३२९६ या सूत्राने 'उपदेश' या स्थली) 'घ' प्रत्यय होऊ शकत नाही, कारण (त्या सूत्रात 'संज्ञायाम्' हे पद असल्यामुळें घप्रत्ययान्त शब्द संज्ञावाचक होत असल्यासच, 'घ' प्रत्यय होऊ शकतो परंतु) 'उपदेश' हा शब्द संज्ञावाचक नसल्यामुळ 'घ' प्रत्यय होऊ शकत नाही ('पुंसि संज्ञायां घ प्रायेण' या सूत्रात) 'प्रायेण संज्ञायाम्' असा अन्वय करणे क्लिष्ट–अयोग्य–आहे आणि भाष्य-कारानी 'न ह्युपाधेरुपाधिर्भवति' इत्यादि व्याख्यान करून तशा प्रकारचा–'प्रायेण संज्ञायाम्' अशा तऱ्हेचा–अन्वय करण्याचे प्रत्या-ख्यान केले आहे ('उपदेशेऽजनुनासिक इत्' १–३–२ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी असेच वरप्रमाणे म्हटले आहे भाष्यकार म्हणतात– 'उपदेश इति घञयं करणसाधन । न सिध्यति । परत्वाल्ल्युट् प्राप्नोति । न ब्रूमोऽकर्तरि च कारके संज्ञायामिति । किंतर्हि ? । हलश्चेति । तत्रापि संज्ञायामिति वर्तते, न चैषा संज्ञा । प्रायवचनादसंज्ञायामपि भविष्यति । प्रायवचनात्संज्ञायामेव

स्याद्वा न वा, न ह्युपाधेरुपाधिर्भवति विशेषणस्य वा विशेषणम् ।... एवं च कृत्वा घञ् न प्राप्नोति । एवं तर्हि कृत्यल्युटो बहुल-मित्ययमत्र घञ् भविष्यति ।' या भाष्यातील 'न ह्युपाधेरुपाधि-र्भवति' या न्यायाचा असा अर्थ आहे की, प्रधान शब्दाच्या अर्थामध्यें अन्वय होणें संभवत असता, वाक्यातील अप्रधान शब्दाच्या अर्थाचा दुसऱ्या अप्रधान शब्दाच्या अर्थाशी अन्वय होऊ शकत नाही 'पुंसि संज्ञायां घ प्रायेण' या सूत्रात 'संज्ञायाम्' व 'प्रायेण' हे दोन्ही अप्रधान शब्द असल्यामुळें, त्यांचा परस्पराशी अन्वय होऊ शकत नाही व त्या सौत्रवाक्यात 'घ' हें जें विधेय प्रधान आहे त्याशीच 'प्रायेण' या पदाचा अन्वय करणे योग्य असून, 'संज्ञायाम्' या अप्रधान पदाशी अन्वय करणे योग्य नाही म्हणून बहुधा संज्ञा वाच्य असता 'घ' प्रत्यय होतो असा त्या सूत्राचा अर्थ न करितां, संज्ञा वाच्य असल्यास बहुधा 'घ' प्रत्यय होतो असाच त्या सूत्राचा अर्थ करणे उचित आहे) 'उपदेश' हा शब्द संज्ञावाचक नसल्यामुळेंच, 'घ' प्रत्ययाचें अपवादक 'हलश्च' सू ३३०० हें जें सूत्र आहे त्या सूत्रानें देखील 'घञ्' प्रत्यय होऊ शकत नाही (कारण त्या सूत्रात 'संज्ञायाम्' हे पद अनुवृत्त असल्यामुळें व 'उपदेश' हा शब्द संज्ञावाचक नसल्यामुळें, त्या सूत्रानें होणारा 'घञ्' प्रत्यय 'उपदेश' या स्थली होऊ शकत नाही सारांश उपदेश' हा शब्द संज्ञावाचक नसल्यामुळें, जसा 'पुंसि संज्ञायाम्' या सामान्य सूत्रानें होणारा 'घ' प्रत्यय होऊ शकत नाही त्याचप्रमाणें 'हलश्च' या अपवादक सूत्रानें होणारा 'घञ्' प्रत्यय देखील होऊ शकत नाही) 'कृत्यल्युटो बहुलम्' सू २८४१ या सूत्रानें (त्या सूत्रात 'बहुलम्' हे पद असल्यामुळें वाटेल त्या कारकाच्या अर्थामध्यें व तसेच 'भावे' या अर्थामध्यें व संज्ञा वाच्य नसतांना देखील) होणारा बाहुलक ल्युट् प्रत्यय अशाच ठिकाणी केला जातो की, जेथें गत्यन्तर नाही, म्हणजे, जेथें इतर कोणतेंहि सूत्र लागू पडत नाही (परंतु प्रकृत स्थली 'भावे' सू. ३१८४ हे सूत्र लागू पडत असल्यामुळ, 'कृत्यल्युटो बहुलम्' या सूत्रानें

होणारा प्रत्यय करणे उचित नाही. यासंबंधी वर सांगितलेल्या सर्व कारणांमुळें, 'उपदेश' या स्थली वर जी सूत्रें निर्दिष्ट केली आहेत त्या सूत्रान्वयें प्रत्यय न करिता, 'भावे' या सूत्रानेंच सिद्धावस्थापन्न-क्रिया या अर्थामध्यें 'घञ्' प्रत्यय करणे योग्य आहे. 'कृञः श च' सू. ३२७७ या सूत्रानें होणारा 'श' प्रत्यय देखील 'भावे' या अर्था-मध्येंच होत असल्यामुळें) 'प्रक्रियन्ते शब्दा याभिः' अशा रीतीनें 'करणे' या अर्थामध्यें 'श' प्रत्यय करून 'प्रक्रिया' या शब्दाची जी व्युत्पत्ति केली आहे ती चूक ठरते ('श्रीमद्विठ्ठलमानम्य पाणि-न्यादिमुनीन् गुरून्। प्रक्रियाकौमुदीं कुर्मः पाणिनीयानुसारिणीम् ॥' या प्रक्रियाकौमुदीतील आद्य श्लोकाच्या द्वितीयार्धात 'प्रक्रिया-कौमुदीम्' हें जें पद आहे त्यातील 'प्रक्रिया' या शब्दाचें व्याख्यान करितांना प्रसादकारांनी 'प्रक्रियन्ते प्रकृतिप्रत्ययविभागेन व्युत्पाद्यन्ते शब्दा आभिस्ताः प्रक्रिया' असें 'कृञः श च' या सूत्रान्वयें 'करणे' या अर्थामध्यें 'श' प्रत्यय करून व्युत्पत्ति केली आहे. दीक्षित म्हणतात कीं, 'करणे' या अर्थामध्यें 'श' प्रत्यय होऊं शकत नसून 'भावे' या अर्थींच तो प्रत्यय होऊं शकतो, व त्यामुळें प्रसादकारांनी जी 'प्रक्रिया' शब्दाची वर सांगितल्याप्रमाणे व्युत्पत्ति केली आहे ती चूक ठरते ) याच अर्थाचें पुढील वार्तिक आहे–'अजब्भ्यां स्त्रीखल्नाः स्त्रिया खलनौ विप्रतिषेधेन'—('ईषद्दुःसुषु कृच्छ्राकृच्छ्रार्थेषु खल्' ३-३-१२६ या सूत्रावरील भाष्यांत 'अजब्भ्यां स्त्रीखल्नाः' व 'स्त्रिया खलनौ विप्रतिषेधेन' हीं दोन वार्तिकें पठित केलीं आहेत. प्रथम वार्तिकाचा अर्थ असा आहे कीं, 'स्त्रियां क्तिन्' या सूत्रातील 'स्त्रियाम्' हा अधिकार ज्यांना लागू आहे असे धातूहून होणारे प्रत्यय व तसेच 'खल्' आणि 'अन' हे प्रत्यय 'अच्' व 'अप्' या प्रत्ययांचे विप्रतिषेधानें बाधक होतात. द्वितीय वार्तिकाचा अर्थ असा आहे कीं, 'स्त्रियां क्तिन्' या सूत्रातील 'स्त्रियाम्' हा अधिकार ज्यांना लागू पडतो अशा धातूहून होणाऱ्या स्त्रीप्रत्ययाचे 'खल्' व

'अन' हे प्रत्यय विप्रतिषेधाने बाधक होतात म्हणून 'कृञ श च' या सूत्राला वरील 'स्त्रियाम्' हा अधिकार लागू पडत असल्यामुळें, त्या सूत्रात करणे या अर्थामध्यें 'श' प्रत्यय करता येत नाही, कारण त्या अर्थात होणाऱ्या 'स्त्रियाम्' या अधिकारात पठित असलेल्या 'श' या प्रत्ययाचा 'करणाधिकरणयोश्च' सू ३२९३ या सूत्राने होणारा 'ल्युट्=अन' प्रत्यय वरील वार्तिकान्वयें बाधक ठरतो त्यामुळें 'प्रक्रिया या स्थली 'भावे' या अर्थामध्येंच 'श' प्रत्यय करणे योग्य आहे असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे) म्हणून वर सांगितलेल्या सर्व कारणामुळें, 'उपदेश' या स्थली 'भावे' या अर्थामध्येच 'घञ्' प्रत्यय करणे न्याय्य आहे (व त्या अर्थामध्यें 'घञ्' प्रत्यय केला असता 'उपदेश' या पदाचा करणव्युत्पत्तीने होणारा 'शास्त्र' असा अर्थ न होता, 'आद्योच्चारण'–उपदेशन–असा अर्थ होतो)

शब्दरत्न– भाष्येति । तत्र हि 'उपदेश इति किम्, अभ्र आँ अप, प्रत्यक्षमाख्यानमुपदेशो, गुणै प्रापणमुद्देश " इति "नासावुपदेश" इत्युक्त्वोपदेशोद्देशयोर्लोकव्यवहारेण सङ्कीर्णत्वमाशङ्कय "उपदेशेऽजनुनासिक" इति वार्तिककृद्दर्शितन्यासस्य खण्डनाय "उपदेश इति करणे घञुपदिश्यतेऽनेन" इत्युक्तम् । तच्च शास्त्रम्=शासनकरणम्, प्रत्यासत्त्यैतच्छास्त्रीयधात्वागमप्रातिपदिकप्रत्याहारसूत्रप्रत्ययादेशरूपम् ।

प्रौढिवादमात्रमिति । वार्तिककृदुक्तन्यासीयार्थस्य कथंचित्सूत्रतोऽपि लाभसम्भवात् न्यासान्तरप्रवृत्तिस्ते वृथैवेति प्रौढ्या बोधयितुमेव वाद इति भाव.।

ज्या भाष्याचा मनोरमेंत उल्लेख केला आहे त्या भाष्यात, म्हणजे 'उपदेशेऽजनुनासिक इत्' १–३–२ या सूत्रावरील भाष्यात, भाष्यकारांनी असा प्रश्न केला आहे की, त्या सूत्रात 'उपदेश' हे पद का घातले आहे व त्या प्रश्नाचे उत्तर देताना त्यांनी असे म्हटले आहे की, 'अभ्र आँ अप' या स्थली 'आँ' या अनुनासिकाला

इत्संज्ञा होऊ नये यावरिता त्या सूत्रात ते पद घातले आहे ज्याचे प्रत्यक्ष उच्चारण केले जाते त्याला 'उपदेश' म्हणतात व ज्याचे प्रसिद्ध धर्म सांगून तसा धर्मानी–गुणानी–बोध केला जातो त्याला 'उद्देश' म्हणतात असे असल्यामुळे 'अग्न आँ अप.' यातील 'आँ' याला उपदेश म्हणता येत नाही. (भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, 'आङोऽनुनासिकश्छन्दसि' सू ३५७५ या सूत्राने 'आङ' चे जागी होणारा अनुनासिक 'आँ' हा आदेश इत्संज्ञक होत नाही. 'आङो आँ छन्दसि' असे सूत्र करून त्या सूत्रात 'आँ' असे प्रत्यक्ष अनुनासिकरूपाने उच्चारण केले असते तर 'आँ' इत्संज्ञक ठरला असता; पण तसे अनुनासिकरूपाने प्रत्यक्ष उच्चारण न करिता, अनुनासिक या गुणाने–धर्माने–विधान केले असल्यामुळे 'आँ' याला इत्संज्ञा होऊ शकत नाही ) असे सांगून, लौकिक व्यवहारात 'उपदेश' या शब्दाचे जागी 'उद्देश' या शब्दाचा प्रयोग व 'उद्देश' या शब्दाचे जागी 'उपदेश' या शब्दाचा प्रयोग असा उलट प्रकारचा प्रयोग देखील भार्येन रूढ असल्यामुळे या संकीर्ण व्यवहारामुळे 'उपदेश' या शब्दाने उद्देशाचे ग्रहण होण्याचा संभव आहे ही शंका मनात धरून तसे होऊ नये यावरिता वार्तिककाराने 'उपदेशेऽजनु-नासिक इत्' या सूत्राऐवजी 'उपदेशनेऽजनुनासिक इत्' असे सूत्र पठित करावे असे जे म्हटले आहे त्याचे खण्डन करण्याच्या हेतूने 'उपदिश्यते अनेन' अशा रीतीने 'करणे' या अर्थामध्ये 'घञ्' प्रत्यय केला असता 'उपदेश' हा शब्द सिद्ध होऊ शकतो (व प्रकृत सूत्रात 'उपदेशे' या पदाऐवजी 'उपदेशने' हे पद घालण्याची काही गरज नाही) असे भाष्यकारानी पुढे म्हटले आहे. ते उपदेशाचे करण–साधन–शास्त्र होय आणि प्रत्यासत्तिन्यायाने, म्हणजे चर्चेचा जो विषय प्रकृत आहे तदनुसार, पाणिनीय शास्त्रात सांगितलेले धातु, आगम, प्रातिपदिक, प्रत्याहार, सूत्र, प्रत्यय व आदेश ही ते शास्त्र होत. ('अग्न आँ अप ' या वैदिक प्रयोगातील

'ओं' हा अनुनासिक अच् उपदेश नसून उद्देश असल्यामुळें, त्याला इत्संज्ञा होत नाही असें सांगतेवेळी भाष्यकारांनी 'प्रत्यक्षमाख्यानमुपदेश', गुणैः प्रापणमुद्देश ' अशी उपदेश व उद्देश या दोन शब्दांची व्याख्या सांगितली आहे, व या दोन व्याख्यांचे विवरण करिताना भाष्यकार म्हणतात–'प्रत्यक्ष तावदाख्यानमुपदेश । तद्यथा, अगोज्ञाय कश्चिद्गां सक्थनि कर्णे वा गृहीत्वोपदिशति, अयं गौरिति । स प्रत्यक्षमाख्यातमाह, उपदिष्टो मे गौरिति । गुणैः प्रापणमुद्देश । तद्यथा, कश्चित् कञ्चिदाह, देवदत्त मे भवानुद्दिशतु इति । स इहस्थ पाटलिपुत्रस्थ देवदत्तमुद्दिशति, अङ्गदी कुण्डली किरीटी व्यूढोरस्को वृत्तबाहुर्लोहिताक्षस्तुङ्गनासो विचित्राभरण ईदृशो देवदत्त इति । स गुणैः प्राप्यमाणमाह, उद्दिष्टो मे देवदत्त इति ।' पण पुढें भाष्यकार त्या भाष्यात अशी शंका उपस्थित करतात व असें म्हणतात की, 'सङ्कीर्णावुद्देशोपदेशौ । प्रत्यक्षमाख्यानमुद्देशो गुणैश्च प्रापणमुपदेश । प्रत्यक्ष तावदाख्यानमुद्देश । तद्यथा, कश्चित् कञ्चिदाह अनुवाक मे भवानुद्दिशतु इति । स तम्मायाचष्टे, इषेत्वकमधीष्व शन्नादेवीयकमधीष्वेति । स प्रत्यक्षमाख्यातमाह, उद्दिष्टो मेऽनुवाकस्तमध्येष्ये इति । गुणैश्च प्रापणमुपदेश । तद्यथा, कश्चित् कञ्चिदाह, ग्रामान्तरं गमिष्यामि पन्थानं मे भवानुपदिशतु इति । स तस्मायाचष्टे, अमुष्मिन्नवकाशे हस्तदक्षिणो ग्रहीतव्योऽमुष्मिन् हस्तवाम इति । स गुणैः प्राप्यमाणमाह, उपदिष्टो मे पन्था इति ।' म्हणून संकीर्ण व्यवहारामुळें उत्पन्न होणाऱ्या या संदेहाच्या निवारणार्थ, म्हणजे उपदेशाने उद्देशाचे ग्रहण न व्हावे याकरिता, नंतर भाष्यकारांनी त्या भाष्यात 'सिद्ध तूपदेशनेऽनुनासिकवचनात्' हें वार्तिक पठित केलें आहे या वार्तिकाचा अर्थ वर सांगितलाच आहे ) प्रकृत सूत्रातील 'उपदेशे' या पदाऐवजी 'उपदेशने' हें पद घालावें (कारण 'करणे घञ्' करून 'उपदेश' हा शब्द सिद्ध होऊ शकत नसल्यामुळें, त्या शब्दाचा 'शास्त्र' असा इष्ट अर्थ होऊ शकत नाही) असें जें वार्तिक-

कारनें म्हटले आहे ते व्यर्थ आहे व सूत्रनिर्दिष्ट 'उपदेशे' या पदातून देखील ('कृत्यल्युटो बहुलम्' या सूत्रानें उपपूर्वक 'दिश्' धातूहून 'करणे' या अर्थामध्यें 'घञ्' प्रत्यय केला असता) वार्तिककाराने भिन्न शब्द वापरून जो इष्ट अर्थ होणे सांगितले आहे तो अर्थ कसा तरी निघू शकतो असे बोधित करण्याकरिता जें भाष्यकारांनी म्हटले आहे तो केवळ प्रौढिवाद होय (व सिद्धान्त नव्हे) असा मनोरमेंतील 'प्रौढिवादमात्रम्' या पदाचा अर्थ आहे (या विषयाचें विवरण मनोरमेंत केलेच आहे धातूहून 'करणे' या अर्थामध्यें घञ् प्रत्यय होऊ शकत नसल्यामुळें व संज्ञा वाच्य नसल्यास 'करणे' या अर्थामध्यें 'घ' प्रत्यय देखील होऊ शकत नसल्यामुळें आणि जेथें इतर कोणतेहि सूत्र लागू पडत नाही तशाच ठिकाणी अगतिकगतिन्यायानें 'कृत्यल्युटो बहुलम्' सू २८४१ हे सूत्र प्रवृत्त करता येत असल्यामुळें व 'उपदेश' या स्थली 'भावे' सू ३१८४ या सूत्राने सिद्धावस्थापन्नक्रिया या अर्थामध्यें 'घञ्' प्रत्यय केल्याने 'उपदेश' हा शब्द सिद्ध होत असून त्याचा 'आद्योच्चारण' असा इष्ट अर्थ निष्पन्न होत असल्यामुळें, 'सिद्धं तूपदेशनेऽनुनासिकवचनात्' या वार्तिकाचे कसे तरी प्रत्याख्यान करिताना, 'एवं तर्हि कृत्यल्युटो बहुलमित्येवमत्र भविष्यति' असें जें प्रकृत सूत्रावरील भाष्यात भाष्यकारांनी म्हटले आहे तो केवळ प्रौढिवाद होय असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे असे शब्दरत्नकार म्हणतात )

शब्दरत्न– घञ इति । "अकर्त्तरि च" इत्यत्र संज्ञायामित्यस्य प्रायिकत्वात्तत्प्राप्तिरिति भावः। बाधादिति। वा सरूपविधिस्तु क्तल्युट्तुमुन्खलर्थेषु प्रतिषिद्धः। न च तत्र साहचर्येण भावल्युट एव ग्रहणमिति वाच्यम्, 'ईषत्पानः सोमो भवता' इत्यत्र कर्मणि खल् नेति भाष्यादिप्रामाण्येनात्र साहचर्यानाश्रयणादिति भावः।

'करणे घञो दुर्लभत्वात्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे ते अशा आशयान म्हटले आहे की, 'अकर्त्तरि च कारके संज्ञायाम्' सू

३१८६ या सूत्रात 'सञ्ज्ञायाम्' हे पद प्रायिक असल्यामुळें—म्हणजे 'सञ्ज्ञाव्यभिचारार्थश्चकारः' या त्या सूत्रावरील काशिकावृत्त्यनुसार, 'को भवता दायो दत्तः, को भवता लाभो लब्धः' या उदाहरणातील 'दाय, लाभ' हे कर्मणि घञ्प्रत्ययान्त शब्द सञ्ज्ञावाचक नसून देखील, कोठें कोठें सञ्ज्ञा वाच्य नसतानाहि घञ्प्रत्यय होत असल्यामुळें—'उपदेश' या स्थली, तो शब्द सञ्ज्ञावाचक नसून देखील, घञ्प्रत्ययाची प्राप्ति आहे (तरी पण त्या घञ्प्रत्ययाचा ल्युट्प्रत्ययाने बाध होतो हे पूर्वी मनोरमेंत सांगितलेच आहे व त्यामुळें 'उपदेश' या स्थलीं 'करणें' या अर्थामध्यें घञ्प्रत्यय होऊं शक्त नाही) 'ल्युटा बाधात्' असे जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचें कारण हे की, 'वाऽसरूपोऽस्त्रियाम्' सू २८३० हें सूत्र क्त, ल्युट्, तुमुन् व खलर्थ प्रत्यय याना लागत नाही ('क्तल्युट्तुमुन्खलर्थेषु वाऽसरूपविधिर्नास्ति'—परि ६९—या परिभाषान्वये 'वाऽसरूपोऽस्त्रियाम्' हे सूत्र ल्युट्प्रत्ययाला लागू पडत नसल्यामुळें, ल्युट्प्रत्ययाने घञ्प्रत्ययाचा बाध होतो तें सूत्र लागू पडलें असतें तर, वरील दोन्ही प्रत्यय विकल्पेंकरून करता आले असते.) वरील परिभाषेंतील 'ल्युट्' या प्रत्ययानें साहचर्यन्यायान्वयें 'भावे' या अर्थामध्यें होणाऱ्याच ल्युट्चें ग्रहण होतें (व 'करणे' इत्यादि इतर अर्थामध्यें होणाऱ्या ल्युट्चें ग्रहण होत नाही) असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाही, कारण 'ईषत्पानः सामो भवता' या उदाहरणात ('आतो युच्' सू ३३०९ या सूत्राने होणारा 'युच्=अन' हा प्रत्यय खल्प्रत्ययाचा बाधक असल्यामुळें) या स्थलीं कर्मणि खल्प्रत्यय होत नाही असें ('वाऽसरूपोऽस्त्रियाम्' ३-१-९४ या सूत्रावरील) भाष्यांत व इतर ग्रन्थांत सांगितलें असल्यामुळें त्या प्रमाणभूत ग्रन्थावरून हे स्पष्ट होतें की, येथें साहचर्यन्यायाचें अवलंबन करता येत नाही ('तुमुन्ण्वुलौ' सू ३१७५ इत्यादि सूत्रांनी होणारा 'तुमुन्=तुम्' हा कृत्प्रत्यय मान्त असल्यामुळें व तशा प्रत्ययान्त शब्दाला 'कृन्मेजन्तः' सू ४४९ या

सूत्राने अव्ययसंज्ञा होत असल्यामुळे, 'अव्ययकृतो भावे' या वचनान्वये 'तुमुन्' प्रत्यय 'भावे' या अर्थामध्येंच नेहमी होत असतो म्हणून शंकाकार अशी शंका करतो की, वरील निषेधात्मक परिभाषेंत 'भावे' या अर्थामध्यें नेहमी होणाऱ्या 'तुमुन्' प्रत्ययाच्या लगेंच पूर्वी 'ल्युट्' प्रत्ययाचे उच्चारण केले असल्यामुळें व अशा रीतीने त्या ल्युट प्रयत्याला तुमुन् या परपठित प्रत्ययाचे साहचर्य असल्यामुळें जरी 'ल्युट्' प्रत्यय 'ल्युट् च' सू ३२९० व 'करणाधिकरणयोश्च' सू ३२९३ या सूत्रानी 'भावे, करणे, अधिकरणे' या तीन्ही अर्थामध्यें होणारा प्रत्यय आहे तरी, वर सांगितलेल्या परसाहचर्यामुळें, 'सहचरितासहचरितयो सहचरितस्यैव ग्रहणम्'–परि ११२–या न्यायान्वयें वरील निषेधात्मक परिभाषेंत निर्दिष्ट असलेल्या 'ल्युट्' प्रत्ययाने 'भावे' या अर्थामध्येंच होणाऱ्या 'ल्युट्' प्रत्ययाचे ग्रहण होते, व 'करणे' आणि 'अधिकरणे' या अर्थामध्यें होणाऱ्या 'ल्युट्' प्रत्ययाचे ग्रहण होत नाही आणि म्हणून वरील परिभाषा 'भावे' या अर्थामध्यें होणाऱ्याच 'ल्युट्' प्रत्ययाला लागू पडते व त्यामुळें 'करणे' या अर्थी होणारा 'ल्युट्' 'करणे' या अर्थामध्यें होणाऱ्या घञ्प्रत्ययाचा, 'वाऽसरूपोऽस्त्रियाम्' या सूत्रान्वयें बाधक होऊ शकत नाही पण शब्दरत्नकार म्हणतात की, ही शंका बरोबर नाही, कारण 'ईषत्पान सोमो भवता' या स्थली 'ईषद्दु सुषु' सू ३३०५ या सूत्रानें 'कर्मणि' या अर्थामध्यें होणारा खल्प्रत्यय होऊ शकत नाही व 'आतो युच्' सू ३३०९ या सूत्रानें 'कर्मणि' या अर्थामध्यें 'युच्=अन' प्रत्ययच होतो असे भाष्यकारानी 'वाऽसरूपोऽस्त्रियाम्' ३-१-९४ या सूत्रावरील भाष्यात म्हटले आहे त्या भाष्यात भाष्यकारानी 'खलर्थ, ईषत्पान सोमो भवता, खलपि प्राप्नोति' असे म्हटले आहे भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, जरी 'ईषत्पान' या स्थली कर्मणि खल्प्रत्ययाची प्राप्ति आहे तरी, वरील निषेधक परिभाषा असल्यामुळें कर्मणि खल् प्रत्यय न होता कर्मणि

युच्प्रत्ययच होतो, आणि म्हणूनच 'आतो युच्' या सूत्रावरील कौमुदीत 'खलोऽपवादः' असे दीक्षितांनी म्हटले आहे जर वरील निषेधक परिभाषेला साहचर्यन्याय लागू पडतो असे मानले तर, 'भावे' या अर्थामध्येच होणाऱ्या तुमुन्प्रत्ययाच्या साहचर्याने भावार्थकच खल्प्रत्ययाचे ग्रहण होईल व त्यामुळें 'कर्मणि' या अर्थामध्ये होणाऱ्या खल्प्रत्ययाचा 'युच्' हा असरूप प्रत्यय 'वाऽसरूपोऽस्त्रियाम्' या सूत्रान्वयें बाधक ठरणार नाही, व तसे मानल्यास, वरील भाष्य चूक ठरण्याची आपत्ति येते पण भाष्य केव्हांहि चूक मानता येत नाही म्हणून ते भाष्य सुसङ्गत ठरण्याकरिता हें मानणें आवश्यक आहे की, वरील निषेधक परिभाषेला 'सहचरितासहचरितयोः' हा साहचर्यन्याय लागू पडत नाही असे मानले म्हणजे, वरील निषेधक परिभाषेत निर्दिष्ट असलेल्या ल्युट्प्रत्ययाने साहचर्यन्यायान्वयें 'भावे' ल्युट्प्रत्ययाचेच ग्रहण होते व त्यामुळें 'करणे ल्युट्' हा 'करणे' घञ् या असरूप प्रत्ययाचा बाधक ठरत नाही असे जें शब्दकाराचे म्हणणे आहे ते निःसंशय चूक ठरते व 'करणे घञो दुर्लभःवात्, ल्युटा बाधात्' असे जें दीक्षितांनी मनोरमेंत म्हटले आहे तेच योग्य आहे असा शब्दरत्नकारांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे)

शब्दरत्न– क्लिष्टत्वादिति । गुणप्रधानसन्निधौ प्रधानस्य विशेषणे साकाङ्क्षत्वे इतरान्वयस्तस्यायुक्त इति क्लेश इति भावस्तदाह-महोत्यादिना । भाष्यकृतेति । अस्यार्थस्येति शेषः । एवं च "उभयप्राप्तौ कर्मणि" इति नियमात्र कर्तरि षष्ठीति बोध्यम् । अवहेलनाच्चेति । चो हेतौ यतोऽवहेलनमतः क्लिष्टत्वमित्यर्थः । घापवाद इति । ल्युडपवादत्वेऽपि बोध्यम्, तत्रापि सञ्ज्ञायामित्यनुवृत्तेरिति भावः । अगतिकगतिरिति । न च "खनो घ च" इति घविधानमन्यतोऽपीत्यर्थमित्याकरे स्पष्टम्, तेनात्र घे सिद्ध्यतीति वाच्यम्, तस्याप्यगतिकगतित्वात्, 'भग पदम्' इत्यादौ यत्र चिरतरम्

तत्रैव तत्प्रवृत्तेश्च । पदस्य घञर्थे क्षेन सिद्धेर्नैतदुदाहरणं किन्तु क्वाचित्क वाक्यं तत् ।

('प्रायेण सञ्ज्ञायामिति व्याख्यानस्य क्लिष्टत्वात्' या मनोरमेंतील पङ्क्तीत) 'क्लिष्टत्वात्' असे जे म्हटले आहे त्याचे कारण हे की, वाक्यात प्रधान व अप्रधान शब्दाचा प्रयोग केला असताना व त्याच्याजवळ विशेषण उच्चारले असल्यास, प्रधान शब्दाला विशेषणाशी अन्वित होण्याची आकांक्षा असल्यामुळे, ते विशेषण वाक्यातील अप्रधान शब्दाशी अन्वित करणे अयोग्य आहे व तसा तऱ्हेने अन्वय करण्यात क्लेश आहे आणि म्हणूनच 'न ह्युपाधेरुपाधिर्भवति' ('विशेषणस्य वा विशेषणम्' असे प्रकृत सूत्रावरील भाष्यात जे भाष्यकारांनी म्हटले आहे त्या) या वचनाचा दीक्षितांनी मनोरमेत उल्लेख केला आहे ('न ह्युपाधेरुपाधिर्भवति विशेषणस्य वा विशेषणम्' असा न्याय असल्यामुळे, 'प्रायेण सञ्ज्ञायाम्' असा पूर्वी सांगितल्याप्रमाणे अन्वय करता येत नाही व 'प्रायेण घ' असाच अन्वय करता येतो) 'भाष्यकृताऽवहेलनाच्च' असे जे मनोरमेत म्हटले आहे त्या वाक्यात 'अस्य अर्थस्य' ही (कर्मवाचक) पदे अध्याहृत आहेत ही पदे अध्याहृत असल्यामुळेच व 'उभयप्राप्तौ कर्मणि' सू ६२४ हे नियामक सूत्र असल्यामुळे, 'भाष्यकृता' या कर्तृवाचक पदाचा ('कर्तृकर्मणोः कृति' सू ६२३ या सूत्रान्वये षष्ठीमध्ये होणारा प्रयोग न करिता) तृतीयाविभक्तीत प्रयोग केला आहे हे जाणावे 'अवहेलनाच्च' मधील 'च' हे पद हेत्वर्थक आहे व त्यामुळे 'अवहेलनाच्च' याचा 'यतोऽवहेलनमत क्लिष्टत्वम्' असा अर्थ होतो, म्हणजे ज्याअर्थी भाष्यकारांनी 'प्रायेण सञ्ज्ञायाम्' अशा प्रकारचा अन्वय करणे अयोग्य मानले आहे त्या अर्थी तसा अन्वय करणे क्लिष्ट व अयोग्य आहे असा दीक्षितांच्या म्हणण्याचा अर्थ आहे 'हलश्च' सू ३३०० या सूत्राने होणारा घञ्प्रत्यय जसा घप्रत्ययाचा अपवाद आहे असे मनोरमेत म्हटले आहे

तमाच तो ल्युट्प्रत्ययाचा देखील अपवाद आहे हें लक्षात असू द्यावें. पण 'हलश्च' या सूत्रानें 'उपदेश' या स्थलीं घञ्प्रत्यय होऊं शकत नाहीं; कारण त्या सूत्रांत ('पुंसि संज्ञायां घः प्रायेण' या पूर्वसूत्रांतून) 'संज्ञायाम्' हें पद अनुवृत्त आहे (आणि 'उपदेश' हा शब्द संज्ञावाचक नसल्यामुळें 'हलश्च' या सूत्रानें या स्थली करणे 'घञ्' प्रत्यय होऊं शकत नाहीं ) 'खनो घ च' सू. ३३०८ या सूत्रानें ('खन्' धातूहून घकारादि घप्रत्यय व्हावा असें जें विधान केलें आहे तें वास्तविक निष्प्रयोजनक आहे, कारण 'खन्' धातूच्या अन्तीं चकार किंवा जकार नसून नकार असल्यामुळें, 'चजो कु घिण्ण्यतोः' सू २८६३ या सूत्रानें घित्प्रत्यय पुढें आला असतां त्याच्या लगेच मागें असलेल्या चकाराचें किंवा जकाराचें कुत्व होणें हें जें फल आहे तें 'खन्' धातूचे ठिकाणीं संभवतच नाहीं तरी पण त्या सूत्रांत) घप्रत्ययाचें विधान ज्याअर्थी केलें आहे त्यांअर्थीं, तो प्रत्यय इतर धातूंहून देखील व्हावा असें भाष्यांत म्हटलें असल्यामुळें, 'उपदेश' या स्थली (तो शब्द संज्ञावाचक नसून देखील 'करणे' या अर्थामध्यें 'उप' पूर्वक 'दिश्' धातूहून) 'खनो घ च' या सूत्रानें घप्रत्यय होऊं शकतो व अशा रीतीनें 'उपदेश' हा शब्द सिद्ध होऊं शकतो असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं, कारण 'खनो घ च' या सूत्रानें देखील 'खन्' धातूहून भिन्न धातूंना अशाच ठिकाणीं घप्रत्यय करता येतो कीं, जेथें गत्यन्तर नाहीं, म्हणजे तें प्रवृत्त केल्यावांचून इतर कोणत्याहि रीतीनें इष्ट रूप सिद्ध होऊं शकत नाहीं. 'भग पदम्' इत्यादि स्थलीं जेथें घित् प्रत्यय केल्यानें कुत्वफल होऊं शकतें तशाच ठिकाणीं 'खनो घ च' या सूत्राची प्रवृत्ति करता येते ('भज्' धातु जकारान्त असल्यामुळें त्याहून 'घ' हा घित्प्रत्यय केला असतां, त्या धातूंतील अन्त्य जकाराचें 'चजो कु' सू २८६३ या सूत्रानें कुत्व होतें व अशाच ठिकाणीं 'खनो घ च' या सूत्रानें

'खनु' धातूहून भिन्न धातूंना घप्रत्यय करता येतो पण 'दिश' धातु चकारान्त किंवा जकारान्त नसून शकारान्त असल्यामुळें त्याचे ठिकाणी 'चजोः कु' या सूत्रानें होणाऱ्या कुत्वाची प्राप्तीच नाहीं. म्हणून 'खनो घ च' या सूत्रानें 'दिश्' धातूहून घप्रत्यय करता येत नाहीं असें शब्दरत्नकाराचें म्हणणें आहे 'खनो घ च' या सूत्रावरील कौमुदींत 'भग पदम्' हें जें उदाहरण दिलें आहे त्यांतील 'भग' हेंच वास्तविक त्या सूत्राचें उदाहरण होय, कारण 'भज्' धातूहून घप्रत्यय केल्यानेंच, 'चजोः कु' या सूत्रानें त्या धातूतील अन्त्य जकाराचें कुत्व होऊं शकतें पण 'पदम्' हें त्या सूत्राचें उदाहरण नव्हे; कारण 'पद्' धातूहून घप्रत्यय केला असता, ता धातु चकारान्त किंवा जकारान्त नसून दकारान्त असल्यामुळें, या स्थळीं कुत्वाची प्राप्तीच नाहीं आणि म्हणून 'पद्' धातूहून 'खनो घ च' या सूत्रानें घप्रत्यय करता येत नाहीं, व 'घञर्थे कविधानम्'—सू ३२३४ वरील वार्तिक—या वार्तिकान्वयें) 'पद्' धातूहून 'क' प्रत्यय केला असता, 'पद' हें रूप सिद्ध होऊं शकत असल्यामुळें, 'पदम्' हें 'खनो घ च' या सूत्राचें उदाहरण नव्हे असें समजावें 'भग पदम्' असा कोठें तरी आढळलेला वाक्यप्रयोग दीक्षितांनीं 'खनो घ च' या सूत्राचें उदाहरण देते वेळीं उपयोगांत आणला आहे

शब्दरत्न– किं च "उच्चार्यं हि वर्णानाह–उपदिष्टा इमे वर्णाः" इत्यादिभाष्यादुपदेशशब्दस्योच्चारणार्थत्वस्य निर्णयेन, सद्धशो-र्णलोकव्यवहारस्य लक्षणयाऽप्युपपत्त्या, भावे घञि बाधकाभाव । किं चोपदेशशब्दस्य प्रत्ययादिपरत्वे तस्यैव हलन्त्यमित्यत्रान्वयेन यत्किंचित्समुदायान्त्यस्य वारणसम्भवे तदर्थमन्त्यग्रहणसामर्थ्यादिवर्णन-क्लेशो भाष्यकृतो व्यर्थः स्यादिति बोध्यम् । "उद्देशश्च प्रातिपदिकानां नोपदेशः" इति "आदेच उपदेशे" इति सूत्रे च भाष्ये भावघञन्त-स्यैव तस्याङ्गीकाराच्चेति दिक् ।

दुसरे असे की, 'उच्चार्य हि वर्णानाह, उपदिष्टा इमे वर्णा.' म्हणजे वर्णाचे उच्चारण करून आचार्य म्हणतात की, या वर्णांचा उपदेश केला–इत्यादि (पस्पशाह्निकातील) भाष्यप्रयोगावरून 'उपदेश' हा शब्द 'उच्चारण' या अर्थाचा वाचक आहे हे सिद्ध होत असल्यामुळें आणि संकीर्ण लोकव्यवहार, म्हणजे उपदेश व उद्देश या दोन शब्दाचा एकमेकाच्या अर्थामध्यें भार्येत उपयोग करणे हा व्यवहार, लक्षणेने देखील उपपन्न ठरत असल्यामुळें, 'उपदेश ' या स्थली 'भावे' या अर्थामध्यें घञ्प्रत्यय करण्यात कोणतेंहि बाधक सूत्र उपस्थित होत नाही (पस्पशाह्निकात भाष्यकार म्हणतात–'अथ क उपदेश ?। उच्चारणम् । कुत एतत् ? । दिशिरुच्चारणक्रिय । उच्चार्य हि वर्णानाहोपदिष्टा इमे वर्णा इति ।' भाष्यातील किती तरी आणखी अशी वाक्यें देता येतील की, ज्यात 'उपदेश' या शब्दाचा 'उच्चारण' या अर्थामध्यें उपयोग केला आहे उदाहरणार्थ, 'हयवरट्' या शिवसूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात–'सर्वे वर्णा सकृदुपदिष्टा । अथ हकारो द्विरुपदिश्यते पूर्वश्चैव परश्च,' म्हणजे शिवसूत्रात बाकीच्या सर्व वर्णांचे एकदाच उच्चारण केले आहे पण या हकाराचे मात्र दोनदा उच्चारण केले आहे, एकदा सर्व व्यञ्जनांच्या पूर्वी व दुसऱ्याने सर्व व्यञ्जनांच्या शेवटी तसेच 'ऋलृक्' या शिवसूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात 'लृकारस्योपदेश किमर्थ,' म्हणजे या शिवसूत्रात लृकाराचे उच्चारण का केले आहे ? भाष्यातील इतर उतारे विस्तारभयास्तव येथे देता येत नाहीत साराश भाष्यकारानी भाष्यात ठिकठिकाणी 'उपदेश' या शब्दाचा 'उच्चारण' या अर्थामध्यें उपयोग केला असल्यामुळें व तसा अर्थ 'उप' पूर्वक उच्चारणार्थक 'दिश्' धातूहून 'भावे' सू ३१८४ या सूत्रानें सिद्धावस्थापन्नक्रिया–साध्य अवस्थेत असून सिद्ध किंवा पूर्ण झालेली क्रिया–या अर्थामध्यें घञ्प्रत्यय केल्यानेच निष्पन्न होऊ शकत असल्यामुळें आणि 'करणे' घञ्प्रत्ययाचा जसा ल्युट्प्रत्यय बाधक आहे तसा 'भावे'

घञ् प्रत्ययाचा इतर कोणताहि प्रत्यय बाधक नसून, संज्ञा वाच्य नसताना देखील तो प्रत्यय होऊ शकत असल्यामुळें, 'उपदेश' या स्थली 'भावे' घञ्प्रत्यय करणें व त्या शब्दाचा 'आद्योच्चारण' असा अर्थ करणें हेंच योग्य आहे असे शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचे तात्पर्य आहे ) दुसरें असें की, 'उपदेश' या शब्दाचा ('उपदेशेऽजनुनासिक इत्' १-३-२ या सूत्रावरील भाष्यात प्रौढोक्तिरूपानें सांगितल्याप्रमाणे 'कृत्यल्युटो बहुलम्' सू २८४१ या सूत्रानें 'करणे घञ्' प्रत्यय करून) प्रत्यय इत्यादि, म्हणजे प्रत्यय, धातु, आदेश, आगम, निपात इत्यादि, असा अर्थ केला तर, त्या प्रत्ययादिकांचा 'हलन्त्यम्' या सूत्रात ('प्रत्ययादीनामन्त्य हल् इत्संज्ञ स्यात्' अशा रीतीनें) अन्वय होऊन त्यांच्याच अन्त्य हलाला इत्संज्ञा होईल व त्यामुळें इतर प्रकारच्या वर्णसमुदायाच्या अन्त्य हलाला इत्संज्ञा आपोआपच प्राप्त होऊ शकणार नाही अस असून देखील, कोणत्याहि इतर वर्णसमुदायाच्या अन्त्य हलाला इत्संज्ञा होऊ नये याकरिता 'हलन्त्यम्' या सूत्रात 'अन्त्य' हें पद घातलें आहे व त्या पदाच्या सामर्थ्यामुळें कोणत्याहि इतर वर्णसमुदायाच्या अन्त्य हलाला इत्संज्ञा होत नाही इत्यादि जें ('हलन्त्यम्' १-३-३ या सूत्रावरील भाष्यात) भाष्यकारानी म्हटलें आहे तें व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते (त्या सूत्रावरील भाष्यात 'हलन्त्ये सर्वप्रसङ्ग । सर्वस्य हल इत्संज्ञा प्राप्नोति । किं कारणम् ? । सर्वान्त्यवात् । सर्वो हि हल त तमवधि प्रत्यन्त्यो भवति' अशी शंका उपस्थित करून त्या शंकेचे निरसन करण्याकरिता 'सिद्ध तु व्यवसिताऽन्त्यत्वात्' हें समाधानपर वार्तिक भाष्यकार पठित करतात व त्या वार्तिकाचें व्याख्यान करिताना असें म्हणतात की, 'सिद्धमेतत् । कथम् ? । व्यवसितान्त्य वात् । व्यवसिताऽन्त्यो हलित्संज्ञा भवतीति वक्तव्यम । के पुनर्व्यवसिता ? । धातुप्रातिपदिकप्रत्ययनिपातागमादेशा । सिध्यति । सूत्र तर्हि भिद्यते । यथान्यासमेवास्तु । ननु चोक्त हलन्त्ये सर्वप्रसङ्ग सर्वान्त्यत्वादिति ।

नैष दोष । आहाऽयम्, हलन्त्यमित्सञ्ज्ञ भवतीति । सवस्च हल् त त-मवधि प्रत्यन्त्यो भवति, तत्र प्रकर्षगतिर्विज्ञास्यते, साधीयो योऽन्त्य इति । कश्च साधीय ? । व्यवसितानां योऽन्त्य । अथवा सापेक्षोऽय निर्देश क्रियते । न चान्यत् किञ्चिदपेक्ष्यमस्ति, तेन व्यवसितानेवापे-क्षिष्यामहे ।' हेच ते वरील भाष्य होय की ज्याचा शब्दरत्नातील वरील पक्तीत निर्देश केला आहे या भाष्यात अशी शका उपस्थित केली आहे की, अन्त्य हलाला इत्सञ्ज्ञा होते असे 'हलन्त्यम्' या सूत्रात सागितले असल्यामुळें, त्या सूत्राने प्रत्येक हलाला इत्सज्ञा होण्याची आपत्ति येते, कारण प्रत्येक हल् कोणत्या तरी समुदायाचा अन्त्य असतोच पण भाष्यकार म्हणतात की, व्यवसिताच्याच, म्हणजे धातु, प्रातिपदिक, प्रत्यय, निपात आगम, व आदेश याच्याच, अन्त्य हलाला इत्सज्ञा होते असे म्हटल्याने वरील आपत्ति टळते पण शकाकार असे म्हणतो की, तसे म्हटल्यास वरील सूत्राच्या ऐवजी 'व्यवसितान्त्य हल्' असे भिन्न तऱ्हेचे सूत्र पठित करावे लागेल पण भाष्यकार म्हणतात की, तसे भिन्न सूत्र पठित करण्याची काही गरज नाही व जसे मूळ सूत्र पठित केले आहे तसे ते मानल्याने देखील इष्टसिद्धि होऊ शकते, कारण अन्त्य हल् इत्सञ्ज्ञक होतो असे आचार्य पाणिनी सागत आहेत व प्रत्येक हल् कोणत्या तरी समुदायाचा अन्त्य असल्यामुळें, त्या सूत्रातील 'अन्त्य' या पदाचे ग्रहण व्यर्थ ठरू पाहते. म्हणून त्या पदाच्या ग्रहणसामर्थ्याने हे बोधित होते की, चागला जो अन्त्य त्याचेच त्या सूत्रातील 'अन्त्य' या पदाने ग्रहण होते व व्यवसिताच्या शेवटी असणारा जो अन्त्य हल् तो चागला अन्त्य होय आणि अशा रीतीने त्या सूत्रातील 'अन्त्य' ग्रहणाच्या सामर्थ्याने त्या सूत्रातूनच 'व्यवसितान्त्य हल् इत्' असा अर्थ निष्पन्न होतो अथवा त्या सूत्रात अवयववाचक 'अन्त्य' असा सापेक्ष शब्द उच्चारला असून कोणत्या समुदायाचा अन्त्य अशा अपेक्षित समुदायाचा त्या सूत्रात निर्देश केला नसल्यामुळें, ती अपेक्षा—आकाक्षा—पूर्ण

करण्याकरिता आम्ही व्यवसितसंज्ञक समुदायाचेच ग्रहण करू असा वरील भाष्याचा भावार्थ आहे. परंतु 'उपदेशेऽजनुनासिक इत्' या पूर्व सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी 'उपदेश' या शब्दाची 'करणे घञ्' प्रत्ययाने व्युत्पत्ति करून व त्या शब्दाचा 'उपदिश्यते अनेन इति उपदेश = शास्त्रम' असा अर्थ करून त्या सूत्रावर वार्तिककाराने 'उपदेशनऽजनुनासिक इत्' असे जें वार्तिक पठित केले आहे त्या वार्तिकाचे प्रत्याख्यान केले आहे हे पूर्वी मनोरमेंत सांगितलेच आहे व या पूर्व सूत्रातील 'उपदेशे' या शब्दाची 'हलन्त्यम्' या उत्तर सूत्रात अनुवृत्ति होत असल्यामुळे, त्या सूत्रात देखील त्या अनुवृत्त पदाचा 'शास्त्रम्' असा अर्थ होऊ शकतोच आणि 'शास्त्रम्' या शब्दानें पाणिनीयशास्त्रोपदिष्ट धातु, प्रत्यय, आगम, आदेश इत्यादिकाचे ग्रहण होऊ शकतेंच आणि त्यामुळें सदा शास्त्रोपदिष्ट धातु, प्रत्यय, आगम, आदेश इत्यादिकाच्याच अन्त्य हलाला त्या सूत्राने इत्संज्ञेची प्राप्ति होते व धात्वादिभिन्न इतर समुदायाच्या अन्त्य हलाला इत्संज्ञेची प्राप्ति मुळीच होत नाही. म्हणून त्या सूत्रावरील भाष्यात 'हलन्त्ये सर्वप्रसङ्ग' ही जी शंका उपस्थित केली आहे ती वास्तविक उद्भवतच नाही व अनुपपन्न ठरते, आणि तसेच त्या शंकेचे निवारण करण्याकरिता 'सिद्ध तु व्यवसितान्त्यत्वात्' हे वार्तिक पठित करून जें उत्तर दिले आहे ते देखील सारखेंच अनुपपन्न ठरते. वास्तविक त्या शंकेवर भाष्यकारानी असे उत्तर द्यावयास पाहिजे होतें की, पूर्व सूत्रातून 'हलन्त्यम्' या सूत्रात 'उपदेशे' या ज्या शब्दाची अनुवृत्ति होते तो 'उपदेश' शब्द पूर्व सूत्रावरील भाष्यात सांगितल्या-प्रमाणे 'करणे घञन्त' असून त्याचा 'शास्त्रम्' असा अर्थ होत असल्यामुळे व 'शास्त्र' या शब्दाने पाणिनीयशास्त्रोपदिष्ट धातु, प्रत्यय, आगम, आदेश इत्यादिकाचेच ग्रहण होऊ शकत असल्यामुळें, धात्वादिभिन्न इतर समुदायातील अन्त्य हलाला इत्संज्ञा होण्याची आपत्ति मुळीच येत नाही आणि त्यामुळें 'हलन्त्ये

सर्वप्रसङ्ग ' ही शका अयोग्य ठरते परतु तसे उत्तर न देता वरील सूत्रातील 'अन्त्य' या पदाच्या सामर्थ्यानें व्यवसिताचेच ग्रहण होतें इत्यादि भिन्न तऱ्हेचे त्या सूत्रावरील भाष्यात उत्तर दिलें आहे म्हणून त्या सूत्रावरील भाष्यात जी शका उपस्थित केली आहे व तिचे जें उत्तर दिले आहे ती दोन्ही अनुपपन्न न ठरावीं' याकरिता हें मानणे आवश्यक आहे की, जरी 'उपदेशेऽजनुनासिक इत्' या पूर्व सूत्रावर पठित केलेल्या वार्तिकाचे कसे तरी प्रत्याख्यान करण्याकरिता भाष्यकारानी 'उपदेश' या शब्दाची 'करणे घञ्' प्रत्यय करून व्युत्पत्ति केली होती तरी ती त्याना वास्तविक मान्य व पसत नव्हती याचे उघड कारण हेच आहे की, जेथें इतर कोणतेहि सूत्र प्रवृत्त होत नाही तशाच ठिकाणी अगतिकगतिन्यायानें 'कृत्यल्युटो बहुलम्' सू २८४१ या सूत्रातील 'बहुल' ग्रहण-सामर्थ्यानें 'करणे' या अर्थामध्यें धातूहून 'घञ्' प्रत्यय करता येतो परतु 'भावे' सू. ३१८४ या सूत्रानें 'भावे' या अर्थामध्यें 'घञ्' प्रत्यय करून 'उपदेश' या शब्दाची शास्त्रशुद्ध व्युत्पत्ति करता येत असल्यामुळें, 'कृत्यल्युटो बहुलम' या सूत्रानें 'करणे घञ्' प्रत्यय करणे अनुचित ठरते आणि हे जाणूनच भाष्यकारानीं 'हलन्त्यम्' या सूत्रावरील भाष्यात त्या सूत्रातील 'अन्त्य' पदाच्या ग्रहणसामर्थ्यानें व्यवसिताचेच ग्रहण होतें इत्यादि म्हटले आहे, म्हणजे अशा भिन्न तऱ्हेन प्रतिपादन केले आहे सारांश 'हलन्त्यम्' या सूत्रावरील भाष्य सुसङ्गत ठरण्याकरिता हें मानणे आवश्यक आहे की, 'भावे घञ्' प्रत्यय करून 'उपदेश' या शब्दाची व्युत्पत्ति करणें व त्या शब्दाचा 'आद्योच्चारण' असा अर्थ करणे हेंच भाष्यकाराना इष्ट होतें आणि अशा रीतीनें त्या सूत्रावरील भाष्य, 'उपदेश' या शब्दाचा 'आद्योच्चारण' असा 'भावे घञ्' प्रत्यय करून अर्थ होतो याला, प्रमाण ठरते असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. आता 'उपदेश' हा शब्द भावे घञन्तच आहे हें सिद्ध करण्या-

करिता शब्दरत्नकार 'आदेच उपदेशेऽशिति' या सूत्रावरील भाष्याचे प्रमाण देतात.) आणि 'उद्देशश्च प्रातिपदिकाना नोपदेश' असे जें 'आदेच उपदेशे' ६–१–४५ या सूत्रावरील भाष्यात म्हटले आहे त्यावरून देखील हेंच सिद्ध होतें की, भाष्यकारानी 'उपदेश' हा शब्द '(करणे घञन्त नसून) भावे घञन्तच आहे असे मानले आहे (त्या भाष्यात 'प्रातिपदिकप्रतिषेध' हें वार्तिक पठित करून 'प्रातिपदिकानां प्रतिषेधो वक्तव्य । गोम्या गोभि, नौम्या नौभि' असे भाष्यकारानीं त्या वार्तिकाचे व्याख्यान केले आहे पुढें भाष्यकार असा प्रश्न करतात की, तें वार्तिक पठित करण्याची गरज आहे काय व त्या प्रश्नाचे उत्तर देताना भाष्यकार म्हणतात –'न वक्तव्य । धात्वधिकारात्प्रातिपदिकस्याऽप्राप्ति । धात्वधिकारात्प्रातिपदिकस्यात्व न भविष्यति । धातोरिति वर्तते । क्व प्रकृतम् ? । लिटि धातोरनभ्यासस्येति । अथापि निवृत्तम् एवमप्यदोष । उपदेश इत्युच्यते, उद्देशश्च प्रातिपदिकाना नोपदेश ।' 'आदेच उपदेशे' सू २३७० हें षष्ठाध्यायातील सूत्र 'धातो' या अधिकारात पठित नाहीं, कारण तो अधिकार तृतीयाध्यायाच्या अखेरपर्यंतच चालू आहे तसेच 'आदेच उपदेशे' या सूत्रात 'लिटि धातोरनभ्यासस्य' या वरेंच पूर्वी असणाऱ्या सूत्रातून 'धातो' हे पद अनुवृत्त करता येत नाहीं, कारण 'ष्यङ सम्प्रसारणम्' इत्यादि पूर्वसूत्रात ते पद निवृत्त झाले आहे आणि मण्डूकप्लुतीनें अनुवृत्ति करणें हा दोष मानला आहे म्हणून 'आदेच' या सूत्रातील 'एच' या पदानें एजन्त प्रातिपदिकाचे देखील ग्रहण होऊ शकते व त्यामुळें 'गो, नौ' इत्यादि एजन्त प्रातिपदिकातून 'भ्याम्, भिस्' इत्यादि शित् नसणारे प्रत्यय केल्यास, एचाचे आत्व होऊन 'गाभ्या गाभि, नाभ्या नाभि' इत्यादि अनिष्ट रूपें होण्याची आपत्ति येते ती आपत्ति टाळण्याकरिता वार्तिककाराने 'प्रातिपदिकप्रतिषेध' हे वार्तिक पठित केले आहे पण भाष्यकार म्हणतात की, ते वार्तिक असण्याची काही गरज

नाही व त्या वार्तिकाचे प्रत्याख्यान करतेवेळी भाष्यकार 'उद्देशश्च प्रातिपदिकाना नोपदेश ' हे कारण देतात या भाष्यपक्तीचा भावार्थ हा आहे की, 'गोपयसोर्यत्' सू १५३८ 'नौवयोधर्म' सू १६४३ इत्यादि सूत्रात 'गो, नौ' इत्यादि एजन्त प्रातिपदिकाचा जरी निर्देश केला आहे तरी तो उद्देशरूपाने केला असून उपदेश नव्हे, म्हणजे त्या सूत्रानी यत्प्रत्यय होण्याचा जो उपदेश केला आहे त्या उपदेशाचे ते शब्द उद्देश्य होत, आणि 'आदेच उपदेशे' या सूत्रात 'उपदेशे' या पदाचे ग्रहण केले असल्यामुळे, ते सूत्र ज्याचा उद्देश्यरूपाने सूत्रात निर्देश केला आहे अशा एजन्त प्रातिपदिकाना लागू शक्त नाही या वरील भाष्यपक्तीचा कैयटाने 'अर्थवदिति प्रातिपदिकसज्ञाविधानाल्लब्धसाधिमान प्रत्ययविधानाय परार्था गवादय उपात्ता । येषा तु स्वरूपज्ञानायाऽपूर्वमुच्चारण तेषामेवोपदेशव्यवहार' असा अर्थ केला आहे व त्यावर उद्योतकाराने 'अनिर्ज्ञातस्वरूपस्य कार्यार्थस्वरूपज्ञापनार्थमपूर्वोच्चारण ह्युपदेश । गुणं प्रापण चोद्देश ... येषा तु परार्थमुपादानेऽपि तेनैव लक्षणेन स्वरूपसिद्धिरपि तेषामुपदेशत्वमस्त्येवेति भाव ' असे म्हटले आहे साराश या वरील भाष्यपक्तीवरून देखील हेच सिद्ध होते की, भाष्यकारानी 'उपदेश ' या शब्दाचा 'आद्योच्चारण' या अर्थामध्येच उपयोग केला आहे व तसा अर्थ 'भावे घञ् प्रत्यय केल्याशिवाय होऊ शकत नसल्यामुळे, 'उपदेश' हा शब्द भावघञन्तच मानणे योग्य असून तो 'करणे' घञन्त मानणे योग्य नाही असा शब्दरत्नकाराचा म्हणण्याचा आशय आहे )

मनोरमा– यत्तु–धातुसूत्रेत्यादि पठन्ति । यच्च व्याचक्षते–करणव्युत्पत्त्या पूर्वार्धोदाहृतानामुपदेशत्वम्, कर्मव्युत्पत्त्या त्वागमादीनाम् । उणादिलिङ्गानुशासनयोरपि सूत्रत्वात्सिद्धे पृथगुपादानं गोबलीवर्दन्यायेन । एव गणश्चादेश सिद्धे धातोरपीत्यादि ।

अत्रेद वक्तव्यम्–किमेषामुपदेशसज्ञा, उत योगमात्रम् । नाद्य, सज्ञाया शास्त्रकारैरनुक्ते', "असंज्ञात्वाद् घप्रत्ययो न" इति भाष्यो-

क्तेरच । अस्मदादिकृतसंज्ञाया शास्त्रव्यवस्थापकत्वेऽतिप्रसङ्गाच्च, 'आप्तोऽस्मिरवमदन्तत्वात्' इत्यादिस्वपरग्रन्थविरोधाच्च, न हृष्टसृष्टा-नुबन्धस्यामो न प्रत्ययत्व येन मित्त्व न भवेत् । किं चैवं प्रत्ययविधौ पञ्चम्या षष्ठीप्रकल्पकत्वे सन सन्नेवादेशो-ऽस्त्विययाशङ्कघोपदेश-भावादित्संज्ञा न स्यादिति भाष्यकैयटोक्त व्याकुप्येत । किञ्च "न धातुलोप " इति सूत्रे " धातुग्रहण किम् ? लूञ् लविता, पूञ् पविता" इति भाष्यम्, 'उपदेश एवानुबन्धलोपे कृते ततो धातुसञ्ज्ञा' इत्येवपर कैयटग्रन्थश्च विरुद्ध्येत । अपि च "ष्वतोरेद्धौ" इति सूत्रे 'लोपश्च' इति द्विशकारको निर्देश, द्वितीय शकार इदिति अलोऽन्त्यसूत्रस्यभाष्य-कैयटादिकमपि विरुद्ध्येत । न द्वितीय , योगस्यैव पुरस्कारे परिगणनस्य व्यर्थत्वात्, धात्वादिषु करणव्युत्पत्तिरागमादिषु नेति वैषम्यस्य दुरुप-पादत्वाच्च । उपदेशताप्रयोजकधातुत्वादिरूपोपाध्यवच्छिन्नसमुदायान्त्य हलिदिःयर्थ इति स्वग्रन्थविरोधाच्च । पक्षद्वयेऽपि लिङ्गानुशासनस्य प्रकृतानुपयोगात्, लोपश्चेति शकारस्यासग्रहाच्च । "आदेच उपदेशे" "उपदेशेऽत्वत " इत्यादावाद्योच्चारणस्यैवोपदेशपदार्थताया सर्वसमत-त्वाच्चेति दिक् ॥

(रामचन्द्रकृत प्रक्रियाकौमुदीत 'उपदेशेऽजनुनासिक इत्' या सूत्रावरील वृत्तीत 'धातुसूत्रगणोणादिवाक्यलिङ्गानुशासनम् । आगम प्रत्ययादेशा उपदेशा प्रकीर्तिता ॥' ही कारिका पठित केली आहे भट्टोजी दीक्षिताचे गुरु शेषोपनामक कृष्णाचार्य यानी प्रक्रियाकौमुदीवर 'प्रकाश' नावाची टीका लिहिली आहे व दीक्षित त्या टीकेचा उल्लेख पुढील पक्तीत करतात ती टीका दुर्दैवाने येथे उपलब्ध नाही परतु रामचन्द्राचे पौत्र विट्ठल यानी प्रक्रियाकौमुदीवर 'प्रसाद' नावाची जी टीका लिहिली आहे ती येथे उपलब्ध आहे, व वरील कारिकेचे व्याख्यान करिताना प्रसादकारानी, 'धातुर्धातुपाठ । तत्र एध वृद्धावित्यादावकारादेरित्संज्ञादि, उपदेशत्वात् । सूत्र सूत्रपाठ । तत्र लण् इत्यादौ च तदेव । गणो गणपाठ । तत्र भवतु इत्यादावपि

तदेव । उणादि उणादिपाठ । तत्रापि कजिमृजिभ्या चित् इत्यादौ चौत्स्य कज्यादेरिदित्वादि । वाक्य वार्तिकम् । तत्रापि आचारे गल्भ-क्लीवहोडेभ्य क्लब् वाच्य इत्यत्र तदर्थानुपक्ताकारस्येत्संज्ञा । लिङगानुशासन लिङगानुशासनप्रतिपादको ग्रन्थ । तत्रापि इदन्तो मृच्च इत्यादौ तकारादेरित्संज्ञादि । उपदेशकार्यं यथासभव ज्ञेयम् । एतेषा द्वन्द्व । समाहारे एकवचनम् । उपदिश्यन्ते यैस्ते इति साधनव्युत्पत्त्या एते उपदेशा । आगम अपुजतुनो पुक् इत्यादि । तत्र उकारादेरित्त्वम् । प्रत्यय सनादि । आदेश चक्षिङ ख्याञ् इत्यादि । उपदिश्यन्ते इति कर्मव्युत्पत्त्या एते उपदेशा ।' असे म्हटले आहे 'उणादिलिङगानुशासनयोरपि सूत्रत्वात्सिद्धे पृथगुपादान गोबलीवर्दन्यायेन । एव गणत्वादेव सिद्धे धातोरपि' असे जे मनोरमेत म्हटले आहे ते वरील प्रसादटीकेत आढळत नाही ते प्रकाशकाराच्या टीकेत म्हटले आहे असे दिसते ) 'धातुसूत्रगणोणादि' इत्यादि कारिका पठित करून तिचे व्याख्यान करिताना प्रकाशकारानी असे म्हटल आहे की, त्या कारिकेच्या पूर्वार्धांत निर्दिष्ट असलेल्या धातु, सूत्र इत्यादिकाना, 'उपदेश' या शब्दाचो 'करणे' घञ प्रत्यय करून ('उपदिश्यते अनेन इत्युपदेश ' असा) व्युत्पत्ति केल्यानें 'उपदेश' असे म्हटले जातें, व त्या कारिकेच्या उत्तरार्धांत निर्दिष्ट असलेल्या आगम, प्रत्यय इत्यादिकाना 'उपदेश' या शब्दाची कर्मणि घञ्प्रत्यय करून ('उपदिश्यते इति उपदेश ' असा) व्युत्पत्ति केल्यानें 'उपदेश' असे म्हटले जाते उणादि सूत्रपाठ व लिङ्गानुशासनपाठ याचा कारिकेंत निर्दिष्ट असलेल्या 'सूत्र' या शब्दात अन्तर्भाव होत असून देखील त्याचा त्या कारिकेंत जो पुन्हा निर्देश केला आहे तो गोबलीवर्दन्यायानें केला आहे त्याचप्रमाणे (ज्यात भ्वादि, अदादि दहा गण निर्दिष्ट केले आहत असा) धातुपाठाचा 'गण' या शब्दात अन्तर्भाव होत असून देखील पुन्हा त्याचा वरील कारिकेत जो पृथक् निर्देश केला आहे तो देखील वरील न्यायान्वयेच केला आहे (या पक्तीत ज्या

गोबलीवर्दन्यायाचा उल्लेख केला आहे तो सामान्यविशेषन्याय होय व त्याला ब्राह्मणवसिष्ठन्याय असे देखील म्हणता येते. 'गो' हा सामान्य शब्द सर्व प्रकारच्या बैलांचा वाचक असून 'बलीवर्द' हा विशेष शब्द, 'त्यदादीनि सर्वैर्नित्यम्' १-२-७२ या सूत्रावरील भाष्यांत सांगितल्याप्रमाणे 'उत्पादितवृषभा वाहाय च विक्रयाय च ये ते बलीवर्दाः' या विशेष प्रकारच्या बैलांचा, वाचक आहे 'गो' या शब्दांत बलीवर्दांचा व तसेच 'ब्राह्मण' या सामान्य शब्दांत ब्राह्मण वर्गाच्या वसिष्ठाचा अन्तर्भाव होत असून देखील पुन्हा बलीवर्द व वसिष्ठ या विशेष व्यक्तिवाचक शब्दाचा प्रामुख्याने निर्देश करणे हाच सामान्यविशेषन्याय किंवा गोबलीवर्दन्याय किंवा ब्राह्मणवसिष्ठ-न्याय होय ) प्रकाशकारांनी वर सांगितल्याप्रमाणे जें व्याख्यान केले आहे त्यासंबंधाने त्यांनी हें सांगावें की, वरील कारिकेंत निर्दिष्ट असलेल्या धातु, सूत्र इत्यादिकांना 'उपदेश' ही रूढ संज्ञा आहे काय, म्हणजे लौकिकव्यवहारांत ते शब्द 'उपदेश' या संज्ञेने बोधित होतात काय किंवा 'उपदेश' या शब्दाचा जो यौगिकअर्थ आहे त्या अर्थान्वयें त्यांना 'उपदेश' असे म्हटले जातें ? पहिला पक्ष स्वीकारता येत नाही, कारण त्यांना उपदेश ही संज्ञा आहे व 'उपदेश' हा शब्द संज्ञावाचक आहे असे शास्त्रकारांनी कोठेंहि म्हटले नाही, व भाष्य-कारांनी 'असंज्ञात्वात् घञ्प्रत्ययो न,' म्हणजे 'उपदेश' हा शब्द संज्ञावाचक नसल्यामुळें 'पुंसि संज्ञायां घः प्रायेण' सू ३२९६ या सूत्राने घप्रत्यय करता येत नाहीं, असे म्हटले आहे (सारांश 'उपदेश' ही संज्ञा नसल्यामुळें वरील कारिकेंत निर्दिष्ट असलेले धातु, सूत्र इत्यादि उपदेशसंज्ञक आहेत असे म्हणता येत नाही ) आपण तयार केलेल्या लौकिकसंज्ञांनी पाणिनीय शास्त्राची व्यवस्था लावल्यास (व तशा लौकिकसंज्ञांचे ठिकाणी पाणिनीय सूत्राची प्रवृत्ति केल्यास) अतिप्रसङ्ग, म्हणजे अतिव्याप्तिरूप दोष येतो (उदाहरणार्थ एखाद्या मुलाचे रघुनाथ असे नाव ठेऊन तो शब्द संज्ञावाचक आहे असे

मानल्यास, 'पूर्वपदात्संज्ञायामग' सू ८५७ या सूत्राने नकाराचे णत्व होण्याची आपत्ति येते पण लौकिकसंज्ञावाचक शब्दांना पाणिनीय सूत्रे लागत नसून शास्त्रीय संज्ञावाचक शब्दांनाच ती सूत्रे लागू पडतात असे मानले तरच ती आपत्ति टळते सारांश पाणिनीय शास्त्रात धातु इत्यादि उपदेशसंज्ञक आहेत व 'उपदेश' हा शब्द संज्ञावाचक आहे असे कोठेंहि सांगितलें नसल्यामुळें व भाष्यकारांनी तो शब्द संज्ञावाचक नाही असे स्पष्ट म्हटलें असल्यामुळें त्याला संज्ञावाचक शब्द मानणे अयोग्य आहे असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे ) तसेच 'प्रत्यय' हा उपदेशसंज्ञक आहे असे मानल्यास, प्रकाशकारांनी 'आमोऽमित्वमदन्तत्वात्' असे जें आपल्या ग्रन्थात पुढें स्वत च म्हटले आहे त्याशी विरोध येतो 'आम' यातील अकार हा अनुबन्ध नाहीसा झाल्यावर अवशिष्ट राहिलेला 'आम्' प्रत्ययसंज्ञक होत नाही व त्यामुळें त्याचा अन्त्य मकार इत्संज्ञक होत नाही असे म्हणता येत नाही ('आमोऽमित्वमदन्तत्वादगुणत्वं विदेस्तथा। आस्का-सोरविधानाच्च पररूपं कृतन्तवत्' ही कारिका 'कास्प्रत्ययादाममन्त्रे लिटि' ३–१–३५ या सूत्रावरील काशिकेत पठित केली आहे व 'आम्' प्रत्यय मित् नाही हे सांगतेवेळी प्रकाशकारांनी त्या कारि-केतील 'आमोऽमित्वमदन्तत्वात्' हें वचन प्रमाण दिले आहे 'आम' हा अकारान्त असल्यामुळें ता मित् नाही असा त्या वचनाचा अर्थ आहे जर 'आम्' हा प्रत्यय मित् मानला, म्हणजे त्या प्रत्ययातील अन्त्य मकार इत्संज्ञक आहे असे मानले तर, 'तस्य लोप' सू ६२ या सूत्राने मकाराचा लोप होऊन 'आ' एवढाच त्या प्रत्ययातील भाग अ-वशिष्ट राहील आणि 'कास्प्रत्ययादाम्' सू २३०६ व 'दयायासश्च' सू २३२८ या सूत्रांनी लिट्लकारात 'काम्' व 'आम्' या धातूंहून 'आम्' प्रत्यय होण्याचे विधान केले असल्यामुळें, तो प्रत्यय मित् मानल्यास, 'मिदचोऽन्त्यात्पर' सू ३७ या सूत्रान्वयें तो प्रत्यय 'काम्, आस्' यातील 'आ' पुढें होईल व 'का+आ+स्=कास्,

आ+आ+म्=आम्' अशीच रुपें होतील व 'आम्' प्रत्ययाचें विधान व्यर्थ ठरेल, म्हणजे ते विधान केले असून देखील न केल्यासारखेंच होईल ही आपत्ति टाळण्याकरिताच 'आम' असा अदन्त उपदेश मानला आहे व त्यामुळें 'आम्' प्रत्यय मित् ठरत नाही आणि म्हणूनच 'इजादेश्च गुरुमत' सू २२३१ या सूत्रावरील कौमुदीत 'आमो मकारस्य नेत्वम् । आस्कासाराविधानाअज्ञापकात्' असे दीक्षितांनी म्हटले आहे 'आम्' असा उपदेश न मानता 'आम' असा उपदेश मानल्यानें, 'आम' यातील अन्त्य अकार 'उपदेशेऽजनुनासिक इत्' सू ३ या सूत्रानें इत्संज्ञक ठरून व 'तस्य लोप' सू ६२ या सूत्रानें त्याचा लोप होऊन 'आम्' असा प्रत्यय अवशिष्ट राहतो व तो उपदेश नसल्यामुळें, त्यातील अन्त्य मकार इत्संज्ञक होत नाहीं व त्या मकाराचा लोप होत नाही आणि असा रीतीनें वर दाखविलेली आपत्ति टळते आता दीक्षित असें म्हणतात कीं, जरी 'आम' असा उपदेश आहे तरी त्यातील अन्त्य अकार हा अनुबंध वर सांगितल्याप्रमाणें नाहीसा झाल्यावर जो 'आम्' अवशिष्ट राहतो तो स्थानिवद्भावानें प्रत्ययसंज्ञक आहेच, अकार नाहीसा झाल्यामुळें 'आम्' प्रत्ययसंज्ञक ठरत नाही असे मुळीच म्हणता येत नाही त्यामुळें 'प्रत्यय' हा शब्द उपदेशसंज्ञक आहे असे मानल्यास, त्या 'आम्' प्रत्ययातील अन्त्य मकार 'हलन्त्यम्' या सूत्रानें इत्संज्ञक ठरेल व 'आम्' प्रत्यय मित् ठरेल त्यामुळें 'आमोऽमित्वमदन्तत्वात्' असे जें प्रक्रियाकारांनीं स्वत पुढील ग्रन्थांत म्हटले आहे व प्रत्यय हा उपदेश आहे असें जें त्यांनी 'धातुसूत्रगणोणादि' या कारिकेचे व्याख्यान करिताना पूर्वी म्हटल आहे त्या दोन विधानामध्यें परस्पर विरोध येतो हे उघड आहे म्हणून प्रत्यय उपदेशसंज्ञक आहे असें मानणें उचित नाहीं असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे येथपर्यंत प्रत्यय उपदेशसंज्ञक मानता येत नाही हें सिद्ध करून आता दीक्षित पुढील पंक्तींत 'आदेश' देखील उपदेशसंज्ञक मानता

येत नाही हे सिद्ध करतात ) दुसरें असे कीं, प्रकाशकाराचे म्हणणें बरोबर मानले तर, ज्या सूत्रात प्रत्यय होण्याचे विधान केले आहे तया सूत्रात पञ्चमीविभक्यन्त शब्दानतर उच्चारलेल्या शब्दाला षष्ठ्यन्त करावे असा ('तस्मादित्युत्तरस्य' सू ४० या परिभाषेचा) अर्थ केल्यानें 'सन सनैव आदेशो भविष्यति' असा ('गुप्तिज्किद्भ्य् सन्' सू २३९३ या सूत्राचा) अर्थ होईल अशी शका उपस्थित करून, तसा त्या सूत्राचा अर्थ केला तरी, आदेश हा उपदेश नसल्यामुळें, 'सन्' या आदेशातील अन्त्य नकाराला इत्सज्ञा होणार नाही असे जें भाष्यकारानी व त्या भाष्यावर टीका करिताना कैयटानें म्हटले आहे त्याशी (आदेश उपदेश मानल्यास, प्रकाशकारानी जें म्हटले आहे ते ) विरुद्ध ठरते ('तस्मादित्युत्तरस्य' १-१-६७ या सूत्रावरील भाष्यात 'यथार्थं वा षष्ठीनिर्देश' हें वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचे व्याख्यान करिताना भाष्यकारानीं असे म्हटले आहे की, 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' व 'तस्मादित्युत्तरस्य' या सूत्रात 'षष्ठी' या पदाचा निर्देश करण्याची काही गरज नाही, कारण त्या दोन्ही सूत्रात 'षष्ठी स्थानेयोगा' या पूर्व सूत्रातून 'षष्ठी' हें पद अनुवृत्त केल्याने, 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य षष्ठी, तस्मादिति निर्दिष्टे उत्तरस्य षष्ठी' असा त्या दोन सूत्राचा अर्थ करता येईल पण पुढें भाष्यकार म्हणतात की, तसा त्या सूत्राचा अर्थ केल्यास, ज्या सूत्रात पञ्चमीविभक्त्यन्त शब्दाचा निर्देश करून प्रत्यय होण्याचं विधान केले आहे तेथें पञ्चमीविभक्त्यन्त शब्दापुढें जो शब्द उच्चारला आहे त्याची षष्ठी करावी लागेल उदाहरणार्थ 'गुप्तिज्किद्भ्य सन्' या सनप्रत्ययविधायक सूत्रात 'गुप्तिज्किद्भ्य' असा पञ्चमीनिर्देश असल्यामुळें त्या शब्दापुढील 'सन्' या प्रथमान्त शब्दाची 'सन' अशी षष्ठी करावी लागेल व 'षष्ठी स्थानेयोगा' सू ३८ या सूत्रावरें ती स्थान्यादेशभावबोधिका षष्ठी मानावी लागेल पण 'सन' ही तशी षष्ठी मानल्यास, त्या सूत्रात आदेशाचा

निर्देश केला नसल्यामुळें, 'सन्' चे जागी आदेश कसा होणार व कोणता आदेश होणार ? या प्रश्नाचे उत्तर देताना भाष्यकार असे म्हणतात की, वरील सूत्रात कोणताहि आदेश जरी निर्दिष्ट नाही तरी, 'स्थानेऽन्तरतम' सू ३९ या सूत्रान्वयें 'सन्' चे जागी 'सन्' असाच अन्तरतम आदेश होईल व 'गुप्तिज्किद्भ्य सन सन्' असा त्या सूत्राचा अर्थ होईल पण भाष्यकार पुढें असे म्हणतात की, असे करणे शक्य नाही, कारण त्या 'सन्' आदेशातील अन्त्य नकाराला इत्संज्ञा होणार नाहीं याचे कारण हे की, उपदेशातील–आद्योच्चार-णातील–अन्त्य हलाचाच 'हलन्त्यम्' या सूत्रानें इत्संज्ञा होणें सांगितले आहे या भाष्यावरून हें स्पष्ट होते की, आदेश हा उपदेश नव्हे आदेश जर उपदेश असता तर, भाष्यकारानी 'नैव शक्यम्। इत्संज्ञा न प्रकल्पेत। उपदेश इतीत्संज्ञोच्यते।' असे त्या भाष्यात म्हटले नसते त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात–'प्रकल्पकमिति चेत् प्रत्ययविधौ खल्वपि पञ्चम्य प्रकल्पिका स्यु। तत्र को दोष ?। गुप्तिज्किद्भ्य सन्। गुप्तिज्किद्भ्य इत्येषा पञ्चमी सनिति प्रथमाया षष्ठी प्रकल्पयेत्, तस्मादित्युत्तरस्येति। अस्तु। न कश्चिदन्य आदेश प्रतिनिर्दिश्यते, तत्रान्तर्यत मन सन्नेव भविष्यति। नैव शक्यम्। इत्संज्ञा न प्रकल्पेत। उपदेश इतीत्संज्ञोच्यते।' या भाष्यातील 'इत्संज्ञा न प्रकल्पेत' या पदाचा 'आदेशस्योपदेशाभावात् तस्येत्संज्ञा न सिध्यति' असा कैयटाने आपल्या वृत्तीत अर्थ केला आहे साराश भाष्यकारानीं व कैयटानें आदेश हा उपदेश नव्हे असे स्पष्ट म्हटले असल्यामुळें, आदेश उपदेश आहे हे प्रकाशकाराच म्हणणे भाष्यकैयटविरुद्ध व चूक ठरते असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे आता धातु देखील उपदेश मानता येत नाही हे दीक्षित पुढील पक्तीत सागतात) आणखी असे की, 'न धातुलोप आर्धधातुके' १–१–४ या सूत्रावरील भाष्यात 'धातुग्रहण किम् ? लूञ् लविता, पूञ् पविता' असं म्हटले आहे, म्हणजे त्या सूत्रात 'धातु' या पदाचे ग्रहण अशाकरिता केले

आहे की, 'लूञ् लविता लवितुम्, पूञ् पविता पवितुम्' या स्थलीं 'सार्वधातुकार्धधातुकयो' सू २१६८ या सूत्राने होणाऱ्या गुणाचा निषेध न व्हावा, व त्या भाष्याच्या वृत्तीत कैयटानें असे म्हटले आहे की, उच्चारणकालींच अनुबन्धाचा लोप केल्यानंतर अवशिष्ट राहिलेल्या भागाला धातुसंज्ञा होते घातु उपदेश मानल्यास, वरील भाष्याशी व कैयटोक्तीशी विरोध येतो (धातुपाठात 'लूञ् छेदने, पूञ् पवने' असा निर्देश आहे 'लूञ्, पूञ्' हे धातु नसून उपदेश आहेत या उपदेशातील 'ञ्' या अन्त्य हलाला 'हलन्त्यम्' या सूत्राने इत्संज्ञा होऊन 'तस्य लोपः' सू ६२ या सूत्राने त्या इत्संज्ञक ञकाराचा लोप केल्यावर, अवशिष्ट राहिलेल्या 'लू, पू' यांना धातुसंज्ञा होते, कारण 'भूवादयो धातवः' सू १८ या सूत्रानें धातुपाठात निर्दिष्ट असलेल्या क्रियावाचक भ्वादि शब्दांना धातुसंज्ञा होणे सांगितले असल्यामुळें व 'लूञ्, पूञ्' हे क्रियावाचक नसून 'लू, पू' हे क्रियावाचक असल्यामुळें, त्यांनाच धातुसंज्ञा होते 'लूञ्, पूञ्' हे क्रियावाचक नाहीत असें जें नुक्तेच वर म्हटले आहे त्याचे कारण हें की, 'लुनाति, पुनाति' इत्यादि स्थान ञकार आढळत नाहीं यावरून हें स्पष्ट होते की, धातु हे उपदेश नव्हत व धातुपाठात निर्दिष्ट असलेल्या उपदेशातील इत्संज्ञक अनुबन्धाचा 'तस्य लोपः' या सूत्राने लोप केल्यावर अवशिष्ट राहिलेल्या क्रियावाचक भागाला धातुसंज्ञा होते त्या सूत्रावरील भाष्याच्या वृत्तींत कैयटानें 'अनुबन्धो न धात्ववयवो, यस्मादुपदेश एवेत्संज्ञा। प्रयोगेतु लूशब्द एव धातुसंज्ञा। केवलमसौ ञित्कार्यं लभते। लूशब्दस्यैव हि क्रियावाचित्वमिति तस्यैव धातुसंज्ञा युक्ता।' असे म्हटले आहे सारांश वरील भाष्यावरून व कैयटवृत्तीवरून धातु उपदेश नव्हत हें स्पष्ट होत असल्यामुळें, प्रकाशकारांनी धातु उपदेश होत असें जें म्हटले आहे तें भाष्यकैयटविरुद्ध व चूक ठरतें असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे आतां मनोरमेंत ज्या भाष्याचा उल्लेख केला आहे तें भाष्य

वास्तविक असे आहे–'धातुग्रहण किमर्थम् ? । इह मा भूत् । लूञ् लविता लवितुम् । पूञ् पविता पवितुम् ।' व त्या भाष्याचा भावार्थ हा आहे की, 'न धातुलोपे' या सूत्रात 'धातु' या पदाचे ग्रहण न करिता 'न लोपे आर्धधातुके' असे सूत्र पठित केले असते तर त्या सूत्राचा असा अर्थ झाला असता की, लोप झाला असता, आर्धधातुक प्रत्ययाच्या निमित्तामुळें होणारा गुण किंवा वृद्धि करू नये व त्यामुळें 'लूञ्, पूञ्' या स्थली ञकारानुबन्धाचा लोप झाला असल्यामुळें 'लू, पू' या धातूहून 'तृच्,' किंवा 'तुमुन्' हा आर्धधातुक प्रत्यय केला असतां, त्या धातूतील अन्त्य ऊकाराचा गुण न होण्याची आपत्ति आली असती व 'लविता लवितुम्, पविता पवितुम्' अशी इष्ट रूपें सिद्ध होऊ शकली नसती पण त्या सूत्रात 'धातु' या पदाचें ग्रहण केले असल्यामुळें व 'लूञ्, पूञ्' हा ञकारानुबन्धघटित समुदाय धातु नसून उपदेश असल्यामुळें आणि त्या समुदायातील ज्या ञकाराचा लोप होतो तो धातूचा अवयव नसल्यामुळें, 'न धातुलोपे' या सूत्राने होणारा गुणनिषेध प्रवृत्त होत नाही व गुण आणि आदेश होऊन इष्ट रूपाची सिद्धि होते येथपर्यंत 'धातुसूत्रगणो-णादि' या कारिकेत निर्दिष्ट असलेले धातु इत्यादि उपदेशसंज्ञक आहेत असे जें विधान केले आहे ते विधान प्रत्यय, आदेश व धातु याच्या विषयात चूक ठरतें हें सिद्ध करून आता ती कारिका दोषयुक्त आहे, म्हणजे जे उपदेश आहेत त्याचा उपदेशसंज्ञकशब्दाचे परिगणन करणाऱ्या त्या कारिकेत निर्देश केला नसून, जे धातु, प्रत्यय व आदेश उपदेशसंज्ञक नाहीत त्याचा त्या कारिकेत निर्देश केला आहे व अशा रीतीने ती कारिका न्यूनातिरिक्तदोषयुक्त आहे, हें सिद्ध करण्याकरिता दीक्षित पुढील पंक्ति लिहितात ) आणखी असे की, ('धातुसूत्रगणोणादि' या कारिकेत निर्दिष्ट असलेले धातु इत्यादि एवढेच उपदेशसंज्ञक होत असे मानल्यास,) 'घ्वसोरेद्धौ अभ्यासलो-पश्च' सू २४७१ या सूत्रात द्विशकारक निर्देश आहे असे मानावे'

व द्वितीय दाकार इत् समजावा असे जें 'अलोऽन्त्यात्पूर्व उपधा' १-१-६५ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारांनी म्हटले आहे व त्या भाष्याच्या वृत्तीत कैयटानें जें म्हटले आहे त्याशी विरोध येतो ('अलोऽन्त्यात्पूर्व उपधा' १-१-६५ या उपधासंज्ञाविषयक सूत्रावरील भाष्यात 'नानर्थकेऽलोऽन्त्यविधिरनभ्यासविकारे'-परि १०५-ही परिभाषा भाष्यकारांनी पठित केली आहे त्या परिभाषेचा अर्थ हा आहे की, जेथें सूत्रात अनर्थक वर्णसमूहाचे जागी आदेश होणे सांगितले आहे तेथें 'अलोऽन्त्यस्य' सू ४२ हें सूत्र लागू पडत नाही, पण जेथें अभ्यासविकाररूप कार्य होणे सांगितले आहे तेथें अनर्थकाचे जागी आदेश होणे सांगितले असले तरी 'अलोऽन्त्यस्य' हें सूत्र लागू पडते या परिभाषेचे प्रयोजन सांगताना भाष्यकार म्हणतात-'घ्वसोरे-द्धावभ्यासलोपश्च इत्यन्त्यस्य प्राप्नोति। अनर्थकेऽलोऽन्त्यविधिर्नेति न दोषो भवति। एतदपि नास्ति प्रयोजनम्। पुनर्लोपवचनसामर्थ्या-त्सर्वस्य भविष्यति। अथवा शित्लोप करिष्यते, स शित्सर्वस्येति सर्वादेशो भविष्यति। स तर्हि शकार कर्तव्य। न कर्तव्य। क्रियते न्यास एव। द्विशकारको निर्देश। घ्वसोरेद्धावभ्यासलोपश्शश्चेति।' या भाष्याचा भावार्थ हा आहे की, 'घ्वसोरेद्धावभ्यासलोपश्च' या सूत्राने घुसंज्ञक 'दा' व 'धा' या धातूपुढें व तसेच 'अस्' धातूपुढें 'हि' प्रत्यय आला असता धातूतील अकाराचे किंवा आकाराचे जागी एकार करावा व अभ्यासाचा लोप करावा असं सांगितले असल्यामुळें, 'दादा + हि = ददा + हि = ददे + हि' अशा स्थितीत 'द' या अभ्यासाचे ठिकाणी 'अलोऽन्त्यस्य' हे सूत्र प्रवृत्त केल्यास, 'द' या अभ्यासातील केवळ अन्त्य अकाराचा लोप होण्याची व 'देहि' असं अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येते परंतु 'नानर्थकेऽलोऽन्त्यविधि' ही परिभाषा असल्यामुळें व 'द' हा अभ्यास अनर्थक-अर्थरहित-असल्यामुळें, 'अलोऽन्त्यस्य' हे सूत्र वरील उदाहरणांत प्रवृत्त होत नाहीं व वर दाखविलेली आपत्ति टळते आणि अशा रीतीनें तो

परिभाषा अप्रयोजनक व चरितार्थ ठरते पण पुढें भाष्यकार असें म्हणतात की, ही परिभाषा न मानतां देखील वरील उदाहरणांत 'द' या संपूर्ण अभ्यासाचा लोप करता येतो; कारण 'घ्वसोरेद्' या सूत्रांत 'लोपो यि' या पूर्व सूत्रातून 'लोप' या शब्दाची अनुवृत्ति करता येत असून देखील पुन्हा 'अभ्यासलोप' या स्थळीं 'लोप' हा शब्द उच्चारला असल्यामुळें, त्या उच्चारणसामर्थ्यामुळें संपूर्ण अभ्यासाचा लोप करतां येतो. अथवा 'लोप' हा शब्द शित् केल्यास, म्हणजे त्याला इत्संज्ञक शकार जोडल्यास, 'अनेकाल्शित्सर्वस्य' सू. ४५ या सूत्रान्वयें संपूर्ण अभ्यासाचे ठिकाणीं लोपरूप आदेश होऊं शकतो, म्हणजे संपूर्ण अभ्यासाचा लोप होऊं शकतो. एवढेंच कीं 'घ्वसोरेद्धावभ्यासलोपश्च' असा प्रकारचेंच सूत्र पाणिनीनें उच्चारलें आहे असें समजावें व तसें मानल्यास, वरील परिभाषा न मानतां देखील, संपूर्ण अभ्यासाचा लोप होऊन 'देहि, धेहि' इत्यादि इष्ट रूपें सिद्ध होऊं शकतात. भाष्यकारांनीं हा जो इत्संज्ञक शकार जोडला आहे तो वरील कारिकेंत निर्दिष्ट असलेल्या 'धातु' इत्यादिकांच्या अन्तीं जोडला नसून 'लोप' या प्रथमान्त पदाच्या अन्तीं जोडला आहे. वरील कारिका बरोबर मानल्यास, त्या कारिकेंत 'पद' या शब्दाचा निर्देश केला नसल्यामुळें तो शकार इत्संज्ञक होऊं शकणार नाहीं. पण भाष्यकारांनीं तो शकार इत्संज्ञक मानला असल्यामुळें हें स्पष्ट होतें कीं, वरील कारिकेंत केलेलें परिगणन चूक असून न्यून—अपुरें—देखील आहे. वरील भाष्यांतील 'द्विशकारको निर्देश' या पदाचें व्याख्यान करितांना कैयटानें 'लोपशब्दात् कृदन्ता-त्सञिनार्थेनार्थवत्त्वाद्विभक्तौ कृतायां शकारः प्रतिनिर्दिश्यते । तस्य चेत्संज्ञायां सत्यां सर्वादेशो लोपो भवति । इत्संज्ञोपदेशो एव प्रवर्तते । तत्कार्यं तु प्रयोग इत्येव सिद्धान्त ।' असें म्हटलें आहे. दीक्षित म्हणतात कीं, वरील कारिकेंत ज्या धातु इत्यादिकांचा निर्देश केला आहे त्याच्यापैकीं कोणाच्याहि वरतीं 'लोप' हा शब्द येत नसून

'अदर्शन लोप ' सू ५३ या सूत्रान्वयें सज्ञावाचक असणाऱ्या 'लोप' या प्रातिपदिकाच्या प्रथमैकवचनाच्या 'लोप ' या रूपाला भाष्यकारानी इत्सज्ञक शकार जोडल्या असल्यामुळें, कारिकेतील परिगणन वरील भाष्याच्या व कैयटोक्तीच्या विरुद्ध ठरते येथपर्यंत प्रथम पक्षाचे, म्हणजे 'पङ्कज' हा शब्द भार्येत कमल या अर्थापर्यें जसा रूढ आहे त्याचप्रमाणे कारिकेत निर्दिष्ट असलेल्या धातु इत्यादि अर्थामध्य 'उपदेश' हा शब्द लौकिक व्यवहारात रूढ आहे या पक्षाचे, खण्डन करून, आता दीक्षित पुढील पङ्क्तीत द्वितीय पक्षाचे-'उपदेश' हा शब्द पङ्कज इत्यादि शब्दासारखा योगरूढ अर्थाचा वाचक नसून, प्रकृतीला प्रत्यय लावल्याने जो अर्थ निष्पन्न होतो तशा यौगिक अर्थाचा, 'पाठक' इत्यादि शब्दासारखा, वाचक आहे या पक्षाचे-खण्डन करितात ) 'उपदेश' हा शब्द रूढ अर्थाचा वाचक नसून केवळ यौगिक अर्थाचा वाचक आहे हा द्वितीय पक्ष मानल्यास, कारिकेत केलेले परिगणन व्यर्थ ठरते ('उपदेश' ही रूढ सज्ञा लौकिक व्यवहारात अमुकानाच लागू पडते व ती इतराना मुळीच लागू पडत नाही असे मानल तरच, कोणाला ती सज्ञा लागू पडते याचे ज्ञान होण्याकरिता परिगणन आवश्यक ठरते पण जर 'उपदेश' हा शब्द केवळ यौगिक अर्थाचा वाचक मानला तर, जे त्या अर्थाच्या कक्षेंत येतात त्याना 'उपदेश' म्हणता येईल मग परिगणन करण्याची गरज काय असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे 'उपदेश' या शब्दाचा केवळ यौगिक अर्थ स्वीकारल्यास, कारिकेच्या पूर्वार्धांत निर्दिष्ट असलेल्या) 'धातु' इत्यादिकाना 'उपदेश हा शब्द लागू पडण्याकरिता ('उपदिश्यते अनेन इति उपदेश ' अशी) 'करण घञ्' प्रत्यय करून 'उपदेश' या शब्दाची व्युत्पत्ति करणे (*व कारिकेच्या उत्तरार्धांत निर्दिष्ट असलेल्या*) '*आगम*' इत्यादिकाना तो शब्द लागू पडण्याकरिता तशी 'करणे घञ्' प्रत्यय करून 'उपदेश' या शब्दाची व्युत्पत्ति न करणे (व 'कर्मणि घञ्'

प्रत्यय करून 'उपदिश्यते इति उपदेश:' अशी त्या शब्दाची भिन्न तऱ्हेने व्युत्पत्ति करणें) या वैषम्याची उपपत्ति लावणे अशक्य आहे (सारांश 'उपदेश' हा शब्द केवळ यौगिक अर्थाचा वाचक आहे असें मानल्यास, 'सकृदुच्चरित शब्द सकृदेवार्थं गमयति' या न्यायान्वयें त्या शब्दाची एकच तऱ्हेनें व्युत्पत्ति करून एकच अर्थ करणें योग्य आहे व भिन्न भिन्न तऱ्हेनें व्युत्पत्ति करून भिन्न भिन्न अर्थ करणे हें वरील न्यायाच्या विरुद्ध आहे असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे) आणखी असें कीं, द्वितीय यौगिक पक्ष मानल्यास, प्रकाशकारांनी ('हलन्त्यम्' या सूत्राचे व्याख्यान करिताना) 'उपदेशनाप्रयोजक-धातुत्वादिरूपोपाध्यवच्छिन्नसमुदायान्त्य हल्विद्त्यर्थः' असें जें स्वतः म्हटले आहे त्याशीं विरोध येतो (या पक्तीचा अर्थ असा आहे कीं, उपदेशनेचे प्रयोजक–'उपदेश' हा शब्द लागू पडण्यास आवश्यक असणारे–धातुत्व इत्यादि जे धर्म त्या धर्मांनीं अवच्छिन्न–युक्त-असलेल्या समुदायातील अन्त्य हल् इत्संज्ञक होतो असा 'हलन्त्यम्' या सूत्राचा अर्थ समजावा 'उपदेश' हा शब्द पङ्कज इत्यादि शब्दासारखा लौकिक व्यवहारात रूढ असलेल्या अर्थाचा वाचक आहे हा प्रथम पक्ष स्वीकारल्यासच, प्रकाशकारांनीं केलेले वरील व्याख्यान उपपन्न ठरतें पण 'उपदेश' हा शब्द 'पाठक' इत्यादि शब्दासारखा केवळ यौगिक अर्थाचा वाचक आहे असा द्वितीय पक्ष मानल्यास, तें व्याख्यान मुळीच उपपन्न ठरत नाही, कारण या द्वितीय पक्षात ज्याना 'उपदेश' हा यौगिक शब्द लागू पडतो त्याना 'उपदेश' मानता येईलच ते धातुत्वादिधर्मविशिष्ट समुदायच असले पाहिजेत असें मानण्याची गरज काय ? तसे मानणे हें प्रथम पक्षाचाच पुरस्कार करणे असून द्वितीय पक्षाच्या विरुद्ध आहे म्हणून प्रकाश-कारांनीं 'हलन्त्यम्' या सूत्राचे व्याख्यान करिताना वर सांगितल्या-प्रमाणे जें म्हटले आहे त्या व्याख्यानान्वयें द्वितीय पक्ष मुळीच स्वीकारता येत नाही व प्रथम पक्षच स्वीकारता येतो असा,

दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे तो प्रथम पक्ष कसा दोषयुक्त आहे हें दीक्षितानी वर सागितलेच आहे या पक्तीचे अधिक विवरण शब्दरत्नात करण्यात येईल ) आणखी असे की, वरील दोन पक्षापैकी कोणताहि पक्ष स्वीकारला तरी (कारिकेत पठित असलेला) 'लिङगानुशासन' हा शब्द प्रकृत विषयामध्यें निरुपयोगी ठरतो. (कारण लिङगानुशासन पाठात इत्संज्ञा करण्याचा प्रसगच उपस्थित होत नाही त्या पाठात प्रत्ययादिकाचा अनुवाद करूनच तसे प्रत्ययान्त शब्द कोणत्या लिङगाचे समजावे वगैरे सागितले आहे ) आणखी असे की, वरील दोन पक्षातून कोणताहि पक्ष मानला तरी, 'लोपश्च' या स्थली जो शकार प्रश्लिष्ट केला आहे त्याचा सग्रह होऊ शकत नाही म्हणजे त्या शकाराला इत्संज्ञा होऊ शकत नाहीं (पहिला योगरूढ पक्ष स्वीकारला तर, कारिकेत सुबन्ताचे परिगणन केले नसल्यामुळें, 'लोप' या सुबन्ताला जोडलेल्या शकाराला इत्संज्ञा होऊ शकत नाही द्वितीय पक्षात देखील शकार का इत्संज्ञक होऊ शकत नाही याचे कारण 'न ह्यनेन किञ्चिदुपदिश्यते' असे शब्दरत्नात दिले आहे व त्याच विवेचन शब्दरत्नात करण्यात येईल परतु 'उपदेश' हा शब्द भावघञन्त मानून त्याचा 'आद्योच्चारण' असा अर्थ केल्यानें 'लोपश्च' या आद्योच्चारणातील अन्त्य शकाराला 'हलन्त्यम्' या सूत्रान्वयें इत्संज्ञा होण्यात काहीच अडचण येत नाही ) तसेच 'अदेच उपदेशे' सू २३७०, 'उपदेशेऽत्वत' सू २२९५ ('एकाच उपदेशेऽनुदात्तात्' सू २२४६) इत्यादि सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'उपदेश' या शब्दाचा अर्थ 'आद्योच्चारण' च आहे असे सर्वांना ममत असल्यामुळें, ('उपदेशेऽजनुनासिक इत' सू ३ या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या) 'उपदेश' या शब्दाचा ('भावे' या सूत्राने सिद्धावस्थापन्न-क्रिया या अर्थामध्यें घञ् प्रत्यय करून) आद्योच्चारण असाच अर्थ करणे योग्य आहे (व भिन्न भिन्न सूत्रात निर्दिष्ट असलेल्या त्या शब्दाचा 'आद्योच्चारण' असा एकच तऱ्हेने सर्वत्र अर्थ करणे सभवत असता, तसाच अर्थ सर्वत्र करणे योग्य असून भिन्न भिन्न रीतीने अर्थ करणे योग्य नाही )

शब्दरत्न– धातुसूत्रेत्यादीति । "धातुसूत्रगणोणादिवाक्यलिङ्गानुशासनम् । आगमप्रत्ययादेशा उपदेशाः प्रकीर्तिताः" इतीत्यर्थं । उपदेशत्वमिति । उपदेशशब्दव्यवहार इत्यर्थं । धातोरपीति । प्रत्ययेभ्य उणादेरपीत्यपिशब्दार्थं । वाक्यशब्देन वार्तिकम् । शीङ्, लण्, चोरट्, उण्, आचारेऽवगल्भ, घुट्, अण्, अनाङ्स्युदाहरणानि । उपदेशसञ्ज्ञेति । उपदेशत्वं योगरूढमेष्विति भाव । ननु सञ्ज्ञाशब्देन व्यवहार एवाभिमतोऽत आह–आम इत्यादि । न चाकारोच्चारण व्यर्थम्, तेनास्मत्पक्षज्ञानानर्थक्यौचित्यादिति भाव । आदिना यकारादौ चुञ्चुप्चणपावित्यादिसङ्ग्रह । उपदेशाभावादिति । आदेशस्योपदेशाभावादित्यर्थं । ततो धातुसञ्ज्ञेति । तृशब्द एव धातुसञ्ज्ञक, केवलमसौ नि कार्यं लभत इति भाव । नन्वत्र सूत्रसाहचर्याद्धातागमप्रत्ययादिशब्देन तद्बोधकपाणिन्यादिपठितानुपूर्वीकाणां ग्रहणम्, तेषां धात्वादिव्यवहारस्तु भाविसञ्ज्ञाविषयघटितत्वेन 'धातुपाठ' इत्यादिव्यवहारवदिति चेन्न, आद्योच्चारणविषयाणामित्येव सिद्धे एतस्यानुपयोगात् । इत एव वाऽरुचेराह-अपि चेति ।

यस्लोऽन्त्यसूत्रेति । उपधासञ्ज्ञासूत्रेत्यर्थं । विरुद्धप्येतेति । तत्र हि 'लोपश्' इति भिन्न पदम् 'श्' इति च । पूर्वस्य श्चुत्वेन श । असन्देहाय झल्परसयोगादित्वेऽपि "स्को" इत्यस्य न प्रवृत्ति, "झला जश्" इत्यादौ जश्त्वस्येव । शकारस्य धात्वाद्यन्तत्वाभावः स्पष्ट एवेति भाव ।

मनोरमेंतील 'धातुसूत्रेत्यादि पठन्ति' या पक्तीतील 'इति' या शब्दाचा 'धातुसूत्रगणोणादिवाक्यलिङ्गानुशासनम् । आगमप्रत्ययादेशाः उपदेशाः प्रकीर्तिताः ॥' ही कारिका असा अर्थ आहे 'पूर्वाधोपात्तानामुपदेशत्वम्' या मनोरमेच्या पक्तीतील 'उपदेशत्वम्' या पदाचा 'उपदेशशब्दव्यवहार'–'उपदेश' हा शब्द लौकिक व्यवहारात कारिकेच्या पूर्वार्धात निर्दिष्ट असलेल्या धातु इत्यादिकाना रूढीने लागू पडतो–असा अर्थ आहे मनोरमेंतील 'धातोरपि' यातील

'अपि' शब्दाचा असा अर्थ आहे की, कारिकेत निर्दिष्ट असलेल्या 'प्रत्यय' या शब्दाने उणादि प्रत्ययाचे देखील ग्रहण होऊ शकते (परंतु त्याचे कारिकेत जें पृथक् ग्रहण केले आहे ते गोबलीवर्दन्यायाने केले आहे) कारिकेतील 'वाक्य' या शब्दाचा ('सुप्तिङन्तचयो वाक्यम्' असा जो प्रसिद्ध अर्थ आहे तो अर्थ नसून) 'वार्तिक' असा अर्थ आहे 'शीङ, लण्, चोरट्, उण, आचारेऽवगल्भ, धुट्, अण्, अनङ' ही (कारिकेत निर्दिष्ट असलेल्या धातु इत्यादिकांची अनुक्रमें) उदाहरणे होत ('शीङ स्वप्ने' हे धातूचे उदाहरण आहे धातु-पाठातील अदादिगणांत 'शीङ' असा उपदेश असल्यामुळे, त्यातील अन्त्य ङकाराला 'हलन्त्यम्' या सूत्राने इत्संज्ञा होते व 'अनुदात्तङित आत्मनेपदम्' सू २१५७ या सूत्रान्वयें 'शी' धातूला आत्मनेपदी प्रत्यय होतात 'लण्' हे सूत्राचे उदाहरण असून ते सहावे शिवसूत्र आहे व त्यामुळे 'हलन्त्यम्' या सूत्रान्वये 'लण्' यातील अन्त्य णकाराला इत्संज्ञा होते व तो णकार इत्संज्ञक असल्यामुळे, 'आदिर-न्त्येन सहेता' या सूत्रान्वय 'अण् इण्' हे प्रत्याहार सिद्ध होतात 'चोरट्' हे गणाचे उदाहरण आहे, हा शब्द पचादिगणात उपदेश-रूपाने पठित असल्यामुळें त्या शब्दातील अन्त्य टकाराला 'हलन्त्यम्' या सूत्राने इत्संज्ञा होते व त्यामुळ 'टिड्ढाणञ्' सू ४७० या सूत्रान्वय 'चोर' या प्रातिपदिकाला 'ङीप्' प्रत्यय होऊन 'चोरी' असे स्त्रीलिङ्गाचे रूप होते उण्' हे उणादीचे उदाहरण आहे व 'कृवापाजिमिस्वदिसाध्यशूभ्य उण्' या प्रथम उणादि सूत्रात 'उण्' असा उपदेश असल्यामुळें त्या 'उण्' मधील अन्त्य णकार 'हल-न्त्यम्' या सूत्राने इत्संज्ञक होतो व त्यामळें 'अत उपधाया सू २२८२ या सूत्रान्वय उपधेतील अकाराची वृद्धि होऊन व 'अचो ञ्णिति' सू २५४ या सूत्राने अन्त्य इक्ची वृद्धि होऊन 'कारु जायु मायु आशु' इत्यादि रूपें सिद्ध होतात 'आचारेऽवगल्भ' हे वार्तिकाचे उदाहरण आहे व 'आचारेऽवगल्भक्लीबहोडेभ्य क्विब्वा' असे ते

संपूर्ण वार्तिक असून ते २६६५ या सूत्रावरील कौमुदींत पठित आहे या वार्तिकांत 'अवगल्भ, क्लीब, होड' असा उपदेशरूपानें निर्देश केला असल्यामुळें, त्या तीन्ही शब्दांतील अन्त्य अनुदात्त अनुनासिक अकार 'उपदेशेऽजनुनासिक इत्' सू ३ या सूत्रानें इत्संज्ञक होतो व 'अनुदात्तङित आत्मनेपदम्' सू २१५७ या सूत्रान्वयें त्या तीन शब्दांहून आत्मनेपदाचे प्रत्यय होऊन 'अवगल्भते, क्लीबते, होडते' इत्यादि रूपें सिद्ध होतात 'घुट्' हे आगमाचें उदाहरण आहे आणि 'ह्र मि घुट्' सू १३१ इत्यादि सूत्रांत 'घुट्' असा आगमाचा उपदेश केला असल्यामुळें, त्यांतील अन्त्य टकार 'हलन्त्यम्' या सूत्रानें इत्संज्ञक होतो व 'आद्यन्तौ टकितौ' सू ३६ या सूत्रान्वयें तो आगम सूत्रनिर्दिष्ट मकार इत्यादिकांचा आद्यवयव होतो 'अण्' हे प्रत्ययाचें उदाहरण आहे व 'प्राग्दीव्यतोऽण्, अश्वपत्यादिभ्यश्च' सू १०७३, १०७४ इत्यादि सूत्रांत तो प्रत्यय उपदेशरूपानें पठित असल्यामुळें, त्यांतील अन्त्य णकाराला 'हलन्त्यम्' या सूत्रानें इत्संज्ञा होते आणि अशा रीतीनें तो प्रत्यय णित् ठरत असल्यामुळें ज्याहून तो प्रत्यय होतो त्यांतील अन्त्य इकाराची व उपान्त्य अकाराची 'अचो ञ्णिति' व 'अत उपधायाः' या सूत्रान्वयें वृद्धि होते 'अनङ्' हे आदेशाचें उदाहरण आहे व तसा आदेश 'अनङ् सौ' सू २४८ इत्यादि सूत्रांत उपदेशरूपानें पठित असल्यामुळें, त्यांतील अन्त्य ङकार 'हलन्त्यम्' या सूत्रानें इत्संज्ञक होतो आणि तो आदेश अनेकाल् असून देखील ज्याला तो होणें सांगितलें आहे त्याच्या अन्त्य वर्णाचे जागीं 'ङिच्च' सू ४३ या सूत्रान्वयें तो होतो वर जीं उदाहरणें दिलीं आहेत त्यांत लिङ्गानुशासनाचें उदाहरण दिलें नाहीं त्याचें कारण हेंच की, लिङ्गानुशासनपाठांत इत्संज्ञा होत नाहीं व वार्तिकांत 'लिङ्गानुशासन' हा शब्द व्यर्थ घातला आहे हें पूर्वी सविस्तर सांगितलेंच आहे उपदेशविषयीभूत शब्दांना जे इत्संज्ञक अनुबन्ध लावले जात असतात ते निरर्थक नसून सप्रयोजनक असतात हें

घ्यानात यावे याकरिता वरील उदाहरणातील प्रत्येक अनुबन्धाचे प्रयोजन वर मागितले आहे ) मनोरमेंतील 'क्मिपामुपदेशसज्ञा' याचा अर्थ हा आहे की, कारिकेत निर्दिष्ट असलेल्या 'धातुसूत्र' इत्यादिकाचे ठिकाणी 'उपदेश' हा शब्द योगरूढ आहे काय, म्हणजे 'उपदेश' या शब्दाचा लौकिक व्यवहारात 'धातुसूत्र इत्यादि' रूढ अर्थ आहे काय व 'उपदेश' या रूढ शब्दाने ते बोधित होतात काय? (साराश जरी चिखलात उत्पन्न होणाऱ्या सर्व वस्तूना पङ्कज असे म्हणता येते तरी तो शब्द 'कमल' या अर्थामध्येंच जगा भाषेत रूढ आहे तसाच 'उपदेश' हा शब्द 'धातुसूत्रगणोणादि' या कारिकेत निर्दिष्ट असलेल्या धातुसूत्र इत्यादिकाचा लौकिक व्यवहारात रूढीनें बोधक आहे काय असे मनोरमेंतील 'किमेपामुपदेशसज्ञा' या पहिल्या प्रश्नात विचारले आहे आता येथें असे म्हणता येऊ शकते की, प्रक्रियाकौमुदीकारानी 'धातुसूत्रगणोणादि' ही जी कारिका पठित केली आहे ती अशाच आशयाने पठित केली आहे की, लौकिक व्यवहारात 'उपदश' हा शब्द रूढीने त्या कारिकेत निर्दिष्ट असलेल्या धातुसूत्र इत्यादिकाचा बोधक आहे व म्हणून 'क्मिपामुपदेशसज्ञा उत योगमानम्' असा जो मनोरमेंत विकल्पप्रदर्शक प्रश्न केला आहे तो अनुचित ठरतो परतु प्रकाशकारानी त्या कारिकेचे व्याख्यान करिताना 'उपदेश' या शब्दाची एकदा 'करणे घञ्' प्रत्यय करून व पुन्हा 'कर्मणि घञ्' प्रत्यय करून व्युत्पत्ति केली असल्यामुळें असें दिसून येतें की, त्यानी बहुधा योगाचाच पुरस्कार केला आहे, म्हणजे 'उपदेश' हा शब्द त्यानी रूढ न मानता केवळ यौगिक मानला आहे म्हणून दीक्षित प्रकाशकाराना असा प्रश्न करितात की तुम्ही जें योगार्थाचे वर्णन केले आहे तें प्रक्रियाकौमुदीकाराच्या मताला अनुसरून 'उपदेश' हा शब्द रूढ आहे या आशयाने केले आहे किंवा तो केवळ यौगिक शब्द आहे या आशयाने केले आहे आणि अशा रीतीने तो विकल्पप्रदर्शक प्रश्न

उपपन्न ठरतो भावप्रकाशकारानीं त्या विकल्पप्रदर्शक प्रस्तावे वर सांगितल्या रीतीनेंच समाधान केले आहे भावप्रकाशकार म्हणतात–
'ननु प्राचो स्थैरेवोक्त्या व्याख्यानुयोगस्यैवोक्त्या तथा विकल्पानवकाशोऽत आह। उपदेशपदमिति। उभयोक्त्या पठकजादिवतस्यैव व्याख्यानेन पाचकादिवद्वा तव मतमिदमिति मूलकृता प्रतिपाद्यते।')
जर प्रकाशकाराचे असे म्हणणे असेल की, 'उपदेश' या शब्दाचा 'व्यवहार' असाच अर्थ अभिप्रेत आहे (व 'उपदेश' हा शब्द लौकिकव्यवहारात वारिवेन निर्दिष्ट असलेल्या धातु इत्यादिकाना म्हटोने लाग पडणारा शब्द आहे) तर, त्या मताचे मण्डन करण्याकरिता दीक्षितानीं 'आमोऽमि वमदन्तत्वात्' या प्रकाशकाराच्या उक्तीचा उल्लेख केला आहे (दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, जर प्रकाशकार प्रक्रियाकौमुदीकाराच्या मताचाच पुरस्कार करीत असतील तर, त्यानीं 'आमोऽमि वमदन्तत्वात' असे जें पुढें म्हटले आहे ते त्या मताच्या विरुद्ध जाते, कारण 'आम' असा अदन्त शब्द पठित आहे असे मानले तरी, त्या शब्दातील इत्संज्ञक अकारानुबन्धाचा 'तस्य लोपः' सू ६२ या सूत्रानें लोप केल्यावर जो 'आम्' अवशिष्ट राहतो तो प्रत्ययसंज्ञक आहेच व प्रत्यय म्हटोनें उपदेशसंज्ञक आहे असे मानल्यास, 'आम्' यातील मकार 'हलन्त्यम्' या सूत्रानें इत्संज्ञक होऊन तो प्रत्यय मित् ठरतो व तो प्रत्यय अमित् आहे असे जें त्याचे म्हणणें आहे तें सिद्ध होऊ शकत नाही ) 'आम' यातील अकारानुबन्धाचे उच्चारण व्यर्थ नाहीं त्या अकारानुबन्धाच्चारणानें आमचा पक्ष ज्ञापित होतो हेंच मानणें उचित आहे ('उपदेश' हा शब्द भावप्रत्ययान्त असून 'आद्योच्चारण' या अर्थाचा वाचक आहे हा जो आमचा सिद्धान्तपक्ष आहे तोच 'आम' हा अदन्त मानल्यानें सिद्ध होतो, कारण 'आम' हें आद्योच्चारण असल्यामुळें, त्याच्या अन्त्य अकारालाच 'उपदेशेऽजनुनासिक इत्' सू ३ या सूत्रानें इत्संज्ञा होते व अवशिष्ट राहिलेल्या 'आम्' यातील

अन्त्य मकाराला 'हलन्त्यम्' या सूत्राने होणारी इत्संज्ञा होऊ शकत नाही, कारण अवशिष्ट राहिलेला 'आम्' जरी प्रत्यय आहे तरी, तो आद्योच्चारण नसून 'आम' हें आद्योच्चारण असल्यामुळें, त्या आम्' ला सिद्धान्तपक्षात उपदेश मानता येत नाही परंतु 'उपदेश' हा शब्द लौकिक व्यवहारात प्रत्यय इत्यादिकाचा वाचक रूढ शब्द आहे असे मानल्यास, 'आम' यातील अन्त्य अकारानुबन्धाचा लोप झाल्यावर अवशिष्ट राहिलेला 'आम' प्रत्ययसंज्ञक असल्यामुळें, यातील अन्त्य मकार 'हलन्त्यम्' या सूत्राने इत्संज्ञक होणार व त्यामुळे तो प्रत्यय अमित ठरू शकणार नाही आणि 'आम' चे ठिकाणी, 'आम्' प्रत्ययातील मकाराचा लोप न व्हावा याकरिता, मुद्दाम मानलेले अकारान्तोच्चारण व्यर्थ ठरणार सारांश 'आम' याचे अदन्तत्व योगरूढपक्षाचे ज्ञापक नसून सिद्धान्तपक्षाचेच ज्ञापक आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे) 'इत्यादि-स्वपरग्रन्थविरोधाच्च' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्यातील 'आदि' या शब्दानें यकारादि 'चुञ्चुप्, चणप्' इत्यादि प्रत्ययाचा संग्रह होतो ('तेन वित्तश्चुञ्चुप्चणपौ' सू १८२७ या सूत्रात 'तेन वित्त या अर्थामध्यें 'चुञ्चुप्' व 'चणप्' प्रत्यय होण्याचे विधान केल आहे या दान्ही प्रत्ययात चकार आदि असल्यामुळें, 'चुटू' सू १८९ या सूत्राने त्या चकाराला इत्संज्ञा होण्याची आपत्ति येते व 'तस्य लोप' या सूत्राने त्या चकाराचा लोप केल्यास, 'विद्याचुञ्चु, विद्याचण' इत्यादि इष्ट रूपें सिद्ध होऊ शकणार नाहीत ती आपत्ति टाळण्याकरिता 'चुटू' १-३-७ या सूत्रावरील भाष्यात भाष्य-कार म्हणतात-'एवं तर्हि यकारादी चुञ्चुप्चणपौ। किं यकारो न श्रूयते? । लुप्तनिर्दिष्टो यकारः।' या भाष्याचा अर्थ असा आहे कीं, 'चुञ्चुप्' व 'चणप्' हे प्रत्यय यकाराने सुरु होणारे प्रत्यय आहेत असे मानावे व त्यात प्रश्लिष्ट असलेल्या यकाराचा 'लोपो व्योर्वलि' सू ८७३ या सूत्राने लोप झाला आहे असे समजावे आणि

त्याचमुळें त्या दोन प्रत्ययांत चकाराचें श्रवण होत नाहीं. दीक्षितांनीं देखील 'तेन वित्त' सू. १८२७ या सूत्रावरील कौमुदींत 'चकार-प्रत्यययोरादौ लुप्तनिर्दिष्टः । तेन चस्य नेत्संज्ञा' असेंच म्हटलें आहे. सारांश 'आम' यातील मकाराला इत्संज्ञा न व्हावी म्हणून त्याचें जसें अदन्त उच्चारण केलें आहे त्याचप्रमाणें 'चुञ्चुप्, चणप' या प्रत्ययांतील आद्य चकाराला इत्संज्ञा न व्हावी म्हणून ते प्रत्यय चकारादि मानले आहेत. [illegible] स्वीकारल्यास, त्या दोन प्रत्ययांतील आद्य चकाराचा लोप केल्यावर देखील अवशिष्ट राहिलेले 'चुञ्चुप्, चणप्' हे प्रत्यय असल्यामुळें, त्यांच्या आद्य चकाराचा 'चुटू' या सूत्रानें पुन्हा लोप होणार व ते प्रत्यय चकारादि पठन करून कोणताहि फायदा होणार नाहीं म्हणून प्रत्यय उपदेशमतक मानणें अयोग्य आहे. 'उपदेश' या पदाचा 'आद्योच्चारण' असा अर्थ केल्यानें, चकारादि 'चुञ्चुप्, चणप्' हे आद्योच्चारण असून अवशिष्ट 'चुञ्चुप्, चणप्' जरी प्रत्यय आहेत तरी ते आद्योच्चारण नसल्यामुळें, त्या प्रत्ययांतील आद्य चकार इत्संज्ञक होण्याची व त्याचा लोप होण्याची आपत्ति टळते म्हणून भावप्रधान पक्ष मानणेंच योग्य आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे ) 'उपदेशाभावादित्संज्ञा न स्यात्' असें जें मनोरमेंत म्हटलें आहे त्यांतील 'उपदेशाभावात' या पदाचा 'आदेशस्यादेशाभावात्' असा अर्थ आहे (सारांश भाष्यकारांनीं आदेश हा उपदेश नव्हे असें म्हटलें असल्यामुळें, आदेश उपदेशजनक आहे हें प्रकाशकाराचें म्हणणें चूक ठरतें ) 'ततो धातुसंज्ञा' असा जो मनोरमेंत कैयटवृत्तीचा उल्लेख केला आहे त्याचा भावार्थ हा आहे की, ('लूञ्' हा उपदेश असून त्यांतील) 'लू' एवढाच शब्द धातुसंज्ञक आहे व त्याला ('हलन्त्यम्' या सूत्रानें इत्संज्ञक होणारा) जो ञकार लावला आहे त्याचें फल हेंच आहे की, ('स्वरितञितः कर्त्रभिप्राये क्रियाफले' सू. २१५८ या सूत्रान्वयें) त्या 'लू' धातूला

भिन्नकार्य होते, म्हणजे तो धातु उभयपदी होतो कित्येकाचे–खण्डन-कारांचे–असे म्हणणे आहे की, 'धातुसूत्रगणोणादि' या कारिकेतील 'सूत्र' या शब्दाच्या साहचर्याने धातु, आगम, प्रत्यय इत्यादि शब्दांनी, पाणिनी, वार्तिककार इत्यादिकांनीं स्वरचित सूत्रात किंवा पाठात व वार्तिकात जसा त्या धात्वादिकांचा (सानुबन्धक) पाठ केला आहे तशा आनुपूर्वीविशिष्ट शब्दाचे ग्रहण होते (आता हे खरे की, प्रयोगकाली धात्वादिकांना लावलेला अनुबन्ध दृष्टिगोचर होत नसल्यामुळें, तशा सूत्रनिर्दिष्ट किंवा पाठनिर्दिष्ट सानुबन्धक धात्वादिकांना धात्वादि म्हणता येत नाही त्यांचा अनुबन्ध नाहीसा केल्यावर अवशिष्ट भागालाच धातु इत्यादि संज्ञा होते तरी पण धातुपाठात जे अनुबन्धसहित शब्द पठित आहेत ते वास्तविक धातुसंज्ञक नसून देखील तशा सानुबन्ध) पाठाचे ठिकाणी जसा धातुपाठ इत्यादि व्यवहार केला जातो त्याचप्रमाणे (सूत्रात धातु, आगम, आदेश इत्यादि उपदेशविषयीभूत शब्दांना जो अनुबन्ध लावला आहे त्याचा लोप केल्यावर) पुढें त्यांना ज्या धातु, प्रत्यय, आगम इत्यादि संज्ञा प्राप्त होणार आहेत त्या भावि संज्ञाचे ते धात्वादि विषय होणारे असल्यामुळें, तशा सानुबन्धक शब्दाचे ठिकाणी धातु, प्रत्यय, आगम इत्यादि व्यवहार उपपन्न ठरतो ('सूत्रसाहचर्यात्' असें जें खण्डन-कारांनें म्हटले आहे त्यातील 'साहचर्य' या शब्दाचा 'सादृश्य'–सदृशधर्मत्व–असा अर्थ आहे सूत्रें व धातुपाठ पाणिनीने रचली असल्यामुळें जसा त्याचे ठिकाणीं पाणिनीयत्व–पाणिनिकृतत्व–धर्म आहे त्याचप्रमाणे त्या पाणिनीय सूत्रात किंवा धातुपाठात निर्दिष्ट असलेल्या सानुबन्धक प्रत्यय, आगम, आदेश, धातु यांचे ठिकाणी देखील, ते पाणिनीनें तशा रीतीनें उच्चारलेले असल्यामुळें, पाणिनीयत्व धर्म आहेच व या धर्मसादृश्यामुळें जसें कारिकेतील 'सूत्र' या शब्दानें पाणिनीय सूत्राचे ग्रहण होतें त्याचप्रमाणे त्या कारिकेत निर्दिष्ट असलेल्या प्रत्यय, आगम, आदेश, धातु या शब्दानीं, पाणिनीनें

स्वरचित सूत्रात किंवा धातुपाठात जें त्याचे सानुबन्ध उच्चारण केले आहे तशा वर्णानुपूर्वीविशिष्ट उच्चारणाचेच ग्रहण केले पाहिजे असा खण्डनकाराच्या म्हणण्याचा भावार्थ आहे हे खरें की, तसे सूत्रनिर्दिष्ट किंवा धातुपाठनिर्दिष्ट सानुबन्धक शब्द प्रत्यय, आगम, आदेश, धातु या सज्ञा होण्यास पात्र नाहीत अनुबन्धाचा लोप केल्यावर अवशिष्ट राहिलेल्या भागालाच त्या सज्ञा होण्याची पात्रता येते तरी पण अनुबन्ध नाहीसा केल्यावर त्याना पुढें तशा सज्ञा अवश्य प्राप्त होणार असल्यामुळें व ते त्या सज्ञाचे अवश्य विषय होणार असल्यामुळें, तशा भावि सज्ञेचा आश्रय केल्याने, सानुबन्धक शब्दाचे ठिकाणी धातु प्रत्यय, आगम, आदेश इत्यादि व्यवहार लक्षणेने करता येतो व कारिकेंत निर्दिष्ट असलेल्या त्या शब्दाचा तसा लक्षणेनें अर्थ केला असता, दीक्षितानी मनोरमेंत जे प्रकृत कारिकेवर दोष दिले आहेत ते मुळीच उद्भवत नाहीत उदाहरणार्थ पाणिनीय धातुपाठात 'लूञ्, पूञ्, शीङ्' असा निर्देश असल्यामुळें, कारिकेत निर्दिष्ट असलेल्या 'धातु' या शब्दाने तशा निर्देशाचे ग्रहण केल्यास आणि तसेच 'अनङ् सौ' इत्यादि सूत्रात 'अनङ्' असा निर्देश असल्यामुळे कारिकेंत निर्दिष्ट असलेल्या 'आदेश' या शब्दाने तशा निर्देशाचे ग्रहण केल्यास, दीक्षितानी जे मनोरमेंत दोष दाखविले आहेत ते निरर्थक ठरतात असे खण्डनकाराचे म्हणणे आहे यावर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'हलन्त्यम्' या सूत्रात अनुवृत्त असलेल्या 'उपदेशे' या पदाचा) 'आद्योच्चारणविषयाणाम्' असा अर्थ केल्यानेच सर्व इष्ट फलाची सिद्धि होत असल्यामुळें, तसे व्याख्यान करणे निरुपयोगी—व्यर्थ-ठरते, म्हणजे तसा लक्षणेने अर्थ करण्याची काहीच गरज नाही ('उपदेश' हा शब्द भावघञन्त मानल्याने 'उपदेशे' या पदाचा अभिधावृत्तीनेच 'आद्योच्चारण-विषयीभूतानाम्' असा अर्थ होत असल्यामुळें व तसा अर्थ केल्याने सर्व इष्ट प्रयोजनें सिद्ध होत असल्यामुळे, कारिकेतील पूर्वार्धात निर्दिष्ट

असलेल्यांचे ग्रहण होण्याकरितां 'उपदेश' या शब्दाची 'करणे घञ्' प्रत्यय करून व्युत्पत्ति करणें व उत्तरार्धांत निर्दिष्ट असलेल्यांचें ग्रहण होण्याकरिता 'उपदेश' या शब्दाची 'कर्मणि घञ्' प्रत्यय करून भिन्न रीतीने व्युत्पत्ति करणे व साहचर्यन्यायाचा, म्हणजे 'सहचरितासहचरितयो सहचरितस्यैव ग्रहणम्'–परि ११२–या परिभाषेचा, व भावि सज्ञेचा आश्रय करणे आणि तसेच कारिकत निर्दिष्ट असलेल्या धातु प्रत्यय, आगम, आदेश याचा वर मागितल्या-प्रमाणे लक्षणेने अर्थ करणे हा सर्व दीर्घ प्रयास व्यर्थ ठरतो सारांश जें अभिधावृत्तीने सहज सिद्ध होते ते सिद्ध करण्याकरिता लक्षणा-वृत्तीचा आश्रय करणे आणि वर मागितल्याप्रमाणे अनेक कल्पना करणे अनुचित असून तसे करण्यात अत्यन्त गौरव आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे तथापि लक्षणावृत्तीनें अर्थ केल्यास मोठासा दोष येत नाही असे कोणी म्हटल्यास,) ती अरुचि मनात धरून 'अपि च घ्वमोरद्धौ' इत्यादि पक्ति पुढे मनोरमेंत लिहिली आहे त्या पक्तीत असणाऱ्या 'अलोऽन्त्यसूत्र' या शब्दाचा 'अलोऽन्त्यात्पूर्व उपधा' सू २४९ हे उपधासज्ञाविधायक सूत्र असा अर्थ आहे त्या सूत्रावरील भाष्यात 'लोपश्च' असा जो द्विशकारक निर्देश मानला आहे त्यात 'लोपश' व 'श' ही भिन्न पदें आहेत व ('लोप+सु+श्–लोपस+श' यातील) पूर्व सकाराचा ('स्तो श्चुना श्चु' सू १११ या सूत्राने) शकार झाला आहे 'झलां जश झशि' सू ५२ इत्यादि सूत्रात, सन्देह न व्हावा म्हणून, 'जश्' यातील शकार या झल्‌च जस ('झलां जशोऽन्ते' सू ८४ या सूत्रानें पावलेले) जश्त्व केले नाही (व 'झला जज् झशि' असे सूत्र पठित केले नाही) त्याचप्रमाणे 'लोपश्च' या स्थली 'मश' या सयोगापुढे चकार हा झल् असून दखील, सयोगाच्या आदि असलेल्या सकाराचा 'स्को सयोगाद्यो' सू ३८० या सूत्राने पावलेला लोप केला नाही (वास्तविक 'स्को सयोगाद्यो' हें त्रैपादिक पूर्व सूत्र

असून 'स्तो श्चुना श्चु' हे त्रैपादिक परसूत्र आहे म्हणून 'पूर्वत्रासिद्धम्' सू १२ या सूत्रान्वय 'स्को संयोगाद्यो' हे सूत्र प्रथम प्रवृत्त व्हावयास हवे होते पण ते सूत्र प्रथम प्रवृत्त केलें असते तर, सकाराचा लोप झाला असता व सूत्रांत द्विशकारक निर्देश स्पष्ट दिसू शकला नसता आणि सन्देह उत्पन्न होण्याची भीति होती द्विशकारक निर्देश दिसून पडावा व सन्देह उत्पन्न न व्हावा याकरिता 'स्को संयोगाद्यो' हे त्रैपादिक पूर्वसूत्र प्रथम प्रवृत्त न करिता 'स्तो श्चुना श्चु' हे त्रैपादिक परसूत्र असून देखील त्याची प्रथम प्रवृत्ति केली आहे 'श्' हे भिन्न पद आहे असे जें वर सांगितलेंत म्हटले आहे त्याचे कारण हे की, 'अनेकाल्शित्सर्वस्य' सू ४५ या सूत्रान्वयें सर्वादेशाचा बोधक 'श्' हा वर्ण अर्थवान् असल्यामुळे 'अर्थवदधातुरप्रत्ययः प्रातिपदिकम्' सू १७८ या सूत्राने त्याला प्रातिपदिक संज्ञा होते व 'ङ्याप्प्रातिपदिकात्' सू १८० या सूत्राने त्याहून सुबुत्पत्ति केली असता, 'श्+सु' अशा स्थितीत 'हल्ङ्याब्भ्यः' सू २५२ या सूत्राने 'सु' प्रत्ययाचा लोप केल्यावर 'प्रत्ययलोपे प्रत्ययलक्षणम्' सू २६२ या सूत्रान्वयें 'श्' पदसंज्ञक ठरतो पण अशा रीतीने 'श्' हे भिन्न पद मानल्यास, 'श्' याला 'लोप' या लगेंच पूर्वी असलेल्या स्वतंत्र भिन्न पदाचा अवयव आहे असे मानता येऊ शकणार नाही व त्यामुळें तो 'श्' 'लोप' या पदाचा अनुबन्ध आहे असे मानता येणार नाही आणि त्यामुळें लोप सर्वादेश ठरणार नाही म्हणून या द्विशकारकनिर्देशपक्षात 'अनेकान्ता अनुबन्धाः'–परि ४–हीच परिभाषा स्वीकारली पाहिजे व ती परिभाषा येथें लावल्यास, जरी 'श' हा 'लोप' याचा अवयव नाही तरी तो त्याच्या समीप उच्चारला असल्यामुळें, त्याला 'लोप' या पदाचा अनुबन्ध आहे असे मानता येते आणि त्यामुळे लोप सर्वादेश होण्यात काही अडचण येत नाही पण 'अनेकान्ता अनुबन्धाः' हा सिद्धान्तपक्ष नसून, 'एकान्ता अनुबन्धाः'–परि. ५–हा वास्तविक सिद्धान्तपक्ष

आहे व 'श्' हा 'लोप' या पदाचा अवयव नसल्यामुळें त्याला या सिद्धान्तपक्षात 'लोप' याचा अनुबन्ध मानता येऊ शकत नाही व द्विशकारक निर्देश मानून देखील, लोप सर्वादेश न होण्याची आपत्ति येते अशी कोणी शका केल्यास, त्या शकेवर हें उत्तर आहे कीं, 'एकान्ता अनुबन्धा' हा पक्ष स्वीकारल्यास, असेच मानले पाहिजे की, 'लोपो वि' या पूर्व सूत्रातून 'घ्वमोरेत्' या सूत्रात 'लोप' या पदाची अनुवृत्ति करता येत असून देखील पुन्हा त्या सूत्रात 'लोप' हें पद मुद्दाम उच्चारले असल्यामुळें, त्या उच्चारण-सामर्थ्याने लोप सर्वादेश होतो सारांश 'अनेकान्ता अनुबन्धा' हा पक्ष मानल्यासच द्विशकारक निर्देश उपपन्न ठरतो; परतु 'एकान्ता अनुबन्धा' हा पक्ष स्वीकारल्यास, लोप सर्वादेश होण्याकरिता, वर सागितल्याप्रमाणेच, उपपत्ति लावली पाहिजे, आणि म्हणूनच 'अलोऽन्त्यात्पूर्व उपधा' या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी दोन्ही प्रकारची उपपत्ति सागितली आहे व ते भाष्य मनोरमेचे विवरण करिताना पूर्वी दिलेच आहे ) 'लोपश' या स्थली द्वितीय शकार हा जो अनुबन्ध मानला आहे तो कारिकेत निर्दिष्ट असलेल्या धातु इत्यादिकापैकी कशाच्याहि अन्ती नाही हे स्पष्ट आहे (तो वास्तविक 'लोप' या पदाच्या अन्ती–म्हणेच पुढें–आहे व कारिकेत परिगणन केलेल्या 'धातु' इत्यादिकात 'पद' याचा समावेश केला नसल्यामुळें, ते परिगणन अन्यून व परिपूर्ण मानल्यास शकाराला इत्सज्ञा होऊ शकत नाही व लोप सर्वादेश ठरू शकत नाही पण 'लोपश्' हें आद्योच्चारण मानल्यास, त्यातील अन्त्य शकार 'हलन्त्यम्' या सूत्राने इत्सज्ञक ठरतो व 'अनेकाल्शित्सर्वस्य' या सूत्रान्वयें लोप सर्वादेश होण्यात, म्हणजे सपूर्ण अभ्यासाचे जागी होण्यात, काहीं अडचण येत नाही

शब्दरत्न– किं च "नमो वरिवश्चित्रङः" इत्यस्यासंग्रहोऽत्र पक्षे इत्यपि बोध्यम्, एषेतस्य क्विरितिवृत्ते. परिगणनतायां एव

त्वाभात् । योगस्यैवेति । न तु रूढेरित्यर्थ । परिगणनस्येति । धात्वादिगणनस्येत्यर्थः । यंयम्येति । भाष्यरीत्या करणव्युत्पत्त्यैव सर्वसंग्रहादिति भावः । उपदेशताप्रयोजकेति । योगमात्रस्वीकारे उपदेशता=उपदेशकरणता, न हि तत्प्रयोजकं धातुत्वादि भवतीति तद्विरोधः । सञ्ज्ञात्वे तु उपदेशता=उपदेशशब्दत्वम्, उपदेशशब्दस्य शब्दपरत्वात् । तदवच्छिन्नस्य प्रयोजकं तु रूढपर्यंतावच्छेदकतया धातुत्वादि वक्तुं शक्यमिति भावः । शकारस्येति । न ह्यनेन किञ्चिदुपदिश्यत इति भावः । ननूपदिश्यते=ज्ञाप्यतेऽनेनेति तदर्थः, धात्वादिभिर्हि प्रयोगो ज्ञाप्यते, तद्वदनेनापि शकारेण सर्वदिशत्वं ज्ञाप्यते, इत्यदचेराह–आदेव इति । सर्वेति । भाष्याकारादीत्यर्थः । यत्र तु करणव्युत्पत्त्यैवार्थसङ्गतिः, तत्रागत्याऽस्तु "कृत्यल्युटः" इति बाहुलकाल्ल्युडभाव । यथा "यन्निमित्तवक्तव्यप्रवृत्तोपदेशाप्रवृत्तौ" इत्यादाविति दिक् ।

दुसरे असे की, या पक्षात, म्हणजे 'उपदेश' हा शब्द योगरूढ आहे हा प्रथम पक्ष मानल्यास, 'नमोवरिवश्चित्रङः क्यच' सू २६७५ या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'चित्रङ' या शब्दाचा संग्रह होऊ शकत नाही (व त्यामुळें त्या शब्दातील अन्त्य ङकाराला इत्संज्ञा होऊ शकणार नाही व त्याचा लोप होऊ शकणार नाही) हें देखील जाणावे, कारण कारिकेत निर्दिष्ट असलेल्या धातु इत्यादिकाना 'उपदेश' ही संज्ञा व्यवहारात रूढीने लागू पडते असे म्हणणें हें परिगणन करणेंच होय (जेथें परिगणन करणे असते तेथें 'परिगणन कर्तव्यम्' असें म्हणण्याचा परिपाठ असून, प्रकृत स्थली तसें म्हटले नसल्यामुळें, कारिकेत परिगणन केले आहे असे म्हणता येत नाही व त्या कारिकेत उपदेशाची काही उदाहरणें दिली आहेत असेच मानले पाहिजे असें प्रकाशकाराचे म्हणणे असल्यास, त्यावर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, कारिकेच्या पूर्वार्धात निर्दिष्ट असलेल्या धातु इत्यादिकाना 'उपदेश' ही योगरूढ संज्ञा लागू पडण्याकरिता 'उपदेश' या शब्दाची 'करणे घञ्' प्रत्यय करून

व्युत्पत्ति करावी व उत्तरार्धात निर्दिष्ट असलेल्या आगम इत्यादिकांना ती संज्ञा लागू पडण्याकरिता त्या शब्दाची 'कर्मणि घञ्' प्रत्यय करून व्युत्पत्ति करावी असे म्हणणे हे केवळ उदाहरणप्रदर्शकपर नसून, परिगणन करणेच होय म्हणून कारिकेत प्रातिपदिकाचा निर्देश केला नसल्यामुळें, 'चित्र' या प्रातिपदिकाच्या अन्तीं असलेला अकार इत्संज्ञक होऊ शकणार नाहीं व त्याचा लोप होऊ शकणार नाहीं परन्तु 'उपदेश' या शब्दाचा 'आद्योच्चारण' असा अर्थ केल्यास, 'चित्रङ' हे आद्योच्चारण असल्यामुळें त्यातील अन्त्य ङकार 'हलन्त्यम्' या सूत्रान्वयें इत्संज्ञक ठरतो व तो शब्द ङित् पठित असल्यामुळें त्याहून क्यच्प्रत्यय केल्यावर 'अनुदात्तङित आत्मनेपदम्' सू २१५७ या सूत्रान्वयें आत्मनेपदी प्रत्यय होऊन 'चित्रीयते' इत्यादि रूपें सिद्ध होतात ) मनोरमेंतील 'योगस्यैव पुरस्कारे परिगणनस्य व्यर्थत्वात्' या पङ्क्तीतील 'योगस्यैव' (या स्थली 'एव' हे अवधारणार्थक पद घातले असल्यामुळें) याचा 'न तु रूढे,' म्हणजे रूढीचा आश्रय न करिता केवळ यौगिक अर्थाचा आश्रय केल्यास, असा अर्थ आहे व 'परिगणनस्य' या शब्दाचा 'धात्वादिगणनस्य,' म्हणजे कारिकेत धातु, सूत्र इत्यादि जें परिगणन केले आहे त्याचे, असा अर्थ आहे मनोरमेंत 'वैयर्थ्यस्य दुरुपपादत्वाच्च'–म्हणजे 'उपदेश' या शब्दाची दोन भिन्न रीतींनें व्युत्पत्ति करणे याचे समर्थन कोणत्याहि रीतीनें करता येत नाहीं–असे जें म्हटले आहे त्याचे कारण हें की, भाष्यकारानी 'उपदेश' या शब्दाची केवळ 'करणे घञ्' प्रत्यय करून व्युत्पत्ति केली आहे व तसा व्युत्पत्तीनेच म्हणजे 'उपदिश्यते प्रयोग अनेन' असा व्युत्पत्तीनेच, सर्व प्रकारच्या उपदेशाचा, म्हणजे कारिकेत पठित असलेल्या धातु इत्यादिकांचा व इतरयाहि संग्रह करतां येत असल्यामुळें परिगणन व्यर्थ ठरतें असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे ('उपदेशेऽजनुनासिक इत्' या सूत्रावरील भाष्यात

'उपदेश' हा शब्द 'करणे घञ्' प्रत्यय करून सिद्ध होऊ शकत नाही असे अनेक रीतीने प्रतिपादन करून अखेरीस भाष्यकारांनी 'एवं तर्हि कृत्यल्युटो बहुलमिति करणे घञ् भविष्यति' असे म्हटले आहे या भाष्याचे विवरण मनोरमेंत केलेच आहे मारांश भाष्यकारांनी 'उपदेश' या शब्दाची दोन तऱ्हेने व्युत्पत्ति न करिता, 'करणे घञ्' प्रत्यय करून एकच तऱ्हेने व्युत्पत्ति केली असल्यामुळें व तशी व्युत्पत्ति केल्याने 'उपदेश' हा शब्द सब प्रकारच्या उपदेशाचा सग्राहक होत असल्यामुळें आणि 'सकृदुच्चरित शब्द सकृदेवार्थं गमयति' हा न्याय असल्यामुळें, प्रकाशकारादिकांनी त्या शब्दाची जी दोन तऱ्हेने व्युत्पत्ति केली आहे ती भाष्यविरुद्ध, व्यर्थ व अयोग्य ठरते असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. येथें असा प्रश्न उपस्थित होतो की, भाष्यकारानी 'उपदेश' या शब्दाची 'करणे घञ्' प्रत्यय करून व्युत्पत्ति केली असल्यामुळें, दीक्षितांनी त्या शब्दाची 'भावे घञ्' प्रत्यय करून जी व्युत्पत्ति केली आहे ती भाष्यविरुद्ध असल्यामुळें बरोबर मानता येत नाहीं या प्रश्नाचे उत्तर हे आहे की, 'उपदेशेऽजनुनासिक इत्' या वार्तिकाचे कसे तरी प्रत्याख्यान करण्याकरितां जरी भाष्यकारानी 'उपदेश' या शब्दाची 'करणे घञ्' प्रत्यय करून व्युत्पत्ति केली आहे तरी ते–भाष्य सिद्धान्तभाष्य नसून केवळ एकदेशीची उक्ति आहे आणि भाष्य सिद्धान्त हाच आहे की, 'उपदेश' हा शब्द भावघञन्त असून त्याचा 'आद्योच्चारण' असाच अर्थ आहे आणि म्हणून दीक्षिताचे म्हणणे सिद्धान्तपक्षाला अनुसरून असल्यामुळें चूक ठरत नाही आता 'उपदेशताप्रयोजक......हलिदिपर्यं इति स्वग्रन्थविरोधाच्च' असे जें मनोरमेंत द्वितीय पक्षावर दूषण दिले आहे त्याचे शब्दरत्नकार पुढील पक्तीत कारण सांगतात ) 'उपदेश' या शब्दाचा केवळ यौगिक अर्थ स्वीकारल्यास, ('करणे घञ्' प्रत्यय करून सिद्ध केलेल्या 'उपदेश' या शब्दाचा 'उपदेशकरण' असा यौगिक अर्थ होत असल्या-

मुळे, 'तस्य भावस्त्वतलौ' सू १७८१ या सूत्राने 'उपदेश= उपदेशकरण' या शब्दाहून 'तल्' प्रत्यय केला असता) 'उपदेशता' या पदाचा 'उपदेशकरणता' असा अर्थ होतो पण उपदेशकरणतेचे प्रयोजक धातुत्वादि होत नाहीत, आणि म्हणून प्रकाशकाराच्या पूर्वपर ग्रन्थात विरोध येतो (धातु हा उपदेशकरण मानला असता, धातूचे ठिकाणी असणारा धातुत्व हा धर्म उपदेशकरणता ठरतो, म्हणजे 'धातुत्व=उपदेशकरणता' असा अर्थ निष्पन्न होतो आणि धातुत्व व उपदेशकरणता ह एकच आहेत असे मानल्यास, धातुत्व उपदेशकरण-तेच, म्हणजेच धातुत्वाचे, प्रयोजक होऊ शक्त नाही, कारण प्रयोज्य व प्रयोजक हे नेहमी भिन्न राहात असून, प्रयोज्यच स्वतःचे केव्हाहि प्रयोजक होऊ शक्त नाही सारांश 'उपदेशता=उपदेशकरणता' ही धातुत्व या धर्माहून भिन्न नाही, कारण धातुत्व हेच उपदेशकरणत्व आहे म्हणून हे दोन्ही पदार्थ एकच असल्यामुळें व एक दुसऱ्याचा प्रयोजक होणें शक्य असून स्वत चाच प्रयोजक होणे शक्य नसल्यामुळें, धातुत्व व उपदेशकरणत्व या दोहामध्ये प्रयोज्यप्रयोजकभाव मुळीच सभवत नाही म्हणून धातुत्वादि उपदेशतेच प्रयोजक आहेत हें प्रकाशकाराचे म्हणणे यौगिकपक्षात चूक ठरते आणि प्रकाशकारानी धातुत्वादिकाना एके ठिकाणी उपदेशता म्हटले असून, दुसरे ठिकाणी उपदेशताप्रयोजक म्हटले असल्यामुळें, त्याच्या या दोन उक्ति परस्पर-विरुद्ध ठरतात असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे 'योगमात्रस्वीकारे उपदेशता=उपदेशकरणता, न हि तत्प्रयोजक धातुत्वादि भवतीति तद्विरोध' या शब्दरत्नातील पक्तीचे व्याख्यान करिताना भैरवीकारानी 'प्रयोज्यप्रयोजकभावस्यान्वयव्यतिरेककल्पनया यथा चैत्रे चैत्रत्वधर्मसत्व एव पाचकत्वमन्यथा नेति कस्यापि न सम्मतम्, किन्तु विक्लित्यनुकूलव्यापारसत्वमेव पाचकत्वप्रयोजकम्, तथा धातुत्वादिक न करणताप्रयोजकम्' असे म्हटले आहे व समापति-मिश्रानी आपल्या टिप्पणीत शब्दरत्नातील वरील पक्तीचा, 'उपदेश-

शब्दस्य यौगिकत्वस्वीकारे धात्वाद्यन्यतमत्वापेक्षयोपदेशकरणताया धात्वाद्यतिरिक्तप्रातिपदिकपदादिष्वपि सत्वेनाधिकवृत्तितया प्रयोज्य-प्रयोजकभावस्य च समनियतयोरेव नियतत्वेन उपदेशताप्रयोजक-धातुत्वादि इत्यग्रिमग्रन्थो विरुद्धयेनेति भाव ' असा अर्थ दिला आहे या म्हणण्याचा असा आशय आहे की, 'तत्सत्वे तत्सत्व तदसत्वे तद-सत्वम्' हा अन्वयव्यतिरेकभाव जेथें असतो तेथेंच प्रयोज्यप्रयोजकभाव मानला जात असल्यामुळें व उपदेशता ही कारिकेच्या पूर्वार्धांत निर्दिष्ट असलेल्या 'धातुसूत्रगणोणादिवाक्यलिङ्गानुशासनम्' एवढ्यानाच लागू पडणारी नसून त्या पूर्वार्धांत निर्दिष्ट नसलेल्या प्रातिपदिक, पद इत्यादिकांना देखील लागू पडणारी असल्यामुळें, म्हणजे उपदेशकरणता ही अधिक व्यापक असल्यामुळें, या दोहोंमध्यें प्रयोज्यप्रयोजकभाव मानता येत नाही, आणि म्हणून धातुत्व इत्यादि उपदेशतेचे प्रयोजक मानता येत नाहीत ) 'उपदेश' हा शब्द संज्ञावाचक– योगरूढ अर्थाचा वाचक–मानल्यास, 'उपदेशता' या शब्दाचा 'उपदेशशब्दवत्त्वम्' असा अर्थ होतो, कारण येथें 'उपदेश' हा शब्द ('उपदेश' या शब्दाच्या अर्थाचा वाचक नसून) त्या शब्दाचाच वाचक आहे म्हणून त्या पक्षात उपदेशता या धर्मानें अवच्छिन्न–युक्त–असणाऱ्या 'उपदेश' या शब्दानें व्यवहारात रूढीनें बोधित होणाऱ्या कारिकानिर्दिष्ट धातु इत्यादिकांचे अवच्छेदक धातुत्व इत्यादि जे धर्म आहेत ते त्या उपदेशतेचे प्रयोजक होतात असें म्हणता येणें शक्य आहे (सारांश योगरूढपक्षात कारिकेंत निर्दिष्ट असलेल्या धातु इत्यादिकांना 'उपदेश' ही रूढ संज्ञा आहे असें मानलें असता, ते व्यवहारात 'उपदेश' या शब्दानें बोधित होत असल्यामुळें, त्यांचे ठिकाणी असणारे धातुत्वादि धर्म त्यांना लागू पडणाऱ्या उपदेशतेचे, म्हणजे 'उपदेश' या शब्दाचे किंवा व्यवहाराचे, प्रयोजक ठरतात असें म्हणता येऊ शकतें–म्हणजें ज्यांचे ठिकाणी धातुत्वादि धर्म आहेत त्यांनाच 'उपदेश' हा शब्द लागू पडतो व ज्यांचे ठिकाणी ते धर्म

नाहीत त्याना 'उपदेश' हा शब्द लागू पडत नाही आणि अशा रीतीने धातुत्वादि धर्म, 'उपदेश' हा शब्द लागू पडण्याचे, प्रयोजक-कारणीभूत–ठरतात असे म्हणता येऊ शकते–असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे परंतु असे व्याख्यान करतेवेळी 'प्रयोजक' या शब्दाचा 'रूढीने होणाऱ्या अर्थाचे अवच्छेदक' असा लक्षणेने अर्थ करावा लागतो व तसा लक्षणेने अर्थ करणे हा एक गौरवरूप दोषच आहे दुसरे असे की, कारिकेत निर्दिष्ट असलेल्या धातु इत्यादिकानाच 'उपदेश' ही संज्ञा लागू पडत असे मानल्यास, जे आद्योच्चारणाचे विषय असून देखील कारिकेत निर्दिष्ट नाहीत ते उपदेश न मानले जाण्याची आपत्ति येते, आणि म्हणून कारिकेत प्रातिपदिक व पद याचा निर्देश नसल्यामुळे 'चित्रङ्" यातील अन्त्य ङकाराला व 'लोपदन्' यातील अन्त्य नकाराला इत्संज्ञा न होणे हा दोष या पक्षात कायम राहतोच. पण आद्योच्चारणपक्ष मानल्यास, वर दाखविलेले सर्व दोष सहज टाळता येऊ शकत असल्यामुळें, तशी सदोष कारिका न मानता व 'उपदेश' हा शब्द 'करणे घञन्त' न मानता, तो शब्द भावघञन्त मानून त्याचा 'आद्योच्चारण' असाच अर्थ करणे उचित आहे आता 'पद' या शब्दाचा कारिकेत निर्देश केला नसल्यामळें, संज्ञापक्षात जसा 'उपदेश' हा शब्द 'लोपदन' या निर्देशाला लागू पडत नाही तसाच तो शब्द यौगिक पक्षात देखील त्या निर्देशास लागू पडत नाही याचे कारण शब्दरत्नकार पुढील पङ्क्तीत सागतात व त्याच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, जसा 'अनङ् सौ' सू २४८ इत्यादि सूत्रात 'अनङ्' इत्यादि आदेश होण्याचा स्पष्ट उपदेश केला आहे तसा 'लोपदन्' या स्थली) नकाराने कशाचाहि उपदेश केला नाही. (पण यावर अशी शका करण्यात येते की,) 'उपदिश्यते ज्ञाप्यते प्रयोग अनेन' असा 'उपदेश' या शब्दाचा यौगिक अर्थ केल्यास, ज्याप्रमाणे धात्वादिकानी प्रयोग ज्ञापित होतो, म्हणजे कोणते

विवरण व कोणते प्रत्यय लावून त्याचा वाक्यात प्रयोग करावा हे ज्ञापित होतें, त्याचप्रमाणे शकाराने ('अनेकाल्शित्सर्वस्य', सू ४५ या सूत्रान्वयें) लोप सर्वादेश व्हावा, म्हणजे सपूर्ण अभ्यासाचे जागी लोपरूप आदेश व्हावा व सपूर्ण अभ्यासाचा लोप व्हावा, हें ज्ञापित होतें (ही शका यथार्थ मानून व) ही अरुचि लक्षात घेऊन दीक्षितानी 'आद्येच उपदेशे...सर्वसम्मतत्वाच्चेति दिक्' ही पक्ति पुढे मनोरमेंत लिहिली आहे (या पक्तीचे विवरण मनोरमेंत केलेच आहे या पक्तीतील 'सर्वसम्मतत्वात्' या पदातील) 'सर्व' या शब्दाचा 'भाष्यकारादि' असा अर्थ आहे (कारण जो अर्थ इतर वैयाकरणाना मान्य असून देखील भाष्यकाराना मान्य नाही तो अर्थ स्वीकाराई नाही पण भाष्यकारानी स्वत 'उपदेश' या शब्दाचा 'आद्योच्चारण' असा अर्थ केला असल्यामुळें, तोच त्या शब्दाचा अर्थ मानणे व त्या अर्थान्वयें जे आद्योच्चारणाचे विषय आहेत त्याना उपदेश मानणे हेच योग्य आहे) जेथें 'उपदेश' या शब्दाची 'करणे घञ्' प्रत्यय करून व्युत्पत्ति केल्याशिवाय अर्थ बरोबर होऊ-जुळू-शकत नाही तेथें गत्यन्तर नसल्यामुळे 'कृत्यल्युटो बहुलम्' सू २८४१ या सूत्रान्वयें बाहुलकत्वामुळें ल्युट् झाला नाही (व 'करणे घञ्' प्रत्यय झाला आहे) असे मानून अर्थ करावा उदाहरणार्थ 'सन्निमित्तयैकल्यप्रयुक्तोपदेशाप्रवृत्तौ' इत्यादि स्थली 'उपदेश' या शब्दाची 'करणे घञ्' प्रत्यय करून व्युत्पत्ति केल्याशिवाय म्हणजे 'उपदिश्यते अनेनेति उपदेश शास्त्र सूत्रम्' असा 'उपदेश' या शब्दाचा अर्थ केल्याशिवाय, त्या पक्तीचा अर्थ बरोबर होऊ शकत नाही (म्हणून तशा ठिकाणी 'करणे घञ्' प्रत्यय करूनच 'उपदेश' या शब्दाचा अर्थ करावा 'सन्निमित्तवैकल्य प्रयुक्तोपदेशाप्रवृत्तौ...।' ही पक्ति 'न पदान्त' सू ५१ या सूत्रावरील शब्दरत्नात दिली आहे व तेथें तिचे व्याख्यान करण्यात येईल)

**मनोरमा– "उपदेशोऽजनुनासिक इत्" ।।** यद्यप्यत्रोपदेशोच्चरितत्वात्-नुनासिकसञ्ज्ञा प्रथमं वक्तुमुचिता, तथाऽपि 'नासिकामनुगतः' इति

योगाश्रयणेनैव गतार्थत्वाद् 'अनुनासिकसञ्ज्ञासूत्रं मन्दप्रयोजनम्' इति ध्वनयितु नेहोपन्यस्तम् । उपदेशे किम् ? 'अभ्र आँ अपः'। यद्यपीह "उञः" "ऊँ" इत्यत्रेव विधानसामर्थ्यान्नेत्वमिति सुवचम्, तथाप्युत्तरार्थमवश्यं कर्त्तव्यमुपदेशग्रहणं स्पष्टप्रतिपत्तये इहैव कृतम् । अच् किम् ? मनिनो मकारस्य मा भूत् ॥

'उपदेशेऽजनुनासिक इत्,' सू ३ या सूत्रात 'अनुनासिक' हा सज्ञावाचक शब्द उच्चारला असल्यामुळे, या सूत्रापूर्वी अनुनासिकसंज्ञेचे विधायक सूत्र, म्हणजे 'मुखनासिकावचनोऽनुनासिक' सू. ९ हे सूत्र, जरी पठित केले पाहिजे होते तरी, 'नासिकामनुगत' अनुनासिक' असा यौगिक अर्थ घेतल्यास ते अनुनासिकसंज्ञासूत्र गतार्थ होत असल्यामुळे, म्हणजे यौगिक अर्थ घेतल्यानेच 'अनुनासिक' या शब्दाच्या अर्थाचा बोध होत असल्यामुळें व अशा रीतीने ते सूत्र व्यर्थ ठरत असल्यामुळे, त्या सूत्राचे फारच अल्प प्रयोजन आहे हे सुचविण्याच्या हेतूने, त्या सूत्राचा प्रकृत सूत्रापूर्वी उपन्यास केला नाही. ('मन्दप्रयोजनम' असे जें दीक्षितानी मनोरमेंत म्हटले आहे त्याचे व्याख्यान शब्दरत्नात करण्यात येईल ) प्रकृत सूत्रात 'उपदेशे' हें पद घालण्याचे प्रयोजन हे आहे की, 'अभ्र आँ अप' या श्रुतीत असलेल्या 'आँ' या अनुनासिक स्वराला इत्संज्ञा होऊ नये (याचे विवरण पूर्वी शब्दरत्नात केलेच आहे साराश वरील श्रुति पाणिनीय 'उपदेश= आद्योच्चारण' नसल्यामुळें त्या श्रुतीतील 'आँ' या अनुनासिक अचाला इत्संज्ञा होत नाही ) ज्याप्रमाणे 'उञ, ऊँ' सू १०६,१०७ या स्थळीं 'उ' या निपाताचे जागी 'ऊँ' असा आदेश होण्याचे विधान केले असल्यामुळे, त्या विधानाच्या सामर्थ्याने 'ऊँ' या अनुनासिक स्वराला इत्संज्ञा होत नाही त्याचप्रमाणे ('आङोऽनुनासिकश्छन्दसि' सू ३५२५ या सूत्रात 'आङ' चे जागी अनुनासिक आदेश व्हावा असे स्पष्ट विधान केले असल्यामुळें त्या) विधानाच्या सामर्थ्याने 'अभ्र आँ अप' यातील 'आँ' हा अनुनासिक इत्संज्ञक होत नाही असे जरी म्हणता

येऊ शकते तरी, उत्तरसूत्रात, म्हणजे 'हलन्त्यम' या सूत्रात, 'उपदेशे' या पदाची अनुवृत्ति होण्याकरिता व प्रकृत सूत्राचा अर्थ स्पष्ट होण्याकरिता प्रकृत सूत्रातच 'उपदेशे' या पदाचे ग्रहण केले आहे ('अभ्र आँ अप' या स्थळी 'आङ्' चे जागी 'आङोऽनुनासिकश्छन्दसि' या सूत्रान्वयें 'आँ' असा आदेश झाला आहे दीक्षित म्हणतात की, ज्याप्रमाणे 'उ' या निपाताचे जागी होणारा 'ऊँ' हा अनुनासिक आदेश विधानसामर्थ्यामुळें इत्संज्ञक होत नाही त्याचप्रमाणे 'आङ्' चे जागी होणारा 'आँ' हा अनुनासिक आदेश विधानसामर्थ्यामुळें इत्संज्ञक होत नाही असं म्हणता येते, कारण जर तो आदेश इत्संज्ञक मानला तर, 'तस्य लोप:' सू. ९० या सूत्राने त्याचा लोप होईल व आदेशाचे विधान व्यर्थ ठरण्याची आपत्ति येईल आणि म्हणून प्रकृत सूत्रात 'उपदेशे' हें पद नसलें तरी, जसा 'ऊँ' हा इत्संज्ञक होत नाही तसाच 'आँ' हा देखील इत्संज्ञक होऊ शकत नाही तरी पण प्रकृत सूत्रात 'उपदेशे' या पदाचे ग्रहण एवढ्याचकरिता केले आहे की, सूत्रार्थ स्पष्ट व्हावा व 'हलन्त्यम्' या उत्तरसूत्रात ते पद अनुवृत्त व्हावं) प्रकृत सूत्रात 'अच्' या पदाचे ग्रहण अशाकरिता केले आहे की, 'मनिन्' प्रत्ययातील मकाराला इत्संज्ञा होऊ नये (प्रकृत सूत्रातून 'अच' हें पद गाळलें असते व 'उपदेशेऽनुनासिक इत्' एवढेंच जर सूत्र केले असतें तर, 'सर्वधातुभ्यो मनिन' उ सू. ५८४ या सूत्राने होणाऱ्या 'मनिन्=मन्' या प्रत्ययातील मकार अनुनासिक असल्यामुळें, तो इत्संज्ञक झाला असता पण प्रकृत सूत्रात 'अच' या पदाचे ग्रहण केले असल्यामुळें व मकार अच् नसल्यामुळें, तो इत्संज्ञक होत नाही) *

शब्दरत्न– नासिकामनुगत इति। नासिकामभिहत्य वायुनाऽभिव्यञ्जित इत्यर्थः। प्रातिशाख्यशिक्षादौ, लोके च तद्व्यवहारस्य तथैवोपपादनमावश्यकमिति तात्पर्यम्॥ अत एव मुखग्रहणप्रत्याख्यानभाष्यध्वनितो यमानुस्वारयोरनुनासिकव्यवहारः सूत्रमते सङ्गच्छते।

"यरोऽनुनासिके" इत्यादौ स्वरूपग्रहणाभावस्तु 'पशु' 'अपत्यम्' इत्यादिवदिति ध्येयम्। मन्दप्रयोजनमिति। मन्देषु प्रयोजनमस्येति बहुव्रीहि। एवंविधयोगलोके प्रातिशाख्याद्यनभिज्ञं प्रति सप्रयोजनमित्यर्थ.। अम्म अॉ अप इति। अत्रेत्सञ्ज्ञाया लोप स्यादिति भाव। विधानेति। इदिति वक्तव्येऽनुनासिकविधानसामर्थ्यादित्यर्थ। नेत्वमिति। तत्फललोपस्य सामर्थ्यादभावे इत्त्वमपि फलाभावान्नेत्यर्थः।

'नासिकामनुगत अनुनासिक' असा जो मनोरमेंत 'अनुनासिक' या शब्दाचा विग्रह केला आहे त्याचा 'नासिकामभिहत्य वायुनाऽभिव्यञ्जित,' म्हणजे नासिकास्थानाचे ठिकाणी आघात करून प्राणवायूने अभिव्यक्त केलेला वर्ण, असा अर्थ आहे ('अनुगत' यातील 'अनु' या उपसर्गाचा 'अभिहत्य' व 'गत' या पदाचा 'वायुना अभिव्यञ्जित' असा लक्षणेने अर्थ करून 'अनुनासिक' या पदाचा वर मागितल्याप्रमाणे शब्दरत्नकारानी अर्थ केला आहे) प्रातिशाख्यात व शिक्षा इत्यादि ग्रन्थात जेथे 'अनुनासिक' या पदाचा निर्देश आढळतो तेथे व लौकिक व्यवहारात जेव्हा 'अनुनासिक' या शब्दाचा उपयोग केला जातो तेव्हा त्या शब्दाचे वर दिलेल्या यौगिक अर्थान्वयेच उपपादन करणे, म्हणजे अर्थ करणे, आवश्यक आहे असा दीक्षिताच्या म्हणण्याचा तात्पर्यार्थ आहे ('नासिकया नासिकास्याभ्यां मुखनासिकया वा' अशी जरी तैत्तिरीय प्रातिशाख्यात 'अनुनासिक' या शब्दाची व्याख्या दिली आहे तरी ऋक्प्रातिशाख्यात किंवा शिक्षेत त्या शब्दाची व्याख्या दिली नाही म्हणून त्या ग्रन्थात आढळणाऱ्या 'अनुनासिक' या शब्दाचा व तसेच लौकिकव्यवहारात उपयोगात आणल्या जाणाऱ्या 'अनुनासिक' या शब्दाचा वर दिलेल्या यौगिक अर्थान्वयेच अर्थ करणे जरूर आहे) आणि 'अनुनासिक' या शब्दाचा तसा यौगिक अर्थ असल्यामुळेच, ज्या भाष्यात त्या सूत्रांतील 'मुख' या शब्दाचे प्रत्याख्यान केले आहे त्या भाष्यावरून

यम व अनुस्वार यांचे ठिकाणी ध्वनित होणारा 'अनुनासिक' या शब्दाचा व्यवहार सूत्रकाराच्या मते योग्य ठरतो ('मुखनासिकावचनोऽनुनासिकः' १–१–८ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात की, त्या सूत्रातून 'मुख' हा शब्द गाळता येणे शक्य आहे पण तो शब्द गाळल्यास व 'नासिकावचनोऽनुनासिकः' एवढेंच सूत्र मानल्यास, ज्यांचे केवळ नासिका हें उच्चारणस्थान आहे अशा यम व अनुस्वार यानाच अनुनासिकसंज्ञा होईल व ती संज्ञा मुख व नासिका या दोन्ही स्थानांनी उच्चारल्या जाणाऱ्या सानुनासिक स्वराना व 'ञ्, म्, ङ्, ण्, न्' या वर्गांतील पञ्चम वर्णांना होणार नाही अशी शंका उपस्थित करून त्या शंकेवर भाष्यकार असे उत्तर देतात की, ग्रामादवासिन्यायानें त्याना देखील अनुनासिकसंज्ञा होऊ शकते त्या न्यायाचा अर्थ सांगताना भाष्यकार असे म्हणतात की, जेथें एका वाड्यात कांही लोक माडीवर राहतात व कांही लोक खालच्या मजल्यावर राहतात आणि कांही लोक माडीवर व खालच्या मजल्यावर मिळून दोन्ही ठिकाणी राहतात तेथें जे लोक माडीवर राहतात त्याना माडीवर राहणारे या शब्दानी ओळखिले जाते व जे खालच्या मजल्यावर राहतात त्याना खालच्या मजल्यावर राहणारे या शब्दानी ओळखिले जाते आणि जे माडीवर व खालच्या मजल्यावर मिळून दोन्ही ठिकाणी राहतात त्याना माडीवर राहणारे किंवा खालच्या मजल्यावर राहणारे अशा दोन्हीहि प्रकारच्या शब्दानी ओळखिले जाते या न्यायान्वयें जे वर्ण मुखानें व नासिकेनें अशा उभय स्थानांनी उच्चारले जातात त्याना मुखाने उच्चारले जाणारे किंवा नासिकेनें उच्चारले जाणारे अशा दोन्हीहि प्रकारच्या शब्दांनी ओळखता येते म्हणून मुख व नासिका या दोन्ही स्थानांनी उच्चारले जाणारे सानुनासिक स्वर किंवा वर्गांतील पञ्चम वर्ण याना 'नासिकावचन' हा शब्द ग्रामादवासिन्यायानें लावता येऊ शकत असल्यामुळें, वरील सूत्रातून 'मुख' हा शब्द गाळला तरी, त्याना अनुनासिकसंज्ञा

होण्यात काही अडचण येऊ शकत नाही पण अशा रीतीने 'मुख' व 'नासिका' या उभय स्थानानी उच्चारलेल्या वर्णांना जरी अनुनासिकसंज्ञा होईल तरी केवळ नासिकास्थानाने उच्चारल्या जाणाऱ्या यम आणि अनुस्वार याना देखील, प्रकृत सूत्रातून 'मुख' हा शब्द गाळल्यास, अनुनासिकसंज्ञा प्राप्त होण्याची आपत्ति येईल, असा प्रश्न करून त्या प्रश्नाचे भाष्यकार असे उत्तर देतात की, यम व अनुस्वार याना अनुनासिकसंज्ञा झाली तरी काही दोष येत नाही आणि त्याना ती संज्ञा न झाल्याने कोणताहि फायदा होत नाही त्या भाष्यात भाष्यकारानी असे म्हटले आहे–'मुखग्रहण शक्यमकर्तुम्। केनेदानीमुभयवचनाना भविष्यति ? । प्रासादवासिन्यायेन । तद्यथा। केचित प्रासादवासिन, केचिद्भूमिवासिन, केचिदुभयवासिन । ये प्रासादवासिनो गृह्यन्ते ते प्रासादवासिग्रहणेन । ये भूमिवासिनो गृह्यन्ते ते भूमिवासिग्रहणेन । ये उभयवासिना गृह्यन्ते ते प्रासादवासिग्रहणेन भूमिवासिग्रहणेन च । एवमिहापि केचिन्मुखवचना केचिन्नासिकावचना केचिदुभयवचना । तत्र ये मुखवचना गृह्यन्ते ते मुखग्रहणेन । ये नासिकावचना गृह्यन्ते ते नासिकाग्रहणेन। ये उभयवचना गृह्यन्ते एव ते मुखग्रहणेन नासिकाग्रहणेन च । भवेदुभयवचनाना सिद्धम्, यमानुस्वाराणामपि प्राप्नोति । नैव दोषो न प्रयोजनम् ।' या भाष्यात यम व अनुस्वार याना अनुनासिकसंज्ञा झाली तरी काही दोष येत नाही असे भाष्यकारानी म्हटले असल्यामुळें त्यावरून हें ध्वनित होतें की, यम व अनुस्वार याना अनुनासिक हा व्यवहार लागू पडतो तसा व्यवहार त्याना लागू पडला नसता तर भाष्यकारानी 'यमानुस्वाराणामपि प्राप्नोति । नैवदोषो न प्रयोजनम' असे म्हटलें नसते पण पाणिनीनीं जें अनुनासिकसंज्ञेचें वरील सूत्र केलें आहे त्यावरून तर हें स्पष्ट होतें की, ज्याचें नासिका व मुख हे दोन्ही मिळून उच्चारणस्थान आहे त्यानाच अनुनासिकसंज्ञा होऊ शकते मग 'अनुस्वारयमाना च नासिकास्थानमुच्यते' या पाणिनीय शिक्षेतील वचनान्वयें ज्याचें केवळ

नासिका हें उच्चारणस्थान आहे अशा अनुस्वार व यम याना व्यवहारात लागू पडणारी अनुनासिकसंज्ञा कशी होणार ? या प्रश्नाचें उत्तर हेंच आहे की, जरी वरील सूत्रान्वयें त्याना अनुनासिकसंज्ञा होऊं शकत नाही तरी, 'अनुनासिक' या शब्दाचा पूर्वी सांगितल्या-प्रमाणे जो यौगिक अर्थ केला आहे तो मानल्यानें त्याना ती संज्ञा होऊं शकतेच व त्याना त्या अर्थान्वयें स्वतंत्र रीतीनें प्राप्त होणारी ती संज्ञा वरील सूत्राने बाधित होत नाहीं. सारांश अनुस्वार व यम याना व्यवहारात लागू पडणारी अनुनासिकसंज्ञा होण्याकरिता पाणि-नीनें कोणतेंहि स्वतंत्र सूत्र रचलें नसल्यामुळें हें ध्वनित होतें की, पाणिनीला 'अनुनासिक' या शब्दाचा वर दिलेला यौगिक अर्थ मान्य होता व त्या अर्थान्वयें त्याना ती संज्ञा प्राप्त होऊं शकत असल्यामुळें, त्याना ती संज्ञा प्राप्त होण्याकरिता स्वतंत्र सूत्र रचण्याची पाणिनीला गरज भासली नाहीं, आणि म्हणून वर जसा 'अनुनासिक' या शब्दाचा यौगिक अर्थ केला आहे तसा अर्थ करणें आवश्यक आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. आता 'अनुनासिक' या शब्दाचा वर सांगितल्याप्रमाणे यौगिक अर्थ असल्यामुळें व त्या अर्थान्वयें इष्ट वर्णांना अनुनासिकसंज्ञा होऊं शकत असल्यामुळें अनुनासिक संज्ञेचें वरील सूत्र असण्याची काही गरज नाहीं असें जें दीक्षितानीं म्हटलें आहे त्यावर शंकाकार अशी शंका करतो की, अनुनासिकसंज्ञेचें सूत्र गाळल्यास, 'अनुनासिक' हा शब्द संज्ञावाचक ठरणार नाहीं व 'स्वं रूपं शब्दस्याशब्दसंज्ञा' सू. २५ हें सूत्र असल्यामुळें, म्हणजे संज्ञावाचक शब्द सोडून सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या शब्दाचें जसें वर्णानुपूर्वीविशिष्ट स्वरूप आहे त्याचेंच त्या शब्दानें ग्रहण करावें व इतर पर्यायवाचक शब्दाचें ग्रहण करूं नये असा अर्थाचें सूत्र असल्यामुळें, 'यरोऽनुनासिकेऽनुनासिको वा' सू. ११६ या सूत्राचा, पदान्तीं असणाऱ्या 'यर्' पुढें 'अनुनासिक' हा शब्द आला असता, त्या यर्चे जागीं विकल्पेंकरून 'अनुनासिक' या

शब्दाचा आदेश होतो अशा प्रकारचा अनिष्ट अर्थ होण्याची आपत्ति येईल या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'हरतेर्दृतिनाथयो पशौ' सू २९३९ व 'तस्यापत्यम्' सू १०८८ इत्यादि सूत्रात निर्दिष्ट असलेल्या) 'पशु, अपत्य' इत्यादि शब्दाचा ज्याप्रमाणे 'पशु, अपत्य हे शब्द' असा अर्थ न करिता, 'पशु, अपत्य' यांच्या अर्थाचे ग्रहण केले जाते त्याचप्रमाणे 'यरोऽनुनासिके' इत्यादि सूत्रात 'अनुनासिके, अनुनासिक' या पदानी 'अनुनासिक' या शब्दाचे ग्रहण न करिता त्याच्या अर्थाचे ग्रहण करता येते ('स्व रूप शब्दस्य' १-१-६८ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी 'शब्दपूर्वकस्यार्थस्य सम्प्रत्यय, इह च व्याकरणे शब्दे कार्यस्य असम्भवोऽर्थेऽसम्भवस्तस्मादर्थनिवृत्ति' इत्यादि तऱ्हेचे प्रतिपादन करून त्या सूत्राचे प्रत्याख्यान केले आहे आता हें खरे की, 'हरतेर्दृतिनाथयो पशौ' या सूत्रात 'पशु' या शब्दाचे व 'तस्यापत्यम्' या सूत्रात 'अपत्य' या शब्दाचे ग्रहण केले आहे आणि हे दोन्ही शब्द संज्ञावाचक नाहीत, कारण अष्टाध्यायीत यांची व्याख्या दिली नाही तरी पण 'स्व रूप शब्दस्य' हे सूत्र असून देखील, ज्याप्रमाणे 'पशु' व 'अपत्य' या शब्दाचा शब्दपर अर्थ न करिता अर्थपर अर्थ केला जातो, त्याचप्रमाणे 'यरोऽनुनासिके' या सूत्रातील 'अनुनासिके, अनुनासिक' या शब्दाचा शब्दपर अर्थ न करिता अर्थपर अर्थ करण्यात काही अडचण येत नाही; कारण पाणिनीने ठिकठिकाणी सूत्रात केलेल्या निर्देशान्वये, 'स्व रूपं शब्दस्य' या सूत्राची अनित्यता सिद्ध होते) मनोरमेतील 'मन्दप्रयोजनम्' या पदाचा 'मन्दं प्रयोजनमस्य' असा व्यधिकरण बहुव्रीहि आहे (व जरी अष्टाध्यायीत तसा व्यधिकरण बहुव्रीहि करण्याकरिता कोणतेहि सूत्र साक्षात् पठित केले नाहीं तरी, 'सप्तमी विशेषणे बहुव्रीहौ' सू ८९८ या ज्ञापकाच्या आधारे तसा बहुव्रीहि करिता येतो) व 'मन्दप्रयोजनम्' या पदाचा अर्थ असा आहे की, ज्याना 'अनुनासिक' या शब्दाचा यौगिकार्थ माहीत नाहीं व लौकिक-

व्यवहारात् आणि प्रातिशाख्यादि व्याकरणग्रन्थात 'अनुनासिक' या शब्दाच्या यौगिक अर्थाला धरूनच त्या शब्दाचा प्रयोग केला जातो हें माहीत नाही तसा लोकाकरिताच अनुनासिकसंज्ञासूत्र केलें आहे व अशा रीतीनें तें सूत्र सप्रयोजनक ठरतें 'अभ्र आँ अप' या स्थली 'आँ' या अनुनासिकाला इत्संज्ञा झाल्यास, ('तस्य लोपः' सू ६२ या सूत्रान्वयें) त्याचा लोप होण्याची आपत्ति येईल असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे 'विधानसामर्थ्यात्' या मनोरमेंतील पदाचा "आङ् इन् छन्दसि असं सूत्र न करिता 'आङोऽनुनासिकश्छन्दसि' असें सूत्र करून अनुनासिक आदेश होण्याचें जें विधान केलें आहे त्याच्या सामर्थ्यामुळें" असा अर्थ आहे इत्वाचें फल जो लोप तो विधान-सामर्थ्यामुळें होत नसल्यामुळें व अशा रीतीनें इत्संज्ञा निष्फल ठरत असल्यामुळें, ती देखील होत नाही असा 'नेत्त्वम्' या मनोरमेंतील पदाचा अर्थ आहे

शब्दरत्न— ननु 'अभ्र आँ अदितिः' इत्यत्र "अनेकान्ता अनुबन्धा" इति पक्षे "आदितश्च" इतीट्प्रतिषेधः फलम्। न च लोपाभावे इदितिमहासञ्ज्ञाकरणात्तत्रापि नेति वाच्यम्, महासञ्ज्ञयेव लोपसिद्धया "तस्य लोपः" इत्यस्य वैयर्थ्यापत्तेः, "इक" इत्यादौ ककारादिश्रवणानापत्तेश्च; इति चेन्न, "अनुबन्धानामेकान्तत्वमेव" इति मुख्यपक्षे दोषाभाव इत्याशयात्। तदा हि मुख्येऽवयविन्यन्य-पदार्थे बहुव्रीहिः। न चायमाकारोऽधातोरवयव, इत्यदोषात्।

(इत्संज्ञेचें फल 'तस्य लोपः' सू ६२ या सूत्रान्वयें लोप असल्यामुळें, जेथें लोप होत नाही तेथें इत्संज्ञा करणें निष्फल ठरत असल्यामुळें ती देखील होत नाही असं जें नुकतेंच वर म्हटलें आहे त्यावर शब्दकार अशी शंका करितो कीं, जेथें इत्संज्ञा केल्यानें लोपव्यतिरिक्त इतर फल संभवतें तेथें इत्संज्ञा व्यर्थ ठरत नाहीं व त्यामुळें तशा ठिकाणी इत्संज्ञा होण्यास कांहीं हरकत नाहीं य आपल्या शंकेच्या पुष्ट्यर्थ तो 'अभ्र आँ अदित' हें उदाहरण देतो

आणि म्हणतो की,) 'अनेकान्ता अनुबन्धाः' हा पक्ष स्वीकारल्यास, 'अभ्र आँ अटित-' या उदाहरणात ('आङ्' चे जागी झालेल्या) 'आँ' या अनुनासिक आदेशाला इत्संज्ञा केली असता, 'आदितश्च' सू ३०३६ या सूत्रान्वयें 'अट्' धातूला इडागम न होणे हें फल संभवते. (शंकाकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, जरी 'आँ' हा 'अट्' धातूचा अवयव नसून भिन्न पद आहे तरी, 'अनेकान्ता अनुबन्धा' परि ४–म्हणजे ज्याला अनुबन्ध लावले जातात त्याचे ते अनुबन्ध अवयव होत नाहीत, ही परिभाषा असल्यामुळें, 'आँ' या समीप असलेल्या भिन्न पदाला देखील अनुबन्ध मानता येते व अशा रीतीने ते पद अनुबन्ध मानल्याने 'उपदेशेऽजनुनासिक इत्' सू. ३ या सूत्राने त्याला इत्संज्ञा केली असता, जरी विधानसामर्थ्यामुळें त्याचा लोप होत नाही तरी, 'आदितश्च' हें सूत्र असल्यामुळें 'अट' धातूला इडागम न होणे हे लोपव्यतिरिक्त फल संभवते ) या शंकेवर अशी प्रतिशंका करण्यात येते की, ज्याअर्थी 'आँ' या अनुनासिकाचा लोप होत नाही त्याअर्थी, इत्संज्ञा अन्वर्थक असल्यामुळे, तो इत्संज्ञा देखील 'आँ' याला होऊ शकत नाही (वरील शंकेवर प्रतिशंका करणाऱ्याच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, एति गच्छतीति-प्रयोगे न तिष्ठतीति–इत्' असा 'इत्' या पदाचा अर्थ असल्यामुळें व इत्संज्ञा अशा रीतीने अर्थाला धरून केलेली असल्यामुळें, ती संज्ञा अन्वर्थक ठरते आणि म्हणून जेथें ज्याचा लोप होत नाही तेथें त्याला अन्वर्थक असलेली ती इत्संज्ञा देखील करता येत नाही या प्रतिशंकेवर शंकाकार असे उत्तर देतो की,) हे म्हणणे बरोबर नाही, कारण इत्संज्ञा अन्वर्थक मानल्यानेच जर लोपसिद्धि होऊ शकते तर, 'तस्य लोपः' सू ६२ हे सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येऊ पाहते व तसेच 'इव' इत्यादि स्थली वकारादि इत् वर्णांचे श्रवण न होण्याची देखील आपत्ति येऊ पाहते (शंकाकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, जर 'इत्' या अन्वर्थक संज्ञेच्या सामर्थ्यानेच इत्संज्ञक

ठरणाऱ्या वर्णाचा लोप होऊ शकतो असे मानले तर, 'तस्य लोपः' हें सूत्र व्यर्थ ठरेल व 'अण् इक्' इत्यादि प्रत्याहारातील अन्त्य वर्ण इत् असल्यामुळें ते एकदम नाहींसे होतील व 'अण्, इक' इत्यादि प्रयोगच होऊं शकणार नाहींत आणि त्यामुळें 'इको यणचि' इत्यादि सूत्र-प्रयोग चूक ठरण्याची आपत्ति येईल म्हणून जेथें लोप होत नाहीं तेथें अन्वर्थक इत्संज्ञा देखील होऊं शकत नाहीं हें म्हणणे अयोग्य ठरते येथें हे लक्षात ठेवावे की, 'ननु अव्य औं अटित' येथपासून 'वकारादिश्रवणानापत्तेश्च' येथपर्यंत शब्दग्रन्थ आहे आता या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात कीं, 'अनेकान्ता अनुबन्धाः' हा सिद्धान्तपक्ष नसून एकदेशीची उक्ति आहे आणि म्हणून तो पक्ष स्वीकारता येत नाहीं आणि 'एकान्ता अनुबन्धा' प. ५ हाच सिद्धान्तपक्ष असल्यामुळें तोच पक्ष स्वीकारला पाहिजे आणि) अनुबन्ध हे अवयवच होत या मुख्य सिद्धान्तपक्षात, वर जी इडागम-प्रतिषेधरूप आपत्ति दाखविली आहे ती मुळींच उद्भवत नाहीं आणि तो सिद्धान्तपक्ष स्वीकारल्यामुळे, अवयवी जो अन्य पदार्थ आहे तो बहुव्रीहिचा अर्थ मानल्यानें बहुव्रीहिसमास उपपन्न ठरतो (सारांश ज्याला अनुबन्ध लावले आहेत त्याचे ते अवयवच होत, म्हणजे एखादा वर्ण ज्याचा अनुबन्ध मानणे आहे त्याचा तो अवयव असल्यामुळे त्याला अनुबन्ध मानता येतें व तो त्याचा अवयव नसल्यास त्याला अनुबन्ध मानतां येत नाही असा सिद्धान्तपक्ष असल्यामुळें, 'अव्य औं अटित' या स्थली 'औं' हा 'अट्' धातूचा अवयव नसून भिन्न पद असल्यामुळें तो 'अट्' धातूचा अनुबन्ध आहे असे मुळींच मानतां येत नाहीं व त्यामुळें 'उपदेशेऽजनुनासिक इत्' या सूत्रानें होणारी इत्संज्ञा त्या 'औं' ला होत नाही व वरील उदाहरणांत 'आदितश्च' हें इडागमप्रतिषेधाचे सूत्र प्रवृत्त होऊ शकत नाहीं व इडागम होऊन 'अटित' असे क्तप्रत्ययान्त इष्ट रूप सिद्ध होऊन 'अव्य औं अटित' हा प्रयोग शुद्ध ठरतो दुसरे असे कीं, 'एकान्ता

अनुबन्धा ' हा पक्ष मानल्यासच 'पित्, मित्, कित्' इत्यादि स्थली 'पकार, मकार, ककार इत् यस्य शप्, श्नम्, क्त इत्याद्यवयविन' असा अन्यपदार्थप्रधान बहुव्रीहिसमास होऊं शकतो व पित्, मित्, कित इत्यादि प्रयोग योग्य ठरतात ) वरील उदाहरणात आकार हा 'अट' धातूचा अवयव नसल्यामुळे शकाकाराने दाखविलेला इडागम-प्रतिषेधरूप दोष येत नाही (याचे विवरण वर केलेच आहे 'अनेकान्ता अनुबन्धा ' व 'एकान्ता अनुबन्धा ' या दोन्ही परिभाषाचे विस्तृत विवरण परिभाषेन्दुशेखराच्या मराठी भाषान्तरात पान १६ ते १८ मध्ये केले आहे व ते वाचल्यास, वरील दोन्ही परिभाषाचा अर्थ नीट ध्यानात येईल व वरील शब्दरत्नातील पङ्क्तीचा अर्थ पूर्णपणे लक्षात येईल )

मनोरमा– 'प्रतिज्ञायते इति प्रतिज्ञा' "आतश्चोपसर्गे" इति कर्मण्यङ्। 'प्रतिज्ञा आनुनासिक्यं येषाम्' इति विग्रहः। एवं च 'प्रतिज्ञासमधिगम्ये प्रतिज्ञाशब्दस्य लक्षणा' इति क्लिष्टं व्याख्यानं नाश्रयणीयम्, "पाणिन्युपज्ञं व्याकरणम्" इत्यादिवद्विना लक्षणां विनैव निर्वाहात्। यद्यपि सूत्रकारकृतोऽनुनासिकपाठ इदानीं परिभ्रष्टस्तथापि वृत्तिकारादिव्यवहारबलेन यथाकार्यं प्राक् स्थित इत्यनुमीयत इति भावः।

('उपदेशेऽजनुनासिक इत्' सू ३ या सूत्रावरील कौमुदीत पठित असलेल्या) 'प्रतिज्ञानुनासिक्याः पाणिनीयाः ' या पङ्क्तीतील 'प्रतिज्ञा' या शब्दाची 'प्रतिज्ञायते इति प्रतिज्ञा' अशी व्युत्पत्ति असून या स्थली 'आतश्चोपसर्गे' सू ३२८३ या सूत्राने 'कर्मणि अङ' प्रत्यय झाला आहे 'प्रतिज्ञानुनासिक्याः' या पदाचा 'प्रतिज्ञा आनुनासिक्यं येषाम्' असा विग्रह आहे म्हणून 'प्रतिज्ञासमधिगम्ये प्रतिज्ञाशब्दस्य लक्षणा' असे जें क्लिष्ट व्याख्यान (प्रकाशकारांनी) केले आहे तें स्वीकारू नये, कारण 'पाणिन्युपज्ञं व्याकरणम्' इत्यादि स्थली जसा लक्षणा न करिता देखील इष्ट अर्थाचा बोध होऊ शकतो

तसा प्रकृत स्थली देखील होऊ शकतो (प्रकाशकारांनी 'प्रतिज्ञान प्रतिज्ञा' असा 'भावे' या अर्थामध्ये 'अङ्' प्रत्यय करून 'प्रतिज्ञा नम्=प्रतिज्ञा' अशा रीतीने 'प्रतिज्ञा' हा शब्द साधला आहे व नंतर 'प्रतिज्ञा' या शब्दाचा 'प्रतिज्ञासमधिगम्य' असा लक्षणेनें अर्थ केला आहे पण 'आतश्चोपसर्गे' या सूत्रात पूर्वं सूत्रातून 'भावे' व 'अकर्तरि च कारके' ही पदें अनुवृत्त होत असल्यामुळें, त्या सूत्राने जसा 'भावे' या अर्थामध्यें 'अङ्' प्रत्यय होऊ शकतो तसाच कर्तृभिन्न कारकाच्या, म्हणजे कर्मरूप कारकाच्या, अर्थामध्यें देखील तो प्रत्यय होऊ शकतो आणि 'कर्मणि' या अर्थामध्यें 'अङ्' प्रत्यय केला असता, 'प्रतिज्ञा' या शब्दाचा 'प्रतिज्ञानविषय' असा यौगिक अर्थ होत असल्यामुळें, प्रथम 'भावे अङ्' प्रत्यय करून नंतर लक्षणा करणें असा द्राविडी प्राणायाम करण्याची काहींच गरज नाही उलट तसें करण्यात गौरव असून, 'कर्मणि अङ्' प्रत्यय करण्यातच लाघव आहे 'पाणिन्युपज्ञं व्याकरणम्' या स्थली, 'उपज्ञायते इति उपज्ञा' असा 'कर्मणि अङ्' प्रत्यय करून 'उपज्ञा' हे रूप सिद्ध केल्यावर, 'पाणिने उपज्ञा पाणिन्युपज्ञम्' म्हणजे 'पाणिनिना प्रथम-मुपज्ञायमानम्=पाणिनिकर्तृकाद्यज्ञानविषयीभूतम्', असा अर्थ होत असता, 'भावे अङ्' प्रत्यय करून नंतर लक्षणा करण्याची जशी गरज राहत नाहीं तसेंच 'प्रतिज्ञा' या स्थली देखील समजावे, म्हणजे दोन्ही स्थली 'कर्मणि अङ्' प्रत्ययच करावा व तसें केले असता लक्षणा करण्याची मुळींच गरज पडत नाही. 'पाणिने उपज्ञा' या स्थली 'पाणिने' ही 'कर्तृकर्मणो कृति' सू ६२३ या सूत्रान्वयें कर्तरि षष्ठी असून 'कृद्योगा च षष्ठी समस्यते इति वाच्यम्'—सू ७०३ वरील वार्तिक—या वार्तिकान्वयें षष्ठीतत्पुरुषसमास झाला आहे व त्या समासात 'उपज्ञा' हें उत्तरपद असल्यामुळें, 'उपज्ञोपक्रमं तदाद्याचिख्यासायाम्' सू ८२४ या सूत्रान्वयें सामासिक शब्द नपुंसक-लिङ्गी झाला आहे हें लक्षात ठेवावे) जरी पाणिनीनें केलेला

अनुनासिक पाठ आतां नाहीसा झाला आहे तरी वृत्तिकारादिकांनी पाणिनीय सूत्रान्वयें प्रक्रिया करिताना जसा व्यवहार केला आहे व जी कार्ये केली आहेत त्या व्यवहारावरून व त्या कार्यांवरून पाणिनीय पाठात कोणते अच् अनुनासिक पठित केले होते याचे आपणास अनुमान करता येत व तशा प्रकारचा अनुनासिकस्वरयुक्त पाणिनीय पाठ–अष्टाध्यायी, धातुपाठ इत्यादि–होता असे आपण अनुमान करू शकतो ('उपदेशेऽजनुनासिक इत्' सू॰३ हें सूत्र पाणिनीने केले असल्यामुळें त्यावरूनच हे सिद्ध होते की, पाणिनीने अष्टाध्यायी, धातुपाठ इत्यादि रचतेवेळीं ज्याना इत्संज्ञा होणें इष्ट आहे अशा आद्योच्चारणविषयक शब्दातील अचांचा अनुनासिकरूपाने पाठ केला असला पाहिजे तसा पाठ पाणिनीनें केला नसता तर त्याला ते सूत्र रचण्याची काहीच आवश्यकता नव्हती साम्प्रतकाली तो अनुनासिक पाठ दुर्दैवाने लुप्त झाला आहे मग त्या पाठात कोणते अच् अनुनासिक पठित केले होते हें आतां समजण्यास मार्ग काय? या प्रश्नाचे दीक्षित असें उत्तर देतात की, वृत्तिकारादि पूर्व वैयाकरणानी जी उदाहरणे दिली आहेत व जे प्रयोग साधले आहेत त्यावरून पाणिनीय पाठातील कोणते अच् अनुनासिक पठित केले होते याचे आपणास अनुमान करता येतें उदाहरणार्थ चुरादि गणात 'चुर स्तेये, घट सघाते, कथ वाक्यप्रबन्धे' हे धातु पठित केले आहेत या धातूचीं 'चोरयति, घाटयति, कथयति' अशी रूपें पूर्व वैयाकरणानीं दिली असल्यामुळें, आपणास हे अनुमान करता येतें कीं, 'चुर' व 'घट' या धातूतील अन्त्य अकार अनुनासिक पठित केला असून 'कथ' यातील अन्त्य अकार अनुनासिक पठित केला नव्हता पहिल्या दोन धातूतील *अन्त्य अकार अनुनासिक पठित केला असल्यामुळेंच* तो प्रकृत सूत्रान्वयें इत्संज्ञक ठरून 'तस्य लोपः' या सूत्रानें त्याचा लोप होतो यामुळेंच 'चुर्' यातील उपधेला 'पुगन्तलघूपधस्य च' सू २१८९ या सूत्राने गुण होतो व 'घट्' यातील उपधा अकाराची

'अत उपधाया' सू २२८२ या सूत्रानें वृद्धि होते पण 'कथ' यांतील अन्त्य अकार अनुनासिक पठित नसल्यामुळें तो प्रकृत सूत्रान्वयें इत्संज्ञक होत नाहीं व 'कथ' धातूहून णिच् प्रत्यय केल्यावर जरी त्या अकाराचा 'अतो लोप' सू २३०८ या सूत्रानें लोप होतो तरी तो अकार स्थानिवद्भावानें विद्यमान आहे असे मानावें लागत असल्यामुळें व अशा रीतीनें 'कथ' यांतील थकारापुढील अकार उपधाभूत अकार ठरत नसल्यामुळें, त्याची 'अत उपधाया' या सूत्रानें होणारी वृद्धि होत नाहीं तसेच 'समानकर्तृकेषु तुमुन्' या सूत्रावरील काशिकावृत्तीत 'भोक्तुम्' हें तुमुन्प्रत्ययान्ताचें उदाहरण दिलें असल्यामुळें, आपणास असें अनुमान करतां येतें कीं, तुमुन्प्रत्ययांतील मकारापुढील उकारच अनुनासिक पठित केला असून, तकारापुढील उकार अनुनासिक पठित केला नव्हता सारांश वृत्तिकारादिकांनीं पाणिनीय सूत्रांचें व्याख्यान करितांना जीं उदाहरणें दिलीं आहेत त्यावरून आपणास पाणिनीय पाठांतील कोणतें अच् अनुनासिक पठित केले होते याचें वर सांगितल्याप्रमाणें अनुमान करतां येतें )

शब्दरत्न–प्रतिज्ञेति । प्रतिज्ञानविषय इत्यर्थः । प्रतिज्ञाशब्दस्येति । भावाऽन्तस्येत्यर्थः । क्लिष्टेति । शक्तिग्राहकव्याकरणसत्त्वाच्छक्त्यैव तदर्थबोधसम्भवे लक्षणाश्रयणं क्लेश इति भावः । लक्षणां विनैवेति । अत्र लक्षणया व्याख्यानं कुर्वतापि तत्र लक्षणां विना मदुक्त रीत्यैव व्याख्यातम् । एवं च पूर्वापरविरोधस्तस्येति भावः । न चोभयोर्विधानेऽपि लाघवाद्भावे शक्तिः, कर्मणि लक्षणा, अनुशासनमपि लाक्षणिकार्थानुशासनमेवेति वाच्यम्, "ल कर्मणि" इत्यादीनामपि तथात्वापत्तौ 'तिङां कर्त्रादौ शक्तिः' इति सिद्धान्तासङ्गत्यापत्तेः, व्याकरणस्याभियुक्तोक्तशक्तिग्राहकत्वस्य भङ्गापत्तेश्च ॥

('प्रतिज्ञायते इति प्रतिज्ञा' अशा रीतीनें 'कर्मणि अङ्' प्रत्यय करून 'प्रतिज्ञा' या शब्दाची व्युत्पत्ति केली असल्यामुळें) 'प्रतिज्ञा' या शब्दाचा 'प्रतिज्ञानविषय' असा अर्थ होतो

'प्रतिज्ञामसधिगम्ये प्रतिज्ञाशब्दस्य लक्षणा' या मनोरमेंत दिलेल्या पङ्क्तीतील 'प्रतिज्ञाशब्दस्य' या पदाचा 'भावाङन्तस्य,' म्हणजे 'भावे' या अर्थामध्यें अङ्प्रत्यय करून जो 'प्रतिज्ञा' शब्द सिद्ध होतो त्या शब्दाचा, असा अर्थ आहे 'क्लिष्ट व्याख्यानम्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, अभिधाशक्तीनें शब्दाच्या अर्थाचा बोध करून देणारें व्याकरणशास्त्र असल्यामुळें, अभिधाशक्तीनेच शब्दाच्या अर्थाचा बोध होणे संभवत असता, तशा ठिकाणी लक्षणेचा आश्रय करण्यात क्लेश–गौरव–आहे (साराश ज्या शब्दाचा अभिधावृत्तीनें इष्ट अर्थ करता येतो त्या शब्दाचा लक्षणावृत्तीनें तसा अर्थ करणें अनुचित असून, तसा अर्थ करण्यात काठिन्य व गौरव आहे) 'लक्षणा विनैव निर्वाहात्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'प्रतिज्ञानुनासिक्या' या स्थली जरी प्रकाशकारानी 'प्रतिज्ञा' या शब्दाचें लक्षणावृत्तीचा आश्रय करून वर सांगितल्याप्रमाणे व्याख्यान केले आहे तरी, 'पाणिन्युपज्ञं व्याकरणम्' या स्थली 'उपज्ञा' या शब्दाचा अर्थ करतेवेळी लक्षणेचा आश्रय न करिता आम्ही जसें 'प्रतिज्ञा' या शब्दाचें अभिधावृत्तीनें व्याख्यान केले आहे तसेंच त्यानी 'उपज्ञा' या शब्दाचें अभिधावृत्तीनेंच व्याख्यान केले आहे आणि अशा रीतीनें त्याच्या या दोन व्याख्यानात परस्पर विरोध येतो (साराश जसा प्रकाशकारानी 'उपज्ञा' या शब्दाची व्युत्पत्ति करिताना 'कर्मणि अङ्' प्रत्यय केला आहे त्याचप्रमाणें त्यानी 'प्रतिज्ञा' या शब्दाची व्युत्पत्ति करिताना देखील 'कर्मणि अङ्' प्रत्ययच करावयास हवा होता तसें त्यानी न करिता 'भावे अङ्' प्रत्यय करून 'प्रतिज्ञा' या शब्दाचा 'प्रतिज्ञामसधिगम्य' असा जो लक्षणेनें अर्थ केला आहे तें त्याचें करणें अनुचित असून, 'उपज्ञा' या शब्दाची त्यानी पुढें जो व्युत्पत्ति केली आहे तिच्याशी विरोध येतो असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे असं शब्दरत्नकार म्हणतात. आता प्रकाश-

कारतर्फे असे म्हणण्यात येते की,) जरी अट्प्रत्यय 'भावे' या अर्थीं व तसेच कर्तृभिन्न इतर कारकाच्या अर्थांमध्यें ह्याचें विधान केलें आहे तरी (धातु क्रियावाचक असल्यामुळें व धातूने क्रियारूप अर्थाचीच उपस्थिति होत असल्यामुळें, धातूहून होणाऱ्या) अट् प्रत्ययाची लाघवामुळें भावार्थ–क्रियारूप अर्थ–द्योतन करण्यातच अभिधाशक्ति आहे व त्या प्रत्ययानें 'कर्मणि' या अर्थाचें द्योतन करणें झाल्यास, लक्षणावृत्तीचा उपयोग केला पाहिजे उदाहरणार्थ, 'अनु-शासन' या शब्दीं ('शास्' धातूहून होणारा 'ल्युट्=अन' हा प्रत्यय अभिधावृत्तीनें 'भावे' या अर्थाचा बोधक असून) लक्षणावृत्तीनें जसा 'करणे' या अर्थाचा बोधक आहे तसाच अट् प्रत्यय अभिधावृत्तीनें 'भावे' या अर्थाचा बोधक असून लक्षणावृत्तीनें 'कर्मणि' या अर्थाचा बोधक आहे (पण शब्दरत्नकार म्हणतात की, प्रकाशकाराच्या मताचें समर्थन करण्याकरिता खण्डनकारादिकांनी हें जें म्हटलें आहे) तें म्हणणें बरोबर नाहीं, कारण तें म्हणणें बरोबर मानल्यास, 'ल कर्मणि च भावे चाकर्मकेभ्य' सू ३१५३ इत्यादि ठिकाणीं देखील असेच मानण्याची, म्हणजे त्याठिकाणीं 'भावे' या अर्थाचा बोध अभिधावृत्तीनें होतो आणि 'कर्मणि' व 'कर्तरि' या अर्थाचा बोध लक्षणावृत्तीनें होतो असे मानण्याची, आपत्ति येईल व त्यामुळें 'निरूढ लक्षणादी शक्ति' हा सिद्धान्त चूक ठरण्याची व तसेंच व्याकरणशास्त्रानें शब्दाच्या अर्थाचा अभिधाशक्तीनें बोध होतो असें जें विद्वान वैयाकरणांनी म्हटलें आहे तें देखील चूक ठरण्याची आपत्ति येईल ('ल कर्मणि च भावे चाकर्मकेभ्य' या सूत्रानें सकर्मक धातूंना 'कर्तरि' व 'कर्मणि' या अर्थांमध्यें व अकर्मक धातूंना 'कर्तरि' व 'भावे' या अर्थांमध्यें लकार होणें सांगितलें आहे, धातूहून केवळ 'भावे' या अर्थामध्यें लकार होणें सांगितलें नाहीं आणि तीन्ही प्रकारच्या अर्थांमध्यें लकार होणें सांगितलें असल्यामुळें, 'भावे' या अर्थाचा अभिधाशक्तीनें बोध होतो आणि 'कर्तरि' व 'कर्मणि' या

अर्थाचा लक्षणावृत्तीने बोध होतो असे मानण्यास काहीच प्रमाण नाही वरील सूत्रात 'कर्तरि, कर्मणि, भावे' या तीन्ही शब्दाचा निर्देश केला असल्यामुळें, लकाराने तीन्ही प्रकारच्या अर्थाचा अभिधाशक्तीनेच बोध होतो असेच मानणे योग्य आहे दुसरें असे की, लकाराने 'भावे' या अर्थाचाच अभिधाशक्तीने बोध होतो असे मानल्यास, 'तिङां भावे शक्ति' असा सिद्धान्त असावयास पाहिजे होता पण तसा सिद्धान्त नसून 'तिङां कर्त्रादौ शक्ति' असा सिद्धान्त आहे व या सिद्धान्तान्वयें जसा 'भावे' या अर्थाचा अभिधाशक्तीने बोध होतो तसाच 'कर्तरि, कर्मणि' या अर्थाचा देखील अभिधाशक्तीनेंच बोध होतो तिसरे असे की, अभियुक्त वैयाकरणानी 'शक्तिग्रहं व्याकरणोपमानकोशाप्तवाक्याद्व्यवहारतश्च । वाक्यस्य शेषाद्विवृत्तेर्वदन्ति सांनिध्यत सिद्धपदस्य वृद्धा ॥' अशी कारिका पठित केली आहे या कारिकेवरून देखील हे स्पष्ट होते की, शब्दाच्या अर्थाचा अभिधाशक्तीने बोध करून देणे हेच व्याकरणशास्त्राचे प्रयोजन आहे म्हणून 'भावे शक्ति इतरत्र लक्षणा' असे जें खण्डनकारादिकानी म्हटले आहे ते शास्त्रविरुद्ध आहे साराश 'आतश्चोपसर्गे' सू ३२८३ या सूत्रानें उपसर्गपूर्वक आकारान्त धातूहून 'भावे' व कर्तृभिन्नकारक या दोन्ही अर्थामध्यें अङ्प्रत्यय होण्याचे विधान केले असल्यामुळें, जसा तो प्रत्यय 'भावे' या अर्थाचा अभिधाशक्तीने बोधक होतो तसाच 'कर्मणि' या अर्थाचा देखील तो अभिधाशक्तीनेंच बोधक होतो आणि म्हणून प्रकाशकारानी जसा 'उपदा' या स्थली कर्मणि अङ्प्रत्यय केला आहे त्याचप्रमाणे 'प्रतिज्ञा' या स्थली देखील त्यानी कर्मणि अङ्प्रत्ययच करावयास पाहिजे होता व त्या स्थली त्यानी प्रथम 'भावे अङ्' प्रत्यय करून नतर 'कर्मणि' या अर्थामध्यें जी लक्षणा केली आहे त त्याचे करणे योग्य नव्हते असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे )

मनोरमा—ननु रलयोरिति न्यूनम्, टकारस्यापि मध्यगतत्वादित्यत आह—प्रत्याहारेष्विति । व्यवह्रियन्ते इति । 'प्रत्याह्रियन्ते =

संक्षिप्यन्ते वर्णा यत्र' इति बाहुलकादधिकरणे घञ्। यद्यपि योगमात्रमकारादिसञ्ज्ञास्वतिप्रसक्तं तथापि योगरूढिरिति भावः। प्रत्याहाराश्चैकचत्वारिंशदिति प्राञ्चः। चतुर्दशसूत्रीस्थैर्हल्भिरिद्भिः कृता अष्टाध्याय्या व्यवहृता एकचत्वारिंशदिति तस्यार्थः। तेन सुप्तिङादीनाम्, रप्रत्याहारस्य, "चयो द्वितीया" इति वार्तिकस्थ-'चय्' प्रत्याहारस्य चाधिक्येऽप्यदोषः। यत्तु "-ञमन्ताड्डः" इति, "ञमिञमन्तेष्वनिडेक इष्यते" इति च 'ञम्' वार्तिककृता व्यवहृत इत्याहुः, तद्भ्रमसाभिधानम्, आद्यस्योणादिसूत्रत्वात्, द्वितीयस्य व्याघ्रभूतिकारिकास्थत्वात्। इत्यास्तां तावत्। एष च सङ्ख्यानियमो नातीवोपयुज्यत इत्युपेक्षितः।

(दीक्षितांनी 'उपदेशेऽजनुनासिक इत्' सू. ३ या सूत्रावरील कौमुदीत 'एषामन्त्या इतः। लण्सूत्रे अकारश्च' म्हणजे शिवसूत्रांतील अन्त्य व्यञ्जन 'हलन्त्यम्' या सूत्राने इत्संज्ञक होते व 'लण्' या शिवसूत्रातील लकारापुढील अकार 'उपदेशेऽजनुनासिक इत्' या सूत्राने इत्संज्ञक होतो, असे सांगून त्यांनी त्या सूत्रावरील कौमुदीत 'लण्सूत्रस्थावर्णेन सहोच्चार्यमाणो रेफोरलयोः सञ्ज्ञा' असे म्हटले आहे यावर कदाचित् अशी शंका करण्यात येईल की, त्या पंक्तीत) 'रलयो' असे जें म्हटले आहे ते न्यून-अपुरें-आहे; कारण (हयवरट्' या सूत्रातील रकार व 'लण्' या सूत्रातील अकार या) दोन वर्णांमध्यें टकार देखील आहे. (म्हणून 'रटलानाम्' असे 'रलयो' या ऐवजी म्हटले पाहिजे होतें. या शंकेचें निरसन करण्याकरिताच) 'प्रत्याहारेष्विना न ग्रहणम्,' म्हणजे प्रत्याहारांनी मध्यें पठित असलेल्या इत्संज्ञक वर्णांचें ग्रहण होत नाही, असें त्या सूत्रावरील कौमुदीत म्हटले आहे (म्हणून 'हयवरट्' या शिवसूत्रातील अन्त्य टकार हा 'हलन्त्यम्' या सूत्रान्वयें इत्संज्ञक असल्यामुळें, 'र' या प्रत्याहारानें त्या टकाराचे ग्रहण न होता 'र्, ल्' या दोन वर्णांचेच ग्रहण होतें आणि अशा रीतीनें 'रलयो. सञ्ज्ञा' असे जें

दीक्षितानी म्हटले आहे ते योग्य ठरते प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेला 'अनुनासिक' हा शब्द 'प्रत्याहारेष्वितां न ग्रहणम्' याचे ज्ञापक आहे हे पूर्वी सांगितलेच आहे. या खेरीज 'तृपिमृपिकृपे काश्यपस्य' सू ३३२६ हे सूत्र देखील त्याचे ज्ञापक देता यते या सूत्रातील 'मृपि' यातील पकारापुढील इकारापुढें ककार आला असून देखील त्या इकाराचे जागी यणादेश केला नसल्यामुळें हे सिद्ध होते की, 'ऋलृक्' या शिवसूत्रातील अन्त्य इत्संज्ञक ककाराचे अच्प्रत्याहाराने ग्रहण होत नाही 'आदिरन्त्येन इत्येतत्सूत्रेण कृता संज्ञा प्रत्याहार-शब्देन व्यवह्रियन्ते' असे जें प्रकृत सूत्रावरील कौमुदीत म्हटले आहे त्यात निर्दिष्ट असलेल्या 'प्रत्याहार' या शब्दाची व्युत्पत्ति आता दीक्षित सांगतात ) 'प्रत्याह्रियन्ते=संक्षिप्यन्ते वर्णा यत्र इति प्रत्याहार' अशी 'प्रत्याहार' या शब्दाची व्युत्पत्ति असून या स्थली ('कृत्यल्युटो बहुलम्' सू २८४१ या सूत्रान) बाहुलकत्वामुळें 'अधिकरणे' या अर्थामध्ये घञ्प्रत्यय झाला आहे जरी 'प्रत्याहार' या शब्दाचा यौगिक अर्थ स्वीकारल्यास अकार इत्यादिकाचे ठिकाणी देखील 'प्रत्याहार' ही संज्ञा लागू पाहाते तरी, येथें 'प्रत्याहार' या शब्दाच्या योगरूढ अर्थाचेच ग्रहण करावे असा वर दिलेल्या कौमुदीतील पंक्तीचा भावार्थ आहे (अच् या प्रत्याहाराने अकारापासून चकारापर्यंत जो वर्णसमुदाय आहे त्याचे जसे ग्रहण होत तसेच शिव-सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'अ, इ, उ' या वर्णांनी अठराहि प्रकारच्या त्या वर्णांचे ग्रहण होते व ऋकार व लृकार यानी तीस प्रकारच्या वर्णांचे व 'ए, ओ, ऐ औ' यानी बारा प्रकारच्या वर्णांचे ग्रहण होते असे 'अणुदित्' सू १४ या सूत्रावरील कौमुदीत सांगितले आहे

येथें 'प्रत्याहार' या शब्दाचा यौगिक अर्थ न स्वीकारता, ज्याप्रमाणे 'पङ्कज' या शब्दाचा 'कमल' असाच योगरूढ अर्थ स्वीकारला जातो त्याचप्रमाणे, योगरूढ अर्थच स्वीकारावा व तसा अर्थ स्वीकारल्यास, शास्त्रीय व्यवहारांत 'अण्, अक्, अच्' इत्यादिकांनाच 'प्रत्याहार' ही संज्ञा लावली जात असल्यामुळें, त्या संज्ञेने तसा शास्त्रीय प्रत्याहाराचेच ग्रहण होते व अकारादिकांचे ग्रहण होत नाही आणि अशा रीतीने वर दाखविलेली आपत्ति टळते ) प्राचीन वैयाकरणांच्या–प्रक्रियाकौमुदीकारादिकांच्या–मतें एकेचाळीस प्रत्याहार आहेत व त्यांच्या म्हणण्याचा अर्थ हा आहे की, चवदा शिवसूत्रांत असणाऱ्या हलन्त व्यजनांनी साधलेले आणि अष्टाध्यायींत उपयोगांत आणलेले एकेचाळीस प्रत्याहार आहेत त्यामुळें 'सुप्,' 'तिङ्,' इत्यादि आणि 'र' व तसेच 'चयोद्वितीया' या वार्तिकांत पठित असलेला 'चय्' प्रत्याहार यांनी जरी वर सांगितलेली एकेचाळीस ही संख्या वाढते तरी कांहीं दोष येत नाहीं (कारण 'सुप्, तिङ्' इत्यादि प्रत्याहार जरी अष्टाध्यायींत निर्दिष्ट आहेत तरी ते शिवसूत्रांत असलेल्या हलन्त इत्संज्ञक साधले नाहींत 'र' प्रत्याहार हा इत् हलन्त साधला नसून 'लण्' या शिवसूत्रांतील 'अ' या इत् अचानें साधला आहे, व 'चय' प्रत्याहार जरी शिवसूत्रस्थ इत् हलन्त साधला आहे तरी, त्याचा अष्टाध्यायींत कोठेंहि निर्देश केला नसून केवळ वार्तिकांत निर्देश केला आहे म्हणून प्राचीन वैयाकरणांनी सांगितलेली प्रत्याहारसंख्या बरोबर मानण्यास हरकत नाहीं प्रकाशकार असे म्हणतात की, 'समन्ताड्ड' व 'यमिर्जमन्तेष्वनिटेत इष्यते' या दोन स्थली वार्तिककारांनी 'अम्' प्रत्याहाराचा उपयोग केला आहे, पण त्यांनी विचार न करितां हें म्हटलें आहे, कारण 'समन्ताड्ड' हें (वार्तिक नसून) उणादि सूत्रम् १११–आहे, आणि 'यमिर्जमन्तेषु' हें देखील (वार्तिक नसून) व्याघ्रभूतिकृत कारिकेचा भाग आहे हा विषयासंबंधी एवढें पुरे

प्रत्याहाराची गणना करण्यात कांहीं विशेष लाभ नाहीं आणि म्हणूनच कौमुदीत तशी संख्या सांगण्याची उपेक्षा केली आहे, म्हणजे सांगितली नाहीं

शब्दरत्न– टकारस्यापीति । अत्र यद्वक्तव्यं तदन्यत्रोक्तम् । बाहुलकादिति । 'भावघञन्तादर्शआद्यच्' इत्यपि बाहुलकादविशिष्ट-मिति भावः । एकचत्वारिंशदिति ।

"एकस्मान् ङञणवटा, द्वाभ्यां ष स्त्रिभ्य एव कणमाः स्युः । ज्ञेयौ चयौ चतुर्भ्यो, रः पञ्चभ्यः, शलौ षड्भ्यः" इति तदुक्तेरिति भावः ॥

'र' प्रत्याहारासंबधाने जें सांगणे आवश्यक आहे ते इतर ग्रन्थात, म्हणजे शब्देन्दुशेखरात, सांगितले आहे (म्हणून त्याचा या ग्रन्थात पुन्हा उल्लेख केला नाही त्या ग्रन्थात असे म्हटले आहे की, 'लण्' या शिवसूत्रातील अकार इत्संज्ञक मानला व त्यायोगें 'र' प्रत्याहाराची सिद्धि करून स्वतंत्र 'र' प्रत्याहार मानला तर, 'अतो लरान्तस्य' सू २३३० असे सूत्र न करिता, पाणिनीने 'अतो रान्तस्य' असे सूत्र करावयास पाहिजे होते, तसेंच 'यण्' प्रत्याहार न करिता, 'य' असा लघु प्रत्याहार करावयास पाहिजे होता आणि त्यामुळें पाणिनीने 'इको यणचि' असे सूत्र न करिता 'इको योऽचि' असे सूत्र करावयास पाहिजे होते व तसे सूत्र केल्यानें अर्धमात्रालाघव झाले असते शब्देन्दुशेखरात 'परे त्वस्यानुनासिकत्वे अतो लेति सूत्रं पाणिनिर्लकारं नोच्चारयेत्, प्रत्याहारेणैव निर्वाहात् । किञ्चास्यें-त्संज्ञकत्वे यद्दपु यणदघटितसूत्रेष्वर्द्धमात्रालाघवानुरोधेन यप्रत्याहारेणैव व्यवहरेत् .... तस्मादस्यानुनासिकत्वमप्रामाणिकम्, उरण्रपर इत्यत्र लग्रहण कर्तव्यमेव, ऋलृवर्णयो सावर्ण्यवदित्याहु ।' नागेशानी असे म्हटले आहे सारांश शब्दरत्नकाराच्या मते 'लण्' या शिवसूत्रातील अकार अनुनासिक व इत्संज्ञक नाही व त्यामुळें 'र' प्रत्याहार सिद्ध होऊ शकत नाही ) 'बाहुलकादधिकरणे घञ्' असे जें मनोरमेंत

म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे कीं, 'प्रत्याहार' हा शब्द भावघयन्त मानून नंतर त्याहून 'अर्श आदिभ्योऽच्' सू. १९३३ या सूत्रानें 'अच्' प्रत्यय करून 'प्रत्याहार' या शब्दाची सिद्धि करणे किंवा बाहुलकत्वामुळें 'अधिकरणे घञ्' प्रत्यय करून त्या शब्दाची सिद्धि करणे या दोन प्रकारच्या व्युत्पत्तीत काहीं फरक नाहीं. (शकाकाराचें असें म्हणणे आहे की, जेथें गत्यन्तर नाहीं तेथेंच 'कृत्यल्युटो बहुलम्' सू. २८४१ या सूत्रानें 'अधिकरणे' या अर्थामध्यें घञ् प्रत्यय करता येतो; कारण 'सिद्धावस्थापन्नक्रिया' या अर्थामध्येंच 'भावे' सू ३१८४ या सूत्रानें घञ् प्रत्यय होणे मागितले असून, 'करणाधिकरणयोश्च' सू ३२९३ या सूत्रानें 'अधिकरणे' या अर्थामध्यें होणारा 'ल्युट्' प्रत्यय 'अधिकरणे घञ्' प्रत्ययाचा बाधक आहे म्हणून 'प्रत्याह्रियन्ते वर्णा यत्र स प्रत्याहार' अशी 'अधिकरणें घञ्' प्रत्यय करून 'प्रत्याहार' या शब्दाची व्युत्पत्ति करणे शास्त्रविरुद्ध व सदोष असल्यामुळें, 'प्रत्याहरणम् प्रत्याहार.' असा भावघयन्त शब्द 'भावे' या सूत्रान्वयें सिद्ध करून नंतर 'प्रत्याहार'=प्रत्याहरणम् अस्ति अस्मिन् स प्रत्याहार.' अशा रीतीनें त्या भावघयन्त 'प्रत्याहार' शब्दाहून 'अर्श आदिभ्योऽच्' सू १९३३ या सूत्रानें मत्वर्थीय 'अच्' प्रत्यय करून 'प्रत्याहार' या शब्दाची व्युत्पत्ति करावी व तसें केल्यानें तो शब्द 'अण्, अक्, अच्' इत्यादि प्रत्याहारांना लागू पडतो पण अशा रीतीनें शकाकारानें म्हटल्या-प्रमाणें 'प्रत्याहार' या शब्दाची सिद्धि करतेवेळीं त्या शब्दाचा 'अर्श आदि' या आकृतिगणात पाठ कल्पिला पाहिजे व 'प्रत्याहरणमिति प्रत्याहारः' आणि 'प्रत्याहार. अस्ति अस्मिन् स प्रत्याहार' अशा दोन वृत्ति कल्पिल्या पाहिजेत असें करण्यात गौरव असून, बाहुल-कत्वामुळें 'अधिकरणे घञ्' प्रत्यय करण्यांत लाघव आहे व तो प्रत्यय अगतिकगतिन्यायानें करतां येतो म्हणून 'अधिकरणे घञ्' प्रत्यय करून 'प्रत्याहार' या शब्दाची व्युत्पत्ति करणे हाच अधिक

श्रेयस्कर मार्ग आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे ) एकेचाळीस प्रत्याहार आहेत असे जें प्राचीन वैयाकरणानी म्हटले आहे त्याचे कारण हे की, त्यानी या विषयासबधी, 'एकस्मान् ङ्णवटा, द्वाभ्या ष, त्रिभ्य एव कणमा स्यु । ज्ञेयो चयो चतुर्भ्यो, र पञ्चभ्य, शलौ षड्भ्य ॥' अशी कारिका पठित केली आहे (या कारिकेचा अर्थ असा आहे की, अक्षरसमाम्नायातील एका वर्णानतर, म्हणजे 'ए, य, अ, छ, ञ' या वर्णांपुढें, 'ङ, ञ्, ण्, व्, ट्' हे इत्सज्ञक वर्ण अनुक्रमें लावले असता, त्या योगाने 'एङ, यञ्, अण्, छव्, अट' हे पाच प्रत्याहार सिद्ध होतात येथील णकार प्रथम शिवसूत्रात असलेला णकार समजावा अक्षरसमाम्नायातील दोन वर्णानतर, म्हणजे 'झ, भ' या दोन वर्णांपुढें, ष् हा इत्सज्ञक वर्ण जोडला असता, त्या योगाने 'झष्, भष्' हे दोन प्रत्याहार सिद्ध होतात अक्षरसमाम्नायातील तीन वर्णांपुढें, म्हणजे 'अ, इ, उ' या तीन वर्णांपुढें, क् हा इत्सज्ञक वर्ण जोडला असता, त्या योगाने 'अक्, इक्, उक्' हे तीन प्रत्याहार सिद्ध होतात तसेच 'लण्' या शिवसूत्रातील इत्सज्ञक णकार 'अ, इ, य' या अक्षरसमाम्नायातील तीन वर्णांपुढें जोडला असता, त्या योगाने 'अण्, इण् यण्' हे तीन प्रत्याहार सिद्ध होतात, आणि तसेच 'म' हा इत्सज्ञक वर्ण अक्षरसमाम्नायातील 'अ, य, ङ' या तीन वर्णांपुढें जोडला असता, त्या योगाने 'अम, यम्, ङम्' हे तीन प्रत्याहार सिद्ध होतात व अशा रीतीने 'त्रिभ्य एव कणमा स्यु' या वचनान्वयें एकदर नव प्रत्याहार सिद्ध होतात 'च्, य्' हे इत्सज्ञक वर्ण अक्षरसमाम्नायातील चार वर्णांनतर येतात, म्हणजे 'च्' हा इत्सज्ञक वर्ण 'अ, इ, ए, ऐ' याच्यानतर जोडला असता, त्या योगाने 'अच्, इच्, एच्, ऐच्' हे चार प्रत्याहार सिद्ध होतात, आणि तसेच 'य्' हा इत्सज्ञक वर्ण 'य, म, झ, ख' या चार अक्षरसमाम्नायातील वर्णांपुढें जोडला असता, त्या योगानें 'यय्, मय्, झय्, खय्,' हे चार प्रत्याहार सिद्ध

होतात व अशा रीतीनें 'झयो चयो चतुर्थ्यः' या वचनान्वयें एकंदर आठ प्रत्याहार सिद्ध होतात. 'र्' हा इत्संज्ञक वर्ण अक्षरसमाम्नायातील 'य, झ, ख, च, श' या पांच वर्णांपुढें जोडला असता त्या योगानें 'यर्, झर्, खर्, चर्, शर्' हे पांच प्रत्याहार सिद्ध होतात. 'म्, ल्' हे इत्संज्ञक वर्ण अक्षरसमाम्नायातील सहा वर्णांपुढें जोडल्यास, म्हणजे म् हा इत्संज्ञक वर्ण 'अ, ह, व, झ, ज, श' या सहा वर्णांपुढें जोडल्यास, त्यायोगानें 'अम्, हम्, वम्, झम्, जम्, शम्' हे सहा प्रत्याहार सिद्ध होतात, आणि त्याचप्रमाणें 'ल्' हा इत्संज्ञक वर्ण 'अ, ह, व, र, झ, श' या सहा वर्णांपुढें जोडल्यास, त्या योगानें 'अल्, हल्, वल्, रल्, झल्, शल्' हे सहा प्रत्याहार सिद्ध होतात आणि अशा रीतीनें 'शलो षड्भ्यः' या वचनान्वयें एकंदर बारा प्रत्याहार सिद्ध होतात सारांश ५+२+९+८+५+१२=४१ असे वरील कारिकेंत सांगितल्याप्रमाणें एकेचाळीस प्रत्याहार सिद्ध होतात व याच एकेचाळीस प्रत्याहारांचा अष्टाध्यायींत निर्देश केला आहे कारिकेंत ज्या इत्संज्ञक वर्णांचा निर्देश केला आहे ते 'हलन्त्यम्' या सूत्रान्वयें इत्संज्ञक होणारे शिवसूत्रांतील अन्त्य वर्ण होत )

मनोरमा– "ऊकालोच्" ॥ ह्रस्वदीर्घप्लुत इति समाहारद्वन्द्वः। सौत्रं पुंस्त्वम्। वां काल इवेति। फलितार्थकथनमिदम्। विग्रहस्तु 'ऊ. कालो यस्य' इति बोध्यः। ऊशब्देन स्वोच्चारणकालो लक्ष्यते। वा वे इति। "निपाता आद्युदात्ताः" इत्याकार उदात्तः। यणस्तु सिद्धसूत्रेण। अर्धाद्य इति। अकारोऽनुदात्तः।

'ऊकालोऽज्झ्रस्वदीर्घप्लुतः' सू. ४ या सूत्रांतील 'ह्रस्वदीर्घप्लुतः' हा समाहारद्वन्द्व आहे व त्याचा पुंल्लिङ्गांत केलेला प्रयोग सौत्रप्रयोग समजावा. ('ह्रस्वदीर्घप्लुत.' हा समाहारद्वन्द्व मानल्यास, 'स नपुंसकम्' सू. ८२१ या सूत्रानें तो नपुंसकलिङ्गी व्हावयास पाहिजे होता. परंतु 'छन्दोवत्सूत्राणि भवन्ति' व 'दृष्टानुविधिश्छन्दसि' या वचनान्वयें तो सौत्र पुंल्लिङ्गी प्रयोग शुद्ध मानला पाहिजे.)

*प्रकृत सूत्रावरील कौमुदीत ' ऊकालः ' या पदाचे ' वा काल इव कालो* मस्य स ' असे जें व्याख्यान केले आहे तें (' ऊकाल ' या शब्दाचा विग्रह नसून, विग्रह वाक्याचा जो अर्थ निष्पन्न होतो तो ) फलित अर्थ सांगणारे तें वाक्य आहे वास्तविक ' ऊकाल ' या पदाचा ' व कालो यस्य ' असा विग्रह समजावा. (या स्थली ' उ + ऊ + ऊ३ ' याचे ' अकः सवर्णे दीर्घः ' सू ८५ या सूत्रानें ' ऊ ' असें रूप झाले असून, ' व ' हें त्याच्या प्रथमेचे बहुवचन आहे हें लक्षात ठेवावे ' ऊकाल ' यातील) ' ऊ ' या शब्दाचा म्हणजे उ, ऊ, ऊ३ या तीन शब्दाचा, त्याचा उच्चार होण्यास लागणारा काल ' असा लक्षणेनें अर्थ होतो (साराश उ, ऊ, ऊ३ हे तीन शब्द वर्णांचे वाचक न समजता ऱ्हस्व, दीर्घ, प्लुत अचाच्या उच्चारणास जो काल लागतो त्या कालाचे लक्षणेनें वाचक आहेत असे समजावे ) ' उच्चैरुदात्तः ' सू ५ या सूत्रावरील कौमुदीत *' आ ये ' हे जें उदाहरण दिले आहे त्यातील ' आ ' हा निपात* ' निपाता आद्युदात्ता ' फिट् सू ८० या सूत्रान्वयें उदात्त आहे पण ' यद् ' हा शब्द ' फिषोऽन्त उदात्तः ' फिट् सू १ या सूत्रान्वयें अन्तोदात्त आहे (' आ ये ' या उदाहरणातील ' ये ' या पदाची स्वरप्रक्रिया शब्दरत्नाचे व्याख्यान करिताना दिली जाईल ) ' निचैरनुदात्तः ' सू ६ या सूत्रावरील कौमुदीत ' अर्वाङ् ' हे जें उदाहरण दिले आहे त्यातील अकार अनुदात्त आहे (याचे कारण शब्दरत्नात दिले जाईल )

**शब्दरत्न– सौत्रं पुस्त्वमिति ।** यद्यपि इतरेतरयोगेऽपि सौत्रमेकवचनं भवतु शक्यम्, तथापि ' लिङ्गमशिष्य लोकाश्रयत्वाल्लिङ्गस्य ' इति तत्र तत्र वार्तिकोक्तेर्लिङ्गस्य लौकिकत्वात्तद्व्यत्ययकल्पनमेवोचितम्, न तु शास्त्रीयवचनव्यत्ययकल्पनमिति भावः । **फलितार्थेति ।** ऊपदेन स्वोच्चारणकालसदृशलक्षणया, कालशब्देन समानाधिकरणबहुव्रीहौ तत् फलतीति भावः । ' वां कालः ' इति तु न विग्रहो व्यधिकरणत्वादत

आह–विग्रहस्त्विति । 'कालः' इति जात्याख्यायामेकवचनम् । स्वोच्चारणकाल इति । स्वोच्चारणकालसदृश इत्यर्थः । सादृश्यमूलके कालयोरभेदाध्यवसाये तु यथाश्रुतमेव साधु ।

फिट्सूत्रेणेति । अन्तोदात्त इत्यर्थः । जसः सुप्त्वादनुदात्तत्वम् । "एकादेश उदात्तेन" इत्येकार उदात्त इति भावः । अनुदात्त इति । फिट्स्वरेणान्तस्योदात्तत्वे शेषनिघातेनेति भावः । अभिमुखवाच्यव्युत्पन्नप्रातिपदिकमर्वाहिति ।

'ह्रस्वदीर्घप्लुत' हा इतरेतरयोगद्वन्द्व असून देखील या स्थली ('ह्रस्वदीर्घप्लुताः' असा जो बहुवचनाचा प्रयोग करावयास पाहिजे होता तसा प्रयोग न करिता) जो एकवचनाचा प्रयोग केला आहे तो सौत्रप्रयोग आहे असे देखील जरी दीक्षितांना म्हणता येऊ शकत होते तरी, त्यांनी तसे न म्हणता 'सौत्र पुंस्त्वम्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचे कारण हें आहे की, 'लिङ्गमशिष्यं लोकाश्रयत्वाल्लिङ्गस्य,' म्हणजे लिङ्ग हे लौकिक व्यवहारावर अवलंबून असल्यामुळें त्याचा उपदेश व्याकरणशास्त्रांत केला जात नाही, असे वार्तिककाराने ठिकठिकाणी म्हटले असल्यामुळें व अशा रीतीने लिङ्ग हें (शास्त्रीय नसून) लौकिक असल्यामुळें, लिङ्गामध्येंच फरक करणे उचित आहे व वचन हे शास्त्रीयोपदेशानुसार होत असल्यामुळें त्यात व्यत्यय–फरक–करणे उचित नाही (सारांश शास्त्रीय मर्यादेचें उल्लङ्घन केव्हाहि करता येऊं शकत नसून अवश्यप्रसंगी लौकिक मर्यादेचें उल्लङ्घन करता येऊं शकत असल्यामुळें, दीक्षितांनी 'सौत्रमेकवचनम्' असे न म्हणता 'सौत्र पुंस्त्वम्' असे म्हटले आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा भावार्थ आहे ) 'फलितार्थकथनमिदम्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'ऊ' या पदाचा त्याच्या उच्चारणाला लागणाऱ्या कालाएवढा काल असा सादृश्यमूलक लक्षणेनें अर्थ केल्यानें 'ऊ' या पदाचा 'काल' या शब्दाशी सामानाधिकरण्यानें बहुव्रीहि होऊन 'ऊ काल यस्य'

असा विग्रह होतो व 'वा काल इव कालो यस्य' हा त्या विग्रहवाक्या-तून तात्पर्यार्थ निघतो (सारांश 'ऊकालोऽज्' या सूत्रातील 'ऊकाल' या पदाचा वरप्रमाणे बहुव्रीहि समास केल्याने, असा अर्थ होतो की, 'उ, ऊ, ऊ३' याच्या उच्चारणाला जेवढा काल लागतो तेवढा काल ज्या अचाच्या उच्चारणाला लागतो तशा अचाना ऱ्हस्व, दीर्घ, व प्लुत अशी अनुक्रमें सज्ञा होते ) 'वा काल इव कालो यस्य' हा व्यधिकरणबहुव्रीहि असल्यामुळें, (तसा विग्रह करणे इष्ट नाही आणि म्हणून मनोरमेंत) 'विग्रहस्तु व कालो यस्य' असे म्हटले आहे. (अष्टाध्यायीत समानाधिकरणबहुव्रीहि सांगितला आहे, व्यधिकरण-बहुव्रीहि सांगितला नाही, तसा बहुव्रीहि जरी 'सप्तमीविशेषणे बहुव्रीहौ' सू ८९८ या ज्ञापकाच्या आधार करता येतो तरी, जेथें गत्यन्तर नाही तशाच ठिकाणी तसा बहुव्रीहि करणे उचित आहे हे या पक्तीवरून ध्वनित होते ) 'व कालो यस्य' या विग्रहवाक्यात 'काल' हा शब्द जातिवाचक मानून त्याचे एकवचन केले आहे (वास्तविक येथें 'काल' हा शब्द तीन प्रकारच्या, म्हणजे एकमात्र, द्विमात्र, व त्रिमात्र अच् याना उच्चारण्यास लागणाऱ्या तीन भिन्न प्रकारच्या कालाचा वाचक आहे आणि म्हणून 'बहुषु बहुवचनम्' सू १८७ या सूत्रान्वयें, काला' असे विग्रहवाक्यात बहुवचन करावयास पाहिजे होते परतु तीन्ही कालाच्या ठिकाणी 'कालत्व' ही एकच जाति असल्यामुळें व अशा रीतीनें 'काल' हा जातिवाचक शब्द असल्यामुळें, 'जात्याख्यायाम्' सू ८१७ या सूत्रान्वयें विकल्पें-करून 'काल' असा विग्रहवाक्यात एकवचनाचा प्रयोग केला आहे )
मनोरमेंतील 'स्वोच्चारणकाल' या शब्दाचा 'स्वोच्चारणकालसदृश काल' असा अर्थ आहे सादृश्यामुळें दोन भिन्न कालाचे ठिकाणी अभेदाचा आरोप करिता येतो असे मानल्याने मनोरमेंत जें म्हटले आहे तेच साधु–योग्य–ठरते ('गौर्वाहीक' या स्थली जरी वाहीक व बैल हे भिन्न आहेत तरी, गुणसादृश्यामुळें जसा 'गोसदृश वाहीक'

असा प्रयोग न करिता, अभेदारोपाने 'गीर्वाहीक' असा देखील प्रयोग करता येतो त्याचप्रमाणे जरी उकार उच्चारण्याचा काल व इतर अच् उच्चारण्याचा काल हे दोन भिन्न काल आहेत तरी, त्याचे ठिकाणी कालसादृश्यामुळें अभेद मानल्यास, 'स्वोच्चारणकालसदृश काल' अशी लक्षणा करण्याची गरज राहत नाही व 'स्वोच्चारण-काल' असे जें मनोरमेंत म्हटलें आहे ते देखील अभेदारोप मानल्याने साधु ठरते ) 'यच्छब्दस्तु फिट्सूत्रेण' असे जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचा अर्थ हा आहे की, 'यद्' हा शब्द ('फिषोऽन्त उदात्त' फिट् सू १ या सूत्रान्वयें) अन्तोदात्त आहे ('यद्+जस्' या स्थली 'त्यदादीनाम' सू २६५ या सूत्रानें 'यद्' यातील दकाराचे जागी अकार होऊन, 'यद=य+अ' अशी स्थिति झाली असता, 'अतो गुणे' सू १९१ या सूत्राने गुणरूप एकादेश झाल्यावर 'य' असे जे प्रातिपदिकाचे रूप होतें ते 'फिषोऽन्त उदात्त' या फिट्सूत्राने अन्तोदात्त होते, म्हणजे 'य' यातील अन्त्य अकार उदात्त होतो व 'जस शी' सू २१४ या सूत्रानें जस्प्रत्ययाचे जागी 'शी=ई' असा आदेश होतो आणि 'अनुदात्तौ सुप्पितौ' सू ३७०९ या सूत्रान्वयें) 'जस्' हा सुप्प्रत्यय अनुदात्त असल्यामुळें (त्याचे जागी होणारा 'शी=ई' हा आदेश स्थानिवद्भावाने अनुदात्त होतो आणि 'य+ई=ये' या स्थली 'आद्गुण' सू. ६९ या सूत्राने झालेला गुणरूप एकारादेश) 'एकादेश उदात्तेनोदात्त' सू. ३६५८ या सूत्रानें उदात्त होतो असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे ('यद्+जस्=य+ई' या स्थली 'य' यातील अकार उदात्त असून 'ई' हा अनुदात्त आहे व या दोहोंचे जागी होणारा 'ए' हा एकादेश उदात्त व अनुदात्त या दोन स्वराचे जागी होत असल्यामुळें, वर सांगितलेल्या सूत्रान्वयें तो उदात्त होतो ) 'अर्वाङ इति । अकारोऽनुदात्त' असे जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचे कारण हें की, (वेदभाष्यात सांगितल्याप्रमाणें) 'अर्वाङ' हें 'अभिमुख' या अर्थाचे वाचक अव्युत्पन्न, म्हणजे धातूहून

प्रत्यय होऊन सिद्ध झालेले नसून स्वत सिद्ध, प्रातिपदिक असल्यामुळें, फिट्स्वराने तें अन्तोदात्त होऊन, शेषनिघाताने त्यातील अकार अनुदात्त होतो ('अर्वाङ्' हे 'अर्वन्तमञ्चति' अशा रीतीनें होणारे व्युत्पन्न प्रातिपदिक न मानता, पाणिनीला अव्युत्पत्तिपक्ष अभिमत असल्याकारणाने, ते अव्युत्पन्न प्रातिपदिक मानले असल्यामुळें, 'फिषोऽन्त उदात्त' या फिट्सूत्राने ते अन्तोदात्त होते, म्हणजे त्यातील अन्त्य अच् 'आ' हा उदात्त होतो व 'अनुदात्त पदमेकवर्जम्' सू. ३६५० या सूत्रान्वयें 'अर्वाङ्' यातील अवशिष्ट 'अ' हा अच् अनुदात्त होतो )

मनोरमा– "तस्यादित" अतन्त्रमिति। "उपेयिवान्" इत्यत्रो-पसर्ग इवाविवक्षितमित्यर्थ। ननु तत्र "ईयिवासमतिस्त्रिध" इत्यादि-प्रयोगदर्शनादविवक्षाऽस्तु, इह त्वविवक्षायां प्रमाण किम्?, इति चेल्लक्ष्यदर्शन प्रातिशाख्यादिक चेति गृहाण। तथा हि–'येऽरा' इत्यत्रैकार, 'तनूनपात्' 'शचीपतिम्' इत्यत्र पदपाठे ऊदीतौ चार्धो-दात्तौ इति सकलवह्वृचप्रसिद्धम्। तनूनपाच्छचीपतिशब्दयो "उभे वनस्पत्यादिषु युगपत्" इति पूर्वोत्तरपदयोराद्युदात्तत्वे कृते "अनुदात्त पदमेकवर्जम्" इति शेषनिघात। पूर्वपदभूतयोस्तनूशची एतयोरन्त्यस्य पाक्षिक स्वरितत्व प्रातिशाख्ये उक्तम्।

"जात्यवद्वा तथा वाऽन्तौ तनूशचीति पूर्वयो" इति।

तथा स्वरितार्द्धस्योदात्तत्वे प्रातिशाख्यमपि—

"एकाक्षरसमावेशे पूर्वयो स्वरित स्वर।
तस्योदात्ततरोदात्तादर्धमात्राऽर्द्धमेव वा॥
अनुदात्त पर शेष स उदात्तश्रुतिर्न चेत्।
उदात्त वोच्यते किंचित्स्वरित वाऽक्षर परम्॥" इति।

अस्यार्थ –पूर्वयो = उदात्तत्वानुदात्तत्वयो। एकत्र समावेशे सति स्वरितो बोध्य। तस्य = स्वरितस्य, स्वतन्त्रोदात्तापेक्षयोदात्ततराऽर्द्ध-मात्रा बोध्येति। "वव वोऽऽवा" इत्यादि ह्रस्वाभिप्रायम्। "अर्धं वा"

इति दीर्घाभिप्रायम्। अनेनैव ह्रस्वस्यापि संप्रहाद्धभावकत्वादिदमेवा-दर्तव्यमिति सूचयितुमेवकारः। "अनुदात्त" इत्यादिपरिशेषसिद्धार्य-कथनम्। सः=शेषः। उदात्तश्रुति स्यात्। किमविशेषेण? नेत्याह—न चेदित्यादि। उदात्तस्वरितपरं विहायेत्यर्थः। शाकल्योऽप्याह—

"अप्राकृतस्तु यः स्वारः स्वरितोदात्तपूर्वगः।
उदादायार्द्धमस्याय शिष्टं निघ्नन्ति कम्पितम्"॥ इति।

उदादाय=उदात्तं कृत्वा। 'अर्द्धह्रस्वशब्देनार्द्धमात्रा लक्ष्यते' इति हरदत्तादिग्रन्थास्तु मतान्तरपरतया कथञ्चिद्धेयाः। क्वेति। "किमोऽत्" "तित् स्वरितम्"। व इति। अनुदात्तं सर्वमपादादौ" इत्यधिकारा-दनुदात्तम्। अश्वा इति। अशो. क्वनि नित्स्वरेणाद्युदात्तम्। संहितायां तु "एकादेश उदात्तेनोदात्तः" इत्योकार उदात्त। ये अरा इति। इयमपि पित्सूत्रेणान्तोदात्तम्। एकादेशस्तु पक्षे स्वरित, "स्वरितो वाऽनुदात्ते पदादौ" इत्युक्ते.।

(ज्या स्वराचे ठिकाणी उदात्त व अनुदात्त याचे मिश्रण होते तशा स्वराला 'समाहार स्वरित' सू ७ या सूत्रान्वयें स्वरित अशी संज्ञा होते अशा मिश्रणाने तयार झालेल्या स्वरित स्वराचा कोणता व किती भाग उदात्त समजावा व कोणता व किती भाग अनुदात्त समजावा याकरिता 'तस्यादित उदात्तमर्धह्रस्वम्' सू ८ हे सूत्र पठित केले आहे या सूत्रातील 'अर्धह्रस्वम्' या पदाचा 'अर्धह्रस्वस्य' असा विग्रह होत असून, 'अर्धं नपुंसकम्' सू ७१२ या सूत्राने 'अर्ध' या शब्दाचा षष्ठीसमासात पूर्व निपात होतो व सूत्रार्थ असा होतो की, ह्रस्व अच् स्वरित असल्यास त्याचा प्रथमार्ध उदात्त होतो पण प्रकृत सूत्राचा असा अर्थ केला तर, दीर्घ अच् स्वरित असल्यास त्याचा प्रथमार्ध उदात्त न होण्याची आपत्ति येते ती टाळावी म्हणून दीक्षितानी प्रकृत सूत्रावरील कौमुदीत 'ह्रस्वग्रहणमतन्त्रम्' म्हणजे प्रकृत सूत्रात 'ह्रस्व' हा जो शब्द घातला आहे तो अविवक्षित आहे असे म्हटले आहे व त्याचे कारण ते पुढील पंक्तीत देतात ) ज्याप्रमाणे

'उपेयिवान्' या स्थली 'उप' हा उपसर्ग अविवक्षित आहे त्याच-प्रमाणे 'अर्धन्ह्रस्वम्' या पदातील 'न्हस्वम्' हा शब्द अतन्त्र-अविवक्षित–आहे ('उपेयिवाननाश्वाननूचानश्च' सू ३०९८ या सूत्रात जरी 'उपेयिवान्' असा शब्द पठित आहे तरी, 'उप' हा उपसर्ग पूर्वी नसून देखील जरी क्वसुप्रत्ययान्त 'ईयिवान्, समीयिवान्' इत्यादि रूपें होतात व अशा रीतीने 'उपेयिवान्' यातील 'उप' हा उपसर्ग अविवक्षित ठरतो त्याचप्रमाणे 'अर्धन्ह्रस्वम्' यात 'न्हस्व' हा शब्द अविवक्षित आहे, म्हणजे या सूत्रात तो शब्द नाही असे समजून 'तस्यादित उदात्तमर्धम्' असेच सूत्र मानावे, व असे सूत्र मानल्याने कोणत्याहि स्वरिताचा, मग तो न्हस्व असो किंवा दीर्घ असो, प्रथमार्ध उदात्त होऊ शकतो व अशा रीतीने वर दर्शविलेली आपत्ति टाळता येते असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे)

'ईयिवांससमतिस्रिध' इत्यादि प्रयोग आढळत असल्यामुळे जरी 'उपेयिवान्' यातील 'उप' हा उपसर्ग अविवक्षित आहे असे मानता येऊ शकते तरी 'अर्धन्ह्रस्वम्' यातील 'न्हस्व' हा शब्द अविवक्षित आहे असे मानण्यास कोणते प्रमाण आहे असा कोणी प्रश्न केल्यास, त्याला उत्तर हे आहे की, 'न्हस्व' हा शब्द अविवक्षित मानण्यास वैदिक उदाहरणे व तसेच प्रातिशाख्यादि ग्रन्थ प्रमाण आहेत. उदाहरणार्थ 'येऽरा' या वैदिक उदाहरणात 'ये' या स्वरित स्वरातील एकार दीर्घ असून देखील त्याचा प्रथमार्ध उदात्त उच्चारला जातो आणि तसेच 'तनूनपात्' व 'शचीपतिम्' याचा पदपाठ करतेवेळी 'तनू' यातील अन्त्य ऊकार व 'शची' यातील अन्त्य ईकार या दोन्ही दीर्घ स्वरिताचा प्रथमार्ध उदात्त उच्चारला जातो हे सर्व बहवृच्-ऋग्वेदी-ब्राह्मणाना पूर्णपणे विदित आहे 'तनूनपात्' व 'शचीपति' हे दोन्ही सामासिक शब्द वनस्पत्यादिगणात पठित असल्यामुळे, 'उभे वनस्पत्यादिषु युगपत्' सू ३८७८ या सूत्राने त्या शब्दातील पूर्व पद व उत्तर पद ही दोन्ही आद्युदात्त होतात व त्या दोन्ही पदातील अवशिष्ट

स्वर जरी 'अनुदात्तं पदमेकवर्जम्' सू ३६५० या सूत्राने अनुदात्त होतात तरी 'तनू' व 'शची' या दोन्ही पूर्व पदातील अन्त्य स्वर विकल्पेकरून स्वरित होतो असे शौनकीय प्रातिशाख्यात सांगितले आहे त्या ग्रन्थात 'जात्यवद्वा नया वाऽन्यौ तनूशचीति पूर्वयोः.' म्हणजे 'तनू' व 'शची' या पूर्वपदातील अन्त्य स्वर विकल्पेकरून ('उदात्तस्वरितपरस्वाभाववान्' असा) जात्य स्वरितासारखा होतो, असे म्हटले आहे (शौनकीय प्रातिशाख्यातील तृतीय पटलात पठित असलेल्या सत्राव्या कारिकेचा 'जात्यवद्वा...पूर्वयोः' हा उत्तरार्ध असून, या कारिकेचा पूर्वार्ध शब्दरत्नात दिला आहे व शब्दरत्नाचे विवरण करिताना त्या पूर्वार्धाचा अर्थ सांगण्यात येईल. ह्रस्व स्वराची एक मात्रा असून, दीर्घ स्वर द्विमात्रिक असतो. दीर्घ अच् स्वरित असल्यास, त्याचा प्रथमार्ध उदात्त होतो असे जे वर म्हटले आहे त्याचा अर्थ हा की, त्या दीर्घ स्वराची पहिली एक मात्रा उदात्त-स्वराने पठित होत असून अवशिष्ट दुसरी मात्रा अनुदात्तस्वराने पठित होते. दीक्षितांनी वर जी वैदिक उदाहरणे दिली आहेत ती ऋग्वेदा-तून दिली आहेत व ते असे म्हणतात की, दीर्घ स्वरिताच्या दोन मात्रांपैकी पहिली मात्रा उदात्तस्वराने पठित केली जाते हे ऋग्वेदसंहितेचे व त्या संहितेच्या पदपाठाचे अध्ययन करणाऱ्या ऋक्शाखीय ब्राह्मणांना पूर्णपणे विदित आहे आणि यावरून हे स्पष्ट होते की, प्रकृत सूत्रातील 'ह्रस्व' या शब्दाचे ग्रहण अविवक्षित आहे तसे न मानल्यास, ऋक्शाखीय ब्राह्मण पुरातन कालापासून दीर्घस्वरिताचा उच्चार करतेवेळी त्याची प्रथम मात्रा जी उदात्तस्वराने उच्चारतात ते त्यांचे करणे अशुद्ध ठरण्याची आपत्ति येते म्हणून हे मानले आवश्यक आहे की, स्वरित स्वर ह्रस्व असो किंवा दीर्घ असो, त्याचा प्रथमार्ध उदात्तस्वराने पठित होत असतो. स्वरित स्वर ह्रस्व असल्यास, त्याची पहिली अर्धी मात्रा व दीर्घ असल्यास, त्याची पहिली एक मात्रा उदात्त होते

असाच प्रकृत सूत्राचा अर्थ समजावा असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे आता 'येऽरा' असे जे मनोरमेंत वैदिक उदाहरण दिले आहे त्यातील 'ये' या पदातील अन्त्य एकार उदात्त आहे व तो उदात्त कसा होतो याची प्रक्रिया पूर्वी दिलीच आहे. 'अरा' यातील 'अ' हा अनुदात्त आहे, कारण 'अर' हा शब्द 'फिषोऽन्त उदात्त' या फिट् सूत्रान्वयें अन्तोदात्त असल्यामुळें, 'अनुदात्तं पदमेकवर्जम्' सू ३६५० या सूत्राने त्यातील अवशिष्ट आद्य अकार अनुदात्त होतो आणि 'एङः पदान्तादति' सू ८६ या सूत्रानें उदात्त एकार व अनुदात्त अकार या दोहाचे जागी झालेला पूर्वरूप एकादेश 'ए' हा 'स्वरितो वानुदात्ते पदादौ' सू ३६५९ या सूत्राने स्वरित होतो या सूत्रावरील कौमुदीत असे म्हटले आहे की, या सूत्राने जी विभाषा सांगितली आहे ती व्यवस्थितविभाषा आहे व 'एङः पदान्तादति' या सूत्राने होणारा पूर्वरूप एकादेश विकल्पेंकरून स्वरित न होता नेहमीच स्वरित होत असतो दीक्षित म्हणतात—'किं च एङः पदान्तात् इति पूर्वरूपे स्वरित एव' 'येऽरा' यातील 'ए' हा दीर्घ स्वरित उच्चारतेवेळी ऋक्शाखीय वैदिक ब्राम्हण त्या 'ए' ची पहिली मात्रा उदात्तरूपाने व द्वितीय मात्रा अनुदात्तरूपाने उच्चारीत असतात हा एकार दीर्घस्वरित असून देखील ज्याअर्थी त्याचा प्रथमार्ध उदात्तरूपाने उच्चारला जातो त्याअर्थी हें स्पष्ट होतें की, केवळ ऱ्हस्व स्वरिताचा प्रथमार्ध उदात्त उच्चारला जात नसून, दीर्घस्वरिताचा देखील प्रथमार्ध उदात्त उच्चारला जात असतो. वनस्पत्यादिगणात पठित असलेल्या 'तनूनपात्' यातील 'तनू' हें पूर्व पद निपातनाने आद्युदात्त आहे म्हणून 'तनू' यातील अन्त्य ऊकार 'अनुदात्तं पदमेकवर्जम्' या सूत्रान्वयें अनुदात्त होतो व तो अनुदात्त 'ऊ' 'त' यातील 'अ' या उदात्त स्वरापुढें असल्यामुळें, 'उदात्तादनुदात्तस्य स्वरितः' सू ३६६० या सूत्रान्वयें स्वरित होतो येथे हें लक्षात ठेवावे की, जरी 'अ' व 'ऊ' या दोन स्वरामध्यें

नकाराचे व्यवधान आहे तरी, 'स्वरविधौ व्यञ्जनमविद्यमानवत्' –परि ८०–व 'हल्स्वरप्राप्तौ व्यञ्जनमविद्यमानवत्'–परि ८१– या परिभाषा असल्यामुळें, नकार या व्यञ्जनाचे व्यवधान नाही असे मानून स्वरकार्य केले जातें 'शचीपतिम्' या पदातील 'शची' हें पूर्व पद 'शाङ्गरवाद्यञोङीन्' सू ५२७ या सूत्रान्वयें 'ङीन्' हा नित्प्रत्यय होऊन सिद्ध झाले असल्यामुळें, 'ञ्नित्यादिर्नित्यम्' सू. ३६८६ या सूत्रानें आद्युदात्त होते व त्यामुळें 'शची' यातील अन्त्य ईकार 'अनुदात्तं पदमेकवर्जम्' या सूत्रान्वयें अनुदात्त होतो आणि तो अनुदात्त ईकार 'श' यातील 'अ' या उदात्त स्वरापुढें, असल्यामुळें, उदात्तादनुदात्तस्य स्वरित' या सूत्रान्वयें तो ईकार स्वरित होतो 'तनू' यातील अन्त्य ऊकार व 'शची' यातील अन्त्य ईकार हे दीर्घस्वरित असून देखील, पदपाठात त्याची पहिली मात्रा उदात्त उच्चारली जात असल्यामुळें, 'ह्रस्वग्रहणमतन्त्रम्' असे जें दीक्षितानी म्हटले आहे ते योग्य ठरते येथपर्यंत दीक्षितानी आपल्या मताचे समर्थन करण्याकरिता वैदिक उदाहरणाचे प्रमाण सांगितले असून, आता पुढील पङ्क्तीत ते प्रातिशाख्याचे प्रमाण देतात) त्याचप्रमाणे स्वरिताचा प्रथमार्ध उदात्त असतो याविषयी, 'एका-क्षरसमावेशे पूर्वयो स्वरित स्वर । तस्योदात्ततरोदात्तादर्धमात्रार्धमेव वा ॥ अनुदात्त पर शेष स उदात्तश्रुतिर्न चेत् । उदात्त वोच्यते किञ्चित्स्वरित वाक्षर परम् ॥' या शौनकीय प्रातिशाख्यातील कारिका प्रमाण आहेत प्रथम कारिकेतील 'पूर्वयो' या पदाचा 'उदात्तानुदात्तत्वया' असा अर्थ आहे व हे दोन उदात्तत्व व अनुदात्तत्व धर्म एखाद्या अचाच्या ठिकाणी एकत्र झाल्यास, तो अच् स्वरित समजावा प्रथम कारिकेतील 'तस्य' या पदाचा 'स्वरितस्य' असा अर्थ आहे व जो मूळचा उदात्त स्वर असतो त्याच्यापेक्षा या स्वरिताची प्रथम अर्धमात्रा उदात्ततर असते हे जाणाव 'क्वऽवोऽश्वा' इत्यादि उदाहरणे ह्रस्वस्वरिताची आहेत वरील प्रथम कारिकेत

'अर्धं वा' असे जे म्हटले आहे ते दीर्घस्वरिताला उद्देशून म्हटले आहे 'अर्धं वा' हें व्यापक असून त्यानेच ऱ्हस्वस्वरिताचा देखील संग्रह–समावेश–होत असल्यामुळें, म्हणजे तो पाठ स्वीकारल्याने, ऱ्हस्वस्वरिताला व दीर्घस्वरिताला सारख्याच रीतीने लागू पडणाऱ्या त्या व्यापक पाठानें ऱ्हस्वस्वरिताच्या व तसेच दीर्घस्वरिताच्या प्रथमार्धाला उदात्त करता येत असल्यामुळें, ('अर्धमात्रा' असे म्हणण्यापेक्षा) 'अर्धं वा' असेच म्हणणे व हाच पाठ स्वीकारणे आदरणीय आहे हे सुचविण्याकरिता, 'अर्धमेव वा' या स्थली 'एव' हे पद घातले आहे (या प्रथम कारिकेतील 'वा' हे अन्त्य पद विभाषेचे वाचक नसून केवळ पादपूरणार्थ घातले आहे हे शब्दरत्नात सांगण्यात येईल सारांश या प्रथम कारिकेतून 'अर्धमात्रा' हा शब्द व तसेच 'वा' हें पादपूरणार्थक पद गाळल्यास, 'पूर्वयो उदात्तत्वानुदात्तत्वयो. एकाक्षर-समावेशे सति, स्वरित स्वरो निष्पद्यते, तस्य स्वरितस्य अर्धमुदात्ततरम्' अशा रीतीची ऱ्हस्वस्वरिताला व दीर्घस्वरिताला सारखीच लागू पडणारी ती कारिका व्यापक होत असून, तिचा अर्थ असा होतो की, ज्या अचामध्यें उदात्तत्व व अनुदात्तत्व या दोन्ही धर्मांचे मिश्रण होते त्या अचाला स्वरित असे म्हणतात व त्या स्वरित अचाचा, मग तो ऱ्हस्व असो किंवा दीर्घ असो, प्रथमार्ध उदात्त होत असून, तो मूळच्या उदात्तापेक्षा अधिक उदात्त रूपाने उच्चारला जातो असा त्या कारिकेचा अर्थ होत असल्यामुळें, 'ऱ्हस्वग्रहणमतन्त्रम्' असे जें दीक्षितानी प्रकृत सूत्रावरील कौमुदीत म्हटले आहे त्याला ही कारिका प्रमाण आहे पशुपतिनाथ मिश्रानी उद्धृत भाष्यानुसार या कारिकेचे 'एकाक्षरसमावेशे सति पूर्वयोरुदात्तानुदात्तयोरिति यावत् स्वरित स्वर निष्पद्यते। .. ..तस्य स्वरितस्य आदौ अर्धमात्रा एकमात्रिकऱ्हस्वस्वरस्थले इति शेष, अर्धमेव वा द्विमात्रस्वरस्य अर्धम् एका वा मात्रा इत्यर्थ, उदात्तादुदात्ततरा उदात्तादपि उदात्ततरा इत्यर्थ' असे व्याख्यान केले आहे, व हें भाष्यानुसार व्याख्यान दीक्षिताच्या

मताशी ततोतंत जुळते आता दीक्षित द्वितीय कारिकेचा अर्थ सांगतात ) या द्वितीय कारिकेंत 'अनुदात्त पर शेष' असे जें म्हटले आहे तें (स्वरित स्वराचा प्रथमार्ध उदात्त होत असल्यामुळें, त्याचा) अवशिष्ट द्वितीयार्ध अनुदात्त होतो या फलितार्थाचें कथन करणारें आहे (वास्तविक 'अनुदात्त पर शेष' असे म्हटले नसतें तरी चालले असतें, कारण स्वरित स्वर हा उदात्त व अनुदात्त या दोन स्वरांच्या समिश्रणाने होणारा स्वर असल्यामुळें, त्याचा प्रथमार्ध उदात्त असतो असे सांगितल्यानेंच हे आपोआप सिद्ध होतें की, त्याचा अवशिष्ट द्वितीयार्ध अनुदात्त असतो ) या द्वितीय कारिकेंतील 'स.' या पदाचा 'शेष' असा अर्थ आहे व या अवशिष्ट (अनुदात्त) द्वितीयार्धाचें उदात्तरूपानें श्रवण होतें पण तसें त्याचें उदात्तरूपानें नेहमी श्रवण होतें की काय अशी पृच्छा केल्यास, कारिकाकार म्हणतात की, तसें श्रवण नेहमी होत नसून, उदात्त किंवा स्वरित स्वर पुढें नसल्यासच, त्या अवशिष्ट अनुदात्त द्वितीयार्धाचें उदात्तरूपानें श्रवण होतें वाक्यानें देखील 'अप्राकृतस्तु म स्वार स्वरितो-दात्तपूर्वग । उदादायार्द्धमस्याथ शिष्ट निम्नन्ति कम्पितम ॥' असे म्हटले आहे या कारिकेंतील 'उदादाय' या पदाचा 'उदात्त कृत्वा' असा अर्थ आहे (व 'अप्राकृत स्वार' या पदाचा 'स्वरित स्वर' असा अर्थ आहे हे शब्दरत्नात सांगितलें आहे आणि म्हणून या कारिकेचा अर्थ असा होतो की, स्वरित स्वर उदात्त किंवा स्वरित स्वरापूर्वी असल्यास, मग तो ऱ्हस्व असो किंवा दीर्घ असो, त्याच्या प्रथमार्धाला उदात्त करून व अवशिष्ट द्वितीयार्धाला अनुदात्त करून त्या द्वितीय अनुदात्त अर्धाला कम्पितरूपानें उच्चारतात यावरून देखील 'ऱ्हस्वग्रहणमतन्त्रम' हे दीक्षिताचें म्हणणें सिद्ध होत व याखेरीज हे देखील सिद्ध होतें की, स्वरित स्वरापुढें उदात्त किंवा स्वरित स्वर नसल्यासच त्याचा द्वितीयार्ध उदात्तश्रुतिक होतो, पण त्या स्वरित स्वरापुढें उदात्त किंवा स्वरित स्वर नसेल तर तो

अनुदात्तरूपाने कम्पितस्वरयुक्त उच्चारला जातो ) प्रकृत सूत्रातील 'अर्धन्हस्वम्' या पदाचा 'अर्धमात्रा' असा लक्षणेने अर्थ होतो, म्हणजे असा त्या पदाचा रूढ अर्थ आहे, असे जें हरदत्तादिकाच्या ग्रन्थात म्हटले आहे ते इतर शाखातील प्रातिशाख्याला अनुसरून म्हटले आहे असे समजावे व अशा रीतीने त्या ग्रन्थात कशी तरी लक्षणा करून केलेल्या त्या अर्थाची, उपपत्ति लावावी (हरदत्तादिकाचे असे मत आहे की, स्वरित स्वर ऱ्हस्व असो किंवा दीर्घ असो, त्याची प्रथम अर्धमात्राच उदात्त पठित होत असते त्याच्या मताप्रमाणे द्विमात्रिक दीर्घ स्वरिताची पहिली अर्धी मात्राच उदात्त पठित होत असून अवशिष्ट दीड मात्रा अनुदात्त होत असते पण दीक्षिताचे असे म्हणणे आहे की, जसा ऱ्हस्व स्वरिताचा प्रथमार्ध उदात्त असतो तसाच दीर्घ स्वरिताचा देखील प्रथमार्ध उदात्त असतो, म्हणजे त्याची पहिली एक मात्रा उदात्त असते व अवशिष्ट द्वितीय मात्रा अनुदात्त असते तैत्तरीय प्रातिशाख्यात 'आदिरस्योदात्तसम, शेषोऽनुदात्तसम इत्याचार्या' असे म्हटले आहे व या प्रातिशाख्यातील पक्तीचे व्याख्यान करिताना भैरवीकारानी 'तत्र पूर्ववाक्याद्यावदर्धं ऱ्हस्वस्येति सम्बध्यते। एवञ्चास्य स्वरितस्यादिर्यावर्द्धस्वस्यार्द्धं ऱ्हस्वार्द्धं कालस्य उदात्तसमो भवति, शेपस्त्वनुदात्तसम इत्याचार्या' असे म्हटले आहे या व्याख्यानावरून हे स्पष्ट होते की, स्वरित स्वर ऱ्हस्व असो किंवा दीर्घ असो त्याची पहिली अर्धमात्राच उदात्त होत असून अवशिष्ट मात्रा अनुदात्त होते सारांश हरदत्तादिकाच्या म्हणण्याला वरील तैत्तरीय प्रातिशाख्य प्रमाण आहे परतु दीक्षित शौनकीय ऋक् प्रातिशाख्याचे अनुयायी असल्यामुळे व पूर्वी सागितल्याप्रमाणे त्या प्रातिशाख्यान्वयें स्वरित स्वर ऱ्हस्व किंवा दीर्घ असला तरी त्याचा प्रथमार्ध उदात्त व अवशिष्ट द्वितीयार्ध अनुदात्त होत असल्यामुळें, दीक्षित हरदत्तादिकाच्या मताचा स्वीकार करण्यास तयार नाहीत ) 'क्व वोऽश्वा' या उदाहरणात 'क्व' हा

शब्द 'किमोत्' सू १९५९ या सूत्रान्वयें 'अत्' प्रत्ययान्त असल्यामुळें, 'तित्स्वरितम्' सू ३७२९ या सूत्रानें त्यातील अन्त्य 'अ' स्वरित होतो व त्या उदाहरणातील 'व' हा शब्द, म्हणजे 'बहुवचनस्य वस्नसौ' सू. ४०५ या सूत्रानें 'युष्मावम्' चे जागी झालेला हा आदेश, 'अनुदात्त सर्वमपादादौ' सू. ४०३ या अधिकार सूत्रान्वयें अनुदात्त असून, 'अश्व' हा शब्द ('अशूप्रुषि' उणादि. सू. १४९ या सूत्रानें) 'अश्' धातूस 'क्वन्' प्रत्यय होऊन झाला असल्यामुळें व अशा रीतीनें तो शब्द नित्प्रत्ययान्त असल्यामुळें ('ञ्नित्यादिर्नित्यम्' सू ३६८६ या सूत्रानें) आद्युदात्त आहे. 'वः अश्वा.' या दोन पदाचा सन्धि केला असता, 'एकादेश उदात्तेनोदात्त.' सू. ३६५८ या सूत्रानें 'ओ' हा एकादेश उदात्त होतो. ('किमोत्' या सूत्रानें सप्तम्यन्त 'किम्' शब्दाहून 'अत्' प्रत्यय होणे सांगितले आहे व तसा 'किम्' शब्दापुढें 'अत्' प्रत्यय आला असता, 'किम्' चे जागी 'क्वाति' सू १९६० या सूत्रानें 'क्व' असा आदेश होणे सांगितले आहे म्हणून 'किम्+अत्=क्व+अत्' अशी स्थिति झाली असता, 'अतोगुणे' सू १९१ या सूत्रानें पर रूप एकादेश होऊन 'क्व' असें रूप सिद्ध होते व हा शब्द नित्प्रत्ययान्त असल्यामुळें, 'तित्स्वरितम्' या सूत्रान्वयें त्यातील अन्त्य अकार स्वरित होतो 'व' हा शब्द अनुदात्त असून, 'अश्व' हा शब्द आद्युदात्त आहे हें वर सांगितलेच आहे 'वस्+अश्वा' या दोन पदाचा सन्धि केला असता, 'ससजुषो रु' सू. १६२ या सूत्राने 'वस्' या पदातील अन्त्य सकाराचे जागी 'रु' असा आदेश होऊन व 'अतो रो' सू १६३ या सूत्रानें त्या 'रु' चे जागी उकारादेश होऊन, 'आद्गुण' सू ६९ या सूत्रानें 'अ' व 'उ' या दोन अनुदात्त अचाचे जागी होणारा 'ओ' हा गुणरूप एकादेश अनुदात्त होतो व 'वो अश्वा' अशी स्थिति झाली असता, 'एङ पदान्तादति' सू ८६ या सूत्रानें 'वो' यातील अनुदात्त 'ओ' आणि 'अश्वा.' यातील उदात्त 'अ' या

दोहोंचे जागी होणारा 'ओ' हा पूर्वरूप एकादेश 'एकादेश उदात्तेनोदात्त' या सूत्राने उदात्त होतो म्हणजे 'क्व' यातील 'अ' हा न्हस्वस्वरित असा आहे की, त्याच्यापुढें 'वो' यातील 'ओ' हा उदात्त स्वर आला आहे त्यामुळें त्याची प्रथम अर्धमात्रा उदात्तरूपानें उच्चारली जात असून, द्वितीय अर्धमात्रा 'शिष्ट निघ्नन्ति कम्पितम' या वचनान्वयें कम्पित अनुदात्तरूपानें स्पष्ट ऐकू येते जर 'क्व' या स्वरितापुढें उदात्त स्वर नसता तर त्याची द्वितीय अर्धमात्रा उदात्ततररूपाने ऐकू आली असती) 'येऽरा' या उदाहरणातील 'ये' व 'अरा' हीं दोन्ही पदें ('फिषोऽन्त उदात्त' फिट् सू १ या) फिटसूत्रान्वयें अन्तोदात्त आहेत व या दोन पदाचा सन्धि केला असता जो एकादेश होतो तो 'स्वरितो वानुदात्ते पदादौ' सू ३६५९ या सूत्राने विकल्पेंकरून स्वरित होतो ('ये' हे पद अन्तोदात्त कसे होते याचा प्रक्रिया मार्गे सांगितलीच आहे 'अर' हे प्रातिपदिक 'फिषोऽन्त उदात्त' या सूत्रान्वयें अन्तोदात्त असल्यामुळें, म्हणजे त्यातील अन्त्य अकार उदात्त असल्यामुळें, 'अनुदात्त पदमेकवर्जम्' सू ३६५० *या सूत्राने त्या प्रातिपदिकातील अवशिष्ट आद्य अकार* अनुदात्त होतो, आणि 'ये+अरा' या दोन पदाचा 'एङ पदान्तादति' या सूत्राने सन्धि केला असता, 'ये' यातील उदात्त 'ए' व 'अरा' यातील अनुदात्त 'अ' या दोहाचे जागी होणारा 'ए' हा पूर्वरूप एकादेश 'स्वरितो वानुदात्ते पदादौ' या सूत्राने विकल्पेंकरून स्वरित होतो म्हणजे 'ये' हा दीर्घ स्वरित असल्यामुळें, त्याची पहिली एक मात्रा उदात्त असून पुढची एक मात्रा अनुदात्त आहे व या अनुदात्त मात्रेपुढें 'रा' यातील 'आ' हा उदात्त स्वर असल्यामुळें, त्या द्वितीय अनुदात्त मात्रेचे 'शिष्ट निघ्नन्ति कम्पितम्' या वचनान्वयें कम्पित अनुदात्तरूपाने स्पष्ट श्रवण होते )

**शब्दरत्न– अविवक्षितमित्यर्थ इति । इद च वक्ष्यमाण प्राति शाख्य यच्छाखायाम्, तच्छाखास्थ वैदिकोदाहरणविषयम् । तनूनपाच्छ-**

चीपतिशब्दयोरिति । अस्य मघपीत्यादि शेषनिघात इति । अस्य तयापीति शेष । तेनोदीतौ अनुदात्तौ प्राप्नुत इति भाव । जात्यवद्वेति । पूर्वपदभूतयोस्तनूशचीशब्दयोरन्तौ जात्यवदिति ।

"अतोऽन्यस्स्वरित स्वार जात्यमाचक्षते पदे" ।

इति लक्षितो जात्य । उदात्तस्वरितपूर्वस्वरितादय एकपदे स्थित स्वरितो जात्य इति तदर्थ । तेन तुल्य तद्वत्, अस्यान्त उदात्तश्रुतिक इत्यर्थ । तथा था असहितवद्वा । सहितवद्वेत्यर्थ,

"पद्यादीस्तुवथ्युदात्तानामसहितवदुत्तरान् ।"

इत्युत्तरमस्य पाठात् । असहितवदित्यनेन केवलमनुदात्तत्वम । सहितवदित्यनेनार्धानुदात्तस्वरितत्वमिति तद्भाष्ये स्पष्टम् । तथेति । लक्ष्यदर्शनवत्प्रातिशाख्यमपि प्रमाणमस्तीत्यर्थ ।

स्वतन्त्रोदात्तोपेक्षयेति । श्लोके 'उदात्तात्" इति स्वतन्त्रोदात्तादित्यर्थकमिति भाव । एवकार इति । तच्छाखायां दीर्घादिष्वपि समाशोदात्तकस्वरितस्यैव पाठादिति भाव । एतेनैतौ पक्षौ वैकल्पिकावित्यपास्तम् । 'धा' शब्दस्तु पादपूरणार्थेति बोध्यम् । अप्राकृत इति । स्वरित इत्यर्थ । स्वार इति । स्वर एव स्वार, स्वार्थेऽण् । स्वरितोदात्ताभ्यां पूर्ववर्णग इत्यर्थ । लक्षते इति । तदुक्तं भाष्ये–"अर्धं ह्रस्व शब्दोऽर्धमात्रायां रूढ " इति । हरिरप्याह—

"प्रमाणमेव ह्रस्वादावनु पात्त प्रतीयते" इति ।

अनुपात्तमपि अर्धमात्राह्प प्रमाणमेवोपलभ्यत इत्यर्थ तस्य हेलाराज आह । एव च लोकेऽन्यशाखासु च दीर्घादिष्वप्यर्धमात्रैवोदात्तेति भाव । मतान्तरेनि । प्रातिशाख्योक्तमतापेक्षयेतरवेदलोकसाधारणमतान्तरेत्यर्थ । क्वचिदिति । लक्ष्यते इत्यत्रापरमिदम्, भाष्यतो रूढिशक्तेरेव प्रतीतेरिति भाव । इत्युक्तेरिति । "नोदात्तस्वरितोदयम्" इति निषेधस्तु "उदात्तादनुदात्तस्य" इत्यस्यैव, "अनन्तरस्य" इति न्यायादिति भाव ॥

'उपेयिवान् इत्यत्रोपसर्ग इवाविवक्षितम्' या मनोरमेंतील पक्तीत 'अविवक्षितम्' हा जो शब्द घातला आहे तो मनोरमेंत ज्या प्रातिशाख्याचा पुढें निर्देश केला आहे ते प्रातिशाख्य ज्या शाखाना लागू पडते त्या शाखातील वैदिक उदाहरणाना अनुलक्षून घातला आहे (मनोरमेंत शौनकीय ऋक्प्रातिशाख्याचा उल्लेख केला आहे व ते प्रातिशाख्य ज्या ऋक्शाखीयाना लागू पडतें त्याच्या वेदातील उदाहरणाना 'अविवक्षितम्' हा शब्द लागू पडतो, म्हणजे ऋग्वेदातील उदाहरणात स्वरित स्वर, ऱ्हस्व असला किंवा दीर्घ असला, तरी त्याचा प्रथमार्ध उदात्त होत असून अवशिष्ट द्वितीयार्ध अनुदात्त होतो पण तैत्तरीय इत्यादि प्रातिशाख्यें ज्या शाखाना लागू पडतात त्या शाखातील वैदिक उदाहरणाना 'अविवक्षितम्' हा शब्द लागू पडत नाही व 'अर्धन्हस्वम्' यातील 'ऱ्हस्वम्' हा शब्द त्या शाखामध्यें विवक्षित आहे, कारण त्या सर्व शाखामध्यें स्वरित स्वर, ऱ्हस्व असो किंवा दीर्घ असो, त्याची प्रथम अर्धमात्राच उदात्त उच्चारली जाते व तो ऱ्हस्वस्वरित असल्यास त्याची अवशिष्ट अर्धमात्रा अनुदात्त उच्चारली जात आणि तो दीर्घ स्वरित असल्यास, त्याची अवशिष्ट दीड मात्रा अनुदात्त उच्चारली जाते) 'तनूनपाच्छचीपतिशब्दया ....शेषनिघात' ही जी मनोरमेंत पक्ति आहे त्या पक्तीच्या आरंभी 'यद्यपि' हा शब्द व शेवटी 'तथापि' हा शब्द अध्याहृत आहे असे समजावें (व असे मानल म्हणजे त्या मनोरमेंतील पक्तीचा असा अर्थ होतो की, 'तनू' व 'शची' हे शब्द आद्युदात्त असल्यामुळें, 'अनुदात्त पदमेकवर्जम्' या सूत्रान्वयें) जरी त्या शब्दाच्या अनुक्रमें अन्त्य ऊकाराला व ईकाराला अनुदात्त स्वराची प्राप्ति होते तरी, 'जायवद्वा तया वाऽन्तौ तनूनाचीनि पूर्वयो' या वार्तिकान्वयें 'तनू' व 'शची' यातील अनुक्रमें अन्त्य ऊकार व ईकार जात्यस्वरात्मके होतात 'अतोऽन्यत्स्वरित स्वार जात्यमाचक्षते

पदे' या कारिकेंत जात्यस्वराची व्याख्या दिली आहे व त्या कारिकेचा अर्थ असा आहे की, ज्या स्वरितापुढें उदात्त किंवा स्वरित स्वर असतो त्याहून भिन्न असणारा व एकाच पदांत असणारा स्वरित जात्य होय (शौनकीय प्रातिशाख्यातील तृतीय पटलांत दिलेल्या चवथ्या कारिकेचा हा उत्तरार्ध असून त्या कारिकेचा 'उदात्तपूर्वं स्वरितमनुदात्त पदेऽपरम्' हा पूर्वार्ध आहे व या कारिकेचे 'पदे एकस्मिन् पदे उदात्तपूर्वं उदात्त पूर्वं यस्य त तथाविधम् अनुदात्त स्वरित जानीयात् .. अत प्रकृतादुदात्तपूर्वा-त्स्वरितात्स्वराद् यदन्यद् एकस्मिन्नेव पदे स्वरितं तं स्वारं जात्य-मावक्षते व्याडिप्रमुखाः । जात्या स्वभावेनैव उदात्तानुदात्तसदर्शनं विना इति यावत जातो जात्य ।' असे व्याख्यान केले आहे शब्द-रत्नातील 'उदात्तस्वरितपूर्वस्वरितान्य.. जात्य 'या पदाचा 'उदात्त-स्वरिताभ्यां पूर्वं य स्वरित तस्मादन्य स्वरित जात्य,' म्हणजे 'उदात्तस्वरितपरत्वाभाववान् स्वरितो जात्य,' असा अर्थ आहे 'जात्य ' या शब्दाची 'जात्या स्वरान्तरसम्बन्ध विनैव जात जात्य ' अशी व्युत्पत्ति आहे व या स्थलीं 'दिगादिभ्यो यत्' सू १८२२ या सूत्राने 'यत्' प्रत्यय झाला आहे सारांश जात्य स्वर हा एक विशिष्ट प्रकारचा स्वरित स्वर आहे व वर जी 'जात्य' या शब्दाची व्युत्पत्ति दिली आहे तिच्यावरून हे स्पष्ट होते की, जा स्वर स्वरान्तराच्या अपेक्षेनें—सहायानें—स्वरित होतो तो जात्य स्वर नव्हे उदाहरणार्थ 'उदात्तादनुदात्तस्य स्वरित ' सू ३६६० इत्यादि सूत्रानी स्वरा-न्तराच्या अपेक्षेने होणाऱ्या स्वरिताला जात्य म्हणता येत नाहीं. 'तित्स्वरितम्' सू ३७२९, 'न्यङ्स्वरौ स्वरितौ' फिट् सू ७४ इत्यादि सूत्रानी जो स्वर स्वरान्तराची अपेक्षा न करिता स्वरित होतो त्याला जात्य स्वरित म्हणतात 'जात्येन तुल्य ' असा 'जात्यवत्' या शब्दाचा विग्रह आहे व 'तेन तुल्यं क्रिया चेद्वति ' सू १७७८ या सूत्राने 'जात्यवत्' या स्थली) 'तेन तुल्यम्' या अर्थामध्ये 'वत्'

प्रत्यय झाला आहे 'तनू, शची' यातील अन्त्य ऊकाराला व ईकाराला जेव्हा जात्यवत स्वरित स्वर होतो तेव्हा त्याचा द्वितीय अर्धांश उदात्तरूपाने ऐकू येतो असा त्या कारिकेचा अर्थ आहे 'जात्यवद्वा तथा वाऽन्तौ तनूशचीनि पूर्वयो ' हा जो (शौनकीय प्रातिशाख्यातील तृतीय पटलात दिलेल्या सोळाव्या कारिकेचा) उत्तरार्ध आहे त्याचा 'पद्यादीस्तु दव्युदात्तानामसहितवदुत्तरान' असा पूर्वार्ध असल्यामुळे, (त्या पूर्वार्धाच्या अनुरोधाने) उत्तरार्धातील 'तथा वा' या पदाचा 'असहितवद्वा' असा अर्थ होतो व 'तथा वा' यात 'वा' हें पद असल्यामुळें, त्याचा 'सहितवद्वा' असा अर्थ होतो या वरील कारिकेतील 'असहितवत्' या पदाचा 'केवळ अनुदात्त' असा अर्थ असून, 'सहितवत्' या शब्दाचा 'अर्धानुदात्तस्वरितत्वम्'–म्हणजे ज्या स्वरिताचा द्वितीयार्ध अनुदात्त असतो तशा स्वरित स्वराला सहितवत् स्वर म्हणतात–असा अर्थ आहे असे त्या कारिकेवरील (उवटकृत) भाष्यावरून स्पष्ट होते (त्या कारिकेचे 'पद्य पदार्धम्, द्व्युदात्ताना पदाना पद्यादीन् पदार्धस्य आदीन् उत्तरान् च असहितवज्जानीयात्। जान्येन तुल्य जात्यवत् । यथा जात्यस्यान्तो निहन्यते अनुदात्तो भवति उदात्ते परभूते, एव तनूशची इति पदयो पदपूर्वार्धयो सतो अन्तौ निहन्येते । तथा वा अन्तौ कुर्यात यथा पद्यादीस्तु इत्यादिना उपरि प्रतिपादितम्' असे व्याख्यान केले आहे साराश 'तनू, शची' यातील अन्त्य ऊकाराला व ईकाराला जात्य, सहितवत, व असहितवत् असे तीन प्रकारचे भिन्न स्वर विकल्पेंकरून होतात या तीन स्वरापैकी सहितस्वर हा स्वरित स्वराचा एक भेद असून, तो जात्य स्वरिताचा प्रतिद्वन्द्वी आहे, म्हणजे ज्या स्वरितापुढें स्वरित किंवा उदात्त स्वर असतो व त्यामुळें त्याचा उत्तरार्ध स्पष्टपणे अनुदात्तरूपाने ऐकू येतो तसा स्वरित सहितसज्ञक असून, ज्या स्वरितापुढें स्वरित किंवा उदात स्वर नाही व ज्याचा उत्तरार्ध उदात्तश्रुतिक असतो त्याला जात्यस्वरित म्हणतात. असहितस्वर हा स्वरित नसून केवळ अनुदात्त स्वराचा

बोधक आहे म्हणून 'तनू, शची' यांतील अन्त्य ऊकार व ईकार जेव्हा जात्य होतात तेव्हा त्याचा उत्तरार्ध उदात्तश्रुतिक होतो जेव्हा ते अन्त्य ऊकार व ईकार सहित होतात तेव्हा त्याचा उत्तरार्ध अनुदात्तश्रुतिक असतो आणि जेव्हां ते असहित होतात तेव्हा त्याच्या दोन्ही मात्रा अनुदात्त असतात असा एकंदरीत या शब्दरत्नातील वरील पक्तीचा भावार्थ आहे ) 'तथा स्वरितार्धस्योदात्तत्वे प्रातिशाख्यमपि' या मनोरमेच्या पक्तीतील 'तथा' या शब्दाचा असा अर्थ आहे की, ज्याप्रमाणे स्वरिताचा (मग तो ऱ्हस्व असो किंवा दीर्घ असो) प्रथमार्ध उदात्त होतो याला वैदिक उदाहरणे प्रमाण आहेत त्याचप्रमाणे त्याला प्रातिशाख्य देखील प्रमाण आहे 'तस्योदात्ततरोदात्तादर्धमात्रार्द्धमेव वा' या मनोरमेंत दिलेल्या कारिकेतील 'उदात्तात्' या पदाचा 'स्वतन्त्रोदात्तात,' म्हणजे 'उच्चैरुदात्त' सू ५ या सूत्रानें उदात्तसंज्ञा पावणाऱ्या स्वतंत्र उदात्तापेक्षा, असा अर्थ असल्यामुळें, दीक्षितानी त्या कारिकेतील 'उदात्तात्' या पदाचा 'स्वतन्त्रोदात्तापेक्षया' असा अर्थ केला आहे त्या कारिकेतील अर्धमेव वा' या स्थली 'एव' हे पद अवधारणार्थक घातले आहे की, ज्या शाखाना ते शौनकीय प्रातिशाख्य लागू पडतें त्या शाखामध्यें दीर्घ स्वरितादिकाचा देखील प्रथमार्ध उदात्त पठित केला जातो, (व केवळ पहिली अर्धमात्रा उदात्त पठित केली जात नाही ) असे असल्यामुळें दीर्घ स्वरिताची पहिली अर्धमात्रा किंवा पहिली एक मात्रा विकल्पेंकरून उदात्त होते असे जे कोणी म्हणतात त्यांच ते म्हणणे चूक ठरतें 'अर्धमेव वा' या स्थली जो 'वा' शब्द घातला आहे तो (विकल्पाचा वाचक नसून) केवळ पादपूरणार्थ घातला आहे असे समजावें 'अप्राकृतस्तु य स्वार स्वरितोदात्तपूर्वग' या कारिकेतील 'अप्राकृत' या पदाचा 'स्वरित ' असा अर्थ असून, 'स्वार' या पदाचा 'स्वर' असा अर्थ आहे व 'स्वार' हा शब्द 'स्वर एव स्वार' असा रीतीने 'स्वार्थे अण्' प्रत्यय होऊन सिद्ध झाला आहे.

'स्वरितोदात्तपूर्वंग' या पदाचा 'स्वरितोदात्ताभ्यां पूर्ववर्णग,' म्हणजे स्वरिताच्या किंवा उदात्ताच्या पूर्वी जो वर्ण आहे त्या वर्णाचे–अचाचे–ठिकाणी असणारा स्वरित स्वर,' असा अर्थ आहे 'अर्धह्रस्वशब्देनाधंमात्रा लक्ष्यते' असे जें हरदत्तादिकानी म्हटले आहे त्याला 'अर्धह्रस्वशब्दोऽर्धमात्रायां रूढ' म्हणजे 'अर्धह्रस्व' या शब्दाचा 'अर्धमात्रा' असा रूढ अर्थ आहे, हें भाष्यकाराचे वचन प्रमाण आहे हरीच्या कारिकेंत देखील 'प्रमाणमेव ह्रस्वादावनुपात्त प्रतीयते' असे म्हटले आहे व हेलाराजानें त्या कारिकेचा 'अनुपात्तमपि अर्धमात्रारूप प्रमाणमेवोपलक्ष्यते' असा अर्थ केला आहे (त्या कारिकेतील 'अनुपात्तम्' या पदाचा 'अर्धह्रस्वशब्दनिष्ठशक्त्यप्रतिपाद्यम्' असा अर्थ आहे व त्यामुळें त्या कारिकेचा असा अर्थ होतो की, जरी 'अर्धह्रस्व' या शब्दाच्या अभिधाशक्तीने अर्धमात्रा या अर्थाचा बोध होऊ शकत नाही तरी, त्या शब्दानें अर्धमात्रारूप प्रमाणाचेच लक्षणेनें ग्रहण होतें) सारांश 'अर्धह्रस्व' हा शब्द अर्धमात्रा या अर्थाचा रूढीने वाचक मानला असल्यामुळें हे स्पष्ट होते की, भाष्येंत व तसेच बह्वृचांच्या शाखा खेरीज करून इतर सर्व शाखामध्यें दीर्घादि स्वरिताची देखील अर्धमात्राच उदात्त होते (व अवशिष्ट दीड मात्रा अनुदात्तरूपानें पठित केली जाते) 'मतान्तरपरतया नेया' या मनोरमेच्या पक्तीचा 'प्रातिशाख्योक्तमतापेक्षयेतरवेदलोकसाधारणमतान्तरपरतया नेया'—म्हणजे ऋक्प्रातिशाख्य ज्याना लागू पडतें अशा शाखाचे वेद खेरीज करून इतर वेदांत व लोकांत अर्धह्रस्व हा शब्द अर्धमात्रा या अर्थामध्यें रूढ असल्यामुळें त्या रूढ अर्थाच्या आधारें हरदत्तादिकांच्या मताचे समर्थन करावें, असा अर्थ आहे भाष्यकारानी 'अर्धह्रस्व' हा शब्द 'अर्धमात्रा' या अर्थाचा रूढीने वाचक मानला असल्यामुळें, 'कथंचिन्नेया' या मनोरमेंतील पदाचा 'लक्षणया नेया' असा अर्थ करावा, (कारण पूर्वी सांगितल्याप्रमाणे 'अर्धह्रस्व' या शब्दाचा 'अर्धमात्रा' असा अभिधाशक्तीनें अर्थ होत नसून भाष्यकारानीं त्या

शब्दाचा तसा रूढ अर्थ मानला असल्यामुळें, त्या शब्दाचा लक्षणेने तसा अर्थ करणे भाग आहे व तसा अर्थ केल्याने, ज्या शाखाना शौनकीय ऋक्प्रातिशाख्य लागू पडत नाही अशा सर्व शाखांच्या वेदात व तसेच भाषेत दीर्घादि स्वरिताची प्रथम अर्धमात्राच उदात्त होत असून अवशिष्ट भाग अनुदात्त होतो असा प्रकृत सूत्राचा अर्थ समजावा ) 'नोदात्तस्वरितोदयम्' सू ३६६१ हू (अष्टमाध्यायातील चतुर्थ पादात पठित असलेले) सूत्र 'अनन्तरस्य विधिर्वा भवति प्रतिषेधो वा'–परि ६२–या न्यायान्वयें 'उदात्तादनुदात्तस्य स्वरित' सू ३६६० या (लगेंच पूर्वी पठित असलेल्या) सूत्राचेच निषेधक सूत्र आहे (व त्या सूत्रान 'स्वरितो वानुदात्ते पदादौ' सू ३६५९ या वरच पूर्वी अष्टमाध्यायाच्या द्वितीय पादात पठित असलेल्या सूत्राचा निषेध होऊ शकत नाही आणि म्हणूनच 'एकादेशस्तु पक्षे स्वरित' असे मनोरमेंत म्हटले आहे )

**मनोरमा –'मुख च नासिका च' इति विग्रहे प्राण्यङ्गत्वा-देकवद्भावे 'मुखनासिकम्' इति स्यादत आह– मुखसहितेति ॥**

('मुखनासिकावचनोऽनुनासिक' सू ९ या सूत्रातील 'मुख-नासिका' या शब्दाचा) 'मुख च नासिका च' असा विग्रह केल्यास, मुख व नासिका हे दोन्ही प्राण्यङ्ग असल्यामुळें ('द्वन्द्वश्च प्राणितूर्य-सेनाङ्गानाम्' सू ९०६ या सूत्राने) एकवद्भाव होऊन (व समाहारद्वन्द्व केला असता 'स नपुंसकम्' सू ८७१ या सूत्रानें समाहारद्वन्द्वानें तयार झालेला सामासिक शब्द नपुंसक होऊन आणि 'ह्रस्वो नपुंसके प्रातिपदिकस्य' सू ३१८ या सूत्रान तो ह्रस्व होऊन) 'मुखनासिकम्' असा सामासिक शब्द होईल (व पूर्ण सामासिक शब्दाचे 'मुखनासिकावचन' असे रूप न होता, 'उच्यते इति वचन, मुखनासिकेन वचन मुखनासिकवचन' असे रूप होण्याची आपत्ति येईल ती आपत्ति टळावी म्हणून) 'मुखसहिता नासिका' असा 'मुखनासिका' या शब्दाचा कौमुदीत विग्रह केला

आहे ( व 'शाकपार्थिवादीनां सिद्धये उत्तरपदलोपस्योपसंख्यानम्'— सू ७३९ वरील वार्तिक—या वार्तिकान्वयें 'सहिता' या मध्यम पदाचा लोप होत असल्यामुळें, 'मुखनासिकया वचन मुखनासिकावचन' हा सूत्रनिर्दिष्ट शब्द साधु ठरतो प्रकृत सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात—'किमिदं मुखनासिकावचनं इति। मुखं च नासिका च मुखनासिकम्। मुखनासिकं वचनमस्य सोऽयं मुखनासिकावचनः। यद्येवं मुखनासिकवचन इति प्राप्नोति। निपातनाद्दीर्घत्वं भविष्यति। अथवा .. मुखद्वितीया वा नासिका वचनमस्य सोऽयं मुखनासिकावचनः। मुखोपसहिता वा नासिका वचनमस्य सोऽयं मुखनासिकावचनः।')

मनोरमा— "तुल्यास्य"। आस्ये भवमास्यम्, "शरीरावयवाद्यत्" । इत्यभिप्रेत्याह—ताल्वादीति । आभ्यन्तरेति । एतच्च प्रशब्दबलाल्लभ्यते। तुल्यास्य किम्। तप्ता अत्र पकारस्य तकारे परे "झरो झरि' इति लोपो मा भूत्। प्रयत्नग्रहणं किम्। वाक् श्चोतति। शस्य लोपो न। ञमङणनानामिति। 'नासिका च' इति चकारेण स्वस्ववर्गानुकूलं ताल्वादि समुच्चीयते। "अनुस्वारोत्तमा अनुनासिका" इति तैत्तिरीयाणां प्रातिशाख्यम्। "यमानुस्वारनासिक्यानां नासिका, अनुनासिकास्चोत्तमा" इति कात्यायनप्रातिशाख्यम्। "वर्गोत्तमा ञमङणना अनुनासिका भवन्ति, स्वास्यास्वस्थानाद्यपरित्यागेन नासिका स्थानं द्वितीयमेषामित्यर्थः" इति तद्भाष्यं च। "एदैतो" इत्यादौ तपरत्वमसंदेहार्थं, न तु तत्कालग्रहणार्थम्। तेन प्लुतस्यापि संग्रहः॥

('तुल्यास्यप्रयत्नं सवर्णम्' सू १० या सूत्रातील) 'आस्य' हा शब्द 'आस्ये भवम्' अशा रीतीनें 'शरीरावयवाच्च' सू १४३० या सूत्रानें ('तत्र भव' या अर्थामध्यें) 'यत्' प्रत्यय होऊन, (व 'यस्येति च' सू ३११ या सूत्रानें प्रकृतीतील अन्त्य अकाराचा व 'हलो यमां यमि लोपः' सू ६० या सूत्रानें अवशिष्ट पूर्व

यकाराचा लोप होऊन) सिद्ध होत असल्यामुळें, त्याचा 'ताल्वादि-स्थानम्' असा कौमुदीत अर्थ केला आहे. (वास्तविक 'आस्य' या शब्दाचा मुख असा अर्थ आहे, पण तसा अर्थ केल्यास, मुखांतूनच सर्व वर्ण निघत असल्याकारणानें प्रकृत सूत्रातील 'आस्य' हा शब्द व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते व त्या शब्दाला मुखात असलेली ताल्वादि स्थाने असा अर्थ अभिप्रेत असल्यामुळें, त्या शब्दाची वर सांगितल्याप्रमाणें व्युत्पत्ति केली आहे. प्रकृत सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात-'न हि लौकिकमास्यम्। किं तर्हि? । तद्धितान्तमास्यम्। आस्ये भवमास्यम्। शरीरावयवाद्यत्। किं पुनरास्ये भवम्? । स्थानं करणं च।') या प्रकृत सूत्रातील 'प्रयत्न' या शब्दात (प्रकर्षार्थक) 'प्र' हा उपसर्ग असल्यामुळें, त्या उपसर्गाच्या सामर्थ्याने 'प्रयत्न' या शब्दाचा आभ्यन्तर प्रयत्न असा अर्थ होतो (सारांश 'यत्न' हा शब्द विवारश्वासादि बाह्य यत्नाचा वाचक असून 'प्रयत्न' हा शब्द आभ्यन्तर यत्नाचा वाचक आहे; कारण आभ्यन्तर प्रयत्न प्रथम होत असून बाह्य यत्न नंतर होत असल्यामुळे व आभ्यन्तर प्रयत्नात जसा प्रकृष्ट यत्न करावा लागतो तसा बाह्य यत्नात करावा लागत नसल्यामुळें, आभ्यन्तर यत्नास प्रयत्न असें म्हणतात) प्रकृत सूत्रात 'तुल्यास्य' हा शब्द अशाकरिता घातला आहे की, 'तर्प्ता' या स्थळी पकारापुढें तकार असल्यामुळें, त्या पूर्व पकाराचा 'झरो झरि सवर्णे' सू ७१ प्रमाणे लोप होऊ नये ('तृप् + ता' या स्थली 'पुगन्तलघूपधस्य च' सू २१८९ या सूत्राने 'तृप्' यातील उपधेस असलेल्या ऋकाराचा गुण होऊन 'तर्प् + ता' अशी स्थिति झाली असता 'र्' या हल्पुढें 'प्' हा झर् असून त्यापुढें तकार हा झर् आहे. पकार व तकार हे दोन्ही स्पर्श वर्ण असल्यामुळें, 'स्पृष्टं प्रयतनं स्पर्शानाम्' या वचनानुसार त्यांचा आभ्यन्तर प्रयत्न एकच— म्हणजे स्पृष्ट—आहे पण पकाराचे ओष्ठ हें उच्चारण स्थान व

तकाराचे दन्त हे उच्चारण स्थान आहे सारांश, जरी या दोन वर्णांचा आभ्यन्तर प्रयत्न एकच आहे तरी त्याच्यात स्थानसाम्य नाही आणि म्हणून, 'तुल्यास्यप्रयत्नं सवर्णम्' या सूत्रान्वयें ते सवर्ण होऊं शकत नाहीत व त्यामुळें 'झरो झरि सवर्णे' हे सूत्र येथें लागू पडत नाही व पकाराचा लोप होत नाही 'तुल्यप्रयत्नं सवर्णम्' असे जर सूत्र असते तर, पकाराचा लोप होण्याची आपत्ति आली असती ती टळावी म्हणून, प्रकृत सूत्रात 'आस्य' हा शब्द मुद्दाम घातला आहे ) या सूत्रात 'प्रयत्न' या शब्दाचे ग्रहण अशाकरिता केलें आहे की, 'वाक् श्चोतति' या स्थली शकाराचा लोप होऊं नये ('वाक् श्चोतति' या उदाहरणात 'क्' या हल्पुढें 'श' हा झर् असून त्यापुढें 'च्' हा झर् आहे शकार व चकार या दोहोंचे उच्चारणस्थान एकच म्हणजे 'इचुयशानां तालु' या वचनान्वयें 'तालु' आहे, पण शकार या ऊष्मवर्णाचा आभ्यन्तरप्रयत्न, 'विवृतमूष्मणां स्वराणां च' या वचनान्वयें, विवृत असून, चकार या स्पर्श वर्णाचा आभ्यन्तरप्रयत्न, 'स्पृष्टं प्रयतनं स्पर्शानाम्' या वचनान्वयें स्पृष्ट आहे सारांश, या दोन वर्णांत जरी उच्चारणस्थानसाम्य आहे तरी, त्याच्यात आभ्यन्तरप्रयत्नसाम्य नाही आणि म्हणून शकार व चकार हे सवर्ण होऊं शकत नाहीत व त्यामुळें 'झरो झरि सवर्णे' हे सूत्र येथें लागू पडत नाही आणि शकाराचा लोप होत नाही जर 'तुल्यास्य सवर्णम्' एवढेंच सूत्र केलें असते तर, शकाराचा लोप होण्याची आपत्ति आली असती ती टळावी म्हणून, त्या सूत्रात 'प्रयत्न' या शब्दाचें मुद्दाम ग्रहण केलें आहे सारांश, या सूत्रात 'आस्य' व 'प्रयत्न' हे दोन्ही शब्द आवश्यक आहेत व ज्या वर्णांत स्थानसाम्य व आभ्यन्तरप्रयत्नसाम्य आहे तसेच, वर्ण प्रकृतसूत्रान्वयें सवर्णसंज्ञक होतात ) 'ञमङणनानां नासिका च' या कौमुदीतील पङ्क्तीत 'च' या पदाचे ग्रहण केलें असल्यामुळें, 'ञ्, म्, ङ्, ण्' व 'न्' ज्या वर्गांत अन्तर्भूत आहेत त्या वर्गाचें जें स्थान आहे तें त्याचे स्थान

होत असून, त्याचे त्या शिवाय नासिका देखील उच्चारणस्थान आहे हें स्पष्ट होतें. (सारांश ञकाराचें तालु व नासिकास्थान, मकाराचें ओष्ठ व नासिकास्थान इत्यादि समजावें ) अनुस्वार व पांच वर्गांपैकी प्रत्येक वर्गांतील अन्त्य वर्ण हे अनुनासिक होत असें तैत्तिरीयाच्या प्रातिशाख्यात सांगितलें आहे. यम, अनुस्वार व नासिक्य यांचे नासिका हें उच्चारणस्थान आहे व पांच वर्गांपैकी प्रत्येक वर्गांतील अन्त्य वर्ण अनुनासिकसंज्ञक आहे असे कात्यायनप्रातिशाख्यांत सांगितलें आहे, व त्या प्रातिशाख्यावरील भाष्यांत असें म्हटलें आहे की, वर्गांचे अन्त्य वर्ण ञ्, म्, ङ्, ण्, न् हे अनुनासिक आहेत आणि 'च' या शब्दानें हें द्योतित होतें की, हे वर्ण ज्या वर्गांत आहेत त्या वर्गांचें जें उच्चारण-स्थान आहे तें त्यांचे आहेच व त्याखेरीज नासिका हें त्यांचें द्वितीय उच्चारणस्थान आहे, म्हणजे दोन्ही स्थानांनी मिळून त्यांचे उच्चारण होतें 'एदैतो (कण्ठतालु, ओदौतो कण्ठोष्ठम्' असें जें कौमुदीत तपरकरण करून 'एदैतो' व 'ओदौतो' असें म्हटलें आहे व) या स्थलीं जें तपरकरण केलें आहे तें, ('तपरस्तत्कालस्य' सू १५ या सूत्रान्वयें) तत्कालत्वाचक वर्णांचेंच ग्रहण व्हावें याकरिता केलें नसून, संदेह उत्पन्न न व्हावा एवढ्याकरिताच केलें आहे व त्यामुळें 'ए, ऐ, ओ, औ' हे वर्ण प्लुत असले तरी त्यांचे देखील ग्रहण होतें, म्हणजे दीर्घ 'ए, ऐ' व दीर्घ 'ओ, औ' यांचे जें उच्चारणस्थान आहे तेंच प्लुत 'ए, ऐ' व प्लुत 'ओ, औ' यांचे उच्चारणस्थान समजावें ('ए+ऐ' यांचा संधि करून व तसेच 'ओ+औ' यांचा 'एचोऽयवायावः' सू ६१ या सूत्रान्वयें संधि करून 'अयै' व 'अवौ' असें रूप झाल्यावर त्याहून षष्ठी विभक्तीच्या द्विवचनाचा प्रत्यय करून जर कौमुदींतील पक्तींत उच्चारण केलें असतें तर, हे कोणत्या वर्णांचे वाचक आहेत असा संदेह उत्पन्न झाला असता तसा संदेह उत्पन्न न व्हावा एवढ्याकरिताच तपरकरण केलें आहे )

शब्दरत्न– 'आस्य'शब्देन कथं तदवयवताल्वादिग्रहणमत आह–आस्ये भवमिति । प्रयत्नस्तत्त्वादिति । प्रकृष्टो यत्नः प्रयत्नः ।

प्रकर्षश्च–वर्णोत्पत्त्यव्यवहितप्राक्कालिकत्वरूप इति भाव । चकारेणेति । अत्र यया नासिकाया स्थानत्वम्, तयाऽन्यत्र निरूपितम् । न तु तत्कालेऽत । एवं शिक्षाद्युक्तार्थानुवादत्वेनात्र शास्त्रप्रवृत्त्यभावादिति भाव ।

'आस्य' (या शब्दाची 'अस्यन्ते वर्णा येन' अशी व्युत्पत्ति असून त्या शब्दाचा 'मुख' असा अर्थ होत असल्यामुळे,) या शब्दानें मुखाचे अवयव जी तालु इत्यादि स्थाने आहेत त्याच ग्रहण करु होते हे बाधित करण्याकरिता, 'आस्ये भवमास्यम्' अशी 'आस्य' या शब्दाची मनोरमेंत व्युत्पत्ति केली आहे 'प्रकृष्टो यत्न प्रयत्न = आभ्यन्तरप्रयत्न ' असा 'प्रयत्न' शब्दाचा विग्रह आहे व बाह्य यत्नाच्या मानाने आभ्यन्तरप्रयत्नामध्यें जो प्रकर्ष, म्हणजे अधिक यत्न, असतो तो वर्णाची उत्पत्ति–अभिव्यक्ति–होण्याच्या स्पष्ट पूर्वी होणारा प्रयत्न होय (वर्णोत्पत्ति मुखाच्या द्वारे होते, पण ती होण्यापूर्वी, 'आत्मा बुद्ध्या समेत्यार्थान् मनो युङ्क्ते विवक्षया । मन कायाग्निमाहन्ति स प्रेरयति मारुतम् ॥ मारुतस्तूरसि चरन मन्द्र जनयति स्वरम् ।' इत्यादि पाणिनीय शिक्षेत सांगितल्याप्रमाणे जो प्रकृष्ट आन्तरप्रयत्न होत असतो त्याला आभ्यन्तर प्रयत्न म्हणतात प्रकृत सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात–'न हि प्रयतन प्रयत्न । किं तर्हि । प्रारम्भो यत्नस्य प्रयत्न ।' 'या भाष्याचा अर्थ असा आहे की, कोणत्याहि तऱ्हेचा प्रयत्न या अर्थामध्यें 'प्रयत्न' या शब्दाचा प्रकृत सूत्रात उपयोग केला नसून, 'प्रारम्भो यत्नस्य' या व्युत्पत्तीनें वर्णोत्पत्ति होण्यापूर्वी जो आभ्यन्तर प्रयत्न होतो त्या अर्थामध्यें येथें प्रयत्न या शब्दाचा उपयोग केला आहे या वरील विवेचनावरून जरी हे सिद्ध होतें की, शास्त्रीय व्यवहारात आभ्यन्तर प्रयत्नालाच प्रयत्न म्हणत असून विवारादि बाह्य यत्नाना प्रयत्न न म्हणता केवळ यत्न असे म्हणतात तरी, लौकिक व्यवहारात असा प्रकारचा भेद मानला जात नसून,

आभ्यन्तर प्रयत्न व बाह्य यत्न या दोन्ही प्रकारच्या यत्नाना प्रयत्न असेच म्हणण्याची प्रथा आहे हे ध्वनित करण्याच्या हेतूनें दीक्षितानी कौमुदीत बाह्य यत्नाचे ठिकाणी देखील प्रयत्न हा शब्द वापरला आहे असे शब्देन्दुशेखरात म्हटले आहे त्या ग्रन्थात नागेश म्हणतात– 'सूत्रे प्रशब्देन विलक्षणार्थबोधेऽपि लोके यत्नप्रयत्नयो पर्यायतेति ध्वनयन्नाह, प्रयत्नो द्विधेति। क्वचिद् यत्न इत्येव पाठ।' येथें कौमुदीच्या ज्या प्रती उपलब्ध आहेत त्या सर्व प्रतीत 'प्रयत्नो द्विधा' असा नागेशानी निर्दिष्ट केलेला पाठ नसून 'यत्नो द्विधा' असाच पाठ आहे तरी पण दीक्षितानी 'पूर्वत्रासिद्धम्' या सूत्रावरील कौमुदीत 'बाह्यप्रयत्नास्त्वेकादशधा, बाह्यप्रयत्नाश्च यद्यपि सवर्णसंज्ञायामनुपयुक्ता' इत्यादि म्हटले असल्यामुळें, नागेशानी सांगितल्याप्रमाणे असे म्हणता येतें की, आभ्यन्तर प्रयत्न व बाह्य यत्न या दोन्ही प्रकारच्या यत्नाना लौकिक व्यवहारात प्रयत्न असे म्हणण्याची चाल आहे हे ध्वनित करण्याकरिता दीक्षितानी कौमुदीत ठिकठिकाणी बाह्य यत्नाच्या ठिकाणी देखील प्रयत्न हा शब्द वापरला आहे) नासिका ह कशा रीतीनें उच्चारणस्थान ठरते यासबधानें इतर ग्रन्थात–शब्देन्दुशेखरात– चर्चा केली आहे (त्या ग्रन्थात नागेशानी नासिकास्थानासबधाने बरीच विस्तृत चर्चा केली आहे व ती सपूर्ण चर्चा येथें विस्तारभयास्तव देता येत नाही तरी पण त्या चर्चेचा जो सारांश सभापतिमिश्रानी आपल्या टिप्पणीत दिला आहे तो पुढें लिहिल्याप्रमाणे आहे–'यद्देशावच्छिन्नवायुसंयोगाद् यद्वर्णस्वरूपोपलब्धिस्तद्देशीयत्वमेव तस्य इति नियम, अत एव अकारादीना कण्ठादिदेशावच्छिन्नवायुसंयोगेन स्वरूपोपलब्ध्या तत्तद्देशत्वमेव तेषाम्, नासिकायास्त्वकारादिषु आनुनासिक्यगुणजनकत्वात्न तत्स्थानत्वम्। ङकारादीनां तु तत्तद्वर्गीयस्थाननासिकोभयावच्छिन्नवायुसंयोगेनैव स्वरूपोपलब्ध्या उभयस्थानत्वम्।' या वरील सारांशाचा भावार्थ हा आहे की, मुखातील ज्या स्थानाचे ठिकाणी वायूचा आघात

होऊन ज्या वर्णांची उत्पत्ति होते ते त्या वर्णांचे स्थान होय असा नियम आहे त्यामुळें कण्ठादि स्थानाचे ठिकाणी वायूचा आघात होऊन अकारादिवर्णांची उत्पत्ति व अभिव्यक्ति होत असल्यामुळें ती ती स्थानेच त्या त्या अकारादिवर्णांची ठरतात नासिका हे त्याचे स्थान नव्हे, कारण नासिकेचा उपयोग केल्याने त्या अकारादि वर्णांचे ठिकाणी आनुनासिक्यरूप गुण उत्पन्न होतो वर्गांतील पञ्चम वर्णांचे उच्चारण करतेवेळी ज्या वर्गाची ती व्यञ्जने आहेत व त्या वर्गाचे जें स्थान आहे त्या स्थानाचे ठिकाणी व तसेच नासिकेचे ठिकाणी वायूचा आघात होऊन वर्गांतील पञ्चम वर्णांची उत्पत्ति व अभिव्यक्ति होत असल्यामुळे नासिका व तत्तद्वर्गीय स्थान ही दोन्ही त्याची उच्चारणस्थाने होतात ) 'एदैतो कण्ठतालु, ओदौतो कण्ठोष्ठम्' असे जें कौमुदीत म्हटले आहे ते शिक्षादि ग्रन्थात जें म्हटले आहे त्याचा केवळ अनुवाद करणारे वचन असल्यामुळें, म्हणजे पाणिनीय शिक्षेत 'एऐ तु कण्ठताल्व्या ओऔ कण्ठोष्ठजौ स्मृतौ' असे म्हटले असून त्या ग्रन्थात 'ए ऐ आ औ' हे वर्ण तपर करून पठित केले नाहीत आणि दीक्षिताचे वचन शिक्षेत दिलेल्या वरील श्लोकाचे केवळ अनुवादक असल्यामुळें, या ठिकाणी 'तपरस्तत्कालस्य' सू १५ या सूत्राची प्रवृत्ति होत नाही (व त्यामुळें ए ऐ ओ औ' या वर्णांनी जसे त्या दीर्घ अचाचे ग्रहण होते तसेच त्या प्लुत अचाचे देखील ग्रहण होते) असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे

मनोरमा- "पूर्वत्रासिद्धम्" । यद्यत्र स्वतन्त्रो विधिः स्यात्, तर्हि 'त्रिपादी पूर्वं प्रत्यसिद्धा' इत्येव लभ्येत, त्रैपादिकं तु पूर्वं प्रति परं नासिद्धं स्यादत आह–अधिकारोऽयमिति । यद्यत्र कार्यासिद्धत्वमिष्येत तर्हि पूर्वत्रासिद्धमिति 'मनोरथ' इत्यादावुत्वं न स्यात्, परत्वाद् "रो रि" इत्यस्य प्रसङ्गात् । तथा च "पूर्वत्रासिद्धे नास्ति विप्रतिषेधोऽभावादुत्तरस्य" इति सिद्धान्तो व्याकुप्येत । अमू, अमी, इत्यादि च न सिध्येदत आह–त्रिपादीति, परं शास्त्रमिति च । एतेन त्रिपाद्यां विहितं कार्यमसिद्धमित्यादि प्राचां ग्रन्थः परास्तः ।

'पूर्वत्रासिद्धम्' सू १२ हें सूत्र (अधिकारसूत्र न मानता) केवळ स्वतंत्र विधिसूत्र मानले तर, त्या सूत्राचा एवढाच अर्थ होईल की, सपादसप्ताध्यायीच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध आहे व त्यामुळें त्रिपादीतील पूर्व सूत्राच्या दृष्टीनें उत्तर सूत्रें असिद्ध ठरणार नाहीत. (ही आपत्ति टळावी म्हणून, प्रकृत सूत्रावरील कौमुदींत) 'अधिकारोऽयम्,' म्हणजे हें अधिकारसूत्र आहे, असें म्हटलें आहे (व हें अधिकारसूत्र मानल्यानें, त्रिपादीतील पुढील प्रत्येक सूत्राशीं हें सूत्र अन्वित होतें व त्यामुळें त्रिपादीतील पूर्व पूर्व सूत्राच्या दृष्टीनें उत्तरोत्तर सूत्र असिद्ध ठरतें येथें हें लक्षात ठेवावें की, वर जें दीक्षितानीं म्हटलें आहे तें 'पूर्वत्रासिद्धम्' हें विधिसूत्र आहे या पक्षाचें खण्डन करण्याकरिता म्हटलें नसून, हें सूत्र अधिकारसूत्र आहे हा पक्ष स्थापित करण्याच्या हेतूनें त्यांनीं तसें म्हटलें आहे प्रकृत सूत्र अधिकारसूत्र मानल्यानें विधिसूत्राचें प्रयोजन व अधिकारसूत्राचें प्रयोजन हीं दोन्ही प्रयोजनें सिद्ध होतात पण तें विधिसूत्र मानल्यास, अधिकारसूत्राचें प्रयोजन सिद्ध होऊं शकत नाहीं म्हणून तें अधिकारसूत्र मानणें आवश्यक आहे भाष्यकारानीं हेंच म्हटलें आहे व तें भाष्य शब्दरत्नांत देण्यात येईल आता दीक्षित कार्यासिद्धत्वपरक मानणें उचित नसून, शास्त्रासिद्धत्वपक्ष मानणेंच योग्य आहे हें सिद्ध करण्याच्या हेतूनें पुढील पंक्ति लिहितात ) जर प्रकृत सूत्र कार्याच्या असिद्धत्वाचें प्रतिपादक सूत्र आहे, (व शास्त्राच्या असिद्धत्वाचें प्रतिपादक सूत्र नाहीं) असें मानलें तर, या सूत्रान्वयें 'मनोरथ' या रूपाची उपपत्ति होणार नाहीं, कारण 'रो रि' सू १७३ हें परसूत्र असल्यामुळें, तें परसूत्र प्रथम प्रवृत्त होण्याचा प्रसंग येईल तसेंच 'पूर्वत्रासिद्धे नास्ति विप्रतिषेधोऽभावादुत्तरस्य,' म्हणजे सपादसप्ताध्यायीच्या दृष्टीनें त्रिपादी असिद्ध असल्यामुळें व त्रिपादीतील पूर्व पूर्व सूत्राच्या दृष्टीनें उत्तर सूत्रें असिद्ध असल्यामुळें आणि म्हणून तीं असिद्ध सूत्रें विद्यमानच नाहीत असें मानावें लागत असल्यामुळें 'पूर्वत्रासिद्धम्' हें सूत्र जेथें लागू

पडते तेथें 'विप्रतिषेधे परं कार्यम्' हें सूत्र लागू पडत नाहीं, असा जो सिद्धान्त आहे त्याशी (शास्त्रासिद्धत्वपक्ष न मानता कार्यासिद्धत्वपक्ष मानल्यास) विरोध येईल आणि 'अमू, अमी' इत्यादि रूपें सिद्ध होऊ शकणार नाहींत. (या पक्षाचें विवरण शब्दरत्नांत केलें जाईल.) म्हणून 'सपादसप्ताध्यायी प्रति त्रिपाद्यसिद्धा । त्रिपाद्यामपि पूर्वं प्रति परं शास्त्रमसिद्धं स्यात्' असें प्रकृत सूत्रावरील कौमुदींत म्हटलें आहे त्यामुळें 'त्रिपाद्या विहित कार्यमसिद्धम्' इत्यादि जें प्राचीन वैयाकरणाच्या ग्रन्थात म्हटलें आहे ते चूक ठरतें (प्रक्रियाकौमुदीकारानी प्रकृत सूत्राचें 'सपादसप्ताध्याय्यां विहितं कार्यं प्रतीह त्रिपाद्यां विहितमसिद्धं ज्ञेयम् । इह परमप्युत्तरोत्तरं कार्यं पूर्वं पूर्वं कार्यं प्रत्यसिद्धं ज्ञेयम् ।' असें व्याख्यान केलें आहे व त्याचे टीकाकार प्रसादकार व प्रकाशकार यानीहि त्याच मताचें समर्थन केलें आहे आणि दीक्षिताचा या मतावर कटाक्ष असून ते असें म्हणतात की, प्रक्रियाकौमुदीकार व त्याचे टीकाकार मानी जो कार्यासिद्धत्वपक्ष मानला आहे तो पक्ष भाष्यविरुद्ध असून शास्त्रासिद्धत्वपक्ष हाच सिद्धान्त पक्ष आहे व या पक्षाचें शब्दरत्नांत समर्थन करण्यांत येईल )

शब्दरत्न– नासिद्धं स्यादिति । ततश्च 'गोधुङ्मान्' इत्यादौ घत्वजश्त्वानुनासिकेषु भष्भावो न स्यात् । न चातिदेशान्तरत्वस्यापि त्रिपाद्यां प्रवृत्तौ न दोषः, सपादसप्ताध्याय्यामपि पूर्वं प्रति परासिद्धत्वापत्तेः । मध्ये पाठस्य, विप्रतिषेधसूत्रस्य च सामर्थ्याश्रयणे तु विनिगमनाविरहात् त्रिपाद्यामप्यप्रवृत्त्यापत्तिरिति भावः । रो रीत्यस्य प्रसङ्गादिति । सिद्धेऽसिद्धत्वारोपात् सूत्रोदाहरणसंपत्त्यें परत्वाल्लक्ष्ये कार्यप्रवृत्तेरावश्यकतया परत्वात् त्रैपादिके कार्यं जाते तत्राभावप्रतियोगित्वारोपेऽपि 'देवदत्तहन्तृहत'न्यायेन स्थानिभूतरोरभावात् "हृनि च" इत्यस्याप्राप्तिरिति भावः । स्पष्टं चेदं प्रकृतसूत्रे "अचः परस्मिन्" इत्यत्र, "षत्वतुकोः" इत्यत्र च भाष्ये ।

तथा चेति । शास्त्रस्य, तद्बोध्यकार्यस्य च शास्त्रज्ञानवेलायामसिद्धत्वाभावे "रो रि" इत्यादेः प्रसङ्गो चेत्यर्थः । व्याकृप्येनेति ।

त्वया विप्रतिषेधशास्त्रप्रवृत्तौ निमित्तस्य त्रैपादिकस्य शास्त्रजबोधविषयकार्यस्य, शास्त्रस्य वाऽसिद्धता वक्तुमशक्या, किन्तु लक्ष्ये जातस्य तस्य प्रवर्तमानसपादसप्ताध्यायीस्थकार्यदृष्ट्याऽसिद्धत्वं वाच्यम् । एवं च विप्रतिषेधाभावोपपादकहेतोरसिद्धिरिति भावः न च ममापि पूर्वपरपदयो पूर्वपरशास्त्रजन्यबोधविषयकार्यलक्षणमा शास्त्रे एव कार्यासिद्धत्वमिति वाच्यम्, लक्षणाया मानाभावात्, फलाभावात्, गौरवाच्च ।

('पूर्वत्रासिद्धम्' हे अधिकारसूत्र न मानता स्वतंत्र विधिसूत्र मानले तर, त्रिपादीतील पूर्व पूर्व सूत्राच्या दृष्टीने उत्तरोत्तर सूत्रें असिद्ध ठरणार नाहीत व) त्यामुळें 'गोधुङ्मान' इत्यादि स्थली घत्व, जश्त्व व अनुनासिक प्रथम केल्यास, भष्भाव होणार नाही ('गोदुह् + मतुप्' या स्थली 'दादेर्धातोर्घः' सू ३२५, 'एकाचो बशो भष्' सू ३२६, 'झलां जशोऽन्ते' सू ८४, व 'यरोऽनुनासिकेऽनुनासिको वा' सू ११६ ही सूत्रें प्रवृत्त केल्याने 'गोधुङ्मान्' हें रूप सिद्ध होते ही सर्व सूत्रें त्रिपादीत पठित आहेत व त्यांचा पूर्वपरक्रम वर दिल्याप्रमाणे आहे जर त्रिपादीतील पूर्व सूत्राच्या दृष्टीने पर सूत्र असिद्ध न मानले तर, 'विप्रतिषेधे परं कार्यम्' सू १७५ या वचनान्वयें उत्तर सूत्र प्रथम प्रवृत्त झाले पाहिजे पण जोपर्यंत 'दुह्' यातील हकाराचे जागी घकार केला जात नाही तोपर्यंत वरील चार सूत्रांपैकी 'यरोऽनुनासिके' या सर्वांत पलीकडे असलेल्या त्रैपादिक सूत्राची प्राप्तीच होऊ शकत नाही, कारण 'दुह्' यातील अन्त्य हकार हा यर नाही म्हणून 'दादेर्धातोर्घः' या प्रथम सूत्राने हकाराचा पहिले घकार करणे आवश्यक आहे घकार केल्यावर 'गोदुघ + मतुप्' अशी स्थिति झाली असता, 'एकाचो बशो भष्, झलां जशोऽन्ते, यरोऽनुनासिके' या तीन सूत्रांची प्राप्ति आहे या तीन सूत्रांपैकी 'यरोऽनुनासिके' हें सर्वांत पुढील सूत्र 'विप्रतिषेधे परं कार्यम्' या वचनान्वयें प्रथम प्रवृत्त केल्यास, घकार

या 'यर्' पुढें मकार हा अनुनासिक वर्ण येत असल्यामुळें, धकाराचे जागी अनुनासिक ङकार होऊन 'गोदुङ्+मतुप्' अशी 'प्रत्यये भाषायां नित्यम्'–सू ११६ वरील वार्तिक–या वार्तिकान्वयें स्थिति झाल्यावर 'एकाचो बशो भष्' हें सूत्र प्रवृत्त होऊ शकणार नाहीं, कारण 'दुङ्' हा एकाच् झषन्त नाही म्हणून 'गोधुङ्मान' हें इष्ट रूप सिद्ध होण्याकरिता 'दादेर्धातोर्घः' ह सूत्र प्रथम प्रवृत्त केल्यावर 'एकाचो बशो भष्' हें सूत्र प्रवृत्त करणे आवश्यक आहे, व ते सूत्र प्रवृत्त करून भष्भाव–धुघ्–व नतर घुग् असे जश्त्व केल्यावर 'यरोऽनुनासिके' या सूत्राची प्रवृत्ति केल्याने 'गोधुङ्मान्' ह इष्ट रूप सिद्ध होऊ शकते सारांश त्रिपादीतील पूर्व पूर्व सूत्राच्या-शास्त्राच्या-दृष्टीने उत्तरोत्तर सूत्र–शास्त्र–असिद्ध मानले तरच, पूर्व पूर्व सूत्र प्रथम प्रवृत्त केल्यानें, वर सांगितल्याप्रमाणे, वरील रूप सिद्ध होऊ शकते म्हणून 'पूर्वत्रासिद्धम्' हे स्वतंत्र विधिसूत्र न मानता अधिकारसूत्रच मानले पाहिजे या सूत्रावरील भाष्यात–८–२–१–भाष्यकार म्हणतात–'पूर्वत्रासिद्धमित्यधिकारोऽयं द्रष्टव्यः। किं प्रयोजनम्? परं परो योग पूर्वं पूर्वं योग प्रत्यसिद्धो यथा स्यात्। अनधिकारे हि सति समुदायस्य समुदायेऽसिद्धत्वं विज्ञायेत। तत्र को दोष। तत्रायमेष्टप्रसङ्गः। तत्राऽयमेष्ट प्रसज्येत। गोधुङ्मान् गुडलिण्मानिति,–घ-ढ-ढयो कृतयोर्जश्त्व इति ढत्व प्रसज्येत।' या भाष्याचा असा अर्थ आहे की, 'पूर्वत्रासिद्धम' हें अधिकारसूत्र न मानता स्वतंत्र विधिसूत्र मानल्यास, सपादसप्ताध्यायीरूप समुदायाच्या दृष्टीनें त्रिपादीरूप समुदाय असिद्ध ठरेल, पण त्रिपादीतील पूर्व पूर्व सूत्राच्या दृष्टीनें उत्तरोत्तर सूत्रें असिद्ध ठरणार नाहीत व त्यामुळें 'गोधुङ्मान् गुडलिण्मान्' हीं इष्ट रूपें सिद्ध होऊ शकणार नाहीत आणि या वरील दोन उदाहरणांत त्रैपादिक उत्तर सूत्रांनी घत्व, ढत्व प्रथम केल्यास, 'झय' सू १८९८ या त्रैपादिक पूर्व सूत्राने मतुप् प्रत्ययातील मकाराचे जागीं वकार

होण्याची आपत्ति येईल भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, 'दुह्' या दकारादि धातूतील अन्त्य हकाराचें 'दादेर्धा-तोर्घः' सू ३२५ या त्रैपादिक उत्तर सूत्रानें प्रथम घत्व केल्यास व तसेच 'लिह्' यातील अन्त्य हकाराचें 'हो ढः' सू ३२४ या उत्तर त्रैपादिक सूत्रानें प्रथम ढत्व केल्यास, 'गोधुघ्, गुडलिढ' यातील अन्त्य 'घ्, ढ्' या झयप्रत्याहारान्तर्गत वर्णापुढें मतुप्' प्रत्यय येत असल्यामुळे,, 'झयः' या पूर्व त्रैपादिक सूत्राची नतर प्रवृत्ति केल्याने, त्या 'मतुप्' प्रत्ययातील मकाराचे जागी वकार होण्याची आपत्ति येईल व वर दिलेली इष्ट रूपें सिद्ध होऊं शकणार नाहींत परंतु 'पूर्वत्रासिद्धम्' हे अधिकारसूत्र मानले असता, पूर्व पूर्व त्रैपादिक सूत्राच्या दृष्टीने उत्तरोत्तर त्रैपादिक सूत्र असिद्ध ठरत असल्यामुळें आणि 'गोदुह्, गोलिह्' अशा स्थितीत त्या पदाच्या अन्ती जो हकार आहे तो झय् नसल्यामुळें, 'झयः' या सूत्राची प्रवृत्ति होत नसून, उत्तर त्रैपादिक सूत्रानी घत्व, ढत्व केल्यावर तें घत्व, ढत्व 'झयः' या पूर्व त्रैपादिक सूत्राच्या दृष्टीने असिद्ध ठरत असल्यामुळें व हकारच विद्यमान आहे असे मानावे लागत असल्या-मुळे, तें पूर्व त्रैपादिक सूत्र प्रवृत्त होत नाही व 'मतुप्' प्रत्ययातील मकाराचे वत्व न होता वर दिलेली दोन इष्ट रूपें सिद्ध होतात या भाष्याला धरूनच शब्दरत्नातील वरील पंक्ति लिहिली आहे हें लक्षात ठेवावे ) इतर अतिदेशविधायक शास्त्राप्रमाणे 'पूर्वत्रासिद्धम्' हे सूत्र देखील त्रिपादीत प्रवृत्त केल्यास कांही दोष येत नाहीं असे कोणी म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर नाहीं, कारण सपाद सप्ताध्यायीमध्ये देखील पूर्वसूत्राच्या दृष्टीने परसूत्र असिद्ध ठरण्याची आपत्ति येईल (शंकाकाराची शंका अशी आहे की, जरी 'पूर्वत्रासिद्धम्' हे सूत्र स्वतन्त्र विधिसूत्र मानता येत नसलें तरी 'स्थानिवदादेशः' सू ४९ 'अन्तादिवच्च' सू ७५ इत्यादि अतिदेशविधायक सूत्राप्रमाणे ते देखील अतिदेशविधायकसूत्र मानावें हे खरें की, त्या सूत्रात

अतिदेशदर्शक 'वति' प्रत्यय लावून 'पूर्वत्रासिद्धवत्' असे सूत्र न करिता, 'पूर्वत्रासिद्धम्' असे सूत्र केले आहे तरी पण 'विनापि वतिम् वत्यर्थो गम्यते' व 'अन्तरेणापि वतिमतिदेशो गम्यते' असे भाष्यात ठिकठिकाणी म्हटले असल्यामुळे, प्रकृत सूत्रातील 'असिद्धम' या पदाचा 'असिद्धवत्' असा अर्थ करून ते सूत्र अतिदेशविधायकसूत्र मानता येते व ते तसे मानल्यास, ज्याप्रमाणे इतर अतिदेशविधायक-सूत्रे सपूर्ण अष्टाध्यायीत प्रवृत्त होत असतात त्याचप्रमाणे प्रकृत सूत्र देखील त्रिपादीत प्रवृत्त होऊ शकेल व त्यामुळे त्रिपादीतील पूर्व-सूत्राच्या दृष्टीने परसूत्र असिद्ध ठरण्यात काही अडचण येणार नाही या शकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, प्रकृत सूत्र अतिदेशविधायक सूत्र मानल्यास व इतर अतिदेशविधायक सूत्राप्रमाणे प्रकृत सूत्र अष्टाध्यायीत सर्वत्र प्रवृत्त केल्यास, ते सपादसप्ताध्यायीत देखील प्रवृत्त होईल व त्यामुळे सपादसप्ताध्यायी-तील देखील पूर्वसूत्राच्या दृष्टीने परसूत्र असिद्ध ठरण्याची आपत्ति येईल व 'विप्रतिषेधे परं कार्यम्' सू १७५ हे सूत्र व्यर्थ ठरेल म्हणून प्रकृत सूत्र अतिदेशविधायक सूत्र मानणे अयोग्य आहे आता शकाकार असे म्हणतो की, प्रकृत सूत्र अतिदेशविधायक सूत्र मानल्यास जर वर दाखविलेला दोष उद्भवतो तर त्याला परिभाषा मानावी व ते सूत्र परिभाषा मानल्यास, 'कार्यकाल सज्ञापरिभाषम्' प ३ या परिभाषान्वये ते कार्यकालपक्षात त्रिपादीतील प्रत्येक सूत्राजवळ, त्या सूत्राने कार्य करतेवेळी, उपस्थित होऊन व त्याशी अन्वित होऊन 'पूर्वं प्रति परमसिद्धम्' अशी व्यवस्था सहज सिद्ध होऊ शकेल या शकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, प्रकृत सूत्र, अष्टाध्यायीच्या प्रथमाध्यायात जेथे परिभाषा पठित केल्या आहेत तेथे पठित न करिता, मुद्दाम सपादसप्ताध्यायी व त्रिपादी या दोहोच्या) मध्ये पठित केले असल्यामुळे, तशा पाठाच्या सामर्थ्याचा व तसेच 'विप्रतिषेधे परं कार्यम्' या सूत्राच्या सामर्थ्याचा आश्रय

केल्यास या दोन सूत्रांपैकीं अमुकच सूत्र त्रिपादींत लागू पडावें असें म्हणण्यास कोणतेंहि प्रमाण उपलब्ध नसल्यामुळें, प्रकृत सूत्र त्रिपादीमध्यें देखील प्रवृत्त न होण्याची आपत्ति येईल. (प्रकृत सूत्र परिभाषाप्रकरणांत पठित न करितां सपादसप्ताध्यायीच्या नंतर व त्रिपादीच्या करितां पूर्वीं–आरंभीं–पठित केलें असल्यामुळें, अशा मध्यें केलेल्या पाठाच्या सामर्थ्यानें त्याला परिभाषा मानतां येत नाहीं. जर तें सूत्र परिभाषारूपानें पठित करावें असा पाणिनीचा हेतु असता तर, त्यानें तें सूत्र जेथें प्रथमाध्यायांत 'षष्ठी स्थानेयोगा, तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' इत्यादि परिभाषा पठित केल्या आहेत तेथें त्या परिभाषाप्रकरणांत पठित केलें असतें असें असून देखील भाष्यकाराच्या म्हणण्याप्रमाणें जर तें सूत्र परिभाषा आहे असें मानलें तर, 'षष्ठी स्थानेयोगा' १ १ ४९ या सूत्रावरील भाष्यांत सांगितल्याप्रमाणें तें सूत्र सर्वशास्त्रव्यापि होईल, म्हणजे त्या सूत्राची सपादसप्ताध्यायी व त्रिपादी या दोन्ही ठिकाणीं सारखीच प्रवृत्ति होईल. त्या भाष्यांत भाष्यकार म्हणतात–'अधिकारो नाम त्रिप्रकारः । कश्चिदेकदेशस्थः सर्वं शास्त्रमभिज्वलयति यथा प्रदीपः सुप्रज्वलितः सर्वं वेश्माभिज्वलयति ।' या भाष्याचा अर्थ असा कीं, अधिकार तीन प्रकारचा आहे. पहिला अधिकार–म्हणजेच परिभाषा–अशा प्रकारचा असतो कीं, तो स्वतः एकाच जागीं विद्यमान राहून, ज्याप्रमाणें चांगला पेटविलेला दिवा एकाच ठिकाणीं ठेवलेला असून सर्व घरांत उजेड पाडतो त्याप्रमाणें, सर्व शास्त्राला प्रकाशित करतो. सारांश परिभाषा ही वरील भाष्यान्वयें सर्वशास्त्रव्यापिनी आहे. म्हणून प्रकृत सूत्राला जर परिभाषा मानलें तर, त्याला स्वतंत्र विधिसूत्र मानतेवेळीं 'सपादसप्ताध्यायी प्रति त्रिपादी असिद्धा' असा जो त्याचा संकुचित अर्थ केला होता तसा अर्थ न होतां, 'पूर्वं प्रति परमसिद्धम्' असा त्याचा सामान्य अर्थ होईल, व अशा रीतीनें तें सूत्र सर्वशास्त्रव्यापि मानल्यानें सपादसप्ताध्यायींत देखील प्रवृत्त झाल्यास, सापादिक

'मनरु+रथ' अशी स्थिति झाली असता, 'हशि च' सू १६६ या सापादिक सूत्राची व तसेच 'रो रि' सू १७३ या त्रैपादिक सूत्राची प्राप्ति होते कार्यासिद्धत्वपक्षात सापादिक शास्त्राच्या दृष्टीने त्रैपादिक शास्त्र असिद्ध ठरत नसल्यामुळे व त्रैपादिक सूत्राने प्रथम कार्य केल्यावर ते कार्य सापादिक कार्य करतेवेळी असिद्ध ठरत असल्यामुळे आणि 'हशि च' या सूत्राच्या मानाने 'रो रि' हे परसूत्र असल्यामुळे, त्या पर त्रैपादिक सूत्राने प्रथम कार्य करून 'मनर्' यातील अन्त्य रुचा, म्हणजे रकाराचा, लोप केल्यास, 'मन+रथ' अशी स्थिति होईल व हे रुलोपरूप कार्य त्रैपादिक सूत्राने झाले असल्यामुळे, ते 'हशि च' या सापादिक सूत्राने होणाऱ्या कार्याच्या दृष्टीने असिद्ध मानता येईल, म्हणजे त्या सिद्ध कार्याचे ठिकाणी असिद्धत्वाचा आरोप करता येईल सारांश कार्यासिद्धत्वपक्षात कार्य झाल्यावरच ते असिद्ध मानता येते. कार्य जर केलेच नाही तर त्याच्या अभावी त्याचे ठिकाणी असिद्धत्वाचा आरोप कसा करता येणार, म्हणजे ते कार्य कसे असिद्ध मानता येणार ? म्हणून त्रैपादिक परसूत्राने कार्य प्रथम करणे भाग आहे व ते कार्य प्रथम केल्यावर जरी 'पूर्वत्रासिद्धम्' या सूत्राने ते प्रथम केलेले कार्य असिद्ध मानता आले तरी, ते कार्य केल्याने 'रु=र्' या स्थानीचे जागी 'रो रि' या सूत्राने लोपरूप आदेश होऊन 'रु' हा स्थानी नष्ट झाला असल्यामुळे, 'हशि च' या सापादिक सूत्राने 'रु' चे जागी उकारार्य करतेवेळी त्या नष्ट झालेल्या 'रु' स्थानीचा पुन्हा कसा प्रादुर्भाव होऊ शकणार, म्हणजे ज्या 'रु' चा लोपरूप कार्याने नाश झाला आहे त्या 'रु' चे पुनरुज्जीवन कसे होऊ शकणार ? एखाद्या मनुष्याने देवदत्ताचा प्राण घेतल्यावर देवदत्ताचा वध करणाऱ्या त्या पुरुषाचा प्राण घेतला तरी त्यामुळे जो देवदत्त एकदा मरून गेला आहे तो पुन्हा जीवन्त होऊ शकत नाही देवदत्ताचा वध करण्यास प्रवृत्त झालेल्या त्या पुरुषाचा त्याने देवदत्तास मारून टाकण्यापूर्वी नाश केला तरच देवदत्ताचे प्राण वाचू शकतात व हाच

देवदत्तहन्तृहतन्याय होय. हा न्याय वरील उदाहरणास लावल्यास, 'रो रि' या त्रैपादिक उत्तरसूत्राने 'र=र्' या स्थानीचा लोप प्रथम केल्यास तो नेहमीकरिता नाहीसा होत असल्यामुळें, 'हशि च' या सापादिक सूत्राने 'रु' चे जागी उकारादेश करतेवेळी तो नेहमीकरिता नष्ट झालेला 'रु' विद्यमान आहे असे मानता येणे शक्य नाही व त्यामुळें उत्व होऊं शकणार नाही व 'ढ्लोपे पूर्वस्य दीर्घोऽण' सू १७४ या सूत्राने 'मन', यातील अन्त्य अकार दीर्घ होऊन 'मनारथ' असे अनिष्ट रूप होण्याची आपत्ति येईल साराश कार्यासिद्धत्वपक्ष मानल्यास, 'मनोरथ' हे इष्ट रूप सिद्ध होऊ शकत नाही शास्त्रासिद्धत्वपक्ष मानला तरच ते रूप सिद्ध होऊ शकते, कारण त्या पक्षात 'रो रि' हे त्रैपादिक शास्त्र वरील उदाहरणात उपस्थित होताक्षणीच 'हशि च' हे सापादिक शास्त्र त्याचा बाध करून त्याला प्रवृत्त होऊ न देता स्वत च प्रवृत्त होते व अशा रीतीने 'रु' या स्थानीचे प्राण वाचत असल्यामुळें, त्या 'रु' च उत्व होऊन 'मन+उ+रथ' अशी स्थिति झाली असता, 'आद्गुण' सू ६९ या सूत्राने गुणरूप एकादेश होऊन 'मनोरथ' या इष्ट रूपाची सिद्धि होण्यात काही अडचण येत नाही म्हणून कार्यासिद्धत्वपक्ष न मानता शास्त्रासिद्धत्वपक्ष मानणेच योग्य आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे हाच पक्ष भाष्यकाराना मान्य आहे हे सिद्ध करण्याकरिता शब्दरत्नकार पुढील पंक्ति लिहितात) प्रकृत सूत्रावरील भाष्यात व 'अच परस्मिन्' १-१-५७ या सूत्रावरील भाष्यात आणि तसेच 'पत्वतुकोरसिद्ध' ६-१-८६ या सूत्रावरील भाष्यात हेच स्पष्ट केले आहे, म्हणजे शास्त्रासिद्धत्वपक्षच मानला आहे (प्रकृत सूत्रावरील भाष्यात-८-२-१-भाष्यकार म्हणतात- 'अथाऽसिद्धवचन किमर्थम् ?...पूर्वत्रासिद्धवचनमादेशलक्षणप्रतिषेधार्थमुत्सर्गलक्षणभावार्थं च । आदेशलक्षणप्रतिषेधार्थं तावत्-राजभि तक्षभि राजभ्या तक्षभ्याम् राजसु तक्षसु इति । नलोपे कृतेऽत्र

इत्यस्मावादय प्राप्नुवन्ति। असिद्धत्वान्न भवन्ति। उत्सर्गलक्षण-भावार्थं च–अमुष्मै अमुष्मात् अमुष्य अमुष्मिन्निति। अत्र मुभावेन इति स्मायादयो न प्राप्नुवन्ति, असिद्धत्वाद्भवन्ति।' या भाष्याचा थोडक्यात भावार्थ हा आहे की, प्रकृत सूत्रात 'असिद्धम्' हे पद अशाकरिता घातले आहे की, आदेशाच्या निमित्ताने जें कार्य प्राप्त होत त्याचा निषेध व्हावा, म्हणजे ते होऊ नये, व उत्सर्गाच्या–स्थानीच्या–निमित्ताने जी कार्ये प्राप्त होतात ती व्हावीत. या भाष्यावरील कैयटाची टीका अत्यन्त महत्त्वाची आहे व त्या टीकेत कैयटाने भाष्याचा गूढार्थ स्पष्ट केला आहे त्या टीकेत 'किं शास्त्रस्यासिद्धत्वमथ कार्यस्येति प्रश्न . सिद्धस्यासिद्धत्ववचनादतिदेश आश्रीयते। शास्त्रस्य चाऽसिद्धवद्भाव आश्रीयते, न तु कार्यस्य। अन्यथोत्सर्गलक्षणकार्यं न सिध्येत् राजभिरिति। नलोपशास्त्रमैमादिषु कर्तव्येष्वसिद्धत्वात्स्वकार्यं न प्रदर्शयतीत्यैसाद्यभाव। अमुष्मा इति। अदसो विभक्तौ त्यदाद्यत्वे कृते परत्वान्नित्यत्वाद्घोत्वप्रसङ्गादकारान्तत्वनिबन्धनस्मायाद्यप्रसङ्ग। उत्वशास्त्रस्याऽसिद्धत्वादप्रवर्तनात्पूर्वं स्मायादय पश्चादुत्वम्।' असे कैयटाने म्हटले आहे कैयटाच्या म्हणण्याचा भावार्थ हा आहे की, 'अथाऽसिद्धवचन किमर्थम्' असा जो वरील भाष्यात भाष्यकारानी प्रश्न केला आहे तो अशा हेतूने केला आहे की, प्रकृत सूत्र शास्त्रासिद्धत्वाचे प्रतिपादन करणारे सूत्र आहे किंवा कार्यासिद्धत्वाचे प्रतिपादन करणारे सूत्र आहे व या प्रश्नाचे उत्तर देताना भाष्यकारानी जें म्हटले आहे त्याचा अर्थ विशद करिताना कैयटाने 'शास्त्रस्य चाऽसिद्धत्वभाव आश्रीयते न तु कार्यस्य' असे स्पष्ट म्हटले आहे 'राजन् भिस्, राजन् भ्यस्' इत्यादि स्थली 'स्वादिष्वसर्वनामस्थाने' सू २३० या सूत्राने 'राजन्' या अङ्गाला पदसंज्ञा होत असल्यामुळें, 'न लोप प्रातिपदिकान्तस्य' सू २३६ या ज्या त्रैपादिक शास्त्राने 'राजन्' यातील अन्त्य नकाराचा लोप होतो ते त्रैपादिक शास्त्र 'अतो भिस ऐस्' सू २०३ व 'बहुवचने झल्येत्'

सू २०५ या सापादिक शास्त्राच्या दृष्टीने प्रवृत्त सूत्रान्वयें असिद्ध ठरत असल्यामुळें व अशा रीतीनें त्या असिद्ध शास्त्रानें झालेला नकारलोप झालाच नाहीं व 'राज' असें अदन्तअङ्ग नसून 'राजन्' असें नकारान्तच अङ्ग आहे असें मानावें लागत असल्यामुळें, त्या असिद्ध शास्त्रानें झालेल्या नकारलोपकार्याच्या निमित्तानें प्राप्त होणारे ऐस्त्व व एत्व होत नाहीं आणि 'राजैः राजेभ्य' अशी अनिष्ट रूपें न होता 'राजभिः राजभ्यः' अशी इष्ट रूपें सिद्ध होतात. त्याचप्रमाणे 'अदस् ङे, अदस् ङसि, अदस् ङस्, अदस् ङि' या रूपांत 'त्यदादीनामः' सू २६५ या सूत्रानें 'अदस्' यांतील अन्त्य सकाराचे जागीं अकारादेश होऊन व 'अतो गुणे' सू १९१ या सूत्रानें पररूप एकादेश होऊन जेव्हां त्या सापादिक सूत्रान्वयें 'अद' असें अदन्त अङ्ग होतें तेव्हां 'सर्वनाम्नः स्मै' सू २१५, 'ङसिङ्योः स्मात्स्मिनौ' सू २१६, 'टाङसिङसामिनात्स्याः' सू २०१ या सापादिक शास्त्रांनीं 'ङे, ङसि, ङस्, ङि' या विभक्तिप्रत्ययांचे जागीं अनुक्रमें 'स्मै, स्मात्, स्य, स्मिन्' या आदेशांची प्राप्ति होते आणि तसेच 'अदसोऽसेः' सू ४१९ या उत्तर त्रैपादिक सूत्रानें 'अद' यांतील 'द' चे जागीं मुत्वाची प्राप्ति होते. उत्तर त्रैपादिक सूत्रानें मुत्वकार्य प्रथम केल्यास अङ्गाचे अदन्तत्व नष्ट होऊन उदन्त अङ्ग होत असल्यामुळें, त्या पुढील विभक्तिप्रत्ययाचे जागीं वरील सापादिक सूत्रांनीं होणारे आदेश होऊं शकणार नाहींत व इष्ट रूपें सिद्ध न होण्याची आपत्ति येईल. परन्तु वरील सापादिक शास्त्राच्या दृष्टीने 'अदसोऽसेः' हें त्रैपादिक शास्त्र प्रवृत्त सूत्रान्वयें असिद्ध असल्यामुळें, म्हणजे त्या सापादिक शास्त्राच्या दृष्टीने 'अदसोऽसेः' या त्रैपादिक शास्त्राचा अभाव असल्यामुळें, तीं सापादिक शास्त्रें प्रथम प्रवृत्त होतात व त्या सापादिक शास्त्रान्वयें विभक्तिप्रत्ययाचे जागीं आदेश केल्यावर असिद्ध 'अदसोऽसेः' हें त्रैपादिक मुत्वशास्त्र नंतर प्रवृत्त होऊन 'अमुष्मै, अमुष्मात्, अमुष्य,

अमुष्मिन्' या इष्ट रूपाची सिद्धि होते. सारांश वरील भाष्यावरून व कैयटवृत्तीवरून हे स्पष्ट होते की, भाष्यकारानी कार्यासिद्धत्वपक्ष मानला नसून शास्त्रासिद्धत्वपक्षच मानला आहे. 'अचः परस्मिन्पूर्वविधौ' व 'षत्वतुकोरसिद्ध' या दोन्ही सूत्रावरील भाष्यात देखील भाष्यकारानी जसे प्रकृत सूत्रावरील भाष्यात व्याख्यान केले आहे तसेच व्याख्यान केले आहे म्हणून त्या दोन सूत्रावरील भाष्य येथे देण्याची आवश्यकता नाही कार्यासिद्धत्वपक्ष मानल्यास, त्रैपादिक परशास्त्र असिद्ध ठरत नसल्यामुळें आणि त्यामुळें 'विप्रतिषेधे परं कार्यम्' सू १७५ या सूत्राची त्रिपादीत प्रवृत्ति बंद करणे अशक्य असल्यामुळें, ते विप्रतिषेधसूत्र त्रिपादीत प्रवृत्त होईल व त्या सूत्राच्या बलावर पर त्रैपादिक शास्त्र सापादिक शास्त्राला व पूर्व त्रैपादिक शास्त्राला बाधून प्रथम प्रवृत्त होण्याची आणि त्यामुळें अनिष्ट रूपें होण्याची आपत्ति येईल ही आपत्ति टाळण्याकरिता शास्त्रासिद्धत्वपक्षच मानणे आवश्यक आहे या पक्षात सापादिक शास्त्राच्या व पूर्व त्रैपादिक शास्त्राच्या दृष्टीने त्रैपादिक पर शास्त्र असिद्ध ठरत असल्यामुळें व अशा रीतीने ही दोन पूर्व व पर शास्त्रें तुल्यबल ठरत नसल्याकारणाने त्या दोहामध्ये विरोध उत्पन्न होत नसल्यामुळें, 'विप्रतिषेधे परं कार्यम्' हे सूत्र त्रिपादीत प्रवृत्त होऊ शकत नाही व त्रैपादिक शास्त्र पर असून देखील पूर्व शास्त्राच्या दृष्टीने असिद्ध असल्यामुळें, ते असिद्ध शास्त्र प्रथम प्रवृत्त न होता सिद्ध शास्त्र प्रथम प्रवृत्त होऊन व नंतर असिद्ध शास्त्र प्रवृत्त होऊन शास्त्रासिद्धत्वपक्षात इष्ट रूपाची सिद्धि होण्यात कांही अडचण येत नाही म्हणून कार्यासिद्धत्वपक्ष मानल्याने उत्पन्न होणाऱ्या अनेक आपत्ति टाळण्याकरिता व इष्ट रूपाची सिद्धि होण्याकरिता शास्त्रासिद्धत्वपक्ष मानणेच योग्य आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे) 'तथा च ...इति सिद्धान्तो व्याख्येयः' या मनोरमेच्या पंक्तींतील 'तथा च' या पदाचा त्रैपादिक

शास्त्र व तसेच त्या शास्त्राने ज्ञात होणारें कार्य याचे ठिकाणी, त्या त्रैपादिक शास्त्राच्या अर्थाचा बोध होतेवेळीं, असिद्धत्वाचा अभाव मानल्याने, 'रो रि' इत्यादि त्रैपादिक शास्त्राची प्रवृत्ति होण्याचा प्रसङ्ग आला असता' असा अर्थ आहे (सारांश कार्या-सिद्धत्वपक्षात सापादिक शास्त्राच्या दृष्टीने त्रैपादिक शास्त्र असिद्ध ठरत नसल्यामुळे, ते पर त्रैपादिक शास्त्र प्रथम प्रवृत्त होऊन त्या सूत्राने होणारे कार्य प्रथम होईल व अनिष्ट रूपें सिद्ध होण्याची आपत्ति येईल ) 'सिद्धान्तो व्याकुप्येत' असे जें वरील मनोरमेच्या पङ्क्तीत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, ('विप्रतिषेधे पर कार्यम्' सू १७५ हे) विप्रतिषेधशास्त्र प्रवृत्त होण्यास निमित्त होणारे त्रैपादिक परशास्त्र किंवा त्या त्रैपादिक परशास्त्राने बोधित होणारे कार्य असिद्ध आहे असे तुम्हाला (कार्यासिद्धत्वपक्ष मानणाऱ्या वादीला) म्हणता येणे शक्य नाही, पण तुम्हाला एवढेंच म्हणता येणे शक्य आहे की, एखाद्या उदाहरणात त्रैपादिक सूत्राने झालेले कार्य पुढे प्रवृत्त होऊ पाहणाऱ्या सापादिक शास्त्राने होणाऱ्या कार्याच्या दृष्टीने असिद्ध आहे त्यामुळे 'विप्रतिषेधे पर कार्यम्' हे सूत्र तिपादीत प्रवृत्त होऊ शकत नाही या सबबाने भाष्यात (पूर्वत्रासिद्धे नास्ति विप्रतिषेधोऽभावादुत्तरस्य' असा) जो हेतु दिला आहे तो हेतु तुमच्या पक्षात (कार्यासिद्धत्ववादीच्या पक्षात) सिद्ध होऊ शकत नाही ('विप्रतिषेधे पर कार्यम' या सूत्राचा 'द्वयो शास्त्रयो तुल्यबलयो एकस्मिन् लक्ष्ये युगपत् प्राप्तौ सत्या, परमेव शास्त्र प्रवृत्तिमर्हति' असा अर्थ आहे या अर्थान्वये विप्रतिषेधशास्त्र प्रवृत्त होण्यास पर शास्त्र असणे, ते पर शास्त्र तुल्यबल असणे, व त्या परशास्त्राची एकाच लक्ष्याचे ठिकाणी जेथें पूर्व शास्त्र प्रवृत्त होऊ पाहत तेथें युगपत् उपस्थिति होणे, ही निमित्तें आवश्यक आहेत जर पर शास्त्र विद्यमानच नसले, किंवा विद्यमान असून ते विद्यमानच नाही असा त्याचे ठिकाणी आरोप होत असला, किंवा पूर्व शास्त्र

नित्य अथवा अन्तरङ्ग अथवा अपवादरूप असल्यामुळें पर शास्त्र बलहीन होते, तशा ठिकाणी विप्रतिषेधशास्त्र–सू १७५–प्रवृत्त होऊ शकत नाही कार्यासिद्धत्वपक्षवादी सापादिक शास्त्राच्या दृष्टीने त्रैपादिक शास्त्र असिद्ध आहे, म्हणजे विद्यमान नाही, किंवा पूर्व पूर्व त्रैपादिक शास्त्राच्या दृष्टोने उत्तरोत्तर त्रैपादिक शास्त्र असिद्ध आहे, म्हणजे विद्यमान नाही, असं मुळीच म्हणत नाही म्हणून त्याच्या पक्षात सापादिक शास्त्राच्या दृष्टीने त्रैपादिक शास्त्र विद्यमान आहे व तसेच पूर्व पूर्व त्रैपादिक शास्त्राच्या दृष्टीने उत्तरोत्तर त्रैपादिक शास्त्र विद्यमान आहे असेच मानले पाहिजे त्यामुळें एखाद्या उदाहरणात पूर्व सापादिक शास्त्र व पर त्रैपादिक शास्त्र एकेच वेळी उपस्थित झाले असता सापादिक शास्त्राच्या दृष्टीनें पर त्रैपादिक शास्त्र असिद्ध आहे, म्हणजे विद्यमान नाही, असें त्याला म्हणता येणे शक्य नसल्यामुळें, विप्रतिषेधसूत्र–सू १७५–प्रवृत्त होईल व पर त्रैपादिक सूत्रान प्रथम कार्य करणे भाग पडेल ते कार्य प्रथम केल्यावर तसे झालेले कार्य पूर्व सापादिक सूत्राने पुढें होणाऱ्या कार्याच्या दृष्टीने असिद्ध आहे एवढेच ता म्हणू शकतो पण भाष्यकारानी तर 'पूर्वत्रासिद्धे नास्ति विप्रतिषेधोऽभावादुत्तरस्य' असें म्हटले आहे भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे कीं, एखाद्या उदाहरणात पूर्व सापादिक शास्त्राचो व पर त्रैपादिक शास्त्राचो किंवा पूर्व व पर त्रैपादिक शास्त्राचो युगपत् प्राप्ति झाल्यान, सापादिक शास्त्राच्या दृष्टीने त्रैपादिक शास्त्राचा व तसच पूर्व त्रैपादिक शास्त्राच्या दृष्टीन उत्तर त्रैपादिक शास्त्राचा अभाव असल्यामुळें, 'विप्रतिषेधे परं कार्यम्' हे सूत्र अशा ठिकाणी प्रवृत्त होऊ शकत नाही सारांश विप्रतिषेधसूत्र प्रवृत्त न होण्यासबधाने 'अभावादुत्तरस्य' असा जो भाष्यकारानी हेतु दिला आहे तो हेतु कार्यासिद्धत्ववादोच्या पक्षात सिद्ध होत नाहो, म्हणजे चूक ठरू पाहतो, कारण कार्यासिद्धत्वपक्षवादी सापादिक शास्त्राच्या दृष्टीने त्रैपादिक

शास्त्र व पूर्व पूर्व त्रैपादिक शास्त्राच्या दृष्टीनें उत्तरोत्तर त्रैपादिक शास्त्र असिद्ध आहे, म्हणजे तें विद्यमान नाहीं, असें मुळींच म्हणत नाही हें वर सांगितलेंच आहे म्हणून त्यांच्या म्हणण्यांत व भाष्यकाराच्या म्हणण्यात उघड विरोध येत असल्यामुळें, त्याचें म्हणणे बरोबर मानता येत नाही व त्यामुळें कार्यासिद्धत्वपक्ष न मानता शास्त्रासिद्धत्वपक्षच मानणें योग्य आहे असा शब्दरत्नकाराचा म्हणण्याचा आशय आहे आता कार्यासिद्धत्वपक्ष मानला असता विप्रादीत विप्रतिषेधसूत्र–सू १३५–प्रवृत्त होण्याची आपत्ति येते, व तें सूत्र विप्रादीत प्रवृत्त होऊं नये नाही या सबबीने भाष्यकारानी 'अभावादुत्तरस्य' असा जो हेतु दिला आहे तो हेतु सिद्ध होऊं शकत नाहीं असें जे दोन दोष त्या पक्षावर दिले आहेत ते दोष वास्तविक त्या पक्षात येत नाहीत हें सिद्ध करण्याकरिता कार्यासिद्धत्वपक्षवादी असें म्हणतो की,) आमच्या पक्षात देखील 'पूर्व' या शब्दाचा 'पूर्वशास्त्रबोध्यकार्य' व 'पर' या शब्दाचा 'परशास्त्रबोध्यकार्य' असा लक्षणेने अर्थ मानल्यानें, परशास्त्रबोध्य कार्याचें ज्ञान होतेवेळीच त्या कार्याचें असिद्धत्व स्पष्ट होतें (व त्यामुळें पर त्रैपादिकशास्त्रबोध्य कार्याची व्यावृत्ति होते, म्हणजे असिद्ध ठरणारें ते कार्य न होता, सापादिकसूत्रविहित किंवा पूर्वत्रैपादिकसूत्रविहित कार्यच होते कार्यासिद्ध पक्षवादीच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, 'पूर्वत्रासिद्धम्' या सूत्रात आश्रित हाणाऱ्या 'पर' या शब्दाचा 'परशास्त्रबोध्यकार्य' असा लक्षणेने अर्थ केल्यास आणि त्याचप्रमाणें त्या सूत्रात उपात्त–गृहीत–असलेल्या 'पूर्व' या शब्दाचा 'पूर्वशास्त्रबोध्यकार्य' असा लक्षणेने अर्थ केल्यास, 'पूर्वत्रासिद्धम्' या अधिकारसूत्राचा 'पूर्वसापादिकशास्त्रबोध्यकार्यं प्रति त्रैपादिकशास्त्रबोध्यकार्यमसिद्धम्, पूर्वपूर्वत्रैपादिकशास्त्रबोध्यकार्यं प्रति उत्तरोत्तरत्रैपादिकशास्त्रबोध्यकार्यमसिद्धम्' असा अर्थ होतो त्यामुळें एखाद्या उदाहरणात सापादिक व त्रैपादिक शास्त्राची एकेच वेळी उपस्थिति आल्यास,

सापादिकशास्त्रबोध्यकार्याच्या दृष्टीनें त्रैपादिकशास्त्रबोध्यकार्ये, वर दिलेल्या अर्थान्वयें, असिद्ध ठरत असल्यामुळे, त्रैपादिकशास्त्रबोध्य-कार्याची व्यावृत्ति होऊन, म्हणजे ते कार्य न होता, सापादिकशास्त्र-बोध्यकार्यच प्रथम होतें त्याचप्रमाणे एखाद्या उदाहरणात पूर्व व पर त्रैपादिक शास्त्राची युगपत् प्राप्ति झाल्यास, वरील अर्थान्वयें, पूर्व-त्रैपादिकशास्त्रबोध्यकार्याच्या दृष्टीने परत्रैपादिकशास्त्रबोध्यकार्य असिद्ध ठरत असल्यामुळें, त्या परसूत्रानें पावलेलें कार्य न होता पूर्व सूत्राने पावलेलेच कार्य प्रथम होते 'पूर्वत्रासिद्धम्' या सूत्राचा जसा वर अर्थ केला आहे त्या अर्थान्वयें विप्रतिषेधसूत्र–सू १७५–त्रिपादीत प्रवृत्त होऊ शकत नाही, आणि म्हणून कार्यासिद्धत्वपक्षात विप्रतिषेध-सूत्र त्रिपादीत प्रवृत्त होण्याची आपत्ति येते असा जो दोष वर दिला आहे तो दोष मुळीच उद्भवत नाही त्याचप्रमाणें भाष्यवचनातील 'अभावा-दुत्तरस्य' या पदाचा 'अभावादुत्तरशास्त्रबोध्यकार्यस्य –म्हणजे सापादिक-शास्त्रबोध्यकार्याच्या दृष्टीनें त्रैपादिकशास्त्रबोध्यकार्याचा अभाव असल्यामुळें व तसेच पूर्वत्रैपादिकशास्त्रबोध्यकार्याच्या दृष्टीनें परत्रैपा-दिकशास्त्रबोध्यकार्याचा अभाव असल्यामुळें–असा अर्थ केल्यानें भाष्य-कारांनी विप्रतिषेधसूत्र त्रिपादीत प्रवृत्त न होण्यासबधानें जो हेतु दिला आहे तो हेतु कार्यासिद्धत्वपक्षात देखील सारखाच लागू पडतो म्हणून कार्यासिद्धत्वपक्ष सदोष व भाष्यविरुद्ध असल्यामुळें स्वीकारार्ह नाही हें म्हणणे अयोग्य ठरतें असा कार्यासिद्धत्वपक्षवादीच्या म्हणण्याचा भावार्थ आहे यावर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की कार्यासिद्धत्व-पक्षवादीनें 'पूर्व' व 'पर' या शब्दाचा वर सांगितल्याप्रमाणे जसा लक्षणेनें अर्थ केला आहे तसा) लक्षणेनें अर्थ करण्यास कोणताहि आधार नसल्यामुळें व तसा लाक्षणिक अर्थ केल्यानें कोणतेहि अधिक फल निष्पन्न होत नसल्यामुळें आणि लक्षणेने अर्थ करण्यात गौरव असल्यामुळें, तसा लक्षणेने अर्थ करून कसा तरी रीतीने कार्या-सिद्धत्वपक्ष स्थापित करणे अयोग्य आहे. ('पूर्व' व 'पर' या

शब्दाचा त्याच्या अभिधाशक्तीनें बोधित होणारा (पूर्वशास्त्र व परशास्त्र असा अर्थ आहे व त्यामुळें 'पूर्वत्रासिद्धम्' या अधिकारसूत्राचा 'पूर्वशास्त्रं प्रति परशास्त्रमसिद्धम्' असाच अर्थ होतो तसा अर्थ केल्याने सापादिक शास्त्राच्या दृष्टीनें शैपादिक शास्त्र असिद्ध ठरते व पूर्व-त्रैपादिक शास्त्राच्या दृष्टीनें परत्रैपादिकशास्त्र असिद्ध ठरतें त्यामुळें एखाद्या उदाहरणात सापादिक व त्रैपादिक शास्त्राची किंवा पूर्व व पर त्रैपादिकशास्त्राची युगपत् प्राप्ति झाल्यास, पूर्व शास्त्राच्या दृष्टीनें पर शास्त्र असिद्ध-विद्यमानच नाही असे-ठरून पूर्व शास्त्रच प्रवृत्त होते व त्या योगाने सर्व इष्ट रूपाची सिद्धि होते सारांश 'पूर्व' व 'पर' या शब्दाचा जो अभिधाशक्तिवाच्य अर्थ आहे तो मानल्याने सर्व इष्ट रूपें सिद्ध होऊ शकत असल्यामुळें, त्या शब्दाचा पूर्वशास्त्र-बोध्यकार्य व परशास्त्रबोध्यकार्य असा लक्षणेने अर्थ करण्याची गरज काय? भाष्यकारादिकानी त्या शब्दाचा तसा लक्षणेने अर्थ केला नसल्यामुळें, तसा अर्थ करण्यास कोणतेहि प्रमाण नाही अभिधा-शक्तिवाच्य अर्थ मानल्याने सर्व इष्ट रूपें सिद्ध न होता, लक्षणेने अर्थ केल्यानेच सर्व इष्ट रूपें सिद्ध होऊ शकत असती तर, अगतिक-गतिन्यायानें लक्षणा करणे योग्य झाले असते पण वर सांगितल्या-प्रमाणे तशी वस्तुस्थिति प्रकृत स्थली नाही तसेच लक्षणा करण्यात गौरवरूप दोष मानला आहे म्हणून अभिधाशक्तिवाच्य अर्थ मानल्यानेंच सर्व काम भागत असल्यामुळें, 'पूर्व' व 'पर' या शब्दाचा लक्षणेने अर्थ करून कसा तरी कार्यासिद्धत्वपक्ष स्थापित करण्याचा अट्टाहास करणे अनुचित आहे सारांश कार्यासिद्धत्वपक्ष न मानता, शास्त्रासिद्धत्वपक्ष मानणेच योग्य आहे असा शब्दरत्न-काराच्या म्हणण्याचा आशय आहे )

शब्दरत्न—ननु मनोरथे दर्शनाभावरूपे लोपेऽभावारोपस्य दर्शनारोपरूपत्वेन न दोष, अभावाभावस्य प्रतियोगिरूपत्वादित्यत आहअमू इत्यादि । 'अद अ औ' 'अद अ अस्' इत्यवस्थाया

जातस्योत्वस्य सपादसप्ताध्यायीस्थकार्यदृष्टयाऽसिद्धत्वेऽपि पूर्वरीत्याऽऽकाराभावेन पररूपाद्यनापत्तिः । मुत्वस्यासिद्धत्वनिषेधसामर्थ्यदितिद्वियेये उक्तन्यायाप्रवृत्तिरिति चेत् ? तेन शास्त्रासिद्धत्वमेव ज्ञापयितुं युक्तम् । एवं शीभावात्पूर्वम् "अदसोऽसे" इति मुत्वे दात्परकाराभावेन "एत ईत्" इति सूत्रमपि व्यर्थं सदत्रैव ज्ञापकमस्तु । न च "तौ सत" इत्यादिनिर्देशैर्बदत्तहन्तृहतन्यायोऽनित्य इति वाच्यम्, 'हते देवदत्ते तद्धन्तरि हतेऽपि नोन्मज्जनम्, हतत्वारोपे तु सुतराम्, हन्तुर्मृतस्य हनने तूज्जीवनमस्त्येव' इति न्यायशरीरम्, 'तौ' इत्यादौ वृद्धिहेतु पूर्वसवर्णदीर्घस्य हननीयमसजातीय प्रसङ्गमात्रम्, न तु हननस्थानीया लक्ष्ये प्रवृत्तिरिति न तत्रास्य न्यायस्य विषय इति तेनास्यानित्यत्वबोधनासम्भवात् । स्पष्टं चेदम् "स्वादिष्वसर्व" इति सूत्र कयटे । प्रकृते तु निरधिष्ठानारोपासम्भवेन हननसजातीय प्रयोगकार्यप्रवर्तनमावश्यकमेवेत्यन्यत्र विस्तरः । परास्त इति । 'विहितं कार्यम्' इत्यध्याहारे गौरवाच्च । किञ्च, त्रिपादी शास्त्रं तद्धि विधानकरणं न त्वधिकरणम् । त्रिपाद्या विद्यमानेन शास्त्रेण विहितं कार्यमिति व्याख्याने त्वत्यन्तं क्लिष्टतैतत्यपि बोद्धव्यम् ।

मनोरथ या उदाहरणात ( रा कि मू १७३ या सूत्रानें भाष्या र व्या-रेफाच्या-) अदर्शनरूप लोपाचे ठिकाणी त्या दर्शनाभावा या अभावाचा म्हणजे दर्शनाचा आरोप केल्याने (कार्यासिद्धत्वामुळे दर्शन) मनोरथ हे रूप सिद्ध होण्यात काही दोष येत नाही कारण अभावाचा अभाव प्रतियोगिरूप भावच असतो, अस यदाचित कार्यासिद्धत्वाभावादीचे म्हणणे असल्यास, दीक्षितांनी 'अस असा त्यादि न न सिद्धयेत' असे मनोरमेच्या पुढील पक्तीत म्हटले आहे ( अदर्शन लोप ' मू ५२ या सूत्रार्थे अदर्शनास लोप असे म्हणतात अदर्शन या शब्दाचा दर्शनाभाव असा अर्थ आहे जेथे लोप=दर्शनाभाव 'शास्त्रदृष्टया असिद्ध ठरतो, म्हणजे दर्शनाभाव शास्त्रात नाही असे मानावे लागत, तर्थे त्या दर्शनाभावाच ठिकाणी

अभावाचा आरोप करणें भाग पडतें तसा आरोप केल्यानें दर्शनाभावाभाव फलित होतो 'यस्याभावो विवक्ष्यते स प्रतियोगी' या वचनान्वयें, दर्शनाभावाचे प्रतियोगि दर्शन आहे व त्यामुळें दर्शनाभावाभाव या शब्दाचा प्रतियोगीरूप दर्शन असाच अर्थ होतो म्हणून 'मनस् + रथ = मनरु + रथ' या उदाहरणात 'रो रि' सू १७३ या त्रैपादिक सूत्राची प्रथम प्रवृत्ति केली तरी, त्या त्रैपादिक सूत्रानें 'मनरु' यातील अन्त्य 'रु = र्' चे ठिकाणी जें लोपरूप = दर्शनाभावरूप कार्य होतें ते 'हृशि च' सू १६६ या सापादिक शास्त्रानें होणाऱ्या उत्वकार्याच्या दृष्टीने कार्यासिद्धत्वपक्षात असिद्ध ठरत असल्यामुळें, 'रु = र्' चा लोप = दर्शनाभाव झालाच नाही असे मानले पाहिजे, म्हणजे रुच्या दर्शनाभावाचे ठिकाणी अभावाचा आरोप करणे भाग आहे तसा आरोप करणे म्हणजेच दर्शनाभावाभाव कल्पिणे होय, व तशी बुद्धि केल्यानें ज्या 'रु' च्या दर्शनाचा अभाव झाला आहे तो 'रु' विद्यमानच आहे असे मानावे लागत असल्यामुळें, 'हृशि च' हे सापादिक सूत्र नतर प्रवृत्त होण्यात काही अडचण येत नाही, व तें सूत्र प्रवृत्त होऊन रुचे उत्व झाल्यावर 'मन + उ + रथ' अशी स्थिति झाली असता, 'आदगुण' सू ६९ या सूत्राने 'अ + उ' याचे जागी 'ओ' असा गुणरूप एकादेश केल्याने 'मनोरथ' असे इष्ट रूप कार्यासिद्धत्वपक्षात देखील सिद्ध होऊ शकते म्हणून 'यद्यत्र' कार्यासिद्धत्वमिष्येत रो रि इत्यस्य प्रसङ्गात्' असे जें दीक्षितानीं मनोरमेंत म्हटले आहे ते अयोग्य ठरत असा कार्यासिद्धत्वपक्षवादीच्या म्हणण्याचा आशय आहे ही शका योग्य मानली तरी, शास्त्रासिद्धत्वपक्ष स्थापित करण्याकरिता 'अमू अमी इत्यादि च न सिद्ध्येत्' ही दुसरी पक्ति दीक्षितानी मनोरमेंत लगेच पुढें लिहिली आहे 'अमू, अमी' ही उदाहरणें अशी आहेत की, यात त्रैपादिक सूत्र प्रथम प्रवृत्त केल्यास लोपरूप–अभावरूप–कार्य होत नसून, 'द' चे 'अदसोऽसे' सू ४१९ या त्रैपादिक सूत्रानें भावरूप मुत्व होतें त्यामुळें 'मनोरथ' या

उदाहरणात 'रो रि' या त्रैपादिक सूत्रानें प्रथम केलेले रलोपरूप–रेफदर्शनाभावरूप–कार्य, 'हशि च' या सापादिक सूत्राने उत्वकार्य करतेवेळी, असिद्ध ठरत होतें व त्यामुळें दर्शनाभावाचे ठिकाणी अभावाचा आरोप केल्यानें 'र' विद्यमानच आहे असे ज्याप्रमाणे मानता येत होते तसं 'अमू, अमी' या वरील दोन उदाहरणात मानण्याचा प्रसङ्गच येत नाही म्हणून कार्यासिद्धत्वपक्ष मानल्याने जरी 'मनोरथ' हे रूप सिद्ध होऊ शकत असे मानले तरी, त्या पक्षात 'अमू, अमी' ही रूपें सिद्ध होऊ शकत नाहीत आणि म्हणूनच दीक्षितानी ती उदाहरणे मनोरमेंत मुद्दाम पुढें दिली आहेत असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा भावार्थ आहे व आता ते पुढील पङ्क्तीत ती रूपें कार्यासिद्धत्वपक्षात कशी सिद्ध होऊ शकत नाहीत याचे विवरण करितात ) 'अद+अ+औ' व 'अद+अ+अम्' अशा स्थितीत त्रैपादिक सूत्राने झालेले उत्व सापादिक सूत्राने होणाऱ्या कार्याच्या दृष्टीने जरी असिद्ध ठरते तरी, अकाराचा अभाव झाला असल्यामुळें, पूर्वी सांगितलेल्या रीतीनें, म्हणजे देवदत्तहन्तृहतन्यायान्वयें, पररूप इत्यादि कार्यें न होण्याची आपत्ति येते ('अदस्+औ' किंवा 'अदस्+जस' या स्थली 'त्यदादीनाम' सू २६५ या सूत्राने 'अदस्' यातील अन्त्य सकाराचे जागी अकार होऊन 'अद+अ+औ' व 'अद+अ+अम्' अशी स्थिति झाल्यावर 'अदसोऽसे' या त्रैपादिक सूत्राची व तसेच 'अतो गुणे' सू १९१ या सापादिक सूत्राची प्राप्ति होते त्रैपादिक सूत्र पर असल्यामुळें व कार्यासिद्धत्वपक्षात तें सापादिक शास्त्राच्या दृष्टीनें असिद्ध ठरत नसल्यामुळें ते त्रैपादिक सूत्र प्रथम प्रवृत्त केल्यास, 'अद' यातील दकाराचे जागी मकार व त्या पुढील अकाराचे जागी उकार होऊन 'अमु+अ+औ' व 'अमु+अ+अम्' अशी स्थिति झाली असता, 'अतो गुणे' या सापादिक सूत्रानें होणाऱ्या कार्याच्या दृष्टीने जरी त्रैपादिक शास्त्राने झालेले मुत्वकार्य असिद्ध मानले तरी, 'अद' यातील अन्त्य अकाराचे जागी उकारादेश होऊन अकार नाहींसा झाला असल्यामुळें, पूर्वी सांगितलेल्या देवदत्तहन्तृहतन्यायान्वयें त्या नष्ट

झाल्या अकाराचे पुनरुज्जीवन होणे अशक्य आहे, आणि अशा रीतीने 'अतो गुणे' हें सापादिक सूत्र प्रवृत्त होण्यास ज्या निमित्ताची, म्हणजे पूर्व अकाराची, आवश्यकता आहे ते निमित्त नाहींसे झाले असल्यामुळें, ते सूत्र प्रवृत्त होऊ शकत नाही व त्यामुळें पररूप एकादेश होऊ शकत नसल्यामुळें, 'अमू अमी' ही इष्ट रुपें कार्यासिद्धत्वपक्षात सिद्ध होऊ शकत नाहींत पण शास्त्रासिद्धत्वपक्ष मानल्यास, 'अदस + औ = अद + अ + औ' अशी स्थिति झाली असता, 'अतो गुणे' व 'वृद्धिरेचि' सू ७२ या सापादिक शास्त्राच्या दृष्टीने 'अदसोऽसे' सू ४१९ हें त्रैपादिक शास्त्र असिद्ध-म्हणजे विद्यमानच नाहीं असें-ठरत असल्यामुळें, ती सापादिक शास्त्रें प्रथम प्रवृत्त होऊन व पररूप एकादेश आणि नंतर वृद्धिरूप एकादेश होऊन 'अद + अ + औ = अद + औ = अदौ' अशी स्थिति झाल्यावर 'अदसोऽसे' हें त्रैपादिक शास्त्र नंतर प्रवृत्त केल्याने 'अदौ' यांतील दकाराचे जागी मकार व त्यापुढील 'औ' चे जागी दीर्घ ऊकार होऊन 'अमू' असे प्रथमेच्या द्विवचनाचे इष्ट रूप सिद्ध होते तसेच 'अदस् + जस = अद + अ + अस' अशा स्थितीत 'अतो गुणे,' 'जस शी' व 'आद्‌गुण' या सापादिक शास्त्राची व तसेच 'अदसोऽसे' या त्रैपादिक शास्त्राची प्राप्ति झाली असता, शास्त्रासिद्धत्वपक्षात सापादिक शास्त्राच्या दृष्टीने त्रैपादिक शास्त्र असिद्ध ठरत असल्यामुळें, ती सापादिक शास्त्रें प्रथम प्रवृत्त होऊन 'अद + अ + ई = अद + ई = अदे' अशी स्थिति झाल्यावर 'एत ईद्बहुवचने' सू ४३८ हे त्रैपादिक शास्त्र नंतर प्रवृत्त केल्याने 'अदे' यांतील दकाराचे जागी मकार व त्या पुढील एकाराचे जागी ईकार होऊन 'अमी' असे प्रथमेच्या बहुवचनाचे इष्ट रूप सिद्ध होते साराश कार्यासिद्धत्वपक्ष मानला असता 'अमू, अमी' ही इष्ट रूपें सिद्ध होत नसून शास्त्रासिद्धत्वपक्ष मानल्यानेच ती रूपें सिद्ध होऊ शकत असल्यामुळें, शास्त्रासिद्धत्वपक्ष मानणेच योग्य आहे असा शब्देन्दुशेखरकाराच्या म्हणण्याचा आशय आहे यावर कार्यासिद्धत्वपक्ष

वादीअसे म्हणतो की, ज्या देवदत्तहन्तृहतन्यायाचा आधार घेऊन कार्यासिद्धत्वपक्ष अयोग्य ठरविला जातो तो) वरील न्याय, 'न मु ने' सू ४३• या सूत्राने मुत्वाच्या असिद्धत्वाचा निषेध केला असल्यामुळें त्या निषेधक सूत्राच्या आरंभ सामर्थ्यानें, या विषयात, म्हणजे मुत्वाच्या विषयात, प्रवृत्त होत नाही ('अदस्+टा = अद+अ+आ' या स्थली 'आङो नाऽस्त्रियाम्' सू २४४ या सूत्राने 'आ' या तृतीयेच्या एकवचनाच्या प्रत्ययाचे जागी 'ना' हा आदेश करते-वेळी मुत्व असिद्ध ठरत नाही असे 'न मु ने' या सूत्रात सांगितले आहे. घिसंज्ञक शब्द असला तरच त्यापुढील 'टा = आ' या प्रत्ययाचे जागीं 'ना' हा आदेश होऊ शकतो 'अद+अ+आ' अशा स्थितीत 'अदसोऽसे' हे पर त्रैपादिक सूत्र प्रथम प्रवृत्त करून 'द' चे मुत्व केल्यास, 'अमु+अ+आ' अशी स्थिति होते व अशा स्थितीत 'अमु' या घिसंज्ञक शब्दाच्या व 'आ,' या प्रत्ययाच्या मध्यें अकाराचे व्यवधान राहत असल्यामुळें, 'आङो नाऽस्त्रियाम्' हें सूत्र प्रवृत्त होऊ शक्त नाही व अशा रीतीने 'न मु ने' हे सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते तें सूत्र चरितार्थ ठरण्याकरिता, मुत्वाच्या विषयात देवदत्तहन्तृहतन्याय लागू पडत नाही हे मानणे आवश्यक आहे तसे मानले म्हणजे, 'अद+अ+आ = अमु+अ+आ' या स्थलीं 'अदसोऽसे' या त्रैपादिक सूत्राने प्रथम केलेले मुत्वकार्य 'अतो गुणे' या सापादिक सूत्राने होणाऱ्या कार्याच्या दृष्टीने असिद्ध ठरत असल्या-मुळें, तें मुत्वकार्य झालेच नाही व दकारापुढील अकार विद्यमान आहे असे मानल्याने, 'अतो गुणे' हे सूत्र प्रवृत्त होऊ शकते व त्या सूत्राने पररूप एकादेश होऊन 'अद+आ' अशी स्थिति झाल्यावर 'अदसोऽसे' या सूत्राची पुन्हा प्रवृत्ति करून 'अमु+आ' अशी स्थिति झाली असता, ते मुत्व, "आ" चे जागी 'ना' हा आदेश करतेवेळीं 'न मु ने' या सूत्रान्वयें असिद्ध ठरत नसल्यामुळें व अशा रीतीनें 'अमु' हा शब्द 'शेषो घ्यसखि' सू. २४३ या सूत्रान्वयें घिसंज्ञक ठरत असल्यामुळें व त्याच्या लगेच पुढें 'आ' हा तृतीयेच्या

एकवचनाचा प्रत्यय आला असल्यामुळें, 'आङो नाऽस्त्रियाम्' या सापादिक सूत्रानें 'आ' चे जागी 'ना' असा आदेश होऊन 'अमुना' हें इष्ट रूप सिद्ध होऊ शकतें. पण मुत्वाच्या विषयात देवदत्तहन्तृहतन्याय लागू पडतो असें मानले तर, दकारापुढील ज्या अकाराचे जागी उकारादेश झाला आहे तो अकार नेहमीकरिता नाहीसा झाला आहे व त्याचे पुनरुज्जीवन होणें शक्य नाही असें मानावे लागेल व तसें मानल्यास, 'अतो गुणे' हें सूत्र प्रवृत्त होऊ शकणार नाही व पररूप एकादेश होऊ शकणार नाही व त्यामुळें 'अमु' व 'आ' या दोहोमध्यें अकाराचें व्यवधान राहील, आणि 'आङो नाऽस्त्रियाम्' हे सूत्र प्रवृत्त होऊ शकणार नाही व 'न मु ने' हें सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येईल म्हणून मुत्वाच्या विषयात वरील न्याय लागू पडत नाही हें 'न मु ने' या निषेधक सूत्राच्या आरम्भसामर्थ्यानेंच सिद्ध होतें असा कार्यासिद्धत्वपक्षवादींच्या म्हणण्याचा आशय आहे यावर शब्दरत्नकार असें उत्तर देतात की, मुत्वाच्या विषयात वरील न्याय लागू पडत नाही याचें 'न मु ने' हें सूत्र ज्ञापक आहे असे मानण्यापेक्षा) तें सूत्र शास्त्रासिद्धत्वपक्षाचें ज्ञापक आहे हेंच मानणें अधिक योग्य आहे म्हणजे असें मानण्यातच लाघव आहे ('अमू, अमुना' ही रूपें, मुत्वाच्या विषयात सार्वत्रिक देवदत्तहन्तृहतन्याय प्रवृत्त होत नाही एवढेंच मानल्यानें, कार्यासिद्धत्वपक्षात सिद्ध होऊ शकत नाहीत त्या पक्षात ती रूपें सिद्ध होण्याकरिता हें मानणें देखील आवश्यक आहे की, मुत्वाच्या विषयात 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्ति' हा सार्वत्रिक न्याय देखील लागू पडत नाही उदाहरणार्थ 'अदस्+औ=अद+अ+औ' अशा, स्थितीत 'अदसोऽसे' या पर त्रैपादिक सूत्राने प्रथम मत्व करून 'अम+अ+औ' अशी स्थिति झाली असता, पररूप एकादेशाचे निमित्त जो दकारापुढील अकार तो नष्ट झाल्यामुळें तो अकार विद्यमान आहे हें मानण्याकरिता, देवदत्तहन्तृहतन्याय मुत्वाचे विषयात लागू पडत नाही असें मानावे लागते तसें मानून

पररूप एकादेश केल्यावर 'अद+औ' अशी स्थिति झाली असता, पुन्हा 'द'चे मुत्व करावे लागतच व 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्ति' या न्यायाचे उल्लघन करून 'अदसोऽसे' हे सूत्र पुन्हा प्रवृत्त करावे लागते ते सूत्र प्रवृत्त करून 'अमु+औ' अशी स्थिति झाली असता, 'प्रथमयो पूर्व सवर्ण' सू १६४ या सापादिक शास्त्राने होणाऱ्या कार्याच्या दृष्टीनें त्रैपादिक मुत्वकार्य असिद्ध असल्यामुळें, पूर्वसवर्णदीर्घकार्य होऊ शकत नाही म्हणून दकारापुढील अकार विद्यमान आहे हे मानण्याकरिता पुन्हा देवदत्तहन्तृहतन्यायाचे उल्लघन करणे भाग पडते व 'अद औ' अशी पुन्हा स्थिति करावी लागते, कारण तसे केल्याशिवाय 'वृद्धिरेचि' सू ७२ हे सूत्र प्रवृत्त होऊ शकत नाही ते सूत्र प्रवृत्त करून 'अद+औ=अदौ' अशी स्थिति झाल्यावर पुन्हा 'लक्ष्ये लक्षणस्य सकृत् प्रवृत्ति' या न्यायाचे उल्लघन करून 'अदसो-ऽसे' हे सूत्र प्रवृत्त करावे लागत आणि ते सूत्र प्रवृत्त केल्याने 'अमू' असे रूप कार्यासिद्धत्वपक्षात अखेरीस सिद्ध होते साराश वरील दोन न्यायाचे पुन पुन्हा उल्लघन केले तरच 'अमू' हे रूप कार्यासिद्धत्व-पक्षात सिद्ध होऊ शकते हे उघड आहे कार्यासिद्धत्वपक्ष मानून एवढा सर्व क्लेश व वरील दोन सार्वत्रिक न्यायाचे उल्लघन सहन करण्यात गौरव असून त्यापेक्षा शास्त्रासिद्धत्वपक्ष मानण्यात लाघव आहे, कारण त्या पक्षात 'अतो गुणे' व 'वृद्धिरेचि' या सापादिक शास्त्राच्या दृष्टीने 'अदसोऽसे' हे त्रैपादिक शास्त्र असिद्ध असल्यामुळें, ते प्रथम प्रवृत्त होऊच शकत नाही व वरील दोन सापादिक शास्त्रे प्रथम प्रवृत्त होऊन 'अदस+औ = अद+अ+औ = अद+औ = अदौ' अशी स्थिति झाल्यावरच 'अदसोऽसे' हे त्रैपादिक शास्त्र अखेरीस प्रवृत्त होऊ शकते व ते प्रवृत्त केल्याने 'अमू' हे इष्ट रूप सिद्ध होते व अशा रीतीने ते रूप सिद्ध करण्यात कोणत्याहि न्यायाचे उल्लघन होत नाही म्हणून असा सदोष कार्यासिद्धत्वपक्ष स्थापित करण्याकरिता

मुत्वाच्या विषयात ‘देवदत्तहन्तृहत’ न्याय प्रवृत्त होत नाही याचे ‘न मु ने’ हे सूत्र ज्ञापक आहे असे मानण्यापेक्षा, ते सूत्र शास्त्रासिद्ध-त्वपक्षाचे ज्ञापक आहे हेच मानणे अधिक योग्य आहे , कारण त्या पक्षात ‘अदस्+टा = अद+अ+आ = अद+आ’ अशा स्थितीत ‘आ’ हा तृतीयेच्या एकवचनाचा प्रत्यय ‘अद’ या अदन्त शब्दापुढे आला असून घिसंज्ञक शब्दापुढे आला नसल्यामुळे, ‘आङो नाऽस्त्रियाम्’ या सूत्राची प्राप्तीच होत नाही व ‘आ’ या प्रत्ययाचे जागी ‘ना’ हा आदेश होऊ शकत नाही आणि ‘टाङसिङसामिनात्स्याः’ सू २०१ या सूत्राने त्या प्रत्ययाचे जागी ‘इन’ या आदेशाची प्राप्ती होते पण ‘इन’ आदेश न होता ‘ना’ हा आदेश होणेच इष्ट आहे व तसा आदेश होण्याकरिता ‘आ’ या प्रत्ययाचे पूर्वी घिसंज्ञक शब्द असणे आवश्यक आहे तसा घिसंज्ञक शब्द ‘आ’ या प्रत्ययाच्या लगेच मागे येण्याकरिता ‘अद’ यातील ‘द’ चे मुत्व करणे आवश्यक आहे. पण त्रैपादिक शास्त्र सापादिक शास्त्राच्या दृष्टीने शास्त्रासिद्ध-त्वपक्षात असिद्ध ठरत असल्यामुळे, ‘टाङसिङसाम्’ हे सापादिक शास्त्र प्रवृत्त होण्यापूर्वी ‘अदसोऽसे’ हे त्रैपादिक शास्त्र प्रवृत्त होऊ शकत नाही परंतु ते त्रैपादिक शास्त्र प्रथम प्रवृत्त केल्याशिवाय ‘अमुना’ हे इष्ट रूप सिद्ध होऊ शकत नाही. म्हणून ते इष्ट रूप सिद्ध होण्याकरिता ‘अदसोऽसे’ हे त्रैपादिक शास्त्र असून देखील प्रथम प्रवृत्त व्हावे व त्या शास्त्राने होणारे मुत्व ‘आङो नाऽस्त्रियाम्’ या सापादिक शास्त्राच्या दृष्टीने असिद्ध ठरू नये या हेतूने पाणिनीने ‘न मु ने’ हे सूत्र मुद्दाम केले आहे व अशा रीतीने ते सूत्र शास्त्रासिद्ध-त्वपक्षाचे ज्ञापक ठरते हे मानणे उचित असून तसेच मानण्यात लाघव आहे असा टीकाकाराच्या म्हणण्याचा आशय आहे.) याचप्रमाणे (‘अदस्+जस’ या स्थली ‘जसः शी’ सू २१४ या सूत्राने ‘जस’ चे जागी) ‘शी = ई’ असा आदेश करण्यापूर्वी ‘अदसोऽसे’ या सूत्राने मुत्व प्रथम केल्यास, दकारापुढे एकार येत नसल्यामुळे, ‘एत

ईद्बहुवचने' सू. ४३८ हें सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येते म्हणून ते सूत्र देखील शास्त्रासिद्धत्वपक्षाचेच ज्ञापक ठरते असे मानणे योग्य आहे (अदस्+जस् = अद+अ+अस्' अशा स्थितीत 'जस् = अस्' प्रत्ययाचे जागी 'जस शी' या सापादिक सूत्रानें ईकारादेश करण्यापूर्वी 'अद' यातील 'द' चे 'अदसोऽसे' या त्रैपादिक परसूत्रानें प्रथम मुत्व करून 'अमु+अ+अस्' अशी स्थिति झाल्यावर नतर 'जस' प्रत्ययाचे जागी इकारादेश केल्यास आणि 'आद्गुण' सू ६९ या सूत्राने 'अ+ई' याचा 'ए' असा सन्धि केल्यास, 'अमु+ए' अशी स्थिति होईल व या स्थितीत दकारापुढें एकार नसल्यामुळें, 'अदसो दात्परस्य एत ईत्स्यात्' असे विधान करणाऱ्या 'एत ईत्' या सूत्रान्वयें एकाराचे जागी ईकारादेश होऊ शकणार नाही व ते सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येईल तो आपत्ति टाळण्याकरिता शास्त्रासिद्धत्वपक्ष मानणेच योग्य आहे तो पक्ष मानल्यास, प्रकृत स्थली लागू पडणारीं सर्व सापादिक सूत्रें प्रथम प्रवृत्त करून 'अदस + जस्=अद + अ + अस्=अद + अस्=अद + ई=अदे' अशी स्थिति झाल्यावर नतर 'एत ईत' ह त्रैपादिक शास्त्र प्रवृत्त केल्यास, दकारापुढें एकार येत असल्यामुळें, त्या सूत्राने दकाराचे जागी मकार होऊन व एकाराचे जागी ईकार होऊन 'अमी' असे इष्ट रूप सिद्ध होण्यात काही अडचण येत नाही व अशा रीतीनें ते सूत्र शास्त्रासिद्धत्वपक्षाचेच ज्ञापक मानणे योग्य आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे), 'तौ सत्' सू ३१०६ इत्यादि सूत्रात 'तौ' असा निर्देश असल्यामुळें 'देवदत्तहन्तृहत' न्याय अनित्य ठरतो असे कार्यासिद्धत्ववादीचे म्हणणे असल्यास, ते म्हणणे बरोबर नाही त्या न्यायाचे स्वरूप असे आहे कीं, म्हणजे त्या न्यायाचा वास्तविक अर्थ असा आहे की, एखाद्याने देवदत्ताचा प्राण घेतल्यावर त्या वध करणाऱ्या पुरुषाचा जरी प्राण घेतला तरी देवदत्त पुन्हा जीवन होऊ शकत नाही त्या वध करणाऱ्या पुरुषाचा

प्राण न घेता तो मेला आहे असा त्याचे ठिकाणी केवळ आरोप केल्यास, देवदत्त जीवत होऊ शकत नाही हें तर अगदीच उघड आहे परंतु तो पुरुष देवदत्ताचा वध करण्यास प्रवृत्त झाला असता त्या वध करू पाहणाऱ्या पुरुषाचा वध केला तरच देवदत्ताचे प्राण वाचू शकतात. 'तौ' इत्यादि स्थली 'वृद्धिरेचि' या सूत्राचे हनन करणाऱ्या 'प्रथमयो पूर्वसवर्ण' या सूत्राची प्रवृत्ति हनन करण्याच्या उद्योगात आहे व हनन होण्याची केवळ प्राप्ति आहे अशा प्रकारची असून, लक्ष्याचे हनन केले आहे असा प्रकारची नाहीं म्हणून 'तौ' इत्यादि उदाहरणे या न्यायाचे विषयच नव्हत आणि त्यामुळें तो न्याय अनित्य आहे असे ज्ञापित होऊ शकत नाही ('तद्+औ' या स्थली 'त्यदादीनाम' सू २६५ या सूत्रानें 'तद्' यातील दकारचे जागी अकार होऊन व 'अतो गुणे' सू १९१ या सूत्रानें पररूप एकादेश होऊन 'तद्+औ=त+अ+औ=त+औ' अशी स्थिति झाली असता, 'त' यातील अन्त्य अकारापुढें 'औ' हा एच् असल्यामुळें 'वृद्धिरेचि' सू ७२ या सूत्राची प्राप्ति होते त्याचप्रमाणे 'त' यातील 'अ' या 'अक्' पुढें 'औ' हा प्रथमेच्या द्विवचनाचा प्रत्यय असल्यामुळें 'प्रथमयो पूर्वसवर्ण' सू १६४ या सूत्राची प्राप्ति होते, व तसेच 'त' यातील अकारापुढें इच्प्रत्याहारान्तर्गत वर्णानें युक्त होणारा 'औ' हा प्रत्यय असल्यामुळें 'नादिचि' सू १६५ या पूर्वसवर्णदीर्घनिषेधक सूत्राची प्राप्ति होते 'प्रथमयो पूर्वसवर्ण' हें परसूत्र 'वृद्धिरेचि' या पूर्व सूत्राचे बाधक असून, 'नादिचि' हे सूत्र 'प्रथमयो पूर्वसवर्ण' या सूत्राचे निषेधक सूत्र आहे 'वृद्धिरेचि' हें सूत्र वरील उदाहरणात प्रवृत्त होऊ पाहताच, त्या सूत्राचा वध-बाध-करण्याकरिता 'प्रथमयो पूर्वसवर्ण' हें प्रवृत्त होऊ पाहते पण या पर सूत्राने त्या पूर्व सूत्राचा वध करण्यापूर्वीच 'नादिचि' हें निषेधक सूत्र प्रवृत्त होऊन 'प्रथमयो पूर्वसवर्ण' या सूत्राचा वध करते त्यामुळें 'वृद्धिरेचि' या

सूत्राचे प्राण वाचतात व ते सूत्र प्रवृत्त होऊन आणि त्या सूत्रानें वृद्धिरूप एकादेश होऊन 'त+औ=तौ' असें इष्ट रूप सिद्ध होत जर 'प्रथमयो पूर्वसवर्ण' या सूत्राने 'वृद्धिरेचि' या सूत्राचा वध केल्यानतर 'नादिचि' हे सूत्र प्रवृत्त होऊन त्याने 'प्रथमयो पूर्वसवर्ण' या सूत्राचा वध केला असता आणि त्यानतर जर 'वृद्धिरेचि' या सूत्राचे पुनरुज्जीवन होऊन ते प्रवृत्त झाले असत तर देवदत्तहन्तृहतन्याय अनित्य मानता आला असता पण वर दिलेल्या प्रक्रियेवरून हे स्पष्ट होते की, 'तौ' या उदाहरणात तशी वस्तुस्थिति नसून 'प्रथमयो पूर्वसवर्ण' या सूत्राने 'वृद्धिरेचि' या सूत्राचा वध करण्यापूर्वीच 'नादिचि' हे सूत्र त्या वध करू पाहणाऱ्या सूत्राचा वध करून 'वृद्धिरेचि' या सूत्राचा प्राण वाचविते व त्यामुळें ते सूत्र प्रवृत्त होत आणि म्हणून 'तौ' या उदाहरणाने वरील न्याय अनित्य आहे असे मुळीच ज्ञापित होत नाही वास्तविक ते उदाहरण त्या न्यायाचा विषयच नाही ) 'स्वादिष्वसर्वनामस्थाने' सू १ ४ १७ या सूत्रावरील भाष्याच्या टीकेत कैयटाने हा विषय स्पष्ट केला आहे (त्या टीकेत 'यथा वृक्षावित्यत्र नादिचीति प्रतिषेधारम्भात्तद्विषये पूर्वसवर्णदीर्घस्याऽभावाद् वृद्धि प्रति बाधकत्वाऽभावाद् वृद्धि प्रवर्तते, तथेह सुवन्त पदमिति पदमञ्ज्ञेत्यर्थ ।' कैयटाने असे म्हटले आहे 'वृक्षौ' व 'तौ' ही उदाहरणे एकच प्रकारची आहेत व या उदाहरणाना देवदत्तहन्तृहतन्याय लागू पडत नाही व त्या न्यायाचे ती उदाहरणे विषय नसून हे वर सागितलेच आहे परतु 'अमू, अमी' इत्यादि उदाहरणे त्या न्यायाचे विषय आहेत हे सिद्ध करण्याकरिता शब्दरत्नकार पुढील पक्ति लिहितात ) परतु अधिष्ठानातिशय आरोप करणे समजत नसल्यामुळें, कार्यासिद्धत्वपक्षात 'अमू, अमी' इत्यादि प्रकृत उदाहरणात त्रैपादिक सूत्रानें प्रथम कार्य करणे आवश्यक आहे व ते कार्य हनन करणाऱ्या कार्यामार्गे आहे या विषयासबधानें इतर ग्रन्थात–शब्देन्दुशेखरात–विस्तृत चर्चा केली

आहे ('पूर्वत्रासिद्धम्' या सूत्रावरील शेखरात नागेश म्हणतात 'अत्र कार्यासिद्धत्वेऽमू इत्याद्यसिद्धिः। अद अ औ इति स्थिते परत्वान्मुत्वे तस्य सपादसप्ताध्यायीस्थकार्यदृष्ट्याऽसिद्धत्वेऽपि देवदत्त-हन्तृहतन्यायेनाकाराभावेन पररूपाद्यनापत्तिः। असिद्धत्वस्याऽऽरोपत्वात्तदारोपाधिष्ठानारोपासम्भवेन कार्यप्रवृत्तेरत्र पक्षे आवश्यकत्वात्।' याच पङ्क्तींचा शब्दरत्नात अनुवाद केला आहे व या पङ्क्तीचा असा भावार्थ आहे की, शुक्तिकादि असल्याशिवाय रजताचा आरोप करणें व तसेच रज्ज्वादि असल्याशिवाय सर्पाचा आरोप करणे शक्यच नाहीं म्हणजे आरोप करण्याकरिता अधिष्ठानाची आवश्यकता आहे कार्यासिद्धत्वपक्षात कार्य प्रथम केल्यावरीज असिद्धत्वाचा आरोप करता येत नाही ते कार्य केल्यावरच ते असिद्ध आहे असा त्या कार्याचे ठिकाणी असिद्धत्वाचा आरोप करता येणे शक्य आहे म्हणून 'अद+अ+औ' या स्थली कार्यासिद्धपक्षात प्रथम मुत्वकार्य करणे आवश्यक आहे व ते मुत्वकार्य केल्यानंतरच त्याचे ठिकाणी असिद्ध-त्वाचा आरोप करता येणे शक्य आहे, कारण जर प्रथम कार्य केलेच नाही तर असिद्धत्वाचा आरोप कशाचे ठिकाणी करता येऊ शकणार? आता हे मुत्वकार्य असे आहे की ते करतेवेळी दकारापुढील अकाराचे जागी उकारादेश होऊन अकाराचा नाश होतो 'स्थानिवदादेश' १·१·५६ या सूत्रावरील भाष्यात स्थानी व आदेश यांची व्याख्या सांगताना भाष्यकारांनी 'स्थानी हि नाम यो भूत्वा न भवति। आदेशो हि नाम योऽभूत्वा भवति,' म्हणजे जो पूर्वी असून मागून नाहीसा होतो त्याला स्थानी म्हणतात व जो पूर्वी नसून मागाहून उत्पन्न होतो त्याला आदेश म्हणतात असे म्हटले आहे या भाष्यावरून हे स्पष्ट होते की, आदेश हा स्थानीचा नाश करतो म्हणून 'द्' पुढील अकाराचे जागी उकारादेश केल्यावर अकार नेहमी-करिता नाहीसा होत असल्यामुळें, उत्वाचे ठिकाणी जरी असिद्ध-त्वाचा आरोप केला तरी, अकाराचे पुनरुज्जीवन होणे शक्य नाहीं व त्यामुळें 'अमू, अमी' इत्यादि उदाहरणात देवदत्तहन्तृहतन्याय

लागू पडतो, व तो न्याय लावल्यास, पररूप एकादेशाचे निमित्त जो अकार तो नेहमीकरिता नष्ट झाला असल्यामुळें, पररूप एकादेश होऊ शकत नाही व त्यामुळें कार्यासिद्धत्वपक्षात 'अमू, अमी' इत्यादि रूपें सिद्ध होऊ शकत नाहीत म्हणून तसा दोषयुक्त पक्ष न मानता शास्त्रासिद्धत्वपक्ष मानणेच योग्य आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे ) मनोरमेंत जी कारणे देऊन 'प्राचा ग्रन्थः परास्त ' असे म्हटले आहे त्या कारणाशिवाय (कार्यासिद्धत्वपक्षाचे खण्डन करण्याकरिता) दुसरे असेहि कारण देता येत की, 'विहित कार्यम्' असा अध्याहार करण्यात गौरव आहे ('पूर्वत्रासिद्धम्' या सूत्रात जेवढे शब्द पठित आहेत तेवढ्यानीच त्या सूत्राचा अर्थ स्पष्ट होऊन शास्त्रासिद्धत्वपक्ष सिद्ध होतो पण कार्यासिद्धत्वपक्ष सिद्ध करण्याकरिता 'सपादसप्ताध्याय्या विहित कार्यं प्रतीह त्रिपाद्या विहितमसिद्ध ज्ञेयम् । इत परमप्युत्तरोत्तर कार्यं पूर्वं पूर्वं कार्यं प्रत्यसिद्ध ज्ञेयम् ।' असा 'विहित कार्यम्' या पदाचा अध्याहार करून वरील सूत्राचा अर्थ करावा लागतो व तसे करण्यात गौरव असून 'सपादसप्ताध्यायीं प्रति त्रिपाद्यसिद्धा । त्रिपाद्यामपि पूर्वं प्रति परं शास्त्रमसिद्धम् ।' असा कोणत्याहि पदाचा अध्याहार न करिता त्या सूत्राचा जसा कौमुदीत अर्थ केला आहे तसा अर्थ करण्यातच लाघव आहे व असा स्वाभाविक रीत्या होणारा त्या सूत्राचा अर्थ केल्याने शास्त्रासिद्धत्वपक्षच सिद्ध होत असल्यामुळें, कार्यासिद्धत्वपक्ष मानणे अयोग्य आहे ) दुसरे असे की, त्रिपादी हें शास्त्र आहे व ते विधानाचे 'अधिकरण' नसून 'करण' आहे म्हणून ('पूर्वत्रासिद्धम्' या सूत्राचा अर्थ करिताना प्रक्रियाकौमुदीकारानी त्रिपादी हें अधिकरण मानून वर सागितल्याप्रमाणे जसा 'त्रिपाद्या विहित कार्यम्' असा अर्थ केला आहे तसा अर्थ न करिता त्या सूत्राचा) 'त्रिपाद्या विद्यमानेन शास्त्रेण विहित कार्यं सपादसप्ताध्याय्या विद्यमानेन शास्त्रेण विहित कार्यं प्रति असिद्धम्' असा अर्थ करावा लागेल व असा अर्थ करण्यात अत्यन्त क्लिष्टता आहे

हें देखील उघड आहे (सपादसप्ताध्यायी जसें शास्त्र आहे त्याच-प्रमाणे त्रिपादी देखील जरी असिद्धकाण्ड आहे तरी शास्त्रच आहे या दोन्ही शास्त्रातील प्रत्येक सूत्र शास्त्रच आहे; कारण त्या प्रत्येक सूत्राने कशाचें तरी विधान केलें जातें आणि 'शिष्यते अनेनेति शास्त्रम्' अशी 'सर्वधातुभ्य ष्ट्रन्' उणादि सू ५९८ या सूत्रान्वयें 'शास्' धातूहून 'ष्ट्रन्' हा औणादिक प्रत्यय होऊन 'शास्त्र' या शब्दाची व्युत्पत्ति होत असल्यामुळें, तो शब्द प्रत्येक विधायक सूत्राला लागू पडतो अशा रीतीने प्रत्येक सूत्राने कार्यादिकाचें विधान केले जात असल्यामुळें, प्रत्येक सूत्र–शास्त्र–त्या विधानाचें साधन–करण–ठरते उदाहरणार्थ 'इको यणचि' सू ४७ हें शास्त्र यणादेशाचें विधान करणारें असल्यामुळें, तें त्या कार्याचें करण–साधन–ठरतें असें असल्यामुळें, 'त्रिपाद्या विहित कार्यं प्रति' असा जो अधिकरणरूप अर्थ प्रक्रियाकौमुदीकारानी केला आहे तसा अर्थ करणें योग्य नसून, 'त्रिपाद्या विद्यमानेन शास्त्रेण विहित कार्यं प्रति' असा करणरूप अर्थ वास्तविक केला पाहिजे पण तसा अर्थ करतेवेळीं किती तरी शब्दाचा अध्याहार करून कार्यासिद्धत्वपक्ष सिद्ध करण्याकरिता प्रकृत सूत्राचा ओढून ताणून अर्थ करावा लागतो व तसा अर्थ करण्यात अत्यन्त क्लिष्टता असून गौरवरूप दोष येतो म्हणून अशा रीतीनें, कार्यासिद्धत्वपक्ष स्थापित करण्याकरिता, प्रकृत सूत्राचा क्लिष्टतऱ्हेनें अर्थ करण्यापेक्षा त्या सूत्राचा सहज रीतीनें होणारा अर्थ केल्याने बोधित होणारा शास्त्रासिद्धत्वपक्ष मानणेंच उचित आहे येथें हे सागणें आवश्यक आहे की, शास्त्रासिद्धत्वपक्षात सापादिक शास्त्राच्या दृष्टीनें त्रैपादिक शास्त्र व पूर्व त्रैपादिक शास्त्राच्या दृष्टीने परत्रैपादिक शास्त्र असिद्ध ठरत असल्यामुळें, या पक्षात देखील सापादिक शास्त्राच्या दृष्टीनें पूर्वी झालेलें किंवा युगपत् प्राप्त होणारें त्रैपादिक कार्य व तसेंच पूर्व त्रैपादिक शास्त्राच्या दृष्टीने पूर्वी झालेलें किंवा युगपत प्राप्त होणारें पर त्रैपादिक कार्यें असिद्ध ठरतेंच पण या पक्षात ते स्वतत्र रीतीनें असिद्ध ठरत नसून

असिद्धशास्त्रद्वारा, म्हणजे शास्त्राच्या असिद्धत्वामुळें, त्याचे असिद्धत्व फलित होते या विषयासंबधानें भैरवीकारानी प्रकृत सूत्रावरील शब्दरत्नाची टीका करिताना 'न च शास्त्रासिद्धत्वस्वीकारेऽपि राजभ्याम्, वृक्ष इह, इत्यस्यासिद्धिरेव, शास्त्रस्यासिद्धत्वेऽपि कार्यस्य सिद्धतया दीर्घादि प्रवृत्त्यापत्तेर्दुर्वारत्वादिति वाच्यम्, शास्त्रस्यासिद्धत्व-प्रतिपादनद्वारा कार्यासिद्धत्वस्य प्रतिपादनात । एवं च यत्र सपादस-प्ताध्यायीस्थशास्त्रस्य त्रैपादिकस्य च युगपत प्राप्तिस्तत्र पर शास्त्रम-सिद्धम् = अवृत्तमित्यनेन बोधने सति परशास्त्रेण लक्ष्ये कार्यगस्कार-बुद्धिर्न भवति । यत्र तु न द्वयोर्युगपत प्राप्तिस्तत्र त्रैपादिके जातेऽपि शास्त्रेऽभावारोपे तन्निष्पाद्यकार्येऽप्रवृत्तत्वज्ञानन प्रसक्त सपादसप्ताध्या-योस्थ काय भवत्येव ।' असे म्हटले आहे )

मनोरमा-विवृण्वते क्ण्ठमिति । विवार एषा प्रयत्न इति भाव । वर्गयमगा इति । वर्गगा, यमगाश्चेत्यर्थ । कादय इति । लोकप्रसिद्धपाठापेक्षमिदम्, चतुर्दशसूत्र्या मावसानत्वायोगात् । अर्द्ध-विसर्गेति । सादृश्यमुच्चारणे, लेखने च बोध्यम् । ऋलृवर्णयोरिति । ऋ च ऋ च ऋलौ, तौ च तौ वर्णौ चेति विग्रह । उश्च उल् च ऋलौ, तयोर्वर्णयोरिति वा, प्रथमान्तेन, परिनिष्ठितविभक्त्या वा विग्रह इति सिद्धान्तात् । "ऋत्यक" इति प्रकृतिभाव ।

('पूर्वत्रासिद्धम्' सू १२ ग सूत्रावरील कौमुदीत ज्या दोन कारिका पठित केल्या आहेत त्यातील) 'विवृण्वते कण्ठम्' या पदाचा 'याचा विवार हा बाह्य यत्न आहे, असा अर्थ आहे तसेच त्या कारि-कातील 'वर्गयमगा ' या पदाचा ('द्वन्द्वान्ते श्रूयमाण पद प्रत्येक सम्बध्यते' या न्यायान्वयें) 'वर्गगा, यमगा ' असा अर्थ होतो या सूत्रावरील कौमुदीत 'कादयो मावसाना स्पर्शा ' असे जें म्हटले आहे ते लौकिक व्यवहारात प्रसिद्ध असलेल्या वर्णपाठाला अनुसरून म्हटले आहे, कारण चतुर्दश शिवसूत्रात (ककारानें सुरू होणारा व) मकारानें संपणारा स्पर्शवर्णांचा पाठ नाही (शिवसूत्रात स्पर्शवर्णांना

पाठ इष्ट प्रत्याहार सिद्ध होण्याकरिता भिन्न क्रमाने केला आहे, व तो अकाराने सुरु होऊन असून णकारानें संपतो ) 'अर्धविसर्गसदृशौ जिव्हामूलीयोपध्मानीयौ,' म्हणजे जिव्हामूलीय व उपध्मानीय अर्धविसर्गासारखे आहेत, असे जें या सूत्रावरील कौमुदीत म्हटले आहे त्याचे कारण हें की, उच्चारण्यामध्यें व लिहिण्यामध्यें त्याने अर्धविसर्गाशी सादृश्य आहे (विसर्ग लिहिताना एक वर व दुसरा त्याचे खाली असा दोन वर्तुळाचा उपयोग केला जात असून, जिव्हामूलीय व उपध्मानीय लिहिताना एक वर व एक खाली असा दोन अर्ध वर्तुळाचा उपयोग केला जात असतो तसेच विसर्गाच्या उच्चारणास जो काल लागतो त्याच्या अर्धाकाल जिव्हामूलीय व उपध्मानीय याच्या उच्चारणास लागतो म्हणून त्याना 'अर्धविसर्गसदृशौ' असे म्हणतात प्रकृत सूत्रावरील कौमुदीत पठित केलेल्या) 'ऋऌवर्णयो मिथ सावर्ण्यं वाच्यम्' या वार्तिकातील 'ऋऌवर्णयो' या पदाचा 'ऋ च ऋ च रलौ, तौ च तौ वर्णौ च ऋऌवर्णौ' असा, किंवा 'उरच उल् च ऋऌौ, तयोर्वर्णयो' असा विग्रह होतो, कारण प्रथमान्त पदाचा उपयोग करून विग्रह करावा किंवा समास करून सिद्ध होणाऱ्या सामासिक शब्दाला ज्या विभक्तीचा प्रत्यय पुढे लावला जातो त्या विभक्तीचा प्रत्यय सामासिक शब्दातील दोन पदाना लावून व तशा दोन विभक्त्यन्त पदाचा उपयोग करून विग्रह करावा असा सिद्धान्त सांगितला आहे (वर दिलेल्या वार्तिकात 'ऋऌवर्णयो' अशा षष्ठ्यन्त सामासिक पदाचा उपयोग केला आहे या पदाचा दोन तऱ्हेने विग्रह करता येतो 'रलौ वर्णौ ऋऌवर्णौ' असा विग्रह करण्याचा एक प्रकार आहे, व लौकिक व्यवहारात हाच प्रकार सर्वत्र उपयोगात आणला जातो असा विग्रह करतेवेळी 'रलौ, वर्णौ' या दोन प्रथमान्त पदाचा उपयोग करून 'ऋऌवर्णौ' असे जें सामासिक रूप सिद्ध होतें त्याहून षष्ठीच्या द्विवचनाचा प्रत्यय करून 'ऋऌवर्णयो' असे रूप सिद्ध केले जातें विग्रह करण्याची दुसरी अशी देखील तऱ्हा आहे की, 'ऋऌवर्णयो' हा षष्ठ्यन्त शब्द

असल्यामुळें, 'रलौ वर्णौ' असा प्रथमान्त पदाचा उपयोग न करता, एकदमच 'ऋलो वर्णयो' असा षष्ठ्यन्त पदाचा उपयोग करून विग्रह करावा असा विग्रह केल्याने षष्ठ्यन्त सामासिक रूप सिद्ध होत असल्यामुळें, पुन्हा त्या सामासिक रूपाहून षष्ठीचा प्रत्यय करण्याची गरज पडत नाही 'ऋ+सु' किंवा 'लृ+सु' या स्थलीं 'ऋदुशनस्' सू या २७६ सूत्रानें 'ऋ' व 'लृ' याचे जागी 'अनङ्= अन्' आदेश होऊन 'अन्+सु' अशी स्थिति झाली असता 'सर्व-नामस्थाने चासम्बुद्धौ' सू २५० या सूत्रानें उपधा दीर्घ होऊन 'आन+सु' अशी स्थिति झाल्यावर 'हल्ङ्याब्भ्य' सू २५२ या सूत्रानें 'सु' प्रत्ययाचा लोप होऊन व नंतर 'न लोप प्रातिपदिका-न्तस्य' सू २३६ या सूत्रानें अन्त्य नकाराचा लोप होऊन, 'ऋ' व 'लृ' या प्रातिपदिकाचे 'आ' असे प्रथमेच्या एकवचनाचे रूप होतें 'ऋलृ+औ' या स्थली संदेह उत्पन्न न व्हावा म्हणून, 'ऋ' व 'लृ' याचा सवर्णदीर्घरूप सन्धि न करिता, 'ऋत्यक' सू ९२ या सूत्रानें विकल्पानें होणारा प्रकृतिभाव कायम ठेवला आहे हें लक्षात असू द्यावे 'आ च आ च रलौ = ऋलृ औ' या स्थलीं 'ऋलृ' या प्रातिपदिकापुढें 'औ' हा प्रथमा विभक्तीचा सर्वनामस्थानप्रत्यय आल्या असल्यामुळें, 'ऋतो ङिसर्वनामस्थानयो' सू २७५ या सूत्रानें लृकाराचा 'अ' असा गुण होऊन व 'उरणरपर' सू ७० या सूत्रानें त्या अकारापुढें लकार होऊन 'ऋ अल् औ' अशी स्थिति झाली असता, 'इको यणचि' सू ४७ या सूत्रानें 'ऋ' चा रकार होऊन 'र्+अल+औ = रलौ' असे रूप होतें 'रलौ वर्णौ = ऋलृवर्णौ' या स्थली, 'ऋलृ+ औ+वर्ण+औ' अशा अलौकिक विग्रहवाक्यात 'सुपो धातुप्रातिपदिकयो' सू ६५० या सूत्रानें 'औ' या दोन अन्तर्वर्ति विभक्तिप्रत्ययाचा लुक् होऊन 'ऋलृवर्ण' असे सामासिक प्रातिपदिक झाल्यावर त्याहून 'औ' हा विभक्तिप्रत्यय केला असता, 'ऋलृवर्णौ' असे रूप होतें 'र' हें 'ऋ' चे व 'उल्' हें 'लृ' चे षष्ठीचे एकवचन आहे व ही रूपें खाली दिलेल्या प्रक्रियेंप्रमाणें

सिद्ध होतात – 'ऋ+ङस' अथवा 'लृ+ङस्' या स्थली, 'ऋत उत्' सू. २७९ या सूत्रान्वयें 'ऋ' व 'ङस्' यातील अकार आणि तसेच 'लृ' व 'ङस्' यातील अकार या दोहोंचे जागी 'उ' असा एकादेश होतो व 'उरण्रपर' सू ७० या सूत्रान्वयें तो एकादेश अनुक्रमें रपर व लपर होऊन 'उरस्' व 'उलस्' अशी रूपें होतात, व 'रात्सस्य' सू २८० या सूत्राने 'उरस्' यातील अन्त्य सकाराचा लोप होऊन व 'खरवसानयोर्विसर्जनीय' सू ७६ या सूत्रानें रकाराचा विसर्ग होऊन 'उः' असे 'ऋ' चे षष्ठीचे एकवचन होतें, आणि 'उलस्' या स्थली 'संयोगान्तस्य लोप' सू ५४ या सूत्रान्वयें सकाराचा लोप होऊन 'उल्' असे 'लृ' चे षष्ठीच्या एकवचनाचें रूप होतें ) 'ऋत्यक' या सूत्रान्वयें, 'ऋॢवर्णयो' या स्थलीं, प्रकृतिभाव झाला आहे, म्हणजे 'ॠॣ' या संधि केला नाहीं

शब्दरत्न–लोकप्रसिद्धेति । "त्रिभिश्च मध्यमैर्वर्गैः" इति भाष्यपर्यालोचनया क–ख–ग–घ–ङेत्यादीनामप्यनादित्वमिति भावः। उच्चारणेति । पादमात्रिकाविमाविति भावः। लेखने चेति । अर्द्ध-वृत्तद्वयात्मकलिपित्वादिति भाव । रत्नाविति । "ॠ ॡ औ इति स्थिते "ऋत्यकः" इति प्रकृतिभावेन दीर्घाभावे, गुणे, यणि च रलावित्यस्य सिद्धि । उश्च उल् च ऋल्वोरिति पाठ । रल्वोरिति पाठे आगन्तुना उकारेण निर्देश इति बोद्धव्यम् । लयोर्वर्णयोरिति । "पूरणगुण" इति निषेधस्तु षष्ठीसमासस्य न तु कर्मधारयस्य' बहुलग्रहणेन तदभावो भाष्योदाहृतविषय एव नान्यत्रेति भाव । प्रथमान्तेनेति । प्रथमोपस्थितत्वादिति भाव । अथ पक्ष 'अनेकमन्यपदार्थे" इति सूत्रे भाष्ये । परिनिष्ठितेति । अत्र च "एकविभक्ति चापूर्वनिपाते" इति ज्ञापकम् । अन्यथा 'मालामतिक्रान्तः' इति विग्रहेऽतिपदस्यापि नियतविभक्त्यन्तत्वेनैकविभक्तीत्यस्य व्याप्त्यलाभ । एकस्यानियतविभक्तित्वे हि तद्वारणाय "एकविभक्ति" इति सार्थकम् परिनिष्ठितविभक्त्या समासे त्वतिक्रान्तमतिक्रान्तेनेत्यादिक्रमेण तस्यानियतविभक्तिकत्व

**स्पष्टमेव। अत एव "तत्पुरुषे तुल्यार्थ:" इति सूत्रे भाष्ये परमे कारके, परमेण कारकेणेत्यादावतिप्रसङ्गमाशङ्क्य प्रतिपदोक्त-परिभाषया समाहितमिति भावः।**

'कादय इति लोकप्रसिद्धपाठापेक्षमिदम्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा भावार्थ हा आहे की, 'त्रिभिश्च मध्यमैर्वर्गै' अशा रीतीने भाष्यात वर्गांचा उल्लेख केला असल्यामुळें, त्या भाष्यावरून हें सिद्ध होतें की, 'क, ख, ग, घ, ङ' इत्यादि वर्णपाठ देखील (शिवसूत्रांतील वर्णपाठाप्रमाणे) अनादि आहे (तुल्यास्यप्रयत्नं सवर्णम्' १ १ ९ या सूत्रावरील भाष्यात 'त्रिभिश्च मध्यमैर्वर्गैर्ल-शमैरच व्यवायेन,' म्हणजे आदि कवर्ग व अन्त्य पवर्ग या दोन वर्गाच्या मध्यें चवर्ग, टवर्ग व तवर्ग हे जे तीन वर्ग आहेत त्यातील वर्णांचे, शिवा लकाराचे शिवा शकाराचे अथवा सकाराचे व्यवधान असल्यास णत्व होत नाही, हे वचन पठित आहे व याच अर्थाचे 'चुटुतुलशर्व्यवाये नेति वक्ष्यामि' हे वचन देखील तेथेंच पठित आहे, आणि त्या भाष्यात बाह्य यत्न कोणते आहेत हें सांगताना भाष्य-कारांनी 'तत्र वर्गाणां प्रथमद्वितीया विवृतकण्ठाः श्वासानुप्रदाना अघोषाः तृतीयचतुर्थाः संवृतकण्ठा नादानुप्रदाना घोषवन्तः ...तथा तृतीयास्तथा पञ्चमा आनुनासिक्यवर्ज्यम्।' असे म्हटले आहे म्हणजे भाष्यकारांनी लोकांत प्रसिद्ध असलेल्या वर्गांचा व त्या वर्गांतील वर्णक्रमाचा भाष्यात ठिकठिकाणी उल्लेख केला असल्यामुळें, ककारादि मकारान्त वर्णपाठ देखील माहेश्वरसूत्रांतील वर्णपाठा-सारखा अनादि आहे हे सिद्ध होतें) जिह्वामूलीय व उपध्मानीय यांचे उच्चारण अर्धविसर्गसदृश असल्यामुळें, त्याची एकचतुर्थांश मात्रा समजावी ('हयवरट्' या शिवसूत्रावरील भाष्यात भाष्यकारांनी विसर्गादि अयोगवाहांचा, 'शर्षु जश्भावषत्वे' हे वार्तिक पठित करून, शर्प्रत्याहारांत पाठ केला असल्यामुळें व अशा रीतीने विसर्ग हा हल् ठरत असल्यामुळें आणि हल् हा अर्धमात्रिक असल्यामुळें, अर्धविसर्ग-सदृश जिह्वामूलीय व उपध्मानीय यांची एकचतुर्थांश मात्रा होते)

'लेखने च' असे जें मनोरमेंत म्हटलें आहे त्याचे कारण हें की, जिह्वामूलीय व उपध्मानीय हे दोन अर्ध वर्तुळांनी दर्शविले जातात. (विसर्ग दोन पूर्ण वर्तुळांनी दर्शविला जात असल्यामुळें व हे अर्ध-विसर्गसदृश असल्यामुळें, हे दोन अर्ध वर्तुळांनी दर्शविले जातात) 'ऋ लृ औ = रलौ' अशा स्थितीत 'ऋत्यक' सू ९७ या सूत्रानें प्रकृतिभाव केला असल्यामुळें, ('अकः सवर्णे दीर्घः' सू ८५ या सूत्रानें होणारें) दीर्घकार्य न होता, गुण व यणादेश होऊन 'रलौ' असे रूप सिद्ध झालें आहे (याची प्रक्रिया पूर्वी मनोरमेंत दिलेच आहे) शब्देन्दुशेखरात 'आ च आ च रलौ, तौ वर्णौ ऋलृवर्णौ' असा विग्रह केला नसून 'आ च लृवर्णश्च ऋलृवर्णौ' असा विग्रह केला आहे व तसा विग्रह करण्याचें कारण 'ननु आ च आ च रलौ इति मनोरमोक्त विग्रह किमिति द्वितीय प्रकार आश्रीयते इति-चेन्टृ, न पदान्ता परेऽस्य सन्धीति भाष्यप्रामाण्येन एका-रान्तानामसमियानेन आ च आ चनि विग्रहस्य वक्तुमशक्य-त्वात्' असें अभिनवचन्द्रिकेंत दिलें आहे) 'उश्च ऊश्च' अशा रीतीनें विग्रह केल्यास, 'ऋलौ' हाच पाठ बरोबर आहे जेथें मनोरमेच्या कांहीं प्रतींत 'रलौ' असा पाठ आढळतो तेथें आगन्तुक अकारानें निर्देश केला आहे असें समजावें ('उश्च ऊश्च ऋलौ' या विग्रहवाक्याचें 'ऋ ङस् लृ टस् आम्' असें अलौकिक-प्रक्रियावाक्य होत असल्यामुळें 'सुपो धातुप्रातिपदिकयोः' सू ६५० या सूत्रानें अन्तर्वर्ति 'सुप्' या दोन विभक्तिप्रत्ययांचा लुक् केला असता, 'ऋ लृ औम्' अशी स्थिति होऊन व 'ऋ लृ' या स्थली 'ऋत्यक' या सूत्रानें प्रकृतिभाव केला असल्यामुळें सन्धिकार्य न होता केवळ 'लृ' चे जागीं 'इको यणचि' सू ४७ या सूत्रानें लकारादेश होऊन 'ऋल्+औम्=ऋलौ.' असेच षष्ठीच्या द्विवचनाचें रूप होतें, 'रलौ' असें रूप मुळींच होऊं शकत नाहीं प्रकृतिभाव न केल्यास, 'ऋलृवर्णयो मिथः सावर्ण्यं वाच्यम्' या वार्तिकान्वयें

'अक सवर्णे दीर्घ' या सूत्राने सवर्णदीर्घ होऊन 'ॠ ओस्=रो' असे रूप होऊ शकते तथापि मनोरमेच्या क्वचित् प्रतीत 'रलो' असा जो पाठ आढळतो त्याचे कसे तरी समर्थन करण्याकरिता शब्दरत्नकार असे म्हणतात की, 'ऋ लृ ओस्' या स्थली ऋकारापुढे आगन्तुक अकार घातला आहे असे समजावे तसे मानल्यास, ऋ अ लृ ओस्' अशी स्थिति होते व अशा स्थितीत 'इको यणचि' या सूत्राने ऋकाराचे जागी रकार व लृकाराचे जागी लकार होऊन 'रलो' असे रूप सिद्ध होऊ शकते हे खरे पण असा आगन्तुक अकार मध्ये घालण्याची गरज काय ? असा आगन्तुक अकार मध्ये घालणे हे 'आगन्तूनामन्ते सन्निवेश' या न्यायाच्या विरुद्ध देखील असल्यामुळे, 'रलो' हा पाठ वास्तविक अशुद्धच ठरतो, व तसा अशुद्ध पाठ न मानता 'ऋलो' हा साम्प्रदायिक पाठ मानणेच योग्य आहे असे शब्दरत्नकार वरील पङ्क्तीत ध्वनित करितात ) 'पूरणगुण' सू ७०५ हे सूत्र कर्मधारयाचा निषेध करणारे नसून षष्ठीसमासाचा निषेध करणारे असल्यामुळे, 'ऋलो वर्णयो ऋलृवर्णयो' हा समास साधु ठरतो ('विशेषण विशेष्येण बहुलम्' सू ७३६ या सूत्राचा 'विशेषण विशेष्येण सामानाधिकरण्येन समस्यते। बहुल-ग्रहणात् क्वचिन्न' असा अर्थ आहे, व विशेषणविशेष्याचा अशा रीतीने सामानाधिकरण्याने समास होत असल्यामुळे, 'तत्पुरुषः समानाधिकरण कर्मधारय' सू ७४५ या सूत्रान्वयें त्या सूत्रान होणारा समास कर्मधारय ठरतो 'पूरणगुण' हे सूत्र २–२–११ असून 'षष्ठी' हे सूत्र २–२–८ आहे व 'विशेषण विशेष्येण बहुलम्' हे सूत्र २–१–५७ आहे साराश 'पूरणगुण' या सूत्राच्या थोडेच पूर्वी 'षष्ठी' हे सूत्र अष्टाध्यायीत पठित असून, 'षष्ठी' या सूत्राच्या बरेच पूर्वी 'विशेषण विशेष्येण बहुलम्' हे सूत्र पठित आहे म्हणून 'अनन्तरस्य विधिर्वा भवति प्रतिषेधो वा'–परि ६२–या न्यायान्वयें 'पूरणगुण' हे सूत्र 'षष्ठी' सू ७०२ या सूत्राचे निषेधक ठरते,

'विशेषण विशेष्येण बहुलम्' या सूत्राचे निषेधक ठरत नाहीं म्हणून 'ऋतो वर्णयो ऋल्वर्णया' असा जो सामानाधिकरण्यानें समासा-तील दोन्ही पदें षष्ठीत, उच्चारून समास केला आहे तो वास्तविक षष्ठीसमास नसून कर्मधारयसमास असल्यामुळें, त्या समासाला 'पूरणगुण' हा निषेध लागू पडत नाही असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे 'विशेषण विशेष्येण बहुलम्' या सूत्रात) 'बहुलम्' या पदाचे ग्रहण केले असल्यामुळें भाष्यात जी उदाहरणे दिली आहेत तसाच स्थली तसा समास होत नाही, इतर स्थली तसा विशेषणविशेष्यसमास होऊ शकतोच ('समानाधिकरणेन षष्ठी न समस्यते' म्हणजे समानाधिकरणावरोबर षष्ठ्यन्ताचा समास होत नाही, असा निषेध 'पूरणगुण' २ २ ११ या निषेधक सूत्रात सांगितला असल्यामुळें व 'ऋतो वर्णया ऋल्वर्णया' या उदाहरणात षष्ठीसामानाधिकरण्य असल्यामुळें तसा समास होऊ शकत नाही अशी शाणी शंका केल्यास, त्या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'विशेषण विशेष्येण बहुलम्' या सूत्रात 'बहुलम्' या पदाचे ग्रहण केले असल्यामुळें व त्या पदाचा 'क्वचित् प्रवृत्तिः क्वचिदप्रवृत्ति क्वचिद्विभाषा क्वचिदन्यदेव' असा अर्थ असल्यामुळें, 'समानाधिकरणेन षष्ठी न समस्यते' हा निषेध 'पूरणगुण' २ २ ११ या सूत्रावरील भाष्यात 'सर्पिष पीयमानस्य, यजुष क्रियमाणस्य' इत्यादि जी उदाहरणे दिली आहेत त्यानाच लागू पडतो, इतर उदाहरणाना तो निषेध लागू पडत नाही म्हणून प्रकृत उदाहरणात 'ऋता' हें विशेषण असून 'वर्णया' हें विशेष्य असल्यामुळें, या स्थली जरी षष्ठीसामानाधिकरण्य आहे तरी, 'बहुल'पदग्रहणसामर्थ्यानें, तसा विशेषणविशेष्यसमास करतेवेळी, वरील निषेध लागू पडत नाही 'पूरणगुण' या सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात – 'समानाधिकरणे किमुदाहरणम् ? । राज्ञ पाटलिपुत्रकस्य, शुकस्य माराविदस्य, पाणिने सूत्रकारस्य । नैतदस्ति ।

असामर्थ्यादित्र न भविष्यति। कथमसामर्थ्यम् ? । समानाधिकरण-मसमर्थवद्भवतीति। इद तर्हि सर्पिष पीयमानस्य, यजुष क्रिय-माणस्येति। ननु चात्रापि असामर्थ्यादेव न भविष्यति। कथमसा-मर्थ्यम् ? । समानाधिकरणमसमर्थवद्भवतीति। अथान्वभिहितमित्येव तत्।' या वरील भाष्यातील 'राज्ञ पाटलिपुत्रकस्य' हें प्रतीक घेऊन कैयटाने असे म्हटले आहे की, 'विशेषणसमासोऽत्र भवत्येव, ततो विशेषणस्यैव पूर्वनिपात सिद्धो भवति। षष्ठीसमासे तु पूर्वनिपातानियम स्यादिति स प्रतिषिध्यते। विशेषणसमासे च वचनसामर्थ्यात्समानाधिकरणमसमर्थवदिति नाश्रीयते।' आता 'प्रथमान्तेन परिनिष्ठितविभक्त्या वा विग्रह' या मनोरमेंतील पक्तीत इतर विभक्तींचा निर्देश न करिता केवळ प्रथमाविभक्तीचा निर्देश करून) 'प्रथमान्तेन' असे जें म्हटले आहे त्याचे कारण हें की, प्रथमा विभक्ति प्रथम उपस्थित होते हा प्रथमान्त पक्ष 'अनेकमन्य-पदार्थे' सू २२४ या सूत्रावरील भाष्यात मागितला आहे (शब्दरत्नातील 'प्रथमोपस्थितत्वात्' या पदाचा भावप्रकाशकारानी 'प्रागुपस्थितनिमित्तकत्वेनान्तरङ्गत्वात्' असा अर्थ केला आहे व त्याचा भावार्थ हा आहे की, प्रथमा विभक्ति होण्यास 'प्रातिपदिकार्थ-लिङ्गपरिमाणवचनमात्रे प्रथमा' सू ५३० या सूत्रान्वयें केवळ प्रातिपदिकार्थरूप निमित्ताची अपेक्षा असून ते निमित्त प्रथम उपस्थित होत असल्यामुळें आणि द्वितीयादि विभक्ति होण्यास प्रातिपदिकार्थाशिवाय 'कर्मणि द्वितीया' सू ५३७, 'कर्तृकरणयोस्तृतीया' सू ५६१ इत्यादि सूत्रान्वयें कर्मादिकांची देखील अपेक्षा असून ती निमित्तें मागून पुढें उपस्थित होत असल्यामुळें 'पूर्वोपस्थितनिमित्तकमन्तरङ्गम् परोपस्थित-निमित्तकं बहिरङ्गम्' या न्यायान्वयें प्रथमा विभक्ति अन्तरङ्ग ठरून प्रथम उपस्थित होते, आणि म्हणूनच 'अनेकमन्यपदार्थे' सू ८३० या सूत्रातील 'अनेकम्' या पदाचा 'अनेकं सुबन्तम्' असा सामान्य अर्थ न करिता दीक्षितानीं कौमुदीत 'अनेकं प्रथमान्तम्' असा अर्थ केला

आहे व हा प्रथमान्त पक्ष 'अनेकमन्यपदार्थे' सू २ २ २४ या सूत्रावरील भाष्यात मागितला आहे त्या भाष्यात भाष्यकारानी त्या सूत्रातील 'अन्य, अनेक, पद, व अर्थ' ही चार पदें कशी आवश्यक आहेत यांची कारणे मागून नंतर 'उक्त वा' हे वार्तिक पठित केले आहे आणि त्या वार्तिकाचे व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात– 'किमुक्तम् ? । कर्मादीनामनुक्ता एकवाक्य इति कृत्वा साङ्ख्या भविष्यन्तीति । प्रथमा तर्हि न प्राप्नोति । समयाद्भविष्यति । यदि सामयिकी न नियोगत, अन्या कस्मात भवन्ति ? । कर्मादीनामभावात्। षष्ठी तर्हि प्राप्नोति ? । शेषलक्षणा षष्ठी, अशेषत्वात् भविष्यति । एवमपि व्यतिकर प्राप्नोति–एकस्मिनपि द्विवचनबहुवचने प्राप्नुत, द्वयोरप्येकवचनबहुवचने, बहुष्वप्येकवचनद्विवचने । अर्थतो व्यवस्था भविष्यति । अथ वा सङ्ख्या नामेय परप्रधाना । सङ्ख्येयमनया विशेष्यम । यदि चात्र प्रथमा न स्यात, सङ्ख्येयमविशेषित स्यात् । अथ वा वक्ष्यत्येतत्तत्र वचनग्रहणस्य प्रयोजनम्–उक्तष्वप्येकत्वादिषु प्रथमा यथा स्यात ।' असा रीतीने प्रथमान्त पक्ष या भाष्यात स्थापित केला असल्यामुळें, चित्रा गावो यस्य स चित्रगु, शबला गावो यस्य स शबलगु ' इत्यादि स्थळी प्रथमान्त पदांनीच विग्रह केला जाता आणि या भाष्याला अनुसरूनच दाक्षितानी 'रगो वर्गो ऋत्वर्गो तयो ऋत्ृवर्णयो ' असा प्रथमान्त पदानीं प्रथम विग्रह केला आहे) 'परिनिष्ठितविभक्त्या वा विग्रह अस जें मनोरमेत म्हटल आहे त्यात 'एकविभक्ति चापूर्वनिपात सू ६५५ हे सूत्र, म्हणजे या सूत्रातील 'एकविभक्ति' हे पद जावर आहे परिनिष्ठितविभक्तीन देखील विग्रह होतो असे न मानल व 'मालामतिक्रान्त ' या विग्रहात 'अति =अतिक्रान्त ' असा प्रथमान्त पदानेच विग्रह होतो असे मानल तर, 'अति' हे पद देखील ('माला' या पदासारखेंच) नियत-विभक्तिक ठरून वरील सूत्रातील 'एकविभक्ति' या पदाला कोणतेहि व्यावर्त्य मिळणार नाही, म्हणजे त्या पदानें विग्रहातील दोन पदार्थी

कोणतेहि पद वगळले जाणार नाही (आणि अशा रीतीनें विग्रहातील दोन्ही पदें नियतविभक्तिक ठरल्याने, वरील सूत्रातील 'एकविभक्ति' हे पद व्यर्थ ठरण्याची आपत्ति येईल) परंतु विग्रहातील दोन पदांपैकी एका पदास वाटेल ती विभक्ति करता येते असे मानल्यानेंच, विग्रहातील जें पद नियतविभक्तिक नसते, म्हणजे ज्याची विभक्ति बदलविता येते, त्याला उपसर्जनसंज्ञा न व्हावी याकरिता 'एकविभक्ति' हे पद अन्वर्थक ठरते 'मालामतिक्रान्तम्, मालामतिक्रान्तेन' इत्यादि भिन्न भिन्न विभक्त्यन्त पदानें विग्रह होऊं शकतो असे मानल्याने, 'अति' हे पद अनियतविभक्तिक आहे हें स्पष्ट होतें परिनिष्ठित विभक्तीने देखील विग्रह करता येतो असे असल्यामुळेंच, 'तत्पुरुषे तुल्यार्थ' सू ६–२–२ या सूत्रावरील भाष्यात 'परमे कारके, परमेण कारकेण' इत्यादि स्थली अतिव्याप्ति होण्याची आपत्ति येईल अशी शंका उपस्थित करून भाष्यकारानी लक्षणप्रतिपदोक्तपरिभाषा –प ११४–प्रवृत्त करून त्या शंकेचे समाधान केले आहे ('एक-विभक्ति चापूर्वनिपाते' सू ६५५ या सूत्रातील 'एकविभक्ति' या पदाचा 'एकैव विभक्तिर्यस्य तत्=नियतविभक्तिकम्,' म्हणजे विग्रहातील ज्या पदाला एकच प्रकारची विभक्ति होते व भिन्न भिन्न विभक्ति होत नाहीत ते नियतविभक्तिक पद होय, असा अर्थ असून, त्या सूत्राचा 'विग्रहे यन्नियतविभक्तिकम् तदुपसर्जनं स्यात्, न तु तस्य पूर्वनिपात' असा कौमुदीत अर्थ दिला आहे यावरून हे स्पष्ट होते की, विग्रहातील दोन्ही पदें नेहमी नियतविभक्तिक असतात असे नसून केव्हा केव्हा त्या दोन पदांपैकी एक पद अनियतविभक्तिक असते, म्हणजे त्याची विभक्ति बदलविता येते व त्याला भिन्न भिन्न विभक्तिप्रत्यय करता येतात विग्रहातील दोन्ही पदें जर नेहमी नियतविभक्तिकच असती तर पाणिनीने वरील उपसर्जनसंज्ञाविधायक सूत्रात 'एकविभक्ति' हे पद घातले नसते पण विग्रहातील नियत-विभक्तिक पदालाच उपसर्जनसंज्ञा व्हावी व अनियतविभक्तिक

पदाला ती संज्ञा होऊ नये म्हणून त्या पद वरील सूत्रात मुद्दाम घातले असल्यामुळें हें आपोआपच सिद्ध होतें की, ज्या ज्या विग्रहातील एक पद अनियतविभक्तिक असतें उदाहरणार्थ 'चित्रा गावो यस्य स चित्रगु' या स्थली जरी 'चित्रगु' या अन्य पदार्थाची विभक्ति बदलविता येते व त्याला भिन्न भिन्न विभक्ति करता येतात तरी विग्रहातील 'चित्रा' व 'गो' या दोन्ही पदाची विभक्ति केव्हांहि बदलविता येत नसून ते नेहमी प्रथमान्तच असतात अशा रीतीने ती दोन्ही पदें नियतविभक्तिक असल्यामुळें त्याना उपसर्जन-संज्ञा होते व 'गोस्त्रियोरुपसर्जनस्य' सू ६५६ या सूत्राने त्याना ह्रस्वकार्य होऊन 'चित्रगु' असे इष्ट रूप सिद्ध होते तसेच 'माला-मतिक्रान्त अतिमाल' या स्थली 'अत्यादय क्रान्ताद्यर्थे द्वितीयया' –सू ७८० वरील वार्तिक–या वार्तिकान्वये द्वितीयातत्पुरुष होत असून विग्रहातील 'माला' व 'अति' या दोन पदार्पैकी 'माला' हे पद नेहमी द्वितीया विभक्तीतच राहते पण 'अति = अतिक्रान्त' या पदाची वाटेल तशी विभक्ति बदलविता येते, म्हणजे सामासिक पदाची जी विभक्ति असेल ती देखील विभक्ति त्याला करता येते त्यामुळें 'अति' हे अनियतविभक्तिक पद उपसर्जनसंज्ञक न ठरता, 'माला' हे नियतविभक्तिक पद उपसर्जनसंज्ञक ठरून, 'गोस्त्रियोरुप-सर्जनस्य' या सूत्राने त्याला ह्रस्वकार्य होते व 'अतिमाल' इत्यादि इष्ट रूपें सिद्ध होतात त्याचप्रमाणे 'राजकुमारी' या स्थली विग्रहा-तील 'राज' हे पद नेहमी षष्ठी विभक्तीतच राहत असून 'कुमारी' या द्वितीय पदाला वाटेल ती विभक्ति करता येत असल्यामुळें, म्हणजे सामासिक पद ज्या विभक्तीत असेल ती देखील विभक्ति त्याला करता येत असल्यामुळें, त्या 'कुमारी' पदाला उपसर्जनसंज्ञा होत नाही व त्यामुळें त्याला 'गोस्त्रियोरुपसर्जनस्य' या सूत्राने होणारे ह्रस्वकार्य होत नाही जर परिनिष्ठित विभक्तीनें विग्रह होत नाही असे मानले व 'मालामतिक्रान्त' व 'राज कुमारी' अशा रीतीने

उत्तर पद नेहमी प्रथमान्त करूनच विग्रह करता येतो असे मानले तर, विग्रहातील दोन्ही पदें नियतविभक्तिक ठरतील व अशा रीतीने 'एकविभक्ति चापूर्वनिपाते' या सूत्रातील 'एकविभक्ति' या पदाला कोणतेहि व्यावर्त्य मिळणार नाहीं व ते सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येईल, व तसेच 'राजकुमारी' या स्थली 'कुमारी' या शब्दाला 'गोस्त्रियोरुपसर्जनस्य' या सूत्राने ऱ्हस्वकार्य होण्याची आपत्ति येईल परिनिष्ठित विभक्तीने विग्रह करता येतो असे मानल्यानेच वर दर्शविलेल्या आपत्ति टळू शकतात. म्हणून 'परिनिष्ठितविभक्त्या वा विग्रहः' हा द्वितीय पक्ष देखील मानणे आवश्यक आहे आणि वर सांगितल्याप्रमाणे या द्वितीयपक्षाचें 'एकविभक्ति चापूर्वनिपाते' या सूत्रातील 'एकविभक्ति' हे पद ज्ञापक ठरते परिनिष्ठित विभक्तीनें देखील विग्रहकरता येत असल्या-मुळेंच, 'तत्पुरुषे तुल्यार्थ' सू ६२२ या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी 'परमकारक' या सामासिक शब्दाचा 'परमं कारकं परमकारकम्, परमेण कारकेण परमकारकेण, परमे कारके परमकारके' असा विग्रह केला आहे परिनिष्ठित विभक्तीनें विग्रह करता येत नसता तर भाष्यकारानी वर सांगितल्याप्रमाणे विग्रह न करिता 'परमश्चासौ कारकः परमकारकः' असा प्रथमान्त पदानीच विग्रह केला असता म्हणून परिनिष्ठित विभक्तीने देखील विग्रह करता येतो याला वरील भाष्य प्रमाण ठरत त्या भाष्यावरील टीकेंत कैयटाने 'विशेषणसमासो न प्रथमान्तानामेव भवत्यपि तु द्वितीयाद्यन्ता-नामपि' असें स्पष्ट म्हटले आहे त्या भाष्यात असे म्हटले आहे की, 'परमे कारके परमकारके' या तत्पुरुषसमासात 'परमे' ही सप्तमी असल्यामुळें व तसेच 'परमेण कारकेण परमकारकेण' या तत्पुरुष-समासात 'परमेण' ही तृतीया असल्यामुळें, 'तुल्यार्थ' सू २०३६ या सूत्रान्वयें त्याना पूर्वपदप्रकृतिस्वराची प्राप्ति होते पण तसा स्वर होणे इष्ट नसून 'समासस्य' सू ३७३४ या सूत्राने सामासिक शब्दास

अन्तोदात्त स्वर होणे इष्ट असल्यामुळे, भाष्यकारांनी 'तत्पुरुषे विभक्तिप्रकृतिस्वरत्वे कर्मधारये प्रतिषेध' हें वार्तिक प्रथम पठित केले आहे व त्याच्या लगेच पुढें त्या वार्तिकाचें प्रत्याख्यान करणारे 'सिद्ध तु लक्षणप्रतिपदोक्तयो प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणात्' हें द्वितीय वार्तिक पठित केले आहे, व त्या द्वितीय वार्तिकाचें व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात –'सिद्धमेतत् । कथम् ? । लक्षणप्रतिपदोक्तयो प्रतिपदोक्तस्यैवेति प्रतिपद यो द्वितीयातृतीयासप्तमीसमासस्तस्य ग्रहणम् । लक्षणोक्तश्चायम् ।' या भाष्यातील 'लक्षणोक्त' या पदाचा 'विभक्तिविशेषमनुपादाय सामान्यलक्षणेनाय समासो विहित इत्यर्थ' असा कैयटाने अर्थ केला आहे या वरील भाष्याचा आशय हा आहे की, 'परम कारक परमकारकम्, परमेण कारकेण परमकारकेण, परमे कारके परमकारके' हे अनुक्रमें प्रतिपदोक्त द्वितीयातत्पुरुष, तृतीयातत्पुरुष व सप्तमीतत्पुरुष नव्हत जे समास-शास्त्रातील 'द्वितीया,' 'तृतीया' व 'सप्तमी' या अधिकारात पठित असलेल्या सूत्रान्वयें समास होतात त्यानाच प्रतिपदोक्त द्वितीया-तत्पुरुष, तृतीयातत्पुरुष व सप्तमीतत्पुरुष म्हणता येते ;वर जी तीन उदाहरणे दिली आहेत ती 'द्वितीया,' 'तृतीया' व 'सप्तमी' या अधिकारात पठित असलेल्या कोणत्याहि सूत्रान्वयें झाली नसल्यामुळें, त्याना प्रतिपदोक्त द्वितीयातत्पुरुष, तृतीयातत्पुरुष, सप्तमीतत्पुरुष म्हणता येत नाही वास्तविक वरील तीन्ही समास 'विशेषण विशेष्येण बहुलम्' सू ७३६ या सूत्रान्वयें झाले आहेत व त्या सूत्रात असमर्थ विभक्त्यन्त पदानी विग्रह करावा असे सांगितले नसल्यामुळें, त्या सूत्राने बनलेल्या सामासिक शब्दाचा विग्रह करतेवेळी त्या सामासिक शब्दाची जी विभक्ति असेल तशा विभक्त्यन्त पदानी देखील विग्रह करता येतो म्हणूनच 'परमकारकम्' हे द्वितीयान्त सामासिक पद असल्यामुळें, त्याचा 'परम कारक परमकारकम्' असा द्वितीयान्त पदानी सामानाधिकरण्याने विग्रह केला आहे तसेच 'परमकारकेण'

व 'परमकारके' ही सामासिक पदें अनुक्रमें तृतीयान्त व सप्तम्यन्त असल्यामुळें, त्याचा 'परमेण कारकेण परमकारकेण' व 'परमे कारके परमकारके' अशा तृतीयान्त व सप्तम्यन्त समानाधिकरणपदानी विग्रह केला आहे सारांश वरील तीन सामासिक पदाचा विग्रह करतेवेळी जरी द्वितीयान्त, तृतीयान्त व सप्तम्यन्त पदाचा सामानाधिकरण्याने उपयोग केला आहे तरी तेवढ्यावरून ते प्रतिपदोक्त द्वितीयातत्पुरुष, तृतीयातत्पुरुष व सप्तमीतत्पुरुष ठरत नाहीत; कारण पूर्वी सांगितल्याप्रमाणे ते द्वितीया, तृतीया व सप्तमी या अधिकारात पठित असलेल्या कोणत्याहि सूत्राच्या कक्षेत येत नाहीत, आणि ते 'विशेषण विशेष्येण बहुलम्' या सूत्रान्वयें सिद्ध झाले असल्यामुळें ते केवळ तसे लाक्षणिक तत्पुरुष होत म्हणून 'लक्षण-प्रतिपदोक्तयो. प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणम्'–परि ११४–ही परिभाषा असल्यामुळें, 'तत्पुरुषे तुल्यार्थतृतीया' सू ३७३६ या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या द्वितीया तत्पुरुष तृतीया तत्पुरुष व सप्तमीतत्पुरुषानी तशा लाक्षणिक तत्पुरुषाचें ग्रहण करता येत नसून, प्रतिपदोक्त तत्पुरुषाचेच ग्रहण करता येतें व त्यामुळें वरील तीन सामासिक शब्दात पूर्वपदप्रकृतिस्वर होण्याची आपत्ति मुळीच येत नाही व 'समासस्य' सू ३७३४ या सूत्राने होणारा अन्तोदात्त स्वरच होतो, आणि म्हणून 'तत्पुरुषे विभक्तिप्रकृतिस्वरत्वे कर्मधारये प्रतिषेध' हें वार्तिक असण्याची काही गरज नाही असे भाष्यकाराचें म्हणणें आहे या वरील भाष्यावरून हे सिद्ध होते की, परिनिष्ठित विभक्तिने देखील विग्रह करता येतो म्हणून 'ऋॣवर्णयो' हें सामासिक पद षष्ठ्यन्त असल्यामुळें, त्याचा 'ऋॢलो वर्णयो' असा जो परिनिष्ठित विभक्तीने दीक्षितानी मनोरमेंत विग्रह केला आहे तो वरील भाष्यान्वयें योग्य ठरतो असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे )

**मनोरमा–"ना ज्झलौ । आकारसहितइति । अत्र च "काल-समयवेलासु" इत्यादिनिर्देशाः प्रश्लेषे लिङ्गम् । न चैवमपि 'विपा१**

सो' इत्यादौ "गुरोरनृतः" इति प्लुतादाकारात्परस्य सनः सस्य षत्वं स्यादेवेति वाच्यम्, आश्च, आ ३ श्चेति द्वन्द्वे सवर्णदीर्घेण दीर्घात्परत्र प्लुतोऽपि प्रश्लिष्यत इति व्याख्यानात् । यणादिर्क्रमिति । शीतलशब्दे सवर्णदीर्घ आदिशब्दार्थः ।

('नाज्झलौ' सू १३ या सूत्रात 'न अज्झलौ' असा पदच्छेद न करिता, 'न आज्झलौ' असा दीक्षितानी पदच्छेद केला आहे व 'आज्झलौ' या पदातील 'आच्' या शब्दाचा 'आकारसहित अच् आच्' असा मध्यमपदलोपीसमास करून नतर 'आच् च हल् च आज्झलौ' असा द्वन्द्वसमास केला आहे या सूत्रात आकारप्रश्लेष का केला आहे व तसे करण्यास काय प्रमाण आहे हें आता दीक्षित सागतात । 'कालसमयवेलासुतुमुन्' सू ३१७९ इत्यादि सूत्रात असलेले निर्देश प्रकृत सूत्रात आकारप्रश्लेष करणे आवश्यक आहे याचे ज्ञापक आहेत ('अणुदित' सू १४ या सूत्राच्या अर्थाचे ज्ञान होईपर्यंत प्रकृत सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'अच्' प्रत्याहारात दीर्घ आकाराचे ग्रहण न होता शिवसूत्रनिर्दिष्ट ऱ्हस्व अकाराचे ग्रहण होते म्हणून 'नाज्झलौ' या सूत्रात आकारप्रश्लेष न केल्यास, त्या सूत्रान्वये जरी अकार व हकार हे सवर्ण होऊ शकत नाहीत तरी, 'तुल्यास्यप्रयत्नं सवर्णम्' सू १० या सूत्रान्वये आकार व ऊष्मवर्ण हकार हे सवर्ण होण्याची आपत्ति येते, कारण 'अकुहविसर्जनीयाना कण्ठ' या वचनान्वये त्या दोन्ही वर्णांचे कण्ठ हे उच्चारणस्थान असून, 'विवृतमूष्मणा स्वराणां च' या वचनान्वये त्या दोहोंचा आभ्यन्तरप्रयत्न देखील एकच-विवृत-आहे, आणि पर णकाराने साधलेल्या अणूप्रत्याहारात हकार अन्तर्भूत असून ता इणप्रत्याहारान्तर्गत वर्ण असल्यामुळे, 'अणुदित्' या सूत्रान्वये हकाराने आकाराचे ग्रहण होऊन व असा रीतीने 'आ' हा इण् ठरून, 'आदेशप्रत्यययो' सू २१२ या सूत्राने 'वेलासु' यातील 'आ' पुढे असलेल्या 'सु' या विभक्तिप्रत्ययातील सकाराचे षत्व होण्याची आपत्ति येते ही आपत्ति

टळावी म्हणून, 'नाज्झलौ' या सूत्रात आकारप्रश्लेष केला आहे, व तसा प्रश्लेष केला असल्यामुळे, जसा 'नाज्झलौ' या निषेधक सूत्रान्वये अकार हकाराचा सवर्ण होत नाही तसाच आकार देखील हकाराचा सवर्ण ठरत नाही व त्यामुळें हकाराने आकाराचे ग्रहण होत नाही आणि अशा रीतीने 'आ' हा इण ठरत नसल्यामुळें, 'वेलासु' या स्थली षत्व होत नाही, 'वेलासु' या स्थली पाणिनीने षत्व केले नसल्यामुळें, तो निर्देश 'नाज्झलौ' या सूत्रात आकाराचा प्रश्लेष केला आहे याचा ज्ञापक ठरतो ) पण वर सांगितल्याप्रमाणे 'नाज्झलौ' या सूत्रात आकारप्रश्लेष केला तरी 'पिपा३सो' इत्यादि स्थली 'गुरोरनृत' मू ९७ या सूत्राने प्लुत झालेल्या आकारापुढें असलेल्या सन् प्रत्ययातील सकाराचे षत्व होणे टाळता येत नाही असे कोणी म्हटल्यास, ते म्हणणे बरोबर नाही, कारण प्रकृत सूत्रात ज्या आ'चा प्रश्लेष केला आहे त्याचा 'आश्च आ३श्च' असा द्वन्द्वसमास केल्याने व ('अकः सवर्णे दीर्घः' सू ८५ या सूत्राने) सवर्णदीर्घ केल्याने आणि दीर्घ 'आ' पुढें प्लुत आ३चा देखील प्रश्लेष आहे असे व्याख्यान केल्याने, 'पिपा३सो' या स्थली षत्व होण्याची आपत्ति येत नाही (वर सांगितल्याप्रमाणे दीर्घ व प्लुत आकाराचा द्वन्द्व केला असल्यामुळे, जसा हकाराचा दीर्घ आकार सवर्ण होत नाही तसाच प्लुत आकार देखील हकाराचा सवर्ण होत नाही व अशा रीतीने हकाराने प्लुत आकाराचे देखील ग्रहण होऊ शकत नसल्यामुळे व ता इण् मानता येत नसल्यामुळें, 'पिपा३सा' या स्थली प्लुत आकारापुढें आलेल्या 'सन्' प्रत्ययातील सकाराचे, 'आदेशप्रत्यययोः' या सूत्रात होणारे, षत्व होत नाही 'तेन दधात्यत्र हरति शीतल षष्ठ सान्द्रमित्येतेषु परेषु यणादिक न' अशी जी 'नाज्झलौ' या सूत्रावरील कौमुदीत पङ्क्ति आहे त्या पङ्क्तीतील) 'यणादिकम्' या पदात जो 'आदि' शब्द आहे (त्याने सवर्णदीर्घाचे देखील ग्रहण होते व त्यामुळें 'दधि' या शब्दापुढें)

'शीतल' हा शब्द आला असून देखील सवर्णदीर्घ होत नाही असा त्या 'आदि' शब्दाचा अर्थ आहे ('दधि शीतलम्' या वाक्यात 'दधि' यातील अन्त्य इकारापुढे शकार हा ऊष्मवर्ण आला आहे इकार व शकार या दोहोंचिहि 'इचुयशाना तालु' या वचनान्वये तालु हे उच्चारणस्थान असून, त्याचा 'विवृतमूष्मणां स्वराणां च' या वचनान्वये 'विवृत' हा आभ्यन्तरप्रयत्न आहे. म्हणून या दोन वर्णात स्थानसाम्य व आभ्यन्तरप्रयत्नसाम्य असल्यामुळे, 'तुल्यास्यप्रयत्नं सवर्णम्' सू १० या सूत्रान्वये ते सवर्ण होतात व 'अकः सवर्णे दीर्घः' सू ८५ या सूत्रान्वये वरील उदाहरणात सवर्णदीर्घ होण्याची आपत्ति येते परन्तु 'नाज्झलौ' ह निषेधक सूत्र असल्यामुळे व इकार अच् असून शकार हल् असल्यामुळे, ते सवर्ण होऊ शकत नाहीत व त्यामुळे सवर्णदीर्घकार्य होत नाही. तसेच 'दधि हरति' या वाक्यात 'दधि' यातील अन्त्य इकारापुढील हकार आकाराचा सवर्ण असल्यामुळे, व 'दधि षष्ठम्' या वाक्यात 'दधि' यातील अन्त्य इकारापुढील षकार ऋकाराचा सवर्ण असल्यामुळे, आणि 'दधि सान्द्रम्' या वाक्यात 'दधि' यातील अन्त्य इकारापुढील सकार ऌकाराचा सवर्ण असल्यामुळे, 'इको यणचि' सू ४७ या सूत्राने वरील तीन्ही स्थली इकाराचे जागी यणादेश होण्याची आपत्ति येते परंतु हकार, षकार व सकार हे हल् असून अकार, ऋकार व ऌकार अच् असल्यामुळे, 'नाज्झलौ' या निषेधक सूत्रान्वये ते सवर्ण होऊ शकत नाहीत व त्यामुळे यणादेश होण्याची आपत्ति टळते )

शब्दरत्न–व्याख्यानादिति । एवं व्याख्याने मान तु प्रयत्नभेदेन "नाज्झलौ" इत्येतत्प्रत्याख्यानपरं भाष्यम् । तद् ध्वनयन्नवदयति–सूत्रं मास्त्विति भाष्ये स्थितमिति । शीतलशब्दे इति । शस्य ईकारे परे, दधीतीकारस्य शकारे परे चेत्यर्थः । न च शीठ. शकारोच्चारणेन तच्छकारस्येकारे न दीर्घ इति वाच्यम्, शीतलशब्दे शीठोऽभावात् ।

किन्तु श्यायातोः क्ते "द्रवमूर्तिस्पर्शयोः श्य " इत्यनेन सम्प्रसारणे, "श्योऽस्पर्शे" इत्युक्तेर्नत्वाभावे च निष्पन्नाच्छीतशब्दात्सिध्मादित्वाल्लचि शीतलशब्द इत्यदोषात्। शीतशब्दो हि सिध्मादिषु गणरत्ने, वृत्तौ च पठ्यते। किं च तेनापूर्ववचनकल्पनापेक्षया सूत्रोदाहरणत्वमेव तस्य युक्तमिति भावः।

'नाज्झलौ' या सूत्रात दीर्घ व प्लुत आकाराचा प्रश्लेष करून दीक्षितांनी त्या सूत्राचे जें व्याख्यान केले आहे त्याला, प्रयत्नभेद मानून 'नाज्झलौ' या सूत्राचे ज्या भाष्यात प्रत्याख्यान केले आहे तें भाष्य प्रमाण आहे (स्वराचा विवृत प्रयत्न आहे व ऊष्मवर्णांचा ईषद्विवृत प्रयत्न आहे असा प्रयत्नभेद मानल्याने, 'नाज्झलौ' हें सूत्र आवश्यक नाही असें सांगून भाष्यकारांनी त्या सूत्राचे प्रत्याख्यान केले आहे 'अ, इ, ऋ, लृ' हेच चार अच् आहेत की, ज्यांचे 'ह्, श्, ष, स्' हे ऊष्मवर्ण अनुक्रमें स्थानसाम्यामुळें व आभ्यन्तरप्रयत्नसाम्यामुळें सवर्ण होऊ शकतात इतर कोणत्याहि अचाचा कोणत्याहि हल् सवर्ण होऊ शकत नाही. 'अ, इ, ऋ, लृ,व 'ह्, श्, ष्, स्' हे अनुक्रमें सवर्ण न व्हावे एवढ्याचकरिता 'नाज्झलौ' हें सूत्र केले आहे पण ऊष्मवर्णांचा विवृत हा आभ्यन्तरप्रयत्न न मानता ईषद्विवृत हा आभ्यन्तरप्रयत्न मानल्यास, ते कोणत्याहि अचाचे आभ्यन्तरप्रयत्नभेदामुळें सवर्ण होऊ शकत नाहीत म्हणून शौनकीय प्रातिशाख्यात सांगितल्याप्रमाणे, तसा प्रयत्नभेद मानल्याने काम भागत असल्यामुळें व मनोरमेंत दर्शविलेल्या सर्व आपत्ति टाळता येत असल्यामुळें, 'नाज्झलौ' हे सूत्र अनावश्यक ठरते असा भाष्यकाराच्या म्हणण्याचा आशय आहे 'नाज्झलौ' १ १·१० या सूत्रावरील भाष्यात तें सूत्र नसलें तर काय आपत्ति येतात हें प्रथम सांगून व त्या आपत्तींचे निवारण करण्याकरितां 'सिद्धमनच्त्वात्' हें वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचे व्याख्यान करितांना भाष्यकार म्हणतात –'सिद्धमेतत्। कथम्?। अनच्त्वात्। कथमनच्त्वम्?। स्पृष्टं स्पर्शानां करणम्।

ईषत्स्पृष्टमन्तःस्थानाम् । विवृतमूष्मणाम् ईषद्विवृतमित्येके । स्वराणां विवृतम्, ईषदिति विवृतम् ।' या त्या भाष्यावरील प्रदीपांत 'प्रयत्नभेदादसवर्णो, सवर्णसंज्ञाया प्राप्तिरेव नास्ति' असें कैयटानें म्हटलें असून, 'दीर्घप्लुतयोराकारयो: सावर्ण्यसंज्ञायामुपपत्तये इत्यादि तस्मादवस्थानमिति भाव' असें उद्योतांत म्हटलें आहे. परन्तु 'छन्दोवत्सूत्राणि भवन्ति' या भाष्यवचनान्वयें पाणिनीय सूत्रें वेदतुल्य मानली असल्यामुळें, ज्याप्रमाणें वेदांतील एकहि अक्षर निरर्थक मानतां येत नाही त्याप्रमाणें पाणिनीय सूत्रांतील देखील एकहि अक्षर निरर्थक मानतां येत नाहीं, मग सबंध सूत्र निरर्थक मानतां येत नाहीं हें सांगणे नकोच. 'वृद्धिरादैच्' १-१-१ या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारानी 'प्रमाणभूत आचार्यो दर्भपवित्रपाणिः शुचाववकाशे प्राङ्मुख उपविश्य महता यत्नेन सूत्रं प्रणयति स्म, तत्राशक्यं वर्णेनाप्यनर्थकेन भवितुं किं पुनरियता सूत्रेण' असें स्पष्ट म्हटलें आहे. म्हणून भगवान् भाष्यकारानी जरी प्रकृत सूत्राचें प्रत्याख्यान केलें आहे व 'उत्तरोत्तर मुनीनां प्रामाण्यम्' या वचनान्वयें भाष्यकारांनी केलेलें प्रत्याख्यान अयोग्य मानतां येत नाही तरी प्रत्येक पाणिनीय सूत्राची व त्यांतील प्रत्येक पदाची आवश्यकता सिद्ध करून दाखविणें हें वृत्तिकारांचें कर्तव्य आहे व त्या कर्तव्यास अनुसरून दीक्षितानी प्रकृत सूत्राचें प्रत्याख्यान करणें टाळावें याकरितां, त्या सूत्रांत दीर्घ व प्लुत आकाराचा प्रश्लेष केला आहे, व प्रयत्नभेद मानून भाष्यकारानी ज्या फलाची सिद्धि केली आहे त्या फलाची दीक्षितानी दीर्घ व प्लुत आकाराचा प्रश्लेष मानून सिद्धि केली आहे. आकारप्रश्लेष करण्यास वरील भाष्य प्रमाण आहे असें जें शब्दरत्नकारानी म्हटलें आहे त्याचा आशय एवढाच आहे की, सूत्रप्रत्याख्यानाद्वारा ज्या फलाची सिद्धि करून दाखविली असते तीं फलें सूत्रारम्भाद्वारा देखील सिद्ध होऊं शकत असली पाहिजेत असा नियम असल्यामुळें, भाष्यकारानी प्रकृत सूत्राचें प्रत्याख्यान करून जें फल साधलें आहे तें फल

प्रकृत सूत्रात दीर्घ व प्लुत आकाराचा प्रश्लेष केल्याशिवाय सिद्ध होऊ शकत नसल्यामुळें, त्या फलाची सिद्धि करण्याकरिता तसा प्रश्लेष करणें याचे वरील भाष्य ज्ञापक ठरते) प्रयत्नभेद मानल्यास प्रकृत सूत्र आवश्यक नाही असे दाखवून स्वतःच पुढील सूत्राच्या वृत्तींत सांगणार आहेत 'शीतलशब्दे सवर्णदीर्घ आदिपदार्थ' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा अर्थ असा आहे कीं, 'दधि शीतलम्' या वाक्यात 'शीतलम्' या स्थली शकारा-पुढें ईकार व तसेच 'दधि' यांतील अन्त्य इकारापुढें शकार आला असल्यामुळें दोन सवर्णदीर्घकार्यांची प्राप्ति आहे (पण 'नाज्झलौ' हे निषेधक सूत्र असल्यामुळें तीं कार्यें होत नाहीत) धातुपाठांत 'शीङ् स्वप्ने' असा धातु पठित असल्यामुळें (व सवर्णदीर्घ करून 'शिङ्' असा ना धातु पठित केला नसल्यामुळें) त्या धातूंतील शकारापुढें इकार आल्यास सवर्णदीर्घकार्य होत नाहीं (व 'शीतलम्' या स्थली सवर्णदीर्घ होऊन 'ईतलम्' असे रूप सिद्ध होऊं शकत नाहीं) याचा तो पाठ ज्ञापक आहे असे कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाही कारण 'शीतल' या शब्दांत 'शीङ्' धातु नाहीं, म्हणजे 'शीतल' हा शब्द 'शीङ्' धातूपासून सिद्ध झालेला शब्द नाहीं ('श्यैङ् गतौ' या धातूस 'क्त' प्रत्यय केला असता, 'आदेच उपदेशेऽशिति' सू २३७० या सूत्रानें त्या धातूचें) 'श्या' असें रूप होतें व त्यापुढें 'क्त' हा कित् प्रत्यय आला असल्यामुळें 'द्रवमूर्तिस्पर्शयोः श्यः' सू ३०२० या सूत्रानें 'श्या' यांतील यकाराचें संप्रसारण होतें व 'श्योऽस्पर्शे' सू. ३०२१ या सूत्रांत 'अस्पर्शे' असा निर्देश असल्यामुळें, 'क्त' प्रत्ययांतील तकाराचा नकार न होता 'शीत' असें जें रूप सिद्ध होतें त्यापुढें 'सिध्मादिभ्यश्च' सू १९०४ या सूत्रानें 'लच्' प्रत्यय केला असता 'शीतल' असें रूप सिद्ध होतें व त्यामुळें प्रकृत स्पर्शी वर दाखविलेला दोष येत नाहीं. ('श्यै+क्त=श्या+क्त' असा स्थितीत 'श्या'

यातील यकाराचे सम्प्रसारण करून, म्हणजे 'इग्यण सम्प्रसारणम्' सू ३२८ या सूत्राने यकाराचे जागी इकार करून, 'श्या = श इ आ' अशी स्थिति झाली असता, 'सम्प्रसारणाच्च' सू ३३० या सूत्राने पूर्वरूप एकादेश होऊन व 'हल' सू २५५९ या सूत्राने 'इ' या सम्प्रसारणाचे दीर्घ होऊन 'शि आ क्त = शि क्त = शीन' असे रूप होते व त्याहून लच् प्रत्यय केल्याने 'शीतल' असे रूप सिद्ध होते. सारांश 'शीतल' हा शब्द 'शीङ्' धातूपासून निष्पन्न झाला नसून 'श्यैङ्' धातूपासून निष्पन्न झाला असल्यामुळे शकाकाराचे म्हणणे अनुपपन्न ठरते हे उघड आहे)

'शीन' हा शब्द गणरत्नात व तसेच काशिकावृत्तीत सिध्मादिगणात पठित केला आहे (या पक्तीवरून असे दिसून येते की, पाणिनीय गणपाठाच्या काही प्रतीत 'शीन' हा शब्द सिध्मादिगणात पठित नाही व तो त्या गणात नाही असे मानल्यास, त्याहून 'सिध्मादिभ्यश्च' या सूत्राने होणारा लच् प्रत्यय होऊ शकणार नाही व 'शीतल' हे रूप सिद्ध होऊ शकणार नाही. म्हणून शब्दरत्नकारानी 'शीन' हा शब्द सिध्मादिगणात पठित आहे हे सिद्ध करण्याकरिता गणरत्न व काशिकावृत्ति या दोन मान्य ग्रन्थाचा आधार दिला आहे) दुसरे असे की, ('शीङ् स्वप्ने' या धातूचे 'शीन' हे क्तप्रत्ययान्त रूप आहे असे मानले तरी, 'शीतल' हे रूप सिद्ध होण्याकरिता 'शीङ्' या ज्ञापकान्वये त्या धातूतील शकारापुढे ईकार आल्यास, सवर्णदीर्घ होत नाही असे मानणे व 'शकारोच्चकार्या-निष्पादक' असा) अपूर्व वचनाची कल्पना करणे यापेक्षा 'शीतल' हे रूप 'नाज्झलौ' या सूत्राचे उदाहरण आहे असेच मानणे योग्य आहे (सारांश जे पाणिनीय सूत्रानी सिद्ध होते त्याच्याकरिता ज्ञापक धुंडण्याची व मानण्याची गरज काय व तसे मानण्यात गौरव असून शिवाय पाणिनीय निषेधक सूत्र असल्यामुळे 'शीतल' या स्थली सवर्णदीर्घकार्य झाले नाही हे मानण्यातच लाघव आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे)

मनोरमा–अत्रेति । अत्रैवेत्यर्थः । यद्यपीति । ग्रहणकशास्त्र-स्याद्याप्यनिष्पत्तेरिति भावः ॥

"हो ढः" इत्युपलक्षणम्, रमास्वित्यत्र षत्वम्, वागाशीरित्यत्र "झयो हः" इत्याकारस्य घकारः, दासीष्टेत्यादौ "दादेः" इति घत्वं च नेति बोध्यम् । यदि तु विवृतमूष्मणामित्यत्र ईषदित्यनुवर्त्य, स्वराणा चेत्यत्र निवर्त्य, प्रयत्नभेदो व्याख्यायते, तदा "नाज्झलौ" इति सूत्रं माऽस्त्विवति भाष्ये स्थितम् ॥

('अणुदित्' सू १४ या सूत्रावरील कौमुदीत 'अत्राण् परेण णकारेण' अशी जी पंक्ति लिहिली आहे त्या पक्तीतील) 'अत्र' या पदाचा 'अत्रैव' असा अर्थ आहे, म्हणजे याच सूत्रात 'अण्' हा प्रत्याहार पर णकारानें साधला आहे असे समजावे (अष्टाध्यायीतील इतर सर्व सूत्रात जेथे जेथे अण्प्रत्याहाराचा निर्देश केला आहे तेथें तेथें तो प्रत्याहार पूर्व णकारानेंच साधलेला प्रत्याहार आहे असे समजावे. 'नाज्झलाविति निषेधो यद्यप्याक्षरसमाम्नायिकानामेव' असे जें प्रकृत सूत्रावरील कौमुदीच्या पक्तीत म्हटले आहे त्या पक्तीत) 'यद्यपि' ही पदे अशाकरिता घातली आहेत की, अद्यून ग्रहणकशास्त्र म्हणजे 'अणुदित्' हे सवर्णग्राहक सूत्र, निष्पन्न–बुद्धयारूढ–झाले नाही (अक्षरसमाम्नायात, म्हणजे माहेश्वरसूत्रात, जे अच् व हल् साक्षात् पठित आहेत त्यानाच 'नाज्झलौ' हा सवर्णसज्ञानिषेध लागू पडतो 'अ' हा वर्ण जरी अक्षरसमाम्नायात पठित आहे तरी 'आ' हा वर्ण त्यात पठित नाही व म्हणून तो निषेध 'आ' ला लागू पडत नाही आणि आकार व हकार या दोन वर्णांत स्थानसाम्य व आभ्यन्तर-प्रयत्नसाम्य असल्यामुळे, 'तुल्यास्यप्रयत्न सवर्णम्' सू १० या सवर्ण-सज्ञाविधायक पूर्व सूत्रान्वयें हकारानें आकाराचे ग्रहण होण्याची आपत्ति येते. ती टाळण्याकरिताच 'नाज्झलौ' या उत्तर सूत्रात दीक्षितानी आकारप्रश्लेष केला आहे पण 'अणुदित्सवर्णस्य' या ग्रहणकशास्त्रान्वयें अक्षरसमाम्नायात पठित असलेल्या अकारानें आकाराचें ग्रहण

होऊं शकतेच, व अशा रीतीनें 'नाज्झलौ' या निषेधान्वयें जसा इकार अकाराचा सवर्ण होऊं शकत नाही तसा तो आकाराचा देखील सवर्ण होऊं शकत नाही आणि म्हणून 'नाज्झलौ' या सूत्रांत आकारप्रश्लेष करण्याची कांही गरज नाही अशी कोणी शंका केल्यास, त्या शंकेवर दीक्षितांनी मनोरमेंत 'ग्रहणकशास्त्रस्याद्याप्यनिष्पत्ते' हें उत्तर दिलें आहे दीक्षितांच्या म्हणण्याचा भावार्थ हा आहे कीं, प्रथम वर्णांचा उपदेश, नंतर इत्संज्ञा, नंतर प्रत्याहारसिद्धि, नंतर सवर्णसंज्ञा, आणि अखेरीस 'अणुदित्' या सूत्रानें सवर्णांचें ग्रहण असा जो क्रम 'नाज्झलौ' या सूत्रावरील भाष्यांत सांगितला आहे त्या क्रमान्वयें सवर्णांचें ग्रहण होणें हें सर्वांच्या शेवटीं होऊं शकत असल्यामुळें, 'अणुदित्' या सूत्राचा उपयोग, त्याच्या पूर्वीं पठित असलेल्या 'तुल्यास्यप्रयत्नं सवर्णम्' व 'नाज्झलौ' या सूत्रांनीं होणाऱ्या सवर्णसंज्ञेचे ठिकाणीं, करतां येत नाहीं. त्यामुळें 'तुल्यास्य-प्रयत्नं सवर्णम्' या सूत्रानें, 'नाज्झलौ' हें निषेधक सूत्र असून देखील, इकारानें आकाराचें ग्रहण होण्याची जी आपत्ति येते ती टाळण्याकरितां, 'नाज्झलौ' या सूत्रांत आकारप्रश्लेष करणें आवश्यक आहे. सारांश 'नाज्झलौ' या सूत्रावरील भाष्यांत जो वाक्यापरिसमाप्तिन्याय सांगितला आहे त्याला अनुसरूनच दीक्षितांनी वरील उत्तर दिलें आहे त्या न्यायाचें विवरण पूर्वीं केलेंच आहे व पुढें सविस्तर करण्यांत येईल ) 'हो ढः' सू ३२४ हें सूत्र स्पष्ट उदाहरणस्थानें सांगितलें आहे (म्हणून 'नाज्झलौ' या सूत्रांत आकारप्रश्लेष केला असल्यामुळें, ज्याप्रमाणें विश्वपा + भिस्=विश्वपाभिः' या स्थळीं 'विश्वपा' यांतील अन्त्य आकारापुढें 'भिस्' प्रत्ययांतील भकार हा झल् असून देखील त्या आकारप्रश्लेषामुळें हकारानें आकाराचें ग्रहण होत नसल्याकारणानें 'हो ढः' या सूत्रानें 'विश्वपा' यांतील अन्त्य आकाराचें ढत्व होत नाहीं त्याचप्रमाणें) 'रमासु' या उदाहरणांत षत्व होत नाहीं, व तसेंच 'वाणानौ' या उदाहरणांत 'झयो होऽन्यतरस्याम्' सू. ११९ या सूत्रानें आकाराचा घकार होत नाहीं, आणि 'दामोष्ट' इत्यादि

उदाहरणात 'दादेर्धातोर्घः'. सू. ३२५ या सूत्राने होणारे घत्व होत नाही हे जाणावे (इण्प्रत्याहारान्तर्गत हकाराने आकाराचे ग्रहण झाल्यास 'रमासु' या उदाहरणात आकारापुढे 'सु' प्रत्यय आला असल्यामुळे, त्या प्रत्ययातील सकाराचे 'आदेशप्रत्यययोः' सू. २१२ या सूत्राने षत्व होण्याची आपत्ति येते तसेच 'वाग्+आशीः = वागाशी' या उदाहरणात 'ग्' या झयपुढे आकार आला असल्यामुळे, हकाराने त्या आकाराचे ग्रहण केल्यास, 'झयो हः' सू. ११९ या सूत्राने त्या आकाराचे वैकल्पिक घत्व होण्याची आपत्ति येते त्याच-प्रमाणे 'दा+सीयुट्+सुट्+त=दासीष्ट' दासीष्ट या उदाहरणात 'दा' हा धातु दकाराने सुरु होणारा असल्यामुळे व त्या दकारापुढे आकार असून त्या आकारापुढे 'स्' हा झल् असल्यामुळे, हकाराने आकाराचे ग्रहण केल्यास, 'दादेर्धातोर्घः' या सूत्राने आकाराचे घत्व होण्याची आपत्ति येते. वर दर्शविलेल्या सर्व आपत्ति टाळण्याकरिताच 'नाज्झलौ' या सूत्रात आकारप्रश्लेष केला आहे व त्यामुळे हकाराने जसे अकाराचे ग्रहण होत नाही तसे आकाराचे देखील ग्रहण होत नाही आता हकाराने आकाराचे ग्रहण न व्हावे याकरिता 'नाज्झलौ' या सूत्रात आकारप्रश्लेष करण्याची जशी दीक्षितास आवश्यकता वाटली तशी शकार व षकार यांनी दीर्घ व प्लुत ईकार, दीर्घ व प्लुत ॠकार यांचे अनुक्रमे ग्रहण न व्हावे याकरिता तशा दीर्घ व प्लुत ईकाराचा व ॠकाराचा प्रश्लेष करण्याची त्याना आवश्यकता का वाटली नाही असा कोणी प्रश्न केल्यास, त्याला उत्तर हे आहे की, 'अणुदित्' या सूत्रातील पर णकाराने साधलेल्या अण्प्रत्याहारात जसा 'ह्' या ऊष्मवर्णाचा अन्तर्भाव होतो तसा श्, ष् या ऊष्मवर्णांचा अन्तर्भाव होत नसल्यामुळे व त्या सूत्रान्वये अण् हाच सवर्णाचा सग्राहक होऊं शकत असल्यामुळे दीक्षिताना तसा प्रश्लेष करण्याची मुळीच गरज वाटली नाही दीर्घ ऌकार संस्कृत भाषेत नाहीच आणि ह्रस्व ऌकार व ऋकार यांचे उच्चारणस्थान व आभ्यन्तरप्रयत्न जरी एकच

आहे तरी ते वर्ण अनुक्रमें अच् व हल् असल्यामुळें 'नाज्झलौ' या निषेधकसूत्रान्वयें ते सवर्ण होऊ शकत नाहींत हें उघड आहे तसेंच 'ऋ, र्' यांचे जरी स्थानसाम्य आहे तरी त्यांचा आभ्यन्तरप्रयत्न भिन्न असल्यामुळें, ते सवर्णच ठरत नाहींत व हेंच इतर अन्तस्थ वर्णांसंबंधानें देखील समजावें जर 'विवृतमूष्मणाम्' या वचनांत 'ईषत्' या पदाची अनुवृत्ति केली व 'स्वराणां च' या स्थलीं त्या पदाची निवृत्ति केली व अशा रीतीनें ऊष्मवर्ण व स्वर यांचा आभ्यन्तरप्रयत्न भिन्न आहे असें व्याख्यान केलें तर, 'नाज्झलौ' हें सूत्र असण्याची कांहीं आवश्यकता नाहीं असें (त्या सूत्रावरील) भाष्यांत सांगितलें आहे (पाणिनीय शिक्षेंत वास्तविक 'स्वराणा-मूष्मणां चैव विवृतं करणं स्मृतम्' असें वचन आहे 'नाज्झलौ' या सूत्रावरील भाष्यांत भाष्यकारांनीं या वचनाचा उल्लेख केला नसून, 'स्पृष्टं करणं स्पर्शानाम्, ईषत्स्पृष्टमन्तस्थानाम्, विवृतमूष्मणाम्, स्वराणां च' हीं चार शौनक आपिशल्यांतील सूत्रें पठित केलीं आहेत व द्वितीय सूत्रांतून तृतीय सूत्रांत 'ईषत्' हें पद अनुवृत्त करून चतुर्थ सूत्रांत ते पद अनुवृत्त होत नाहीं व त्या सूत्रांत तृतीय सूत्रांतून 'विवृतम्' एवढेंच पद अनुवृत्त होतें असें त्यांनीं म्हटलें आहे ते भाष्य पूर्वी दिलेंच आहे त्या नात्यानें भाष्यकारांनीं ऊष्म-वर्णांचा आभ्यन्तरप्रयत्न ईषद्विवृत व स्वरांचा आभ्यन्तरप्रयत्न विवृत मानून 'नाज्झलौ' या सूत्राचें प्रत्याख्यान केलें आहे या भाष्यान्वयें ऊष्मवर्ण व स्वर या दोहींत आभ्यन्तरप्रयत्नसाम्य राहत नसल्यामुळें, ह्, श्, ष्, स हे ऊष्मवर्ण जसे अ, इ, ऋ, ऌ या ह्रस्वस्वरांचे सवर्ण होऊ शकत नाहींत तसेंच ते त्या दीर्घ व प्लुत स्वरांचे देखील सवर्ण होऊ शकत नाहींत व त्यामुळें 'नाज्झलौ' या सूत्रांत दीर्घ व प्लुत आकाराचा प्रश्लेष करण्याची कांहीं गरज राहत नाहीं पण दीक्षितांनीं शिक्षेंतील पाणिनीय वचन प्रमाण मानून, ह्रस्वानें दीर्घ व प्लुत आकाराचें ग्रहण न व्हावें म्हणून त्या आकाराचा 'नाज्झलौ' या सूत्रांत प्रश्लेष केला आहे.)

शब्दरत्न—अत्रैवेति । ग्राहकसूत्र एवेत्यर्थः । अत्र च "उरॄत्" इति सूत्रे तपरत्वं मानम्—तद्धि चुरादिण्यन्तात्कृतधातोर्लुङ्यचीकृत-दित्यत्र दीर्घाकारस्य स्थाने ह्रस्व एव यथा स्यादित्यर्थम् । पूर्वेणाग्रा-ग्रहणे तूद्देश्येन, विधेयेन च ऋकारेणानत्वाद्भिन्नकालाग्रहणेन न तस्य स्थानित्व न वा आदेशत्वं प्रसक्तमिति व्यर्थं तत्स्यात् । न च तपरसूत्रेण ऌकारग्रहणार्थं तत्, स्थानेऽन्तरतमपरिभाषया ऋकारस्थाने तस्य वारणेन तद्ग्रहणे फलाभावात् । न चैव ज्ञापितेऽपि भाव्य-मानत्वात्सवर्णग्रहणाप्रसक्तेस्तद्वैयर्थ्यम्, तपरत्वाभावे आदेशान्तर-निवृत्त्यर्थत्वेन स्वरूपाभ्यनुज्ञानार्थनयाऽपूर्वबोध्यत्वाभावेनाविधेयत्वात् । कृते तु तपरत्वे भाव्यमाननाऽपीत्यन्यदेतत् ।

'अत्रैव' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचा 'ग्राहकसूत्रे एव,' म्हणजे 'अणुदित्सवर्णस्य' या ग्रहणक शास्त्रामध्येंच, असा अर्थ आहे 'अणुदित्सवर्णस्य' या सूत्रात निर्दिष्ट असलेला अण्प्रत्याहार पर णकाराने घ्यायला आहे याला 'उरॄत्' सू २५६७ या सूत्रातील तपरकरण प्रमाण आहे तें तपरकरण अशाकरिता केलें आहे की, चुरादिगणात पठित असलेल्या णिजन्त 'कृत' धातूचा लुङ् केला असता, 'अचीकृतत' या स्थळी दीर्घ ऋकाराचे जागी ह्रस्व ऋकार व्हावा जर 'अणुदित्' या सूत्रात निर्दिष्ट असलेला अण्प्रत्याहार पूर्व णकाराने म्हणजे 'अइउण्' या प्रथम शिवसूत्रातील णकाराने, घ्यायचा आहे असे मानले तर, 'उरॄत्' या सूत्रातील उद्देश्य ऋकार व विधेय ऋकार हे दोन्ही अण्भिन्न असून ह्रस्व ऋकार भिन्नकालिक ऋकाराचा, म्हणजे दीर्घ ऋकाराचा, ग्राहक होऊ शकणार नाही व त्यामुळे ('कृत' धातूतील) दीर्घ ऋकार स्थानी होऊ शकणार नाही व अशा रीतीने त्याचे ठिकाणी जर स्थानित्वच येत नाही तर त्याचे ठिकाणी आदेश होण्याचा प्रसंगच येऊ शकत नाही आणि त्यामुळे 'उरॄत्' हें सूत्र व्यर्थ ठरण्याची आपत्ति येईल ('उरॄत' या सूत्रात 'उ' ही 'ऋ' ची षष्ठी आहे पूर्व णकाराने 'अणुदित्' या सूत्रात

निर्दिष्ट असलेला अण्प्रत्याहार साधल्यास, 'अ, इ, उ' एवढेच अण् होतील व ऋकार अण् होणार नाही आणि त्यामुळें ग्रहणक शास्त्रान्वयें तो ऋकार सवर्णाचा–दीर्घ ऋकाराचा–ग्राहक होऊ शकणार नाही त्यामुळें 'उरृत्' या सूत्राचा 'ह्रस्वऋकारस्थाने ह्रस्वऋकारादेशो भवति' असा अर्थ करावा लागेल व तसा अर्थ केल्यास कोणतेहि फल निष्पन्न होणार नाही व ज्या धातूच्या उपधेंत दीर्घ ऋकार आहे तो वरील अर्थान्वयें स्थानी ठरू शकत नसल्यामुळें, त्या दीर्घ ऋकाराचे जागी ह्रस्व ऋकारादेश होऊ शकणार नाही आणि त्यामुळें 'अचीकृतत्' हे इष्ट रूप सिद्ध होऊ शकणार नाही ही आपत्ति टाळण्याकरिता 'अणुदित्' या सूत्रात निर्दिष्ट असलेला अण्प्रत्याहार पर णकाराने साधला आहे असे मानणे आवश्यक आहे तसे मानले म्हणजे, 'उरृत' या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या उद्देश्य ऋकाराने दीर्घ ऋकाराचे ग्रहणक शास्त्रान्वयें ग्रहण होऊन दीर्घ ऋकार ह्रस्व ऋकारादेशाचा स्थानी ठरत असल्यामुळें, 'अचीकृतत्' हे इष्ट रूप सिद्ध होण्यात काही अडचण येत नाही आणि अशा रीतीने 'उरृत्' या सूत्रातील तपरकरण, 'अणुदित्' या सूत्रात निर्दिष्ट असलेला अण्प्रत्याहार 'लण्' या शिवसूत्रातील पर णकाराने साधला आहे याचे, ज्ञापक ठरते 'अ+कृत्+णि+चङ्+त' या स्थली 'कृत्' धातु णिजन्त असल्यामुळें 'णिश्रिद्रुस्रुभ्यः कर्तरि चङ्' सू २३१२ या सूत्राने 'च्लि' चे जागी चङ् होऊन व 'उरृत्' या सूत्राने 'कृत्' यात उपधेंत असलेल्या दीर्घ ऋकाराचे जागी ह्रस्व ऋकार होऊन व 'चङि' सू २३१५ या सूत्राने द्वित्व होऊन व 'उरत्' सू २२४४ या सूत्रात अभ्यासातील ऋकाराचे जागी अकार व 'कुहोश्चुः' सू २२४५ या सूत्राने अभ्यासातील ककाराचे जागी चकार होऊन व या स्थली 'सन्वल्लघुनि' सू २३१६ या सूत्राने सन्वद्भाव होत असल्यामुळें, 'सन्यतः' सू २३१७ या सूत्राने अभ्यासातील अकाराचे जागी इकार होऊन व 'दीर्घो लघोः'

सू २३१८ या सूत्राने तो ऱ्हस्व इकार दीर्घ होऊन व 'णेरनिटि' सू २३१३ या सूत्राने णिलोप होऊन 'अचिकृतत्' असे इष्ट रूप सिद्ध होते हें ल्क्षात ठेवावे आता 'उरृत्' या सूत्रातील तपरकरण, 'अणुदित' या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या अण्प्रत्याहार पर णकाराने साधला आहे याचे, ज्ञापक आहे असं जें शब्दरत्नकारानी म्हटले आहे त्यावर शकाकार अशी शका करतो की, तें तपरकरण इतर रीतीने चरितार्थ ठरत असल्यामुळें, 'अत्राण् परेण णकारेण' याचे ते ज्ञापक मानता येत नाही ते तपरकरण इतर रीतीने कसे चरितार्थ ठरतें ह तो पुढील पक्तीत सागतो ) 'तपरस्तत्कालस्य' सू १५ या तपर सूत्रान्वयें ऋकारान ऌकाराचे ग्रहण व्हावे याकरिता ते तपरकरण केले आहे पण (शब्दरत्नकार म्हणतात की,) हें म्हणणे बरोबर नाही, कारण 'स्थानेऽन्तरतम' सू ३९ या परिभाषेने ऋकाराचे ठिकाणी ऌकारादेशाच वारण होत असल्यामुळें, ऋकाराने ऌकाराचे ग्रहण केल्यान काहीच फलनिष्पत्ति होत नाही ('तपरस्तत्कालस्य' १–१–७० या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी असा प्रश्न केला आहे की, तें सूत्र नियमार्थ सूत्र आहे किंवा प्रापक–स्वतत्र विधायक–सूत्र आहे व या प्रश्नाचे उत्तर देताना भाष्यकार असं म्हणतात की, जर 'अणुदित्' या पूर्व सूत्रातून 'अण' या पदाची या उत्तर सूत्रात अनुवृत्ति केली तर हे सूत्र नियमार्थ ठरते, आणि जर या सूत्रात 'अण' या पदाची अनुवृत्ति केली नाही तर हें स्वतत्र विधिसूत्र ठरत हे स्वतत्र विधिसूत्र ठरल्यास, अणाखेरीज इतर कोणताहि वर्ण तपर केल्यास, जरी 'अणुदित्' या सूत्राने त्या वर्णाने कोणत्याहि सवर्णाचे ग्रहण होऊ शकत नाही तरी, 'तपरस्तत्कालस्य' या सूत्रान्वयें त्या वर्णाने तत्कालिक सवर्णाचे ग्रहण होऊ शकते शकाकाराने 'तपरस्तत्कालस्य' हें विधिसूत्र मानूनच वरील शका उपस्थित केली आहे त्याच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, 'उरृत' या सूत्रात अणूभिन्न ऱ्हस्व ऋकार

तपर केला असल्यामुळें, त्या तपरकरणाच्या सामर्थ्यानें, 'ॠॡवर्णयो मिथ सावर्ण्यं वाच्यम्' या वार्तिकान्वयें ऱ्हस्व ऋकाराचा सवर्ण जो तत्कालिक ऱ्हस्व ऌकार आहे त्याचे ग्रहण होऊ शकतें व त्यामुळें 'उरृत्' या सूत्राचा 'ऱ्हस्वऋकारस्य स्थाने ऱ्हस्वऋकारादेश स्यात्' असा अर्थ न होता, 'ऱ्हस्वऋकारस्य स्थाने ऌकारादेशोऽपि भवति' असा त्या सूत्राचा अर्थ होता त्यामुळें तें सूत्र व्यर्थ ठरत नाही आणि धातूच्या उपधेंतील ऋकाराचे जागीं ऌकारादेश देखील व्हावा याकरिता ते तपरकरण केलें असल्यामुळें व अशा रीतीनें तें तपरकरण चरितार्थ ठरत असल्यामुळें, 'अणाण परेण णकारेण' याचें तें ज्ञापक मानता येत नाही या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'तपरस्तत्कालस्य' हें जरी विधिसूत्र मानलें व त्या सूत्राच्या आधारावर 'ऋत्' यातील तपरकरणामुळें ऋकारानें जरी ऌकाराचे ग्रहण केलें तरी, ऋकार व ऌकार यांचे उच्चारणस्थान भिन्न असल्यामुळें व अशा रीतीनें त्या दोन वर्णांत आन्तरतम्य-अत्यन्त सादृश्य-नसल्यामुळें आणि 'स्थानेऽन्तरतम' या परिभाषेनें स्थानीचे जागीं अन्तरतम आदेश होणें भाग असल्यामुळें, ऋकाराचे जागी ऌकारादेश होऊच शकत नाही आणि त्यामुळें ऌकारग्रहण हें तपरकरणाचें फल आहे असें मानलें तरी त्यापासून कोणतेंहि फल निष्पन्न होऊ शकत नाही (म्हणून तें तपरकरण इतर रीतीनें चरितार्थ ठरत नसल्यामुळें, वर भाष्यकारांप्रमाणें 'अणाण् परेण णकारेण' याचें तें ज्ञापक आहे हेंच मानणें उचित आहे) 'उरृत्' या सूत्रांतील तपरकरणानें 'अणुदित्' या सूत्रांतील अण्-प्रत्याहार पर णकारानें साधला आहे असें जरी ज्ञापित होत असलें तरी, ऋकार हा भाव्यमान-विधीयमान किंवा पुढें होणारा-आदेश असल्यामुळें, म्हणजे तसा आदेश होण्याचें त्या सूत्रांत विधान केलें असल्यामुळें, ('भाव्यमानेन सवर्णानां ग्रहणं न'-परि १९-या परिभाषान्वयें) तो ऋकार सवर्णांचा ग्राहक होऊच शकत नाही

आणि त्यामुळें त्या सूत्रातील तपरकरण व्यर्थ ठरते असे कोणी म्हटल्यास, ते म्हणणें बरोबर नाही, कारण तपरकरण न केल्यास, त्या सूत्राचा एवढाच अर्थ होईल की, आदेशान्तराची, म्हणजे अर्, इर्, आर् या आदेशाची, निवृत्ति होऊन स्थानी आपले मूळ स्वरूपच कायम ठेवितो, व असा अर्थ केल्याने कोणत्याहि प्रकारचा अपूर्व बोध होत नसल्यामुळें, ऋकाराचे ठिकाणी विधीयमानत्व–भाव्यमानत्व येऊ शकत नाही (व त्यामुळें त्या ऋकाराला भाव्यमानपरिभाषा –परि १९–लागू पडणार नाही ) तपरकरण केल्याने ऋकाराचे ठिकाणी भाव्यमानता देखील येते ही गोष्ट वेगळी (शकाकाराचे असे म्हणणे आहे की, 'भाव्यमानेन सवर्णांना ग्रहण न' ही परिभाषा असल्यामुळे, अण्प्रत्याहार पर णकाराने साधला आहे व त्यामुळे ऋकार हा अण् आहे असे जरी मानले तरी, 'उरृत्' या सूत्रात ऋकारादेशाचे विधान केले असल्यामुळे, तो विधीयमान् ऋकार वरील परिभाषान्वय व 'अणुदित्' या सूत्रातील 'अप्रत्यय अविधीयमान' या निषेधान्वयें सवर्णाचा ग्राहक होऊच शकत नाही त्यामुळें त्या सूत्रातील तपरकरण व्यर्थ ठरते व अशा रीतीने, ते तपरकरण 'स्वाशे'–स्वविषयात–चरितार्थ ठरत नसल्यामुळें 'अत्राण् परेण णकारेण' याचे ते ज्ञापक मानता यत नाही कारण 'स्वाशे चारितार्थ्यम, वचनसिद्धि, फलमन्यस्थलेष्वपि' असे ज्ञापकाचे लक्षण असल्यामुळें, ज्याला ज्ञापक मानणे आहे ते स्वाशे चरितार्थ असणे आवश्यक आहे. या शकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, ज्या भाव्यमानपरिभाषेच्या आधारावर शकाकार 'उरृत्' या सूत्रातील तपरकरण व्यर्थ ठरवू पाहतो ती परिभाषा अशाच ठिकाणी लागू पडते की, जेथें भाव्यमान–विधीयमान–आदेशाचे ठिकाणी अपूर्वबोध्यत्व आहे जेथे स्थानीच्या स्वरूपाहून भिन्न अशा आदेशाचे विधान केले असेल तेथेंच आदेशाच ठिकाणी अपूर्वबोध्यत्व आहे असे म्हणता येत व तशाच आदेशाचे ठिकाणी भाव्यमानपरिभाषा लागू

पडते. पण जसा स्थानी आहे त्याच स्वरूपाचा आदेश त्याचे जागी व्हावा असें जेथें विधान केलें असेल तेथें आदेश स्थानीच्या स्वरूपात कोणताहि फरक करत नसून आदेश शब्दावर देखील स्थानीचें मूळ स्वरूप जसेंचे तसेंच कायम राहत असल्यामुळें, तशा आदेशाचे ठिकाणीं पूर्वी जें ज्ञात नाही त्याचें ज्ञान करून देणारें अशा प्रकारचें अपूर्वबोधकत्व येत नाही व त्यामुळें तशा आदेशाला षाष्ठस्थान-परिभाषा लागू पडत नाही उदाहरणार्थ 'त्यदादीनाम' सू ३६५ या सूत्रानें 'त्यद्' इत्यादि सर्वनामांच्या अन्त्य वर्णाचे जागी अकारादेश होतो सांगितलें आहे हा आदेश स्थानीहून भिन्न स्वरूपाचा असल्यामुळें त्याचे ठिकाणीं अपूर्वबोधकत्व आहे आणि त्यामुळें त्या आदेशाला षाष्ठस्थानपरिभाषा लागू पडते म्हणून 'इदम्,' या सर्वनामाहून विभक्तिप्रत्यय केल्या असता, 'इदम्' यांतील अन्त्य मकार अनुनासिक असून देखील त्याचे जागीं अनुनासिक अकारादेश न होता निरनुनासिक अकारादेशच होतो, कारण अनुनासिक अकार जरी निरनुनासिक अकाराचा सवर्ण आहे तरी, 'त्यदादीनाम' या सूत्रांत निरनुनासिक अकाराचे ग्रहण केलें असल्यामुळें त्या षाष्ठस्थान निरनुनासिक अकारानें, षाष्ठस्थान-परिभाषान्वयें, अनुनासिक अकाराचें ग्रहण करता येत नाही आता 'उरण्रपरः' या सूत्रांत जर तपरकरण केलें नाही व तें सूत्र केवळ कार्यान्तरव्यावृत्ति—म्हणजे अर्, इर्, आर्, या आदेशांची निवृत्ति—करणारी व स्थानी जसाचा तसाच कायम राहावा याकरिता केलें आहे असें नव्याकरणाच्या म्हणण्याप्रमाणें मानलें तर, आदेशाचे ठिकाणीं अपूर्वबोधकत्व येत नसल्यामुळें, तशा आदेशाला षाष्ठस्थान-परिभाषा लागू पडत नाही व त्यामुळें उद्देश्य ऋकारानें जसें दीर्घ ऋकाराचें ग्रहण करतां येतें त्याचप्रमाणें विधेय ऋकारानें देखील त्याचा सवर्ण जो दीर्घ ऋकार आहे त्याचें ग्रहण होईल आणि 'स्थानेऽन्तरतमः' या परिभाषान्वयें, 'ह्रस्वऋकारस्य स्थाने ह्रस्व

ऋकारादेश स्यात्, दीर्घ ऋकारस्य स्थाने दीर्घऋकारादेश स्यात' असा त्या सूत्राचा अर्थ होईल व तसा अर्थ केल्याने कोणतेहि विशेष फल निष्पन्न होणार नाही पण त्या सूत्रातील ऋकार तपर केला असल्यामुळे, त्या सूत्राचा असा अर्थ होतो की, स्थानी ऱ्हस्व ऋकार असो किंवा दीर्घ ऋकार असो त्याचे जागी ऱ्हस्व ऋकारादेशच होतो अशा रीतीने दीर्घ ऋकाराचे जागी जें ऱ्हस्व ऋकारादेश होण्याचे विधान केले आहे त्या योगाने आदेशाचे ठिकाणी अपूर्व-बोध्यत्व येते व त अपूर्वबोध्यत्व तपरकरणाच्या सामर्थ्यानेच येत असल्यामुळे, त तपरकरण स्वाचे' चरितार्थ ठरते हे उघड आहे म्हणून शब्दकाराचे जे म्हणणे आहे की, तें तपरकरण स्वाचे चरितार्थ ठरत नसल्यामुळे 'अत्राण् परण णकारेण' याच ते ज्ञापक मानना येत नाही ते त्याचे म्हणणे चूक ठरते असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे )

शब्दर न–अनिष्पत्तेरिति । 'वर्णानामुपदेशस्तावत्, तदुत्तर-कालमित्सञ्ज्ञा, तदुत्तरम् "आदिरन्त्येन" इति प्रत्याहार', तदुत्तर-काला सवर्णसञ्ज्ञा, तदुत्तरकाल "अणुदित्" इति, एतेन समुदितेनान्यत्र सवर्णाना ग्रहणम्' इति वाक्यापरिसमाप्तिन्यायादि-त्यर्थ । अथ भाव –"आदिरन्त्येन" इति प्रत्याहारसिद्धौ "नाज्झलौ" इत्येतद्वाक्यार्थबोधे सति, निर्णीततद्विषयपरिहारेण सवर्णपदबोध्यत्व-निश्चये "अणुदित" इत्यनेन तासना ग्रहण बोधनीयम् । अन्यथा बाधकसम्भावनया तुल्यास्यसूत्रजशक्तिग्रहेऽप्रामाण्यसन्देहेन तच्छा-स्त्रजबोधानापत्तिः । न चैतद्वाक्यार्थबोधात् प्राक् तन्निश्चय इति । यत्तु–निषेधवाक्यार्थबोधात्पूर्वं विधेर्वाक्यार्थबोध एव नेति, तन्न, पदार्थोपस्थितौ वाक्यार्थबोधे बाधकाभावात्, निषेधस्य प्रतियो-गिज्ञानोपपादकतया विध्यपेक्षत्वेऽपि विधेस्तदपेक्षत्वे मानाभावाच्च । रमास्वित्यत्र पत्वमिति । सर्वस्याप्येकया युक्त्या वारणेनापाद्यमानेऽयं न्यायानादरादेवमुक्तम् ॥

भाष्ये स्थितमिति । अनेनाऽत्वारप्रश्लेषे भानं दर्शितम् ।

'ग्रहणकशास्त्रस्याप्राप्यनिष्पत्ते' असा जो मनोरमेंत हेतु दिला आहे त्याचे कारण हें कीं, 'वर्णानामुपदेशस्तावत्, तदुत्तरकालमित्संज्ञा, तदुत्तरमादिरन्त्येन इति प्रत्याहार, तदुत्तरकाला सवर्णसंज्ञा, तदुत्तरकाल अणुदित् इति, एतेन समुदितेनान्यत्र सवर्णानां ग्रहणम्' असा वाक्यापरिसमाप्तिन्याय ('नाज्झलौ' १ १ १० या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारांनी सांगितला) आहे याचा भावार्थ हा आहे कीं, 'आदिरन्त्येन सहेता' सू ७ या सूत्रानें प्रत्याहाराची सिद्धि झाल्यावर 'नाज्झलौ' (या सूत्रांतील अच् व हल् या पदाच्या अर्थाचा बोध होऊन) या संपूर्ण सूत्राच्या अर्थाचा बोध झाल्यानंतर अच् व हल् हे सवर्णसंज्ञक होत नाहीत असे त्या निषेधक सूत्रानें ज्ञान होऊन ('तुल्यास्यप्रयत्नं सवर्णम्' सू १० या सूत्रांतील) 'सवर्ण' या पदानें वाणच्या सवर्णांचे ग्रहण करता येत व कोणत्या सवर्णांचे ग्रहण करता येत नाहीं याचा निश्चित बोध झाल्यावर 'अणुदित्' या सूत्रानें अणप्रत्याहारान्तर्गत वर्णांनीं त्या वर्णांचे जे वर्ण सवर्ण ठरतात तेवढ्याच ग्रहण होतें 'नाज्झलौ' या निषेधक सूत्राच्या अर्थाकडे लक्ष न देता 'तुल्यास्यप्रयत्नं सवर्णम्' या सवर्ण-संज्ञाविधायक सूत्रान्वयें जे जे सवर्ण ठरतात त्या सर्वांचे ग्रहण केल्यास, त्यापैकीं काहीं वर्णांचे ठिकाणीं 'नाज्झलौ' या निषेधक सूत्रानें सवर्णसंज्ञेचा बाध होण्याचा संभव असल्यामुळें, 'तुल्यास्यप्रयत्नं सवर्णम्' या सूत्रान्वयें ज्यांना सवर्ण मानलें आहे ते वास्तविक सवर्ण आहेत किंवा नाहींत याबद्दल संदेह उत्पन्न होऊन, त्या सूत्राच्या अर्थाचा निश्चित बोध न होण्याची आपत्ति येते. 'नाज्झलौ' या निषेधक सूत्राच्या अर्थाचा बोध होण्यापूर्वी 'तुल्यास्यप्रयत्नं सवर्णम्' या सूत्राच्या अर्थाचा निश्चित बोध होऊ शकत नाहीं (वर जो वाक्यापरिसमाप्तिन्याय सांगितला आहे त्याचें पूर्वी विस्तृत विवेचन केलेंच आहे व त्या न्यायाचा थोडक्यात भावार्थ हा आहे कीं, जेथें

अनेक पोटवाक्यानी महावाक्य बनले असते तेथें त्या पोटवाक्यापैकी एक पोटवाक्य प्रधान असून बाकीची पोटवाक्यें त्याची अङ्गभूत असतात व त्या अङ्गभूत पोटवाक्याचा अर्थ सिद्ध झाल्याशिवाय प्रधान–मुख्य–पोटवाक्याचा अर्थ सिद्ध होऊ शकत नाही, आणि या अङ्गभूत पोटवाक्याचा अर्थ करतेवेळी प्रधान पोटवाक्याच्या अर्थाचा उपयोग करता येत नाही असा अर्थाचा हा न्याय असल्यामुळें व महावाक्यात 'अणुदित्' हें मुख्य पोटवाक्य असून 'तुल्यास्यप्रयत्नं सवर्णम्' व 'नाज्झलौ' ही पोटवाक्यें त्याची अङ्गभूत असल्यामुळें, 'नाज्झलौ' या अङ्गभूत पोटवाक्याचा अर्थ करतवेळी 'अणुदित्' या मुख्य पोटवाक्याच्या अर्थाचा उपयोग करता येत नाही, म्हणजे प्रथम वर्णांचा उपदेश, नतर इत्संज्ञा, नतर प्रत्याहारसिद्धि, नतर सवर्णसंज्ञा व अखेरीस सवर्णांचे ग्रहण असा क्रम असल्यामुळें व या क्रमाप्रमाणे सवर्णांचे ग्रहण हें सर्वांच्या शवटी असल्यामुळें, 'नाज्झलौ' या अङ्गभूत व पूर्वी असणाऱ्या पोटवाक्याचा अर्थ करतेवेळी सर्वांच्या अखेरीस असणाऱ्या 'अणुदित' या मुख्य पोटवाक्याच्या अर्थाचा उपयोग करता येत नाही त्यामुळें 'नाज्झलौ' या निषेधक सूत्रान्वयें जरी हकारानें अक्षरसमाम्नायात साक्षात् पठित असलेल्या अकाराचे ग्रहण होऊ शकत नाही तरी दीर्घ व प्लुत आकार अक्षरसमाम्नायात पठित नसल्यामुळें व अशा रीतीनें 'नाज्झलौ' या निषेधक सूत्रात निर्दिष्ट असलेल्या अच्प्रत्याहारानें त्याच ग्रहण होऊ शकत नसल्यामुळें हकारानें त्याच ग्रहण होण्याची आपत्ति येते हें खरं की, 'अणुदित्' या ग्रहणकशास्त्रान्वयें अकाराने दीर्घ व प्लुत आकाराचे ग्रहण करता येते, व तसं केल्यास, हकाराने जस अकाराचे ग्रहण होऊ शकत नाही तसेच दीर्घ व प्लुत आकाराचें देखील ग्रहण होऊ शकणार नाही. पण वर सांगितलेल्या वाक्यापरिसमाप्तिन्यायान्वयें 'नाज्झलौ' या सूत्राचा अर्थ करतेवेळी 'अणुदित्' या सूत्राच्या अर्थाचा उपयोग

करता येत नसल्यामुळें, वर दर्शविलेली आपत्ति टाळता येत नाही ती आपत्ति टाळण्याकरिताच 'नाज्झलौ' या सूत्रात दीक्षितांना दीर्घ व प्लुत आकाराचा प्रश्लेष करणे भाग पडले असा शब्दरत्न-कारांच्या म्हणण्याचा आशय आहे तसेच, 'प्रकल्प्य चापवादविषयं तत उत्सर्गोऽभिनिविशते'–परि ६४–, म्हणजे प्रथम अपवादाच्या कक्षेत येणारी उदाहरणे वगळून नतर उरलेल्या उदाहरणांतच सामान्य शास्त्र प्रवृत्त होते, अशी परिभाषा असल्यामुळें, एखाद्या विधिसूत्राच्या अर्थाचा निश्चित बोध होण्याकरिता, म्हणजे ते सूत्र कोठें प्रवृत्त करावे व कोठें प्रवृत्त करू नये याचे निश्चित ज्ञान होण्याकरिता, त्या सूत्राची जी निषेधक व अपवादक सूत्रें आहेत त्यांचे ज्ञान असणे आवश्यक आहे तसे ज्ञान असले म्हणजेच, निषेधक व अपवादक सूत्राच्या कक्षेत जी उदाहरणे येतात ती वगळून इतर स्थली सामान्यशास्त्राचा उपयोग करावा हे निश्चित ज्ञान होऊ शकते तसे ज्ञान पूर्वी करून न घेता सामान्यशास्त्राचा सर्वत्र उपयोग केल्यास, अनिष्ट रूपें होण्याची आपत्ति येईल उदाहरणार्थ 'प्रथमयो पूर्वसवर्ण' सू १६४ या सूत्राचे 'नादिचि' सू १६५ हें निषेधक सूत्र आहे या निषेधक सूत्राच्या अर्थाचे प्रथम ज्ञान करून न घेता, 'प्रथमयो पूर्वसवर्ण' हे सामान्यशास्त्र सर्वत्र प्रवृत्त केल्यास, 'राम+औ=रामा, विश्वपा+औ=विश्वपा' इत्यादि अनिष्ट रुपें होण्याची आपत्ति येईल तसेच 'झोऽन्त' सू २१६९ या सूत्राचे 'अदभ्यस्तात्' सू २४७९ हें अपवादक सूत्र आहे या अपवादक शास्त्राच्या अर्थाचे प्रथम ज्ञान करुन न घेता, 'झोऽन्त' हें सामान्यशास्त्र सर्वत्र प्रवृत्त केल्यास, 'ददन्ति, दधन्ति, नेनिजन्ति' इत्यादि अनिष्ट रूपें होण्याची आपत्ति येईल म्हणून सामान्यशास्त्र व त्याची जी निषेधक व अपवादक शास्त्रें आहेत त्या सर्वांची एकवाक्यता करून सामान्यशास्त्राच्या अर्थाचा निश्चित बोध करून घेणे योग्य आहे तसे केल्यानेंच सामान्यशास्त्राच्या अर्थाचा निश्चित बोध होऊ शकतो व ते सामान्यशास्त्र कोठें प्रवृत्त करावे व कोठें

प्रवृत्त करू नये याचे निश्चित ज्ञान होऊ शकते म्हणून 'तुल्यास्य-प्रयत्न सवर्णम्' या सूत्राचे 'नाज्झलौ' हे निषेधक सूत्र असल्यामुळें, त्या दोन्ही सूत्राची एकवाक्यता करून 'तुल्यास्यप्रयत्न सवर्णम्' या सूत्राच्या अर्थाचे निश्चित ज्ञान करून घेणे योग्य आहे तसे न केल्यास व 'नाज्झलौ' या निषेधक सूत्राकडे दुर्लक्ष करून 'तुल्यास्य-प्रयत्न सवर्णम्' हे सवर्णसंज्ञाविधायक सूत्र सर्वत्र एकदम प्रवृत्त केल्यास, हकाराने अकाराचे, शकाराने इकाराचे, षकाराने ऋकाराचे व सकाराने लृकाराचे ग्रहण होण्याची आपत्ति येईल सारांश निषेधक व अपवादक शास्त्राच्या अर्थाचा प्रथम बोध करून घेतल्याशिवाय सामान्यशास्त्राच्या अर्थाचा निश्चित बोध होऊ शकत नाही असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा भावार्थ आहे) निषेधक सूत्राच्या *अर्थाचा बोध होण्यापूर्वी विधिसूत्राच्या अर्थाचा बोध मुळीच होऊ* शकत नाही हे म्हणणे मात्र बरोबर नाही, कारण विधिसूत्रातील सर्व पदाच्या अर्थाचा बोध झाल्यावर त्या विधिसूत्राच्या अर्थाचा बोध होण्यात काहीच बाधक–अडचण–येत नाही दुसरे असे की, निषेधक शास्त्र ज्या विधिसूत्राचा निषेध करते त्या प्रतियोगिस्वरूप विधि सूत्राच्या ज्ञानाचे उपपादन करणारे ते निषेध शास्त्र असल्यामुळें, म्हणजे विधिसूत्रात जें विधान केले आहे त्या विधानाला अनुलक्षूनच त्याचा विशिष्ट *स्थली निषेध* करणारे ते निषेधक सूत्र *असल्यामुळे*, जरी निषेधशास्त्राला विधिसूत्राची अपेक्षा असते, म्हणजे विधिसूत्राचा अर्थ कळल्याशिवाय निषेधक सूत्राच्या अर्थाचा बोध होऊ शकत नाही, तरी विधिसूत्राच्या अर्थाचा बोध होण्याकरिता निषेधक सूत्राच्या अर्थाच्या ज्ञानाची आवश्यकता आहे असे मानण्यास कोणतेहि प्रमाण नाही (सारांश शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय हा आहे की, जरी विधिसूत्र उच्चारल्याबरोबर त्याचा अर्थ निषेधक सूत्राच्या अर्थाच्या सहायाशिवाय स्वतंत्रपणे कळू शकतो तरी तो निश्चित बोध नव्हे निषेधक सूत्राचा अर्थ जाणल्याशिवाय

व त्या सूत्राची विधिसूत्राशी एकवाक्यता करून त्या दोन सूत्रांचा मिळून अर्थ केल्याशिवाय आणि निषेधक सूत्रानें विधिसूत्राच्या कक्षेंतून काय वगळले जाते हे कळल्याशिवाय, विधिसूत्राच्या अर्थाचा निश्चित बोध होऊ शकत नाही तरी पण विधिसूत्रांत निर्दिष्ट असलेल्या पदाच्या अर्थाचा बोध झाल्यावर जसा विधिसूत्राच्या अर्थाचा निषेधक सूत्राच्या सहायाशिवाय स्वतन्त्रपणे बोध होऊ शकतो—तो निश्चित बोध नव्हे ही गोष्ट वेगळी—तसा निषेधक सूत्राच्या अर्थाचा विधिसूत्राच्या सहायाशिवाय स्वतन्त्रपणे बोध होऊ शकत नाही, कारण विधिसूत्राने होणाऱ्या कार्याच्या अभावाचें प्रतिपादन करणारे निषेधक सूत्र असल्यामुळें, व अभावज्ञान भाव-ज्ञानाधीन असल्यामुळें, अभावाचे ज्ञान होण्यापूर्वी, ज्याला अभाव सांगितला आहे त्याचा प्रतियोगी जो भाव त्याचे जसें पूर्व ज्ञान असणे आवश्यक आहे त्याचप्रमाणे निषेधक सूत्राच्या

सवर्णदीर्घो न ' असा अर्थ करतां येतो व अवर्णात् प्रथमाद्वितीययो. इचि परे पूर्वसवर्णदीर्घो न स्यात् ' असा त्या निषेधक सूत्राचा अर्थ आहे हे ध्यानात येऊ शकतें, आणि म्हणूनच 'निषेधस्य...माना-भावाच्च' असे शब्दरत्नकारानी म्हटले आहे ) 'रमास्वित्यत्र षत्वम्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे तें, ज्या ज्या कार्यांची प्राप्ति आहे *त्या सर्व कार्यांचे निवारण एकाच युक्तीने, म्हणजे 'नाज्झलौ' या* सूत्रात आकारप्रश्लेप केल्याने, होत असल्यामुळें, 'पूर्वत्रासिद्धम्' या न्यायाकडे लक्ष न देता, म्हटले आहे ('रमा+सु' या उदाहरणात, हकाराने आकाराचे ग्रहण केल्यास, वास्तविक प्रथम षत्व पावत नाही, कारण 'आदेशप्रत्यययो ' सू २१२ हे षत्वविधायक सूत्र त्रैपादिक उत्तरसूत्र असून, 'हो ढ ' सू. ३२४ व 'षढो क सि' सू २९५ ही त्रैपादिक पूर्व सूत्रें असल्यामुळें, 'पूर्वत्रासिद्धम्' या न्यायान्वयें त्या पूर्व सूत्राची प्रथम प्राप्ति आहे म्हणून दीक्षितानी वास्तविक असे म्हणावयास हवे होते की, 'रमासु' या उदाहरणात हकाराने आकाराचे ग्रहण केल्यास, म्हणजे आकार हकार मानल्यास, त्या आकाराचा प्रथम ढकार होऊन व नतर ढकाराचा ककार होऊन त्यानतर 'सु' प्रत्ययातील सकाराचे षत्व होण्याची आपत्ति येते परतु 'नाज्झलौ' या सूत्रात आकारप्रश्लेप केल्याने व अशा रीतीने हकार जसा अकाराचा सवर्ण होत नाही तसा तो आकाराचा देखील सवर्ण होऊ शकत नसल्यामुळें त्या एकाच प्रश्लेपरूप युक्तीने ढत्व, कत्व व षत्व ही सर्व कार्यें टाळता येतात आणि म्हणून दीक्षितानी मनोरमेंत अखेरीस होणाऱ्या कार्याचीच आपत्ति दाखविली आहे ) 'नाज्झलौ इति सूत्र माऽस्त्विति भाष्ये स्थितम्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे तें, 'नाज्झलौ' या सूत्रात आकारप्रश्लेष करण्यास ते भाष्य प्रमाण आहे हे दर्शविण्याच्या हेतूनें म्हटले आहे (आकारप्रश्लेप करण्यास ते भाष्य कसे प्रमाण ठरते याचे पूर्वीं विवेचन केलेच आहे )

**मनोरमा–"वृद्धिरादैच्" ऐजिह द्विमात्र एव, तात्परत्वात्,**

तेन 'कृष्णैकत्वम्' इत्यत्र त्रिमात्रो न । एवमुत्तरसूत्रेऽपि । तेन 'गङ्गोदकम्' इत्यादौ त्रिमात्रो न ॥

'वृद्धिरादैच्' सू १६ या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'ऐच्' नें, म्हणजे 'ऐ, औ' या वर्णांनी, द्विमात्रिक 'ऐ औ' चेच ग्रहण होते, कारण त्या सूत्रात 'आत्' यातील तकारानंतर 'ऐच्' चे उच्चारण केले आहे त्यामुळें 'कृष्ण+एकत्वम्=कृष्णैकत्वम्' या स्थली होणारा वृद्धिरूप एकादेश जो 'ऐ' होतो तो त्रिमात्रिक होत नाही याच-प्रमाणे उत्तर सूत्रात, म्हणजे 'अदेङ् गुण' सू १७ या सूत्रात, देखील समजावे त्यामुळें 'गङ्गा+उदकम=गङ्गोदकम इत्यादि स्थली होणारा गुणरूप एकादेश त्रिमात्रिक होत नाही ('तपर-स्तत्कालस्य' या सूत्रातील 'तपर' या पदाचा भाष्यकारांनी 'त परो यस्मात्' व 'तात् पर' असा दोन तऱ्हेनें विग्रह केला आहे त्यामुळें ज्या वर्णापुढें तकार जोडला आहे—जसे अत्, इत्, उत् इत्यादि—किंवा ज्या वर्णापूर्वी तकार उच्चारला आहे असा दोन्ही प्रकारच्या वर्णांनी तत्कालिक वर्णाचेच ग्रहण होते 'वृद्धिरादैच' या सूत्रात 'आत्' यातील तकारापुढें 'ऐच' पठित केला आहे व तसेच 'अदेङ् गुण' या सूत्रात 'अत्' यातील तकारापुढें 'एङ्' पठित केला आहे म्हणून 'तपरस्तत्कालस्य' या सूत्रान्वयें वरील दोन सूत्रात पठित असलेले एङ् व ऐच्, म्हणजे ए, ओ, ऐ, औ हे वर्ण, द्विमात्रिक ए, ओ, ऐ, औ याचेच वाचक होतात, आणि या वर्णांनी त्रिमात्रिक किंवा चतुर्मात्रिक ए, ओ, ऐ, औ याचे ग्रहण होत नाही सारांश वृद्धिरूप किंवा गुणरूप एकादेश त्रिमात्रिक किंवा चतुर्मात्रिक न होता द्विमात्रिकच होतो म्हणूनच 'कृष्ण+एकत्वम्' या स्थली अकाराची एक मात्रा असून 'ए' द्विमात्रिक आहे तरी, 'वृद्धिरेचि' सू ७२ या सूत्राने त्याचे जागी होणारा वृद्धिरूप 'ऐ' हा एकादेश आन्तरतम्याने, म्हणजे 'स्थानेऽन्तरतम' या सूत्रान्वयें, त्रिमात्रिक न होता, द्विमात्रिकच होतो त्याचप्रमाणे 'खट्वा+ओदन'

या स्थली जरी आ, औ हे प्रत्येक द्विमात्रिक आहेत तरी त्याचे जागी होणारा 'औ' हा वृद्धिरूप एकादेश आन्तरतम्याने चतुर्मात्रिक न होता द्विमात्रिकच होतो याचे कारण हेच की, वर सागितल्याप्रमाणे 'वृद्धिरादैच' या सूत्रात द्विमात्रिक ऐ, औ यानाच वृद्धिसज्ञा होणे सागितले आहे आणि त्याचप्रमाणे 'अदेङ् गुण' या सूत्रात द्विमात्रिक ए, ओ यानाच गुणसज्ञा होणे सागितले आहे 'वृद्धिरादैच्' १-१-१ या सूत्रावरील भाष्यात 'अथ किमर्थमाकारस्तपर क्रियते' असा प्रश्न करून त्या प्रश्नाचे अखेरीस उत्तर देताना भाष्यकार म्हणतात– 'इद तर्हि प्रयोजनम । आन्तर्यतस्त्रिमात्रचतुर्मात्राणा स्थानिना त्रिमात्रचतुर्मात्रा आदेशा मा भूवन्निति । खट्वा इन्द्र खट्वेन्द्र । खट्वा उदक खट्वोदकम् । खट्वा ईषा खट्वेषा । अथ क्रियमाणेऽपि तकारे कस्मादेव त्रिमात्रचतुर्मात्राणा स्थानिना त्रिमात्रचतुर्मात्रा आदेशा न भवन्ति । तपरस्तत्कालस्येति नियमात् । ननु त परो यस्मात्सोय तपर । नेत्याह । तादपि परस्तपर ।' या भाष्याच्या अनुरोधानेच दीक्षितानी प्रकृत सूत्राचे मनोरमेत वर सागितल्या-प्रमाणे व्याख्यान केले आहे )

**मनोरमा–"भूवादयो धातवः" भूश्च वाश्चेति द्वन्द्वः । आदिशब्दयोर्व्यवस्थाप्रकारवाचिनोरेकशेषः । भूवौ आदी येषामिति बहुव्रीहि । भूप्रभृतयो वासदृशा । सादृश्यञ्च क्रियावाचकत्वेनेत्यभि-प्रेत्याह–क्रियावाचिन इति । क्रियावाचिन किम् ? "या पश्यसि" इत्यादौ धातुत्व मा भूत् । सति हि तस्मिन्, "आतो धातोः" इति स्यात् । भ्वादय. किम् ? 'हिरुक्' 'पृथक्' इत्याद्यव्ययानाम्, 'शिश्ये' इति भावार्थतिङन्तस्य च मा भूत् स्तम्भ्वादीनामुदित्करणेन सौत्राणा धातुत्व ज्ञाप्यते । चुलुम्पादीना तु "बहुलमेतन्निदर्शनम्" इति गणसूत्रेण सङ्ग्रहः ॥**

'भूवादयो धातव' सू १८ या सूत्रातील 'भूवादय' या पदाचा 'भूश्च वाश्च' असा प्रथम द्वन्द्वसमास करून व नतर व्यवस्था-

वाचक आणि प्रकारवाचक असा दोन 'आदि' या पदाचा एकशेष करून अखेरीस 'भुवो आदी येषाम्' असा बहुव्रीहिसमास केल्याने 'भूवादय.' हा शब्द सिद्ध झाला आहे, व असा समास केल्याने त्या पदाचा 'भूप्रभृतयो वासदृशा' असा अर्थ होतो. ('व्यवस्था' या पदाचा 'प्रभृति' व 'प्रकार' या पदाचा 'सादृश्य' हा अर्थ आहे व प्रथम 'आदि' पद 'प्रभृति' या अर्थाचे वाचक असून द्वितीय 'आदि' पद 'सादृश्य' या अर्थाचे वाचक आहे म्हणून 'भू आदि= भूप्रभृति, वा आदि=वासदृश' असा अर्थ होत असल्यामुळे, त्या संपूर्ण पदाचा 'भूप्रभृतयो वासदृशा' असा अर्थ होतो 'आदि' या दोन भिन्नार्थवाचक पदाचा 'सरूपाणामेकशेष एकविभक्तौ' सू १८८ या सूत्रान्वये एकशेष झाला आहे 'वासदृशा' असे जे म्हटले आहे त्याचे कारण हे की, 'वा गतिगन्धनयो' या धातून व धातुपाठात पठित असलेल्या भूप्रभृति इतर धातून) क्रियावाचकत्वरूप सादृश्य आहे (म्हणून 'वासदृशा' या पदाचा 'क्रियावाचिन' असा अर्थ होतो) हे सर्व लक्षात घेऊनच 'क्रियावाचिनो भ्वादयो धातुसंज्ञा स्यु' असा सदर सूत्राचा कौमुदीत अर्थ केला आहे (सारांश सदर सूत्राचा असा अर्थ आहे की, 'भू' पासून सुरू होणारे जे शब्द धातुपाठात पठित केले आहेत त्यानाच धातुसंज्ञा होते परंतु ती संज्ञा त्याना तेव्हाच होते की, जेव्हा ते क्रियेचे वाचक असतात जे शब्द क्रियेचे वाचक नाहीत ते शब्द धातुपाठात पठित असले तरी त्याना धातुसंज्ञा होत नाही, आणि तसेच जे शब्द क्रियेचे वाचक असून धातुपाठात पठित नाहीत त्याना देखील धातुसंज्ञा होत नाही) क्रियावाचिनो भ्वादयो धातुसंज्ञाः स्यु' या कौमुदीतील वरील 'क्रियावाचिन' हे पद अशाकरिता घातले आहे की, 'या पश्यसि' इत्यादि स्थली 'या' या शब्दाला धातुसंज्ञा होऊ नये ('यद्' शब्दापुढे विभक्ति-प्रत्यय आला असता, 'त्यदादीनाम' सू २६५ या सूत्राने 'यद्' यातील अन्त्य दकाराचे जागी अकार होऊन व 'अतो गुणे' सू १९१

या सूत्राने पररूप एकादेश होऊन 'यद्=य+अ=य' असे अदन्त रूप होते व त्याहून 'अजाद्यतष्टाप्' सू ४५४ या सूत्राने 'टाप=आ' हा स्त्रीप्रत्यय केला असता 'य+आ=या' असे स्त्रीप्रत्ययान्त रूप होते 'या प्रापणे' हा धातु धातुपाठात अदादिगणात पठित आहे म्हणून वर सांगितल्याप्रमाणे 'यद्' शब्दाहून सिद्ध केलेल्या 'या' या शब्दाला धातुसंज्ञा होण्याची आपत्ति येते परंतु हा शब्द जरी धातुपाठात पठित आहे तरी 'या पश्यसि' या उदाहरणात 'या' हा शब्द क्रियावाचक नसल्यामुळें त्याला धातुसंज्ञा होत नाही आणि अशा रीतीने 'क्रियावाचिन' हे पद अन्वर्थक व आवश्यक ठरते) त्याला धातुसंज्ञा झाली असती तर ('या+शस्=या+अस्=या' या म्हणी 'या' हे 'यचि भम' सू २३१ या सूत्रान्वय भसंज्ञक अङ्ग ठरत असल्यामुळें) 'आतो धातो' सू २४० या सूत्राने 'या' या भसंज्ञक अङ्गातील अन्त्य आकाराचा लोप होण्याची आपत्ति आली असती (आणि 'या' असे इष्ट रूप सिद्ध होऊ शकले नसते प्रकृत सूत्रावरील भाष्यात १-३-१ 'पाठेन धातुसंज्ञाया समानशब्दप्रतिषेध' हे वार्तिक पठित करून त्या वार्तिकाचे व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात—'पाठेन धातुसंज्ञाया समानशब्दाना प्रतिषेधो वक्तव्य । या इति धातु, या इत्यावन्त । वा इति धातु, वा इति निपात । नु इति धातु, नु इति प्रत्ययश्च निपातश्च । दिव् इति धातु, दिव् इति प्रातिपदिकम् । किं च स्याद्यद्येतेपामपि धातुसंज्ञा स्यात् ? । धातोरिति तव्यदादीनामुत्पत्ति प्रसज्यत । नैष दोष । साधने तव्यदादयो विधीयन्ते साधन च क्रियाया । क्रियाऽभावात् साधनाऽभाव । साधनाभावात् सत्यामपि धातुसंज्ञाया तव्यदादयो न भविष्यन्ति इद तर्हि या पश्य, आतो धातोरिति लोप प्रसज्येत ।' त्याच भाष्यात पुढें भाष्यकार म्हणतात—'तद्यदा तावत् क्रियावचनो धातुरित्येष पक्षस्तदा भू इत्यत्र य आदिशब्द स व्यवस्थाया वर्तते, वा इत्यन य आदिशब्द स प्रकारे, भू इत्येवमादयो वा इत्येव प्रकारा इति यदि तर्हि लक्षण क्रियते,

सूत्राने यणादेश होऊन सिद्ध झाले आहे 'शिर्ये' हा शब्द जरी क्रियावाचक आहे तरी तसा शब्द धातुपाठात पठित नसल्यामुळें त्याला धातुसंज्ञा होत नाही. जर त्याला धातुसंज्ञा झाली असती तर वर सांगितल्याप्रमाणे त्याहून तिबादि व तव्यदादि प्रत्यय होण्याची आपत्ति आली असती वर दर्शविलेल्या सर्व आपत्ति टाळण्याकरिताच दीक्षितांनी 'क्रियावाचिनो भ्वादयो धातुसंज्ञाः स्युः' असा प्रकृत सूत्राचा कौमुदीत अर्थ केला आहे व तो अर्थ वर दिलेल्या भाष्याला अनुसरूनच केला आहे) 'स्तम्भु' इत्यादि सूत्रनिर्दिष्ट धातु उदित् केले असल्यामुळें ते धातु आहेत हे ज्ञापित होतें ('स्तम्भु' इत्यादि सुमारें वीस धातु धातुपाठात पठित केले नसून पाणिनीय सूत्रात त्यांचा निर्देश केला आहे 'स्तम्भु' इत्यादि धातु उदित् पठित केले असल्यामुळें त्यांचें उदित्करण ते धातु आहेत याचें ज्ञापक ठरतें उदित् धातूपुढें 'क्त्वा' प्रत्यय आल्यास त्या प्रत्ययाला विकल्पेंकरून इडागम होतो या अर्थाचें 'उदितो वा' सू ३३२८ हे सूत्र आहे. जर 'स्तम्भु' इत्यादि सूत्रनिर्दिष्ट शब्द धातुसंज्ञक नसते तर त्यांना उदित करून पठित करण्याची काहीच गरज नव्हती पण ते मुद्दाम उदित् करून पाणिनीय सूत्रात पठित केले असल्यामुळें ते धातुसंज्ञक आहेत हें ज्ञापित होतें) 'बहुलमेतन्निदर्शनम्' या गणसूत्रान्वयें 'चुलुम्प' इत्यादि धातुसंज्ञक ठरतात ('बहुलमेतन्निदर्शनम्' हें गणसूत्र असल्यामुळेंच दीक्षितांनी 'च्व्यतेर' सू २०२१ या सूत्रावरील कौमुदीत 'भ्वादिराकृतिगणः । तेन चुलुम्पतीत्यादिसंग्रहः.' असें म्हटलें आहे 'चुलुम्प' हा धातु 'लोप' या अर्थाचा वाचक आहे सारांश 'चुलुम्प' इत्यादि शब्द जरी धातुपाठात साक्षात् पठित नाहींत तरी ते क्रियावाचक असल्यामुळें व वरील गणसूत्रान्वयें त्यांचा धातूंत संग्रह करता येत असल्यामुळें, ते शब्द धातुसंज्ञक ठरतात असा दीक्षितांच्या म्हणण्याचा आशय आहे)

शब्दरत्न–सादृश्य वेति । यायातो यातादृश्यं च प्रयोगभेदेन बोध्यम् । आतो धातोरिति । न च स्त्र्यर्थनिमित्तकटापो बहिरङ्गा-

धातुपाठात पठित आहेत ते 'वा' धातूसारखे क्रियावाचक असतानाच त्याना धातुसज्ञा होते....पण जो क्रियेचा वाचक आहे तो धातु होय असे जर 'धातु' या सज्ञेचे लक्षण केले तर, धातुपाठ पठित करण्याची गरज काय ? धातुपाठ पठित केलाच पाहिजे व त्याचे प्रयोजन हें की, प्रातिपदिकाना, म्हणजे हिरुक्, पृथक् इत्यादि क्रियावाचक अव्ययरूप प्रातिपदिकाना आणि तसेच 'आणवयति, वट्टति, वड्ढति' इत्यादि अपभ्रंश शब्दाना धातुसज्ञा न व्हावी या वरील भाष्याला अनुसरूनच मनोरमेंत प्रकृत सूत्राचे विवरण केले आहे व या भाष्या-वरून हे स्पष्ट होते की, जे शब्द धातुपाठात पठित आहेत ते जेव्हा क्रियेचे वाचक असतात तेव्हाच त्याना धातुसज्ञा होते व जे शब्द क्रिया-वाचक असून देखील धातुपाठात पठित नाहीत त्याना धातुसज्ञा होत नाही ) वर दिलेल्या कौमुदीतील पक्तीत 'भ्वादय' हे पद अशाकरिता घातले आहे की, 'हिरुक्, पृथक्' इत्यादि अव्ययाना व तसेच 'शिश्ये' या भाववाचक तिङन्ताला धातुसज्ञा होऊ नये ('हिरुक, पृथक्' हे शब्द स्वरादिगणात पठित असल्यामुळे 'स्वरादिनिपातमव्ययम' सू ४४७ या सूत्रान्वयें त्याना अव्ययसज्ञा आहे हे दोन्ही शब्द वर्जनरूप क्रियेचे वाचक आहेत मनोरमेंतील अव्ययप्रकरणात दीक्षितानी 'पृथक भिन्ने, हिरुक, वर्जने' असा या अव्ययाचा अर्थ दिला आहे व प्रसादकारानी या दोन्ही शब्दाचा 'वर्जने' हाच अर्थ दिला असून 'त्वत्त पृथक नास्ति बन्धु, हिरुक् कर्मणा मोक्ष' ही उदाहरणे दिली आहेत अशा रीतीने हे दोन्ही शब्द जरी क्रियेचे वाचक आहेत तरी भूपासून सुरु होणाऱ्या धातुपाठात ते पठित नसल्यामुळें त्याना धातुसज्ञा होत नाही त्याना धातुसज्ञा झाली असती तर त्या शब्दाहून 'धातो' सू २८२९ या अधिकारसूत्रान्वयें तिबादि व तव्यदादि प्रत्यय होण्याची आपत्ति आली असती 'शिश्ये' हे 'शीङ स्वप्ने' या अकर्मक धातूचे लिटाचे प्रथमपुरुषाचे एकवचन आहे व ते 'शि + शी + ए' अशी स्थिति झाली असता 'एरनेकाच' सू. २७२ या

सूत्राने यणादेश होऊन सिद्ध झाले आहे 'शिरयें' हा शब्द जरी क्रियावाचक आहे तरी तसा शब्द धातुपाठात पठित नसल्यामुळें त्याला धातुसंज्ञा होत नाही. जर त्याला धातुसंज्ञा झाली असती तर वर सांगितल्याप्रमाणे त्याहून तिवादि व तव्यदादि प्रत्यय येण्याची आपत्ति आली असती. वर दर्शविलेल्या सर्व आपत्ति टाळण्याकरिताच दीक्षितानी 'क्रियावाचिनो भ्वादयो धातुसंज्ञा स्यु' असा प्रकृत सूत्राचा कौमुदीत अर्थ केला आहे व तो अर्थ वर दिलेल्या भाष्याला अनुसरूनच केला आहे) 'स्तम्भु' इत्यादि सूत्रनिर्दिष्ट धातु उदित् केले असल्यामुळें ते धातु आहेत हे ज्ञापित होते ('स्तम्भु' इत्यादि सुमारे वीस धातु धातुपाठात पठित केले नसून पाणिनीय सूत्रात त्याचा निर्देश केला आहे 'स्तम्भु' इत्यादि धातु उदित् पठित केले असल्यामुळें त्याचे उदित्करण ते धातु आहेत याचे ज्ञापक ठरते उदित् धातूपुढें 'क्त्वा' प्रत्यय आल्यास त्या प्रत्ययाला विकल्पेकरून इडागम होतो या अर्थाचे 'उदितो वा' सू ३३२८ हे सूत्र आहे जर 'स्तम्भु' इत्यादि सूत्रनिर्दिष्ट शब्द धातुसंज्ञक नसते तर त्याना उदित करून पठित करण्याची काहीच गरज नव्हती पण ते मुद्दाम उदित् करून पाणिनीय सूत्रात पठित केले असल्यामुळें ते धातुसंज्ञक आहेत हे ज्ञापित होते) 'बहुलमेतन्निदर्शनम्' या गणसूत्रान्वयें 'चुलुम्प' इत्यादि धातुसंज्ञक ठरतात ('बहुलमेतन्निदर्शनम्' हे गणसूत्र असल्यामुळेंच दीक्षितानी 'च्यवनेर' सू २०२१ या सूत्रावरील कौमुदीत 'भ्वादिरवाद्‌निगण । तेन चुलुम्पतीत्यादिसग्रह' असे म्हटले आहे 'चुलुम्प' हा धातु 'लोप' या अर्थाचा वाचक आहे सारांश 'चुलुम्प' इत्यादि शब्द जरी धातुपाठात साक्षात् पठित नाहीत तरी ते क्रियावाचक असल्यामुळें व वरील गणसूत्रान्वयें त्याचा धातूत संग्रह करता येत असल्यामुळें, ते शब्द धातुसंज्ञक ठरतात असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे)

शब्दरत्न—सादृश्य चेति । सापातो वागादृश्यं च प्रयोगभेदेन बोध्यम् । आतो धातोरिति । न च स्थ्यर्थनिमित्तत्वापो बहिरङ्गा-

सिद्धत्वम् । "नाजानन्तर्ये" इति निषेधात्, ततोऽपि बहिर्भूतसख्यानिमित्तकविभक्तिनिमित्तकभसञ्ज्ञानिमित्तकत्वेन लोपस्य बहिरङ्गत्वाच्च अर्थनिमितकबहिरङ्गत्वस्याभावाच्च । नाप्यय लाक्षणिक,

"नकारजावनुस्वारपञ्चमौ झलि धातुषु ।
सकारज शकारश्चेषट्टुवर्गस्तवर्गज" ॥ १ ॥

इत्यभियुक्तोक्तेर्धातुषु लाक्षणिका नामपि दर्शनेन तद्विषये तत्परिभाषाया अप्रवृत्ते । "आतो धातो" इत्यत्र प्रतिपदोक्त आकारो गृह्यते इति तु वक्तुमप्यशक्यम्, 'पशुष' इत्यसिद्धयापत्ते । पशु सनोतीति विट्, "विड्वनो" इत्यात्वम् । 'आतोऽनाप" इति वार्तिकमते तु विकल्पार्थकनिपातवाशब्दस्य धातुत्वे प्रातिपदिकत्वाभावात्सुबभावे पदत्वानापत्तिर्दोष । क्रियात्वम्–साध्यत्वेन प्रतीयमानत्वम् । साध्यत्वञ्चोत्पाद्यमानत्वमेवेत्यन्यत्र विस्तर । हिरुगित्यादि । एषा क्रियासमानाधिकरणत्वात, लिङ्गाद्यनन्वयित्वाच्च तदर्थस्य क्रियात्वमित्यभिमान । एषामव्ययेषु पाठस्तु अप्रातिपदिकत्वेऽप्यकजर्थ स्यात । एतेन तेषु पाठसामर्थ्याद्धातुत्वाभाव इत्यपास्तम् । नन्वेषा क्रियाऽऽकाङ्क्षादर्शनेन न क्रियावाचकत्वमत आह–शिष्ये इति । कालोऽपि धात्वर्थ एवेति न क्रियावाचकत्वहानि । तस्य च धातुत्वे "आदेच उपदेशे" इत्यात्व स्यात् । तद्धि अनैमित्तिकम्, धातुत्वनिमित्तकञ्चेति-स्पष्टमेव । अत्र च प्रत्ययस्यैव धातुत्वापत्तिर्बोध्या, तिङन्तस्य तूपदेशाभावान्नात्वप्रसक्तिरित्याहु ।

'वा' हा धातु भिन्न भिन्न प्रयोगात आढळत असल्यामुळे, एका प्रयोगातील 'वा' धातु इतर प्रयोगातील 'वा' धातु सदृश आहे असे मानता यते (म्वादि इतर धातु 'वा' धातूहून भिन्न असल्यामुळे, ते क्रियावाचकत्वरूप धर्मसादृश्यामुळे 'वा' सदृश आहेत असे मानता येत, पण 'वा' धातु जो धातुपाठात एकदाच पठित आहे तो 'वा' सदृश आहे असे कसे म्हणता यणार, कारण 'भेदनिबन्धन सादृश्यम्' असा न्याय असल्यामुळे व 'तद्भिन्नत्वसति तद्गतभूयो-

धर्मवत्त्वं सादृश्यम्' असी 'सादृश्य' या शब्दाची व्याख्या असल्यामुळें, सादृश्य होण्याकरितां दोन पदार्थांची आवश्यकता आहे; एखादा पुरुष स्वत: सारखा आहे असा प्रयोग जसा होऊं शकत नाहीं त्याचप्रमाणें 'वा' धातु 'वा' सदृश आहे असें म्हणतां येत नाहीं अशी शंकाकाराची शंका आहे. या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, आपणांस 'वा' धातूचे 'वाति, वातः' इत्यादि अनेक प्रयोग आढळत असल्यामुळें व 'प्रत्युच्चारणं शब्दो भिद्यते' असा सिद्धान्त असल्यामुळें, एका प्रयोगांतील 'वा' धातु इतर प्रयोगांत आढळणाऱ्या 'वा' धातुसदृश आहे असें मानतां येतें व त्यामुळें वरील शंका अनुपपन्न ठरते. 'या: पश्यसि' या उदाहरणांत आकारलोप करते वेळीं 'अर्थनिमित्तक बहिरङ्गत्वम्' या न्यायान्वयें) स्त्रीरूप अर्थाचा बोध होणें या निमित्तामुळें होणारा 'टाप्' प्रत्यय बहिरङ्ग असून त्यामुळें असिद्ध आहे असें कोणी म्हटल्यास, तें म्हणणें बरोबर नाहीं, कारण 'नाजानन्तर्ये बहिष्ट्वप्रकॢप्तिः' —परि ५१ ही बहिरङ्गत्वाची निषेधक परिभाषा आहे. दुसरें असें कीं, लिङ्गाच्या मानानें संख्या बहिर्भूत–बहिरङ्ग–असल्यामुळें, म्हणजे लिङ्गाचा बोध प्रथम होत असून संख्येचा बोध नंतर होत असल्यामुळें (व अशा रीतीनें लिङ्गकार्य प्रथम उपस्थित होत असून संख्यानिमित्तक कार्य नंतर उपस्थित होत असल्यामुळें) तशा बहिरङ्ग संख्येचा बोध करून देणें या निमित्तामुळें होणारा जो संख्यावाचक विभक्तिप्रत्यय त्या विभक्ति-प्रत्ययाच्या निमित्तामुळें जी भसंज्ञा होते ती आकारलोप होण्याचें निमित्त असल्यामुळें, तें आकारलोपरूपकार्य 'टाप्' प्रत्ययरूपकार्याच्या मानानें बहिरङ्ग ठरतें. शिवाय असें कीं, 'अर्थकृत बहिरङ्गत्वम्' असा न्यायच नाहीं. ('या: पश्यसि' या स्थलीं 'यद्' या सर्वनामाचें पूर्वी सांगितल्याप्रमाणें 'य' असें अदन्त रूप झाल्यावर 'अजाद्यतष्टाप्' सू. ४५४ या सूत्रानें जो स्त्रीत्वरूप अर्थाचा बोधक 'टाप्' प्रत्यय होतो तो, 'अर्थनिमित्तक बहिरङ्गम्,' म्हणजे अर्थाच्या निमित्तामुळें होणारें'

कार्य बहिरङ्ग ठरते, या न्यायान्वयें, बहिरङ्ग ठरतो, कारण तो 'टाप्' प्रत्यय स्त्रीवाचक अर्थाचा बोध करून देणे या निमित्तामुळें झाला असून 'आ'लोपकार्य अर्थाच्या निमित्तामुळें होणारें कार्य नसल्यामुळें व अशा रीतीनें 'आलोपकार्याच्या मानानें टाप्प्रत्यय-रूपकार्य बहिरङ्ग ठरत असल्यामुळे, 'असिद्ध बहिरङ्गमन्तरङ्गे'— परि–५०–या परिभाषान्वयें अन्तरङ्ग आलोपकार्य करतेवेळी बहिरङ्ग टाप प्रत्यय असिद्ध ठरतो म्हणजे तो झालाच नाही असे मानावें लागतें तसें मानणें म्हणजे, 'आ'लोपकार्य पावतच नाही, कारण जर 'आ'लोपकार्याच्या दृष्टीनें टाप्प्रत्यय विद्यमानच नाही तर त्याचा लोप कसा होणार? म्हणून शङ्काकार म्हणतो की, 'क्विशवाचिन क्विम् या पदशनि आता धातागिनि स्यात्' असे जें दीक्षितांनी मनोरमेंत म्हटलें आहे ते बरोबर नाही या शङ्केवर समाधानकार असें उत्तर देतात की, 'तुष्यतु दुर्जन या न्यायान्वये शङ्काकाराच्या म्हणण्या-प्रमाणे 'आ'लोपकार्याच्या मानानें 'टाप' प्रत्ययरूपकार्य बहिरङ्ग आहे असे मानले तरी, 'असिद्ध बहिरङ्गमन्तरङ्गे' या परिभाषेचा निषेध करणारी 'नाजानन्तर्ये' ही परिभाषा असल्यामुळें, आलोप-कार्य करतेवेळीं 'टाप्' प्रत्यय बहिरङ्ग असून देखील बहिरङ्ग ठरत नाही अचाच्या लगेच पुढें असणाऱ्या निमित्तामुळें अन्तरङ्ग-कार्य करणे प्राप्त झाल्यास पूर्वी झालेलें बहिरङ्गकार्य बहिरङ्ग मानू नये असा त्या निषेधक परिभाषेचा अर्थ आहे 'या पश्यसि' या प्रकृत उदाहरणात 'या+शम् या स्थली जा 'टाप्' प्रत्यय विभक्तिप्रत्यय लागण्यापूर्वी झाला आहे तो बहिरङ्ग आहे असे मानले तरी, त्याच्या लगेच पुढें असणाऱ्या 'शम्=अन' या विभक्ति-प्रत्ययाच्या निमित्तामुळें 'आतो धातो' या सूत्रानें त्या 'टाप्=आ' प्रत्ययाचा लोप करतेवेळी वरील निषेधक परिभाषान्वयें तो टाप्-प्रत्यय बहिरङ्ग ठरत नाही त्यामुळें 'टाप्=आ' विद्यमान आहे असे मानणे भाग आहे व तसें मानल्यास, आकारलोप होण्याची

आपत्ति येते. म्हणून 'या' हा शब्द प्रकृत स्थळीं क्रियावाचक नसून देखील केवळ धातुपाठात पठित आहे या कारणामुळें धातुसंज्ञक मानल्यास दीक्षितानीं जो आकारलोप होण्याची आपत्ति दर्शविली आहे ती योग्य ठरते असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे. येथपर्यंत शब्दरत्नकारानी 'आ'लोपकार्याच्या मानानें पूर्वी झालेले टाप्प्रत्ययरूप कार्य बहिरङ्ग आहे असे शङ्काकाराच्या म्हणण्याप्रमाणे गृहीत धरून त्याच्या शङ्केचे निरसन केले आहे परंतु शब्दरत्नकार पुढें असे म्हणतात की, वास्तविक टाप्प्रत्ययाच्या मानाने 'आ'लोपरूपकार्य अन्तरङ्ग नसून बहिरङ्ग आहे, कारण 'पञ्चकं प्रातिपदिकार्थं' या वचनान्वयें जाति, व्यक्ति, लिङ्ग, सङ्ख्या, व कारक असे प्रातिपदिकाचे पाच अर्थ आहेत व या अर्थांचा वर जो क्रम दिला आहे त्या क्रमान्वयेंच त्या अर्थांचा बोध होत असतो, म्हणजे प्रातिपदिक ऐकल्याबरोबर त्यापासून प्रथम सामान्य अर्थ मनात येतो, तसा सामान्य अर्थ मनात आल्यानन्तर त्या सामान्य अर्थानें युक्त अशी व्यक्ति मनात येते, त्यानन्तर त्या व्यक्तिच्या लिङ्गाचा आणि नंतर सङ्ख्येचा बोध होतो आणि अखेरीस त्या व्यक्तीचा दुसऱ्या पदार्थाशी असलेल्या कारकरूप संबंध मनात येतो असा क्रमानें प्रातिपदिकाच्या वर सांगितलेल्या पाच अर्थांचा बोध होत असल्यामुळें, ज्या क्रमाने हे अर्थ ध्यानात येतात त्याच क्रमानें त्या अर्थांना अनुलक्षून होणारीं कार्यें होतात. 'अचः परस्मिन्' १–१–५७ या सूत्रावरील भाष्यात 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' ही परिभाषा लौकिकन्यायसिद्ध आहे हें सांगताना भाष्यकारानीं वर दिलेला सिद्धान्त सांगितला आहे त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात –'सा चाप्येषा लोकतः सिद्धा। कथम्? प्रत्यङ्गवर्ती लोको लक्ष्यते। तद्यथा। पुरुषोऽयं प्रातरुत्थाय यान्यस्य प्रतिशरीरं कार्याणि तानि तावत्करोति, ततः सुहृदां, ततः सम्बन्धिनाम्। प्रातिपदिकं चाप्युपदिष्टं सामान्यभूतेऽर्थे वर्तते। सामान्ये वर्तमानस्य व्यक्तिरुप-

जायते । व्यक्तस्य सत लिङ्गसख्याभ्यामन्वितस्य बाह्येनार्थेन योगो भवति । यथैव चानुपूर्व्यार्थाना प्रादुर्भावस्तथैव शब्दानामपि तद्वत्कार्यै-रपि भवितव्यम् ।' या भाष्यकारीय सिद्धान्तान्वये लिङ्गकार्य प्रथम उपस्थित होत असून सख्याबोधक विभक्तिरुप कार्य नतर उपस्थित होत असल्यामुळे, 'पूर्वोपस्थितमन्तरङ्ग परोपस्थित बहिरङ्गम्' या न्यायान्वये लिङ्गबोधक टापूरूप कार्य, विभक्तिप्रत्ययाच्या निमित्तामुळे होणाऱ्या 'आ'लोपकार्याच्या मानाने, अन्तरङ्ग ठरते. म्हणून 'या+शस् = या+अस्' या स्थली प्रथम टाप्प्रत्यय झाल्या-नतरच तशा स्त्रीप्रत्ययान्त शब्दाहून 'ङ्याप्प्रातिपदिकात्' सू १८२ या अधिकारसूत्रान्वये 'शस्' हा द्वितीयेच्या बहुवचनाचा प्रत्यय होतो हा प्रत्यय असर्वनामस्थान अजादि प्रत्यय असल्यामुळे, 'या' या अङ्गाला 'यचि भम्' सू २३१ या सूत्राने भसज्ञा होते, व 'या' हा शब्द क्रियावाचक नसून देखील धातुसज्ञक मानल्यास, 'आतो धातो' सू २४० या सूत्राने 'या' यातील अन्त्य आकाराचा लोप होण्याची आपत्ति येते हे आकारलोपरूप कार्य टाप्प्रत्ययरूप कार्याच्या मानाने वर सागितल्याप्रमाणे बहिरङ्ग असल्यामुळे, बहिरङ्ग 'आ'-लोपरूप कार्य करतेवेळी प्रथम झालेला अन्तरङ्ग 'टाप् = आ' विद्यमान आहे असे मानणे भाग आहे व तसे मानले म्हणजे, दीक्षितानी मनोरमेत जी आपत्ति दाखविली आहे ती योग्य ठरत असून शकाकाराची शका व्यर्थ ठरते तिसरे असे की, 'अर्थनिमित्तक बहिरङ्गत्वम्' या ज्या न्यायाच्या आधारावर शकाकाराने वरील शका उपस्थित केली आहे तसा वास्तविक न्यायच नाही या विषया-सबधाने परिभाषेन्दुशेखरात 'अर्थनिमित्तस्य न बहिरङ्गत्वम् । अत एव न तिसृचतम् इति निषेधश्चरितार्थ । अन्यथा स्त्रीत्वरूपार्थनिमि-त्तकतिसपेक्षयान्तरङ्गत्वात् त्रयादेशे तदसङ्गति स्पष्टैव । अत एव त्रयादेशे स्न्तस्य प्रतिषेध इति स्थानिवत्सूत्रस्थभाष्यवार्तिकादि सङ्ग-च्छते ।' असे नागेशानी म्हटले आहे. या पक्तीचे विस्तृत विवेचन

परिभाषेन्दुशेखराच्या मराठी भाषान्तरात पान १६७ ते १७० मध्ये केले आहे तें वाचल्यास व तसेच 'नाजानन्तर्ये' परि–५१ आणि प ५० या परिभाषेचे जें विवरण त्या ग्रंथात केले आहे तें वाचल्यास शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा भावार्थ उत्तम रीतीनें ध्यानात येईल सारांश वर जी तीन कारणे दिली आहेत त्या कारणावरून हें स्पष्ट होते की, शकाकाराची शंका व्यर्थ असून दीक्षितांनी जी मनोरमेत आपत्ति दाखविली आहे ती मान्य आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे आता शकाकार पुन्हा असा शंका करतो की 'आतो धातो' सू २४० या सूत्रान ज्या आदन्त धातूच्या अन्त्य आकाराचा लोप होणे सांगितले आहे त्या धातूनें, 'लक्षणप्रतिपदोक्तयो प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणम् –परि ११४–या परिभाषावर्यें, प्रतिपदोक्त आदन्त धातूचेच ग्रहण होऊ शकत, लाक्षणिक आदन्त धातूचे ग्रहण होऊ शकत नाही म्हणजे ज्या आकाराचा लोप होणे सांगितले आहे तो प्रतिपदोक्त आकार असला पाहिजे व तो लाक्षणिक आकार नसावा म्हणून या पद्दमि' या उदाहरणात 'पद् या शब्दामध्ये 'य + अ = य अग जें अदन्त रूप होते त्याहून अजादन्ताप्' सू ४५४ या सूत्रानें–सूत्रानें– टाप = आ हा स्त्रीवाचक प्रत्यय झाल्यावर 'या' असे आदन्त रूप होते असल्यामुळें, तसा लाक्षणिक –लक्षणप्राप्त–आदन्त 'या' या शब्दाला धातुसंज्ञा झाली तरी, त्यातील अन्त्य आकार या प्रातिपदिक या धातूतील य-अ आकाराला प्रतिपदोक्त–सूत्रानें स्पष्ट सिद्ध–नसून, लाक्षणिक–सूत्र प्रवृत्त झाल्यानें उत्पन्न झालेला–असल्यामुळें तसा आकाराचा 'आतो धातो' या सूत्रानें लोप होऊ शकत नाही, आणि म्हणून वरील उदाहरणात दीक्षितांनी जी आकारलोप होण्याची आपत्ति दाखविली आहे ती अमान्य ठरते या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की,) धातुसंज्ञा विषयात लक्षणप्रतिपदोक्त परिभाषा–परि ११४–मुळीच लागू पडत नाहीं ('नाप्यय लाक्षणिक' असें

शब्दरत्नात म्हटले आहे त्यातील 'लाक्षणिक' या पदात असणारा 'लक्षण' हा शब्द लक्षणावृत्तीचा किंवा सूत्र अथवा वार्तिक या अर्थाचा वाचक नसून, जसा 'भामा' हा शब्द एकदेशन्यायाने सत्यभामेचा वाचक आहे त्याचप्रमाणे त्या न्यायान्वयें तो 'लक्षण' शब्द 'लक्षण-प्रतिपदोक्तपरिभाषा' या अर्थाचा वाचक आहे, व या शब्दाहून 'अर्हति' या अर्थामध्यें 'तदर्हति' सू १७२८ या सूत्राने 'ठञ्' प्रत्यय होऊन 'लाक्षणिक' हा शब्द सिद्ध झाला आहे या शब्दरत्नातील वरील पङ्क्तीतील 'धयम्' या पदाचे 'धातु' किंवा 'आकार' असे दोन अर्थ होऊ शकतात म्हणून या पङ्क्तीचा 'धातुसंज्ञाविषये लक्षणप्रतिपदोक्तपरिभाषा न प्रवर्तते' असा किंवा 'आतो धातोरिति सूत्रेण आकारलोपे कर्तव्ये लक्षणप्रतिपदोक्तपरिभाषा न प्रवर्तते' असा अर्थ होऊ शकतो आता प्रथम अर्थ मानल्यास, धातूच्या विषयात लक्षणप्रतिपदोक्तपरिभाषा प्रवृत्त होत नाही याचे कारण शब्दरत्नकार पुढील पङ्क्तीत सागतात ) मान्य वैयाकरणानी 'नकार-जावनुस्वारपञ्चमौ झलि धातुषु। सकारजः शकारश्चेत्षाट्टवर्गस्त-वर्गजः' अशी कारिका पठित केली असल्यामुळे व अशा रीतीने धातुपाठात पठित असलेल्या भ्वादि अनेक धातूत लाक्षणिक वर्ण देखील आढळत असल्यामुळें, धातूच्या विषयात लक्षणप्रतिपदोक्त-परिभाषा लागू पडत नाही (वरील कारिकेचा असा अर्थ आहे की, झल् पुढें असता त्याच्या लगेच मार्गे धातूत आढळणारा अनुस्वार किंवा पञ्चमवर्ण नकाराचे जागी झाला आहे असे समजावे, तसेच धातूत चकारापूर्वी आढळणारा शकार सकाराचे जागी झाला आहे असे समजावे, त्याचप्रमाणे धातूतील षकाराच्या किंवा षकाराच्या पुढें टवर्ग आढळल्यास तो तवर्गाचे जागी झाला आहे असे समजावे उदाहरणार्थ, धातुपाठात तुम्प, तुम्फ, अञ्च, ध्वंस, भ्रंश इत्यादि धातु पठित आहेत या सर्व धातूत झल वर्णापूर्वी जो अनुस्वार किंवा पञ्चम वर्ण आढळतो तो वास्तविक 'नश्चापदान्तस्य झलि' सू.

१२३ या सूत्रानें नकाराचे जागीं अनुस्वार झाला असून, जेथें त्या अनुस्वारापुढें यय् प्रत्याहारान्तर्गत वर्ण आला आहे तेथें 'अनुस्वारस्य ययि परसवर्णः' १२४ या सूत्रानें त्या अनुस्वाराचे जागीं परसवर्ण पञ्चम वर्ण झाला आहे. सारांश या धातूंत आढळणारा अनुस्वार किंवा पञ्चम वर्ण मूळचा नसून लक्षणान्वयें झाला आहे, म्हणजे लाक्षणिक आहे. तसेंच 'व्रश्च' असा जो धातु धातुपाठांत पठित आहे त्यांत वास्तविक मूळचा सकार असून त्या सकारापुढें चकार आला असल्यामुळें, 'स्तोः श्चुना श्चुः' सू १११ या सूत्रानें त्या सकाराचे जागीं शकार झाला आहे. त्याचप्रमाणें 'क्णुं' असा जो धातु धातुपाठांत पठित आहे त्यांत वास्तविक मूळचा नकार असून तो नकार रेफापुढें आला असल्यामुळें, 'रषाभ्यां नो णः' सू २६५ या सूत्रानें त्या नकाराचे जागीं णकार झाला आहे. तसेंच 'ष्ठा' हा जो धातु धातुपाठांत पठित आहे त्यांत वास्तविक मूळचा थकार असून तो षकारापुढें आला असल्यामुळें 'ष्टुना ष्टुः' सू ११३ या सूत्रानें त्या थकाराचे जागीं ठकार झाला आहे. वर जीं उदाहरणें दिलीं आहेत त्या खेरीज धातुपाठांतून प्रकृत कारिकेचीं अनेक उदाहरणें देतां येतील पण विस्तारभयास्तव तीं दिलीं नाहींत. सारांश धातुपाठांतील कित्येक धातूंत लाक्षणिक वर्ण आढळत असून देखील त्यांना धातुसंज्ञा होणें व धातूला होणारीं कार्यें त्यांना होतात यावरून हें सिद्ध झालें कीं, धातूच्या विषयांत लक्षणप्रतिपदोक्तपरिभाषा लागू पडत नाहीं. त्यामुळें 'या पश्यसि' या उदाहरणांतील 'या' हा शब्द धातुपाठांत पठित असलेल्या 'या प्रापणे' या धातूचा प्रतिपदोक्त आदन्त शब्द नसून वर सांगितल्याप्रमाणें लाक्षणिक आदन्त शब्द आहे तरी, 'क्रियावाचिनो भ्वादयो धातुसंज्ञाः स्युः' असें जें प्रकृत सूत्राचें कौमुदींत व्याख्यान केलें आहे त्यावरून 'क्रियावाचिनः' हें पद गाळल्यास, त्या 'या' शब्दाला धातुसंज्ञा होण्याची आपत्ति येते पण अशा रीतीनें त्या शब्दाला जरी धातुसंज्ञा

झाली तरी, 'आतो धातो ' सू २४० हे सूत्र प्रतिपदोक्त आदन्त धातूला लागू पडणारे सूत्र असल्यामुळें, आकारलोप होण्याची आपत्ति येत नाही असे जें शंकाकाराचें द्वितीय अर्धान्वयें म्हणणें आहे त्यावर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की,) 'आतो धातो ' या सूत्रातील आकाराने प्रतिपदोक्त आकाराचेच ग्रहण होते असे म्हणता येणे अशक्य आहे, कारण तसे मानल्यास, ('असिद्धवदत्राभात' ६-४-२२ या सूत्रावरील भाष्यात दिलेले) 'पशुप ' हे रूप सिद्ध न होण्याची आपत्ति येईल 'पशु सनोतीति पशुषा' या स्थली ('जनसनखनक्रमगमो विट्' सू ३४१३ या सूत्राने) 'विट्' प्रत्यय होऊन 'विड्वनोर-नुनासिक्स्यात्' सू २९८२ या सूत्राने 'सन्' धातूतील नकाराचे जागी आकार झाला आहे (व 'सनोतेरन ' सू ३६४५ या सूत्राने 'सन' धातूतील सकाराचे ष व होऊन 'पशुषा' असे रूप सिद्ध झाले आहे याहून 'शस्' प्रत्यय केला असता, यातील आकार धातूत असणारा प्रतिपदोक्त आकार नसून, नकाराचे जागी झालेला लाक्षणिक आकार असल्यामुळें 'आतो धातो हें सूत्र प्रवृत्त होऊ शकत नाही असे मानल्यास, आकारलोप होणार नाही व 'पशुप ' हे द्वितीयेच्या बहुवचनाचे भाष्यात दिलेले इष्ट रूप सिद्ध होऊ शकणार नाही. म्हणून 'आतो धातो ' हे सूत्र प्रतिपदोक्त आदन्त धातूलाच लागू पडते व त्या सूत्रातील आकाराने प्रतिपदोक्त आकाराचेच ग्रहण होते हे मानणे बरोबर नाही) 'आतो धातो ' या सूत्राऐवजी 'आतोऽनाप.'–म्हणज आदन्त शब्दातील अन्त्य आकार सोडून इतर आकाराचा लोप होतो–असे वार्तिककाराच्या मताप्रमाणे सूत्र पठित केल्यास, (जरी 'या पश्यसि' या स्थली 'या' या आदन्त शब्दातील आकारलोप होण्याची आपत्ति टळते व 'पशुप ' या स्थली आकारलोप होऊ शकतो आणि अशा रीतीने वर दाखविलेल्या दोषाचे निवारण होऊ शकते तरी, 'क्रियावाचिनो भ्वादयो धातुसंज्ञा स्यु ' असे जें प्रकृत सूत्राचे कौमुदीत व्याख्यान केले आहे त्यांतून

'क्रियावाचिन' हें पद गाळल्यास, 'वा गतिगन्धनयो' हा शब्द धातुपाठात पठित असल्यामुळें आणि मूळ पाणिनीय धातुपाठात धातूचे अर्थ पठित केले नसून केवळ धातूच पठित केले असल्यामुळें,) 'वा' या विकल्पवाचक निपाताला धातुसंज्ञा होईल व ('अर्थवदधातुरप्रत्ययः प्रातिपदिकम्' सू १७८ या सूत्रात 'अधातु' असा प्रतिषेध असल्यामुळें) त्याला प्रातिपदिकसंज्ञा होणार नाहीं आणि त्यामुळें ('ङ्याप्प्रातिपदिकात्' सू १८२ या अधिकारसूत्रानवर्ये प्रातिपदिकाहून होणारे) सुबादि प्रत्यय होऊ शकणार नाहीत व त्यामुळें 'वा' या निपाताला ('सुप्तिङन्तं पदम्' सू २९ या सूत्रानें होणारी) पदसंज्ञा न होण्याची आपत्ति येईल हा दोष येतोच (त्यामुळें भरखीत सांगितल्याप्रमाणें 'देवदत्त पचति वा गच्छति वा' या उदाहरणातील 'गच्छति' या तिङन्त पदापूर्वी असणारा 'वा' हा निपात धातुसंज्ञक मानल्यास, 'तिङ्ङतिङः' सू ३९३५ या सूत्रानें होणारा अनुदात्त स्वर 'गच्छति' या तिङन्ताला होणार नाही आणि तसेंच 'नयनिस्तत्र त्वा वा मा वा प्रेषयिष्यति' या उदाहरणात '‹वामौ द्वितीयायाः' सू ४०७ या सूत्रानें 'माम' च जागीं होणारा 'मा' हा आदेश न होण्याची आपत्ति येईल, कारण वर दिलेल्या उदाहरणात 'मा' चे पूर्वी असलेला 'वा' हा निपात धातु मानल्यास, त्याला प्रातिपदिकसंज्ञा होणार नाही व त्यामुळें त्याहून सुबुत्पत्ति होणार नाहीं व त्याला पदसंज्ञा होणार नाहीं आणि म्हणून '‹वामौ द्वितीयायाः' या सूत्रानें पदाच्या पुढें असणाऱ्या 'माम्' चे जागीं 'मा' असा आदेश होणें सांगितलें असल्यामुळें, वरील उदाहरणात तसा आदेश होऊ शकणार नाही शब्दरत्नात जो वर दोष दाखविला आहे तो प्रकृत सूत्रावरील भाष्यात दाखविला आहे व त्या भाष्याचा शब्दरत्नात अनुवाद केला आहे त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात–'इद तर्हि–या पश्य–आतो धातोरिति लोप प्रसज्येत । नैष दोष । अनाप इत्येव स । अस्य तर्हि वाशब्दस्य निपातस्याधातुरिति प्रातिपदिकसंज्ञाया प्रतिषेध

प्रमज्येन । अप्रातिपदिकत्वानस्वाद्युत्पत्तिर्न स्यात् ।' साराश प्रकृत सूत्राचे दीक्षितानी जें व्याख्यान केले आहे त्यात 'क्रियावाचिनः' हें पद असणे आवश्यक आहे व ते पद घातले असल्यामुळेच, क्रियावाचक नसणाऱ्या 'वा' या निपाताला धातुसंज्ञा होत नाही व त्यामुळे वर दर्शविलेल्या सर्व आपत्ति टळतात असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे यावर शकाकार पुन्हा अशी शका करतो की, 'क्रिया-वाचिनो भ्वादयो धातुसज्ञा स्युः' असा जरी प्रकृत सूत्राचा अर्थ केला तरी, 'वा' या निपाताने विकल्परूप क्रिया प्रतीयमान–बोधित–होत असल्यामुळें, म्हणजे 'वाति' याचा 'विकल्पयति' असा अर्थ होणे शक्य असल्यामुळें, 'वा' या निपाताला धातुसज्ञा होणे टाळता येत नाहीं. या शकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की) जिचा साध्यत्वरूपानें बोध होतो, म्हणजे जो सिद्ध नसून साध्यावस्थेंत आहे, तिला क्रिया म्हणतात व 'साध्यत्वम्' या पदाचा 'उत्पाद्यमानत्वम्'–म्हणजे ज्याची उत्पत्ति होणे चालू आहे–असा अर्थ आहे या विषयासबधानें इतर ग्रन्थात–मञ्जूषेंत व उद्योतात–विस्तृत चर्चा केली आहे ('वा' या निपाताचा 'विकल्प' असा अर्थ आहे. तो साध्य नसून सिद्ध आहे म्हणून विकल्पार्थवाचक 'वा' या निपाताला क्रियावाचक मानता येत नाहीं आणि त्यामुळें त्याला धातुसज्ञा होऊ शकत नाही. साराश प्रकृत सूत्राचे व्याख्यान करिताना 'क्रियावाचिन' हें पद घालणे आवश्यक आहे आणि दीक्षितानी तें पद व्याख्यानात घातले असल्यामुळेंच, 'वा' या निपाताला धातुसज्ञा होण्याची आपत्ति टळते असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे या विषयासबधानें 'क्रियावाचिन किम्? । विकल्पार्थकवाशब्दस्य निपातस्य धातुत्वेऽ-प्रातिपदिकत्वात् सुबभावे पदत्वानापत्ते, तद्वत्तौ तु न दोष, वार्थस्य विकल्पस्य भूतभविष्यत्कालसम्बन्धाभावेन क्रियात्वाभावात् ।' असे शब्देन्दुशेखरात म्हटले आहे आता 'भ्वादय किम्? । हिरुक्, पृथक् इत्याद्यव्ययाना...मा भूत्' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्यावर

शकाकार अशी शंका करतो की, 'हिरुक्, पृथक्' हे निपात क्रिया-वाचक नसल्यामुळें त्याना धातुसंज्ञा होऊ शकत नाही आणि म्हणून ते शब्द जरी 'क्रियावाचिन' याचें प्रत्युदाहरण मानता येऊ शकतात तरी 'भ्वादय किम्' याचे ते शब्द प्रत्युदाहरण ठरू शकत नाहीत या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की,) 'हिरुक्, पृथक्' इत्यादि अव्ययाचें क्रियेशी सामानाधिकरण्य होत असल्यामुळें, व हे निपात लिङ्ग, सख्या इत्यादिकांशी अन्वित होत नसल्यामुळें त्याच्या अर्थाचे ठिकाणी क्रियात्व आहे असें (दीक्षितानी) मानलें आहे. हे शब्द क्रियावाचक मानले असल्यामुळें जरी याना प्रातिपदिकसंज्ञा होऊ शकत नाही तरी ('अव्ययसर्वनाम्नामकच' सू २०२६ या सूत्राने होणारा) 'अकच्' प्रत्यय त्याना व्हावा एवढ्याकरिता त्याचा अव्ययात पाठ केला असावा म्हणून त्या अव्ययात केलेल्या पाठाच्या सामर्थ्यानें या निपाताना धातुसंज्ञा होऊ शकत नाही हें म्हणणे चूक ठरते. (साराश दीक्षिताच्या मताप्रमाणे जरी 'हिरुक्, पृथक्' इत्यादि निपात क्रियावाचक ठरतात तरी, ते धातुपाठात पठित नसल्यामुळें त्याना धातुसंज्ञा होत नाही आणि म्हणून 'भ्वादय किम्' याचे ते शब्द प्रत्युदाहरणरूपानें मनोरमेत दिले आहेत क्रियावाचिनो भ्वादयो धातुसंज्ञा स्यु' असें जें प्रकृत सूत्राचे कौमुदीत व्याख्यान केले आहे त्यातून 'भ्वादय' हे पद गाळल्यास, वरील क्रियावाचक निपाताना धातुसंज्ञा होण्याची आपत्ति येते पण तें पद त्या व्याख्यानात घातले असल्यामुळे ती आपत्ति टळते आता येथें अशी शंका करण्यात येते की, दीक्षितानी प्रकृत सूत्राचें व्याख्यान करिताना 'भ्वादय' हे जें पद घातले आहे ते गाळल्यास, जर 'हिरुक्' इत्यादि निपाताना धातुसंज्ञा होण्याची आपत्ति येईल हे बरोबर मानले तर, हे निपातधातुसंज्ञक ठरल्याने, 'अर्थवदधातुरप्रत्यय प्रातिपदिकम्' सू १७८ या सूत्रात 'अधातु' असा प्रतिषेध असल्यामुळें, त्याना प्रातिपदिकसंज्ञा होणार नाही व त्यामुळें त्याहून

आपोआपच सुबन्पत्ति होणार नाही मग असे असून देखील त्यांचा अव्ययांत पाठ कां केला आहे ? या शंकेवर असें उत्तर देण्यांत येतें की, त्या शब्दांना अव्ययसंज्ञा व्हावी व त्यायोगानें त्या शब्दांहून 'अम्' प्रत्यय व्हावा एवढ्याच करितां त्यांचा अव्ययांत पाठ केला आहे. परन्तु त्यांचा अव्ययांत पाठ केला असल्यामुळें त्या पाठाच्या सामर्थ्यानें त्या शब्दांना धातुसंज्ञा होत नाहीं हें जें कित्येक वैयाकरणांचें म्हणणें आहे तें बरोबर नाहीं त्यांना धातुसंज्ञा होत नाही यांचें खरें कारण हें आहे की, तें धातुपाठांत पठित नाहींत आणि अशा रीतीनें ते शब्द 'स्यादय स्मि' यांचे प्रत्युदाहरण मानता येतात असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे असे शब्दरत्नकार म्हणतात या वरील पंक्तीत 'इत्यभिमान' हीं जी अरुचिप्रदर्शक पदें घातलीं आहेत त्याचें कारण शब्दरत्नकार पुढीलप्रमाणें देतात ) 'हिरुक्' इत्यादि शब्दांना क्रियान्तराची अपेक्षा असल्यामुळें ते क्रियावाचक आहेत असें मानता येत नाहीं असें कोणी म्हणतील, दीक्षित मनोरमेंत 'निचे' हें दुसरें उदाहरण देतात (कारण 'हिरुक्' इत्यादि शब्दांच्या अर्थांवरून सामान्य क्रियेचा बोध होत असल्यामुळें व त्यास क्रियान्तराची आकांक्षा असल्यामुळें, ते शब्द देखील 'क्रियावाचित्व स्मि' याचेंच प्रत्युदाहरण मानतां येतात आणि म्हणून ते शब्द क्रियावाचक ठरत असल्यामुळें 'स्यादय स्मि' याचें हे शब्द योग्य प्रत्युदाहरण ठरूं शकत नाहीत

होत नाही (शब्दकाराची शंका अशी आहे कीं, जो शब्द केवळ क्रियावाचक असतो त्यालाच धातुसंज्ञा होते पण 'शिश्ये' हा शब्द केवळ क्रियावाचक नसून परोक्षभूतकालाचा देखील वाचक आहे आणि म्हणून त्याला धातुसंज्ञा होण्याची आपत्तीच येत नाहीं या शंकेवर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, 'क्रियात्वक्रियाकालसङ्ख्या-कारकेति पञ्चकं धात्वर्थं, तिङ् तु द्योतकं ' या वचनान्वयें 'काल' देखील धातूचा अर्थ ठरतो म्हणून 'शिश्ये' या शब्दाने जरी क्रियेचा व तसेच कालाचा देखील बोध होतो तरी, त्यायोगानें त्याचे क्रियावाचकत्व नाहींसें होत नाही व प्रकृत सूत्राचे जें व्याख्यान केलें आहे त्यांतून 'भ्वादय' हें पद गाळल्यास, 'शिश्ये' या शब्दाला धातुसंज्ञा होण्याची आपत्ति येते परन्तु व्याख्यानांत ते पद घातलें असल्यामुळें व धातुपाठांत 'शिश्ये' हा शब्द पठित नसल्यामुळें, त्याला धातुसंज्ञा होण्याची आपत्ति टळते आणि अशा रीतीनें 'भ्वादय किम्' याचे 'शिश्ये' हें योग्य प्रत्युदाहरण ठरतें असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे) 'शिश्ये' हा शब्द धातु मानल्यास, 'आदेच उपदेशेऽशिति' सू २३७० या सूत्रानें त्या शब्दातील अन्त्य एकाराचे जागी आकारादेश होण्याची आपत्ति येते वरील सूत्रानें होणारें आत्वकार्य कोणत्याहि परनिमित्तामुळें होणारें नसून धातुसंज्ञानिमित्तक कार्य आहे हें अगदीं स्पष्ट आहे ('शिश्ये' हें परिनिष्ठित लिट्लकाराचे रूप असल्यामुळें त्याच्यापुढें शित्भिन्न प्रत्यय येण्याचा संभवच नाही व त्यामुळें त्यातील अन्त्य एकाराचे जागी आकारादेश होण्याची आपत्तिच येत नाही असें कोणी म्हटल्यास, त्यावर शब्दरत्नकार असें उत्तर देतात कीं, वरील सूत्रान्वयें आत्व होण्याकरिता शित्भिन्न प्रत्यय पुढें असण्याची मुळींच आवश्यकता नाहीं, कारण भाष्यकारानी त्या सूत्रांतील 'अशिति' हा पर्युदास मानला नसून प्रसज्यप्रतिषेध मानला आहे व 'अशिति' या पदाचा 'शित्भिन्ने प्रत्यये परे' असा अर्थ न करिता 'शिति न' असा त्या

आपोआपच सुबुत्पत्ति होणार नाही मग असे असून देखील त्याचा अव्ययात पाठ का केला आहे ? या शंकेवर असे उत्तर देण्यात येते की, त्या शब्दाना अव्ययसंज्ञा व्हावी व त्यायोगानें त्या शब्दाहून 'अकच्' प्रत्यय व्हावा एवढयाच करिता त्याचा अव्ययात पाठ केला आहे. परंतु त्याचा अव्ययात पाठ केला असल्यामुळे त्या पाठाच्या सामर्थ्यानें त्या शब्दाना धातुसंज्ञा होत नाही हें जें कित्येक वैयाकरणाचे म्हणणे आहे ते बरोबर नाहीं त्याना धातुसंज्ञा होत नाही याचे खरें कारण हे आहे की, तें धातुपाठात पठित नाहींत आणि अशा रीतीनें ते शब्द 'भ्वादय किम्' याचे प्रत्युदाहरण मानता येतात असा दीक्षिताच्या म्हणण्याचा आशय आहे असं शब्दरत्नकार म्हणतात या वरील पङ्क्तींत 'इत्यभिमान' हीं जी अरुचिप्रदर्शक पदें घातली आहेत त्याचें कारण शब्दरत्नकार पुढील पङ्क्तींत देतात ) 'हिरुक्' इत्यादि अव्ययाना क्रियान्तराची अपेक्षा असल्यामुळें ते क्रियावाचक आहेत असे मानता येत नाहीं असें कोणी म्हटल्यास, दीक्षित मनोरमेंत 'शिश्ये' हे दुसरे उदाहरण देतात (साराश 'हिरुक्' इत्यादि शब्दाच्या अर्थापासून साध्यरूप क्रियेचा बोध होत नसल्यामुळें व त्याना क्रियान्तराची आकाङ्क्षा असल्यामुळें, ते शब्द देखील 'क्रियावाचिन किम्' याचेच प्रत्युदाहरण मानता येतात आणि म्हणून ते शब्द क्रियावाचक ठरत नसल्यामुळें 'भ्वादय किम्' याचे ते शब्द योग्य प्रत्युदाहरण ठरू शकत नाहींत पर ते शब्द क्रियावाचक असते तरच ते 'भ्वादय किम्' याचे योग्य प्रत्युदाहरण मानता येऊ शकले असते, आणि ही अरुचि मनात धरूनच दीक्षितानी 'शिश्ये' हे दुसरे उदाहरण दिलें आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा भावार्थ आहे ) 'काल' हा देखील धातूचा अर्थ असल्यामुळें 'शिश्ये' हा शब्द क्रियावाचक मानण्यात काही अडचण येत नाही, म्हणजे त्या शब्दाने जरी परोक्षभूत कालाचा देखील बोध होतो तरी त्यायोगानें त्याचें क्रियावाचकत्व नष्ट

होत नाही (शाकाकाराची शंका अशी आहे की, जो शब्द केवळ क्रियावाचक असतो त्यालाच धातुसंज्ञा होते पण 'शिश्ये' हा शब्द केवळ क्रियावाचक नसून परोक्षभूतकालाचा देखील वाचक आहे आणि म्हणून त्याला धातुसंज्ञा होण्याची आपत्तीच येत नाहीं या शंकेवर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, 'क्रियात्वक्रियाकालसङ्ख्याकारकेति पञ्चक धात्वर्थ, तिङ् तु द्योतक' या वचनान्वयें 'काल' देखील धातूचा अर्थ ठरतो म्हणून 'शिश्ये' या शब्दाने जरी क्रियेचा व तसेच कालाचा देखील बोध होता तरी, त्यायोगानें त्याचे क्रियावाचकत्व नाहींसे होत नाही व प्रकृत सूत्राचे जें व्याख्यान केले आहे त्यातून 'भ्वादय' हें पद गाळल्यास, 'शिश्ये' या शब्दाला धातुसंज्ञा होण्याची आपत्ति येते परंतु व्याख्यानात ते पद घातले असल्यामुळें व धातुपाठात 'शिश्ये' हा शब्द पठित नसल्यामुळें, त्याला धातुसंज्ञा होण्याची आपत्ति टळते आणि अशा रीतीनें 'भ्वादय किम्' याचे 'शिश्ये' हें योग्य प्रत्युदाहरण ठरतें असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे) 'शिश्ये' हा शब्द धातु मानल्यास, 'आदेच उपदेशेऽशिति' सू २३७० या सूत्राने त्या शब्दातील अन्त्य एकाराचे जागी आकारादेश होण्याची आपत्ति येते वरील सूत्राने होणारे आत्वकार्य कोणत्याहि परनिमित्तामुळें होणार नसून धातुसंज्ञानिमित्तक कार्य आहे हे अगदी स्पष्ट आहे ('शिश्ये' हें परिनिष्ठित लिट्लकाराचे रूप असल्यामुळें त्याच्यापुढें शिद्भिन्न प्रत्यय येण्याचा संभवच नाही व त्यामुळें त्यातील अन्त्य एकाराचे जागी आकारादेश होण्याची आपत्तिच येत नाही असे कोणी म्हटल्यास, त्यावर शब्दरत्नकार असे उत्तर देतात की, वरील सूत्रान्वयें आत्व होण्याकरिता शिद्भिन्न प्रत्यय पुढें असण्याची मुळींच आवश्यकता नाहीं, कारण भाष्यकारानी त्या सूत्रातील 'अशिति' हा पर्युदास मानला नसून प्रसज्यप्रतिषेध मानला आहे व 'अशिति' या पदाचा 'शिद्भिन्ने प्रत्यये परे' असा अर्थ न करिता 'शिति न' असा त्या

पदाचा अर्थ केला आहे त्यामुळें 'आदेच' सू २३७० या सूत्राचा असा अर्थ होतो की, उपदेशात-धातुपाठात-पठित असलेल्या एजन्त धातूपुढें शित् प्रत्यय आल्यास, त्यातील अन्त्य एच्चे जागी आकारादेश होत नाही, पण एजन्त धातूपुढें शिद्भिन्न प्रत्यय असो वा नसो, त्यातील अन्त्य एच्चे आत्व होतेच त्यामुळें 'शिश्ये' या शब्दापुढें जरी शिद्भिन्न प्रत्यय न आला तरी त्यातील अन्त्य एकाराचे जागी आकारादेश होण्याची आपत्ति येतच आता येथें अशी शंका करण्यात येते की, 'शिश्ये' या क्रियावाचक तिङन्ताला धातु मानले तरी, 'उक्तार्थानामप्रयोग' या न्यायान्वयें 'शिश्ये' या शब्दाहून पुन्हा तिबादि प्रत्यय होण्याची मुळींच आपत्ति येत नाही व उपदेशात-धातुपाठात-'शीङ् स्वप्ने' असा धातु पठित असून 'शिश्ये' हा शब्द धातुपाठात पठित नसल्यामुळें व अशा रीतीनें 'शिश्ये' हा शब्द उपदेशाचा-आद्योच्चारणाचा-विषय ठरत नसल्यामुळें आणि 'आदेच उपदेशे' या सूत्रात 'उपदेशे' या पदाचे ग्रहण केले असल्यामुळें, 'आदेच उपदेशे' हे सूत्र 'शिश्ये' या शब्दाला लागू पडत नाही व त्यामुळें त्याच्या अन्त्य एकाराचे आत्व होण्याची आपत्तीच येत नाहीं (अशी कोणी शंका केल्यास, ती शंका योग्य मानून) कित्येक वैयाकरण असे म्हणतात की, 'शिश्ये' या उदाहरणात वास्तविक *'ए' या प्रत्ययालाच धातुसंज्ञा होण्याची आपत्ति येते, 'शिश्ये' या* तिङन्ताला उपदेश-आद्योच्चारण मानता येत नसल्यामुळें, त्याचे ठिकाणीं आत्वाची प्राप्तीच होत नाही (सारांश 'शिश्ये' हा शब्द धातुपाठात पठित नसल्यामुळें, जरी तो उपदेशाचा-आद्योच्चारणाचा -विषय होऊ शकत नाही तरी, 'लिटस्तझयोरेशिरेच्' सू २२४१ या सूत्रात 'एश् = ए' हा पठित असल्यामुळें तो आद्योच्चारणाचा विषय ठरतो आणि 'भावे' या अर्थामध्यें झालेला तो प्रत्यय क्रियावाचक असल्यामुळें, त्यालाच धातुसंज्ञा होऊ शकते आणि त्याला व्यपदेशिवद्भावानें एजन्त मानता येत असल्यामुळें त्याचेच आत्व होण्याची

आपत्ति येते परंतु 'ए' हा शब्द प्रत्यय धातुपाठात पठित नसल्यामुळें व अशा रीतीने तो 'ष्वादि' ठरत नसल्यामुळें, त्याला, प्रकृत सूत्राचे जें व्याख्यान केलें आहे त्या व्याख्यानान्वयें, धातुसंज्ञा होण्याची आपत्ति टळते. म्हणून 'ष्वादय ष्मिम्' याचे 'सिष्ये' हे प्रत्युदाहरण न ठरता त्याच्या अन्ती असलेला 'ए' हा प्रत्ययच प्रत्युदाहरण मानता येतो असा त्या वैयाकरणाच्या म्हणण्याचा भावार्थ आहे )

शब्दरत्न—ननु षष्ठे प्रकृतसूत्रे धातुग्रहणासम्बन्ध उक्तो भाष्ये, इति न तद् धातुत्वनिमित्तकम्, किं चासितीति प्रसज्यप्रतिषेधेऽपि सितपरत्वयोरयस्यैवात्वविधानाप्राप्तात्वप्रसक्तिः। अपि च चासादृश्य-मन्यानभिहितक्रियावाचकत्वेनेति न दोषोऽत आह–चेति। सूत्रशेष-भाष्योक्तेषु 'आणवयति' 'भट्टयति' इत्यादिषु च धातुत्वे शास्त्रविषयतया साधु त्वापत्तिरिति तद्व्यावृत्तये तदिति भावः। उदित्करणेनेति। इदमुपलक्षणम्, तत्प्रकृतिकश्त्यनुवादेनाडविधानेन, सार्वधातुके परे विकरणविधानेन च धातुत्वम्। "जुचङ्क्रम्य" इत्यत्र पठितत्रो.' "जपजभ" इत्यत्र पठित 'पशः' इत्यतिप्रभृतीनां च क्वचिद्धात्वधिकारविहितकार्योद्देश्यत्वाद् बोध्यम्। एतेन च स्थितस्य तेषां पाठस्य भ्रंशोऽनुमीयते इति भावः। मैत्रेयाद्यन्यसमतं समाधिमाह—बहुलमिति॥

(आता 'धातुत्वनिमित्तकञ्चेति स्पष्टमेव' व 'अयच प्रत्ययस्यैव धातुत्वापत्तिर्बोध्या' असे जें वर शब्दरत्नात म्हटले आहे त्यावर अशी शंका करण्यात येते की,) षष्ठाध्यायात पठित असलेल्या 'आदेच उपदेशे' या सूत्रांत भाष्यकारांनी 'धातो' या पदाचे ग्रहण होऊ शकत नाही असे म्हटले असल्यामुळें, त्या सूत्राने आत्व होण्यास धातुरूप निमित्ताची आवश्यकता आहे असे मुळीच मानता येत नाही ('आदेच उपदेशे' ६-१-४५ हे सूत्र तृतीयाध्यायात पठित असलेल्या 'धातो' सू. २८२९ या अधिकारात पठित नसून षष्ठा-ध्यायात पठित आहे 'धातो' हा अधिकार तृतीयाध्यायाच्या

अखेरपर्यंतच चालू आहे म्हणून ते सूत्र धात्वधिकाराच्या बाहेर पठित असल्यामुळें, त्यात 'धातो' हें पद अनुवृत्त होऊ शकत नाही 'लिटि धातोरनभ्यासस्य' या पूर्व सूत्रातून 'धातो' या पदाची अनुवृत्ति करता येईल, पण त्या सूत्राच्या व 'आदेच उपदेशे' या सूत्राच्यामध्यें 'ष्यङः सम्प्रसारणम्' हे सूत्र पठित असल्यामुळें व सूत्रात 'धातो' हे पद अनुवृत्त करणे अशक्य असल्यामुळें, 'आदेच उपदेशे' या पुढील सूत्रात त्या पदाची मण्डूक-प्लुतीनेंच अनुवृत्ति करता येणे शक्य आहे पण तशा रीतीनें अनुवृत्ति करणे हा दोष मानला असून भाष्यकारानी तशा रीतीने त्या सूत्रात 'धातो' या पदाची अनुवृत्ति केली नाही त्या सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानी 'प्रातिपदिकप्रतिषेध'–म्हणजे 'प्रातिपदिकाना प्रतिषेधो वक्तव्य' असे वार्तिक पठित करून पुढें भाष्यकार असे म्हणतात की, तसा प्रतिषेध करण्याची काही गरज नाही व त्याचे कारण सागताना भाष्यकार 'धात्वधिकारात् प्रातिपदिकस्याप्राप्ति' हे वार्तिक पठित करून असे म्हणतात की, 'धात्वधिकारात् प्रातिपदिकस्यात्व न भविष्यति। धातोरिति वर्तते। क्व प्रकृतम्?। लिटि धातोरनभ्यासस्येति। अथापि निवृत्तम्। एवमप्यदोष। उपदेश इत्युच्यते, उद्देशश्च प्रातिपदिकाना नोपदेश।' या भाष्यावरून हें स्पष्ट होते की, 'आदेच' या सूत्रात 'धातो' हे पद अनुवृत्त किंवा संबद्ध नाही आणि म्हणून आत्व होण्यास धातुरूप निमित्ताची आवश्यकता आहे, म्हणजे ज्याला धातुसंज्ञा आहे त्यालाच होणारें आत्वकार्य आहे, असे मानता येत नाही त्यामुळें प्रकृत सूत्राच्या व्याख्यानातून 'भ्वादय' हे पद गाळल्यास, जरी 'शिव्ये' या तिङन्ताला धातुसंज्ञा होण्याचा संभव असला तरी, धातुसंज्ञानिमित्तक आत्वकार्य नसल्यामुळें, त्या संज्ञेच्या निमित्तामुळें 'शिव्ये' यातील अन्त्य एकाराचे आत्व होण्याची आपत्ति येते हे म्हणणे योग्य ठरत नाही त्या एकाराचे आत्व का होत नाही याचे कारण पुढील

पक्तीत सागतात ) दुसरें असे की, 'आदेच उपदेशेऽशिति' या सूत्रातील 'अशिति' हा (पर्युदास न मानता) प्रसज्यप्रतिषेध मानला तरी ('विप्रयोगस्यापि संयोगवत् तादृशार्थोपस्थितिजनकत्वमेव' या न्यायान्वयें) ज्याच्यापुढें शित् प्रत्यय येण्याचा संभव असता तशाचेच ठिकाणी आत्व होण्याचे विधान केले असल्यामुळें, 'शिश्ये' या उदाहरणात आत्वकार्याची प्राप्तीच होत नाही, (कारण शिश्ये' हे सिद्ध पद असल्यामुळें व तसेच 'ए' हा प्रत्यय असल्यामुळें, त्याच्यापुढें सार्वधातुक शित् प्रत्यय येणे असंभवनीय आहे आणि म्हणून 'ए' चे आत्व होण्याची प्राप्ती नाही ) आणखी असे की, सामानाधिकरण्य-क्रियावाचकत्व-असावेच ठिकाणी संभवते की, जो इतर शब्दाने सांगितलेल्या क्रियेचा अनुवाद करणारा नसून स्वतः क्रियावाचक असतो ( शिश्ये' हा सिद्ध किंवा यातील ए' हा लिटाचा प्रत्यय क्रियावाचक नसून, 'शाङ्' धातु क्रियावाचक आहे व त्या क्रियावाचक धातूच्या अर्थाचा केवळ अनुवाद करणारे 'शिश्ये' हा सिद्ध व त्यातील 'ए' हा प्रत्यय आहेत म्हणून याना वास्तविक धातुसंज्ञा होऊच शकत नाही त्यामुळें व तसेच वर सांगितल्याप्रमाणे त्याच्यापुढें सार्वधातुक शित् प्रत्यय येणे असंभवनीय असल्यामुळें 'ए' चे आत्व होण्याची आपत्तीच येत नाही असा शंकाकाराच्या म्हणण्याचा अभिप्राय आहे हे शंका अयोग्य नाही, आणि हा अरुचि मनात धरूनच दीक्षितानी 'मावार्थेऽनि त्यस्य च मा भूत' या मनोरमेंतील पक्तीत 'च' हें पद मुद्दाम घातले आहे असे शब्दरत्नकार पुढील पक्तीत सागतात व त्या पदाची आवश्यकता दाखवितात ) 'भूवादयो धातवः सू १-३-१' या सूत्रावरील भाष्याच्या अखेरीस 'आणवयति, वट्टयति' इत्यादि ज्या शब्दाचा निर्देश केला आहे त्याना धातुसंज्ञा झाल्यास ते शब्द व्याकरणशास्त्राचे विषय होऊन तसे (प्राकृत भाषेत रूढ असलेले अशुद्ध) प्रयोग साधु ठरण्याचा आपत्ति येईल आणि म्हणून त्या आपत्तीचे निवारण करण्याकरिता व तसा

असाधु प्रयोगांना धातुसंज्ञा न व्हावी यावरिता 'भूवादयो धातव' सू १८ या सूत्रात 'भूवादय' हें पद व त्या सूत्राचे व्याख्यान करिताना कौमुदीत 'भ्वादय' हे पद मुद्दाम घातले आहे असा मनोरमेच्या वरील पक्तीतील 'च' या शब्दाचा भावार्थ आहे (प्रकृत सूत्रावरील भाष्यात भाष्यकार म्हणतात 'भुवादिपाठ' कर्तव्य । किं प्रयोजनम् ? । प्रातिपदिकाणवव्यादिनिवृत्त्यर्थं । प्रातिपदिकनिवृत्त्यर्थं, आणवयादिनिवृत्त्यर्थंश्च । के पुनराणवयादय ? । आणवयति, वट्टति, वड्डति ।' मागाहून 'हिक्क, पृथक्' हीं अव्यये व तसेच 'शिम्ये' हे तिङन्त पद 'भ्वादय' किम्' याची याग्य प्रत्युदाहरणे ठरत नसली तरी 'आणवयति, वट्टति, वड्डति' इत्यादि प्राकृत भाषेतील क्रियावाचक शब्द त्याची योग्य प्रत्युदाहरण ठरतात व या हेतूनेच दीक्षितांनी भावार्थनिदर्शनार्थ च मा भून् या मनोरमेतील पक्तीत च हें पद मुद्दाम घातले आहे असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा तात्पर्यार्थ आहे ) 'स्तम्भादीना दिक्कारणत सौत्राणां धातुत्व ज्ञाप्यते' या मनोरमेतील पक्तीत 'उदित्करणात' हा जो हेतु दिला आहे तो उपलक्षणार्थक आहे, म्हणजे सौत्र धातूंना धातु म्हणण्यास तवढाच एक हेतु नसून इतर कारणे दर्शविली आहेत (जृम्भ-मु' सू २२९१ या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या) स्तम्भु या सौत्रधातूच्या प्रकृतीपुढे येणाऱ्या च्लि' चा अनुवाद करून त्या च्लि च जागी (विकल्पेंकरून) 'अङ्' व्हावा असे विधान केले असल्यामुळे आणि तसेच ( स्तम्भुस्तुम्भु' सू २१५५ या सूत्रात निर्दिष्ट असलेल्या 'स्तम्भु, स्तुम्भु, स्कम्भु, स्कुम्भु या सौत्र धातूंहून) सार्वधातुक प्रत्यय आला असता त्यांना ( श्नु' किंवा 'श्ना' हें) विकरण व्हावे असे विधान केले असल्यामुळें, वरील दोन सूत्रांत पठित असलेल्या त्या त्या दिलेल्या शब्दांना धातुसंज्ञा होते ('च्लि लुङि' सू २२११ या सूत्रात 'धातोरेकाच' या पूर्व सूत्रातून 'धातो' हें पद अनुवृत्त होत

असल्यामुळें व तसेच विकरणविधायक सूत्रात देखील त्या पदाची अनुवृत्ति असल्यामुळें, ज्याहून 'च्लि' होणे सांगितले आहे किंवा विकरण होण्याचे विधान केले आहे ते धातु असलेच पाहिजेत वर दिलेल्या सौत्र धातूच्या विषयात तसे विधान केले असल्यामुळें ते धातुसंज्ञक आहेत हे सिद्ध होते ) त्याचप्रमाणे 'जुचङ्क्रम्य' सू ३१३० या सूत्रात पठित असलेल्या 'जु' या सौत्र धातूस व तसेच 'जपजभ' सू २६३८ या सूत्रात पठित असलेल्या 'पस्' या सौत्र धातूस आणि तसेच ('ऋते रीयङ्' सू २४२२ या सूत्रात पठित असलेल्या) 'ऋति' या सौत्र धातूस आणि पाणिनीय सूत्रात पठित असलेल्या इतर सौत्र धातूस उद्देशून धात्वधिकारात पठित असलेली कार्ये होणे सांगितले असल्यामुळें, ते धातुसंज्ञक ठरतात हें जाणावें ('जु' या सौत्र धातूहून 'युच्=अन' हा कृत् प्रत्यय होणे सांगितले आहे 'पस्' या सौत्र धातूहून 'यङ्' किंवा 'यङ्लुक्' केला असता, त्याच्या अभ्यासाला 'नुक्' आगम होणे सांगितले आहे 'ऋति' या सौत्र धातूहून 'स्वार्थे ईयङ्' होणे सांगितले आहे धात्वधिकारात पठित असलेली व धातूंना होणारी ही कार्ये त्याना उद्देशून सांगितली असल्यामुळें, ते सूत्र पठित शब्द जरी धातुपाठात पठित नाहीत तरी धातु आहेत हे स्पष्ट होते हेच इतर सौत्र धातूच्या संबधाने देखील जाणावें ) हे सौत्र धातु पूर्वी धातुपाठात पठित असून त्याचा पाठ पुढें नष्ट झाला असे अनुमान करता येते असा दीक्षिताच्या म्हणण्याचा भावार्थ आहे (पण असे अनुमान करण्यात गौरव असल्यामुळें) दीक्षितानी मनोरमेंत 'बहुलमेतन्निदर्शनम्' हे दुसरे समाधान सांगितले आहे, व ते मैत्रेय इत्यादि वैयाकरणाना संमत असलेल्या पक्षाला धरून सांगितले आहे ('बहुलमेतन्निदर्शनम्' याचा अर्थ असा आहे की, धातुपाठात पठित असलेले भ्वादि धातु हेच केवळ धातु नसून त्याखेरीज इतर धातु देखील आहेत त्यामुळेंच सूत्रनिर्दिष्ट व वार्तिकनिर्दिष्ट धातूना धातुसंज्ञा होण्यात काही अडचण येत नाही.

उदाहरणार्थ 'कण्ड्वादिभ्यो यक्' सू २६७८ या सूत्रानें कण्ड्वादि-गणात पठित असलेल्या धातूहून 'यक्' प्रत्यय होणें सांगितलें आहे. हे धातु धातुपाठात पठित नाहीत तरी पण त्या ३-१-२७ सूत्रावरील भाष्यात भाष्यकारानीं कण्ड्वादि हे धातु मानले आहेत त्या भाष्यात भाष्यकार म्हणतात-'उभयं कण्ड्वादीनि, धातवश्चैव प्रातिपदिकानि च। धातवश्चोभयम्, कण्डूयतीति हि क्रिया कुर्वाणे प्रयुज्यते, अस्ति मे कण्डूरिति वेदनामात्रस्य सान्निध्ये। अरर आहे-धातुप्रकरणाद्धातुः कस्य चासञ्जनादपि। आह चायमिमं दीर्घं मन्ये धातुर्विभाषितः इति।' तसें च 'कास्प्रत्ययादाम्' ३-१ ३५ या सूत्रावरील भाष्यात 'कास्यनेकाज्ग्रहणञ्चुलुम्पाद्यर्थम्' हे वार्तिक पठित केलें आहे 'चुलुम्प' इत्यादि धातु धातुपाठात पठित नाहीत तरी पण वार्तिककारानें त्याना धातु मानले आहे यावरून हें स्पष्ट होतें कीं, धातुपाठात पठित असलेल्या धातुखेरीज इतर धातु देखील आहेत आणि म्हणूनच कैयटानें प्रकृत सूत्रावरील भाष्याच्या वृत्तीत 'ये धातुपाठे पठितास्तेषामेव धातुसंज्ञा। तेषां च पाठो नोपलक्षणार्थः, यदि नु इयत्ताप्रतिपादनार्थं। नव यदि क्रियावाची धातुरित्येतल्लक्षणं क्रियेत तर्हि आणवयति वटयतीत्यादीनामपि धातुसंज्ञा स्यात्। अथ सूत्रपठितानामनन्तरं ते धातव इत्युच्येत, तदा तत्रापठितानां न स्यात्। तस्मादयुवादय इत्युक्तम्। तत्र सूत्रवार्तिकभाष्यगणेषु ये पठ्यन्ते तेऽपि सूत्रकारादिप्रामाण्याद्धातुत्वेनाश्रयणीया।' असें म्हटलें आहे म्हणून 'बहुलमेतन्निदर्शनम्' या गणसूत्रान्वयें धातुपाठात पठित नसलेल्या पण सूत्रकार, वार्तिककार व भाष्यकार यांनीं मानलेल्या धातुंना धातुसंज्ञा करता येते )

मनोरमा-"चाइ" अद्रव्यार्थी किम्? 'पशु' लिङ्ग-सख्यान्वितं द्रव्यम्। इह तु स्यादेव-'सोमं नयन्ति पशु मन्यमानाः'। 'पशु' इति सम्यगर्थे ॥

('चादयोऽसत्त्वे' सू. २० या सूत्राचा 'अद्रव्यार्थाश्चादयो

निपातसंज्ञा स्यु ' असा कौमुदीत अर्थ केला आहे व या पक्तींत) 'अद्रव्यार्थी ' हे पद असाकरिता घातले आहे कीं, 'पशु' या शब्दाला निपातसंज्ञा होऊ नये जें लिङ्ग व संख्या यांशी अन्वित होतें त्याला द्रव्य म्हणतात. 'लोघं नयन्ति पशु मन्यमाना' या श्रुतीतील 'पशु' या शब्दाला निपातसंज्ञा होतेच व त्या 'पशु' शब्दाचा 'सम्यक्' असा अर्थ आहे (चादिगणात 'पशु' हा शब्द पठित आहे व तो शब्द जेव्हा द्रव्याचा वाचक नसतो तेव्हाच त्याला निपातसंज्ञा होते पण 'पशु' या पुल्लिङ्गी व एकसंख्यावाचक शब्दाला निपातसंज्ञा होऊ शकत नाही, कारण लिङ्ग व संख्या यांशी अन्वित झालेला तो शब्द द्रव्यवाचक आहे )

शब्दरत्न– सम्यगर्थे इति । न च "लुघमपि नयन्ति पशु मन्यमाना " इति निरुक्ते 'पशुम्' इति सानुस्वारपाठात् तत्र पश्विति लुप्तविभक्तिकं सत्त्ववाचीति वाच्यम् । 'लोधम्' इत्यनवगतमिति तद्व्याख्योक्त्या तन्मात्रनिर्णायके निरुक्ते, पशुशब्दाेऽव्ययपाठे माना-भावात् । स्पष्ट चेदं प्रकृतसूत्रे हरदत्तग्रन्थे, दृशधातौ माधवग्रन्थे चेति दिक् ।

'लुघमपि नयन्ति पशु मन्यमाना ' या निरुक्तातील पाठात 'पशु' असा अनुस्वारयुक्त पाठ असल्यामुळें मनोरमेंत दिलेल्या श्रुतीतील 'पशु' हा शब्द लुप्तविभक्तिक, म्हणजे त्यांत द्वितीया विभक्तीच्या प्रत्ययाचा लोप झाला आहे, व तो शब्द द्रव्यवाचक आहे असे समजू नये, कारण त्या निरुक्तावरील भाष्यात 'लोधम्' या शब्दाचा अर्थ अज्ञात आहे असे म्हटले असल्यामुळें व त्या शब्दाचा अर्थ निश्चित करण्यापुरतेच तें निरुक्त प्रमाण असल्यामुळें, 'पशु' या शब्दाचा 'पशुम्' असा भिन्न सानुस्वार पाठ मानण्यास काहीच प्रमाण नाही प्रकृत सूत्रावरील हरदत्ताच्या व्याख्यानावरून व तसेंच माधवीय धातुवृत्तीत 'दृश्' धातूचें व्याख्यान करिताना माधवाने जें म्हटले आहे त्यावरून देखील हेंच सिद्ध होतें ('लाघ

नयन्ति पशु मन्यमाना ' ही ऋग्वेदाच्या तृतीय मण्डलातील ५३ व्या सूक्तातील तेविसावी ऋचि आहे या ऋचेवर 'लुब्धमृपि नयन्ति पशु मन्यमाना ' असे निरुक्त आहे या निरुक्तावरील भाष्यात 'लोधम् इति एतदनवगतम् । लुब्धम् इत्यवगम ।' असे म्हटले आहे या भाष्याचा अर्थ हा आहे की, 'लोधम्' या शब्दाचा अर्थ अज्ञात असल्यामुळें, निरुक्तकाराने त्या शब्दाचा 'लुब्धम्' असा अर्थ सांगितला आहे त्या भाष्यात असे मुळीच म्हटले नाही की, 'पशु' या शब्दाचा देखील अर्थ अज्ञात असल्यामुळें, निरुक्तकाराने त्या शब्दाचा 'पशुम्' असा अर्थ सांगितला आहे त्या भाष्यावरून हे स्पष्ट होते की, वरील निरुक्त 'पशु' या शब्दाच्या अर्थाचे निर्णायक नसून, केवळ 'लोधम' या शब्दाच्या अर्थाचच निर्णायक आहे व तेवढ्यापुरतच ते निरुक्त प्रमाण आहे म्हणून त्या निरुक्तांत आढळणारा 'पशुं' असा सानुस्वार पाठ प्रमाण मानता येत नाही व लेखकाच्या प्रमादामुळें तसा अशुद्ध सानुस्वार पाठ झाला असावा असा शब्दरत्नकाराच्या म्हणण्याचा आशय आहे 'दृशिर् प्रेक्षणे' या धातूवरील वृत्तीत माधवाने 'पशु । अर्जिदृशि'–उणादिसू २७–उप्रत्यय पशादेशश्च । यदायमसत्त्ववचनस्तदा चादित्वान्निपातत्व, यथा लोध नयन्ति पशुमन्यमाना इति, पशु सम्यगिति ह्यस्यार्थ ' असे म्हटले आहे तसेच प्रकृत सूत्रावरील पदमञ्जरीत हरदत्ताने देखील 'क्व तर्हि वर्तमान पशुशब्दोऽसत्त्ववचनो भवति, दृश्यर्थे, लोध नयन्ति पशु मन्यमाना इत्यत्र दृश्यर्थेन मनन विशेष्यते दर्शन-मननमननम्, सम्यक् मन्यमाना इत्यर्थ ' असे म्हटले आहे या वरील दोन्ही ग्रन्थात मनोरमेंत दिलेल्या श्रुतीतील 'पशु' हा शब्द लुप्त-विभक्तिक द्रव्यवाचक मानला नसून अद्रव्यवाचि निपातच मानला आहे व त्या शब्दाचा 'सम्यक्' असाच अर्थ दिला आहे यावरून हें स्पष्ट होते की, निरुक्तात आढळणारा 'पशुं' असा सानुस्वारपाठ लेखकप्रमादामुळें झाला आहे सारांश 'लुब्धमृपि नयन्ति पशु मन्य-

माना ' असा निम्नताचा शुद्ध पाठ समजावा असे मन्दरत्नकाराच्या म्हणण्याचे तात्पर्य आहे )

मनोरमा–"उपसर्गाः" निस्, दुस् इति सान्तौ, "निसस्तपतौ" इति निर्देशात् अयोगवाहानामविशेषेणेति प्रकरणे 'निष्कृतम्' 'दुष्कृतम्' इत्युदाहृत्य "इदुदुपधस्य सकारस्य यो विसर्जनीयः" इति भाष्यकारोक्तेश्च । "उपसर्गस्यायतौ" इति सूत्रे वामनोऽप्येवम् । "निरः कुषः" "सुदुरोरधिकरणे" इति निर्देशाद्रेफान्तावपीति तत्रैव सूत्रे हरदत्तः ॥

('गतिश्च' सू २३ या सूत्रावरील कौमुदीत पठित केलेले) 'निस्, दुस्' हे उपसर्ग सान्त आहेत, कारण 'निसस्तपतौ' सू २८०३ या सूत्रात 'निस्' असा सान्त निर्देश केला आहे. आणि तसेच 'अयोगवाहानामविशेषेण' या प्रकरणात 'निष्कृतम्, दुष्कृतम्' ही उदाहरणे देऊन भाष्यकारांनी 'इदुदुपधस्य सकारस्य यो विसर्जनीय.' असे म्हटले आहे ('हयवरट्' या शिवसूत्रावरील भाष्यात अयोगवाहाचा 'अट्' व 'शर्' प्रत्याहारात पाठ करावा असे प्रथम सांगून पुढे भाष्यकार म्हणतात–'अथवाऽविशेषेणोपदेशः कर्तव्यः । किं प्रयोजनम् ? । अविशेषेण सयोगोपधसंज्ञाल्लोपोऽन्यद्विर्वचनस्थानि-वद्भावप्रतिषेधा ' । व ही जी पाच प्रयोजने सांगितली आहेत त्यांपैकी द्वितीय प्रयोजनाचे, म्हणजे उपधासंज्ञेचे, व्याख्यान करिताना भाष्यकार म्हणतात–'उपधासंज्ञा च प्रयोजनम् । दुष्कृतम् निष्कृतम् । निष्पीतम् दुष्पीतम् । इदुदुपधस्य चाप्रत्ययस्य इति षत्वं सिद्धं भवति । नैतदस्ति प्रयोजनम् । नेदुदुपधग्रहणेन विसर्जनीयो विशेष्यते । किं तर्हि । सकारो विशेष्यते । इदुदुपधस्य सकारस्य यो विसर्जनीय इति ।' या वरील भाष्यात 'दुष्कृतम्, निष्कृतम्, दुष्पीतम्' ही जी चार उदाहरणे दिली आहेत त्यात असलेले उपसर्ग 'निर्, दुर्' असे रेफान्त मानल्यास, रेफाचे जागी झालेल्या विसर्गांचे ष व होणार नाही, कारण सकाराचे जागीं झालेल्या विसर्गांचेच 'इदुदुपधस्य' सू १५९ या सूत्रान्वये

पन्च होऊ शकते असे वरील भाष्यात सांगितले आहे या भाष्यावरून हें स्पष्ट होत की, 'निस्, दुस्' असे सान्त उपसर्ग आहेत.) उपसर्गस्यायतौ' सू ८-२-१९ या सूत्रावरील काशिकावृत्तीत वामनाने देखील असेच म्हटले आहे (त्या वृत्तीत वामनाने 'दुस् निस् इत्येतयोस्तु रुत्वस्यासिद्धत्वाल्लत्वेन नैव भवितव्यम् । निरयणम् दुरयणम्' असे म्हटले आहे या वृत्तीत देखील 'निस् दुस्' असा सान्त उपसर्गांचा निर्देश केला आहे यावरूनहि हे सिद्ध होते की, 'निस् दुस्' असे सान्त उपसर्ग देखील आहेत) 'निर कुप' सू २५६० या सूत्रात व तसेच 'सुदुरोरधिकरणे'–सू २९६५ वरील वार्तिक–या वार्तिकात 'निर् दुर्' असा अनुक्रमें निर्देश असल्यामुळें, 'निर् दुर' असे रेफान्त उपसर्ग देखील आहेत असे त्याच सूत्रावरील पदमञ्जरीत हरदत्ताने म्हटले आहे. ('उपसर्गस्यायतौ' सू ८-२-१९ या सूत्रावरील पदमञ्जरीत 'ननु च निर कुप, सुदुरोरधिकरणे इति निर्देशात् रेफान्तावप्युपसर्गौ स्त, तौ वचनस्यावकाशा इति वय व्यवधाने भवति' इत्यादि हरदत्ताने म्हटले आहे सारांश 'निस्, दुस, निर्, दुर्' असे दोन्ही प्रकारचे, म्हणजे सान्त व रेफान्त, उपसर्ग आहेत हे मनोरमेंतील व्याख्यानावरून स्पष्ट होते )

शब्दरत्न–वामनोऽप्येवमिति । तत्र हि 'दुस् सान्त' इति तेनोक्तम् ॥

'वामनोऽप्येवम' असे जें मनोरमेंत म्हटले आहे त्याचे कारण हे की, 'उपसर्गस्यायतौ' ८-२-१९ या सूत्रावरील काशिकावृत्तीत 'दुस् सान्त' असे वामनाने म्हटले आहे (वामनाचे म्हणणे वर मनोरमेंत दिलेच आहे )

॥ संज्ञाप्रकरण समाप्तम् ॥